# मराठयांच्या इतिहासाची साधने




पोर्तुगीज दप्तर—खंड तिसरा
आशिया विभाग (भाग १ ते ५)

[इ. स. १६६३–१७३९]



संपादक

ए. बी. द. ब्रागांस परेरा

अध्यक्ष, पुराणवस्तु संशोधन विभाग, गोवा सरकार, १९३९-४०

अनुवादक : श्री. स. शं. देसाई, विश्वकोश कार्यालय, वाई

# मराठ्यांच्या इतिहासाची साधने

## पोर्तुगीज दप्तर—खंड तिसरा

## आशिया विभाग

(भाग १ ते ५)

[इ. स. १६६३–१७३९]




संपादक

**ए. बी. द. ब्रागांस परेरा**

अध्यक्ष

**पुराणवस्तु संशोधन विभाग**

गोवा सरकार १९३९–४०




अनुवादक

**श्री. स. शं. देसाई**

विश्वकोश कार्यालय, वाई

प्र का श क :

© महाराष्ट्र राज्य

साहित्य व संस्कृति मंडळ



मु द्र क :

व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
मुंबई



किंमत सहा रुपये

पहिली आवृत्ति १९६८

# नि वे द न

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने ज्या विविध प्रकाशन-योजना हाती घेतल्या आहेत त्यांमध्ये महाराष्ट्राच्या सर्वांगीण इतिहासाच्या साधनांचे प्रकाशनही अंतर्भूत होते. पोर्तुगीज, डच व फ्रेंच यांचे भारताशी दळणवळण १७ व्या शतकापासून मोठ्या प्रमाणात सुरू होते. त्यांच्या तत्कालीन दप्तरांमधील महाराष्ट्राच्या व भारताच्या इतिहासाची पुष्कळ साधने अजून इतिहास-लेखकांना उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. त्याकरिता, पोर्तुगीज, डच आणि फ्रेंच उत्तम रीतीने जाणणाऱ्या स्वदेशी व विदेशी इतिहास-संशोधकांच्या प्रयत्नांची गरज आहे. श्री. ए. बी. द. ब्रागांस परेरा, अध्यक्ष, पुराणवस्तु संशोधन विभाग, पोर्तुगीज शासन, गोवा, यांनी परिश्रमपूर्वक केलेले संशोधन अनेक खंडांत पोर्तुगीज भाषेत प्रसिद्ध केले. त्यांतील खंड ३ रा, आशिया विभाग, या ग्रंथातील मराठ्यांच्या इतिहासाशी संबद्ध असलेली प्रकरणे काही वर्षांपूर्वी श्री. स. शं. देसाई यांनी आस्थापूर्वक अनुवाद करून साहित्य-संस्कृति मंडळाच्या स्वाधीन केली. श्री. देसाई हे इतिहासाचे चांगले अभ्यासू आहेत. त्यांचा पोर्तुगीज भाषेचा अभ्यास उत्तम असल्यामुळे त्यांनी मराठीमध्ये परिश्रमपूर्वक हा अनुवाद केला आहे.

महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबंधित असलेली अशा प्रकारची साधने मराठीत अनुवादून प्रकाशित करण्याचा जो कार्यक्रम मंडळाने आखला आहे त्यातील हे पहिले पुस्तक होय.

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ.

# भाग पहिला

[इ. स. १६६३–१७०८]

## प्रस्तावना

इसवी सनाच्या सहाव्या शतकापासून आठव्या शतकापर्यंत सावंतवाडी संस्थान चालुक्यांच्या राज्यात मोडत होते. दहाव्या शतकात ते यादवांकडे गेले. तेराव्या शतकात कल्याणच्या चालुक्य राजाकडे आले. चौदाव्या शतकात त्याच्यावर विजयनगरचा सुभेदार राज्य करीत होता. तो गोव्याला राहात असे. पंधराव्या शतकात त्याचा अंतर्भाव बहामनी राज्यात झाला आणि त्याच शतकाअखेर ते विजापूरच्या सुलतानाकडे गेले. कुडाळचें देसाई हे विजापूरकरांचे मांडलिक होते.

देसायांच्या राज्यात दोन करियता (Kariats), एक विलायत, बारा तरफा, वेंगुर्ल्यांचे बंदर, आणि मणेरी, पेडणे, डिचोली, साखळी, आणि फोंडे ह्या पाच परगण्यांचा अंतर्भाव होत असे.

सोळाव्या शतकाच्या मध्यास (इ. स. १५५४) मांग सावंत भोसले ह्यांनी विजापूरकरांविरुद्ध बंड पुकारले व वाडी संस्थान स्वतंत्र झाल्याचे जाहीर केले. परंतु पुढे मांग सावंतांच्या वारसदारांनी विजापूरकरांचे मांडलिकत्व पत्करले. इ. स. १६२७ साली, खेम सावंत भोसले ह्यांनी विजापूरकरांच्या पडत्या काळाची संधी साधून आपले संस्थान पुनः स्वतंत्र झाल्याचे जाहीर केले. इ. स. १६५० साली खेम सावंत ह्यांचे पुत्र लखम सावंत ह्यांनी कुडाळच्या देसायांचा मुलुख बळकावला व शिवाजी महाराजांचे मांडलिकत्व स्वीकारले. महाराजांनी खेम सावंत ह्यांना सरदेसाई हा किताब बहाल केला. शिवाजी महाराजांचे वर्णन पोर्तुगीज इतिहासकारानी पुढीलप्रमाणे केले आहे :—

"....Alma romantica e mistica, aventureiro ousado e feliz, admirador da mulher bela, qual cavaleiro audaute, olharagudo, magnetico cortese clemente para os venei doz, como Alexandre, inteligencia pronta e viva, decisās rapida, accão fulgurante a subitanea como a de Jucio Cesar, volonte de pinissance, evirgico e diseiplinador, etrategico notivel, grande visão politica e grande

poder de organizacão, jogando abilmente com as rivaldades autagonismos doz Mongoes, doz Tureoz de Bijapur, doz Portugueses, Tugleses e Franceses. Sivaji talhou a ponta da espada um grande imperio a custa doz rais manmetano do Bijapur, depontando a maior potencia Asiãtiead da e poca o Grão Mogol"

(A. B. de Braganca Pereira).

उपरिनिर्दिष्ट परिच्छेदाचा मराठी अनुवाद पुढीलप्रमाणे आहे :

"गूढ आणि अद्भुतरम्य, साहसप्रेमी, आणि धाडसी, नशीबवान, सुस्वरूप ललनांचा चाहता, एक भटका सरदार, आकर्षित करणारी तीक्ष्ण नजर, लाघवी चर्या, मनमिळावू आणि सौजन्यशील स्वभाव, शिकंदराप्रमाणे शरणांगतांना औदार्याने वागविणारा, उत्स्फूर्त आणि तरल बुद्धिमत्तेचा, झटपट निर्णय घेणारा, ज्यूलियस सीझरप्रमाणे विजिगीषु, कृती करणारा, दृढनिश्चयी आणि शिस्तप्रेमी, निष्णात डावपेची, दूरदृष्टीचा प्रतिभावान राजकारणपटु, कुशल संघटक, दिल्लीचे मोगल, विजापूरचे तुर्क, पोर्तुगीज, इंग्रज, डच, आणि फरेंच ह्या प्रतिस्पर्ध्यांशी मोठ्या चातुर्याने राजकारण खेळणारा. शिवाजीने आशिया खंडातील त्या कालच्या सर्वात मोठ्या मोगली सत्तेची परवा न करता, विजापूरकरांशी झुंज देऊन एक मोठे साम्राज्य (Um Grande Imperio) स्थापन केले." शिवाजी महाराजांचा एक समकालीन पोर्तुगीज व्हाइसराय कोंट ऑफ सेंट व्हिन्सेट (Cone de S. Vincente) ह्याने शिवाजी महाराजांची तुलना शिकंदर आणि सीझर ह्यांच्याशी केली आहे आणि ज्या वेळी महाराज निधन पावले तेव्हा त्यांचा सर्वात मोठा शत्रू औरंगजेब बादशहा ह्याने त्यांच्याविषयी पुढील उद्गार काढल्याचे मोंगलांच्या दरबारातील पोर्तुगीज राजदूताने नमूद करून ठेवले आहे.

"Morreo o um grande capiteão que senpre raspeitom a houra das mulheres Cativas"

(A. B. de Braganca Pereira Tutrodacão Arquivo Portugues Oriental).

"आपल्या हातात पडलेल्या शत्रूच्या स्त्रियांच्या अब्रूची कदर करणारा एक महावीर मरण पावला." इ. स. १६५९ साली लखम सावंत ह्यांनी आपल्या राज्याचा अर्धा महसूल शिवाजी महाराजांच्या स्वाधीन केला व तीन हजार पायदळ ठेवण्याची व किल्ल्यांचे रक्षण करण्याची त्यांची अट मान्य केली. परंतु शिवाजी महाराजांच्या मागण्या मान्य केल्याबद्दल लखम सावंत ह्यांना नंतर पश्चात्ताप झाला व त्यांनी विजापूरच्या सुलतानाचे मांडलिकत्व स्वीकारले.

इ. स. १६६० साली शिवाजी महाराजांनी पन्हाळा घेऊन चौलपासून दाभोळपर्यंतची किनारपट्टी कावीज केली. परंतु लखम सावंत ह्यांनी महाराजांना वेंगुर्ल्याच्या परिसरात रोखून धरले. इकडे विजापूरचा सरदार सिद्दी जोहार ह्याने विजापूरकरांना शस्त्रे आणि दारूगोळा पुरविणाऱ्या इंग्रज व्यापाऱ्यांची मदत घेऊन पन्हाळा पुनः काबीज केला. ह्या गोष्टीचा वेंगुर्ले येथील डच वखारीतील लोकांनी दि. ५ मे १६६० रोजी लिहिलेल्या एका पत्रात उल्लेख केला आहे.

इ. स. १६६१ साली शिवाजी महाराजांनी राजापूर, खारेपाटण आणि शृंगारपूर ही तीन ठाणी घेतली. महाराजांचे हे विजय रेविंग्टन, टेलर, आणि गायफोर्ड ह्या तिघा इंग्रजांनी १६६१ सालच्या जून महिन्यात लिहिलेल्या एका पत्रात मान्य केले आहेत.

शिवाजी महाराजांना त्यांचे वडील शहाजी राजे ह्यांची पूर्वसूचना मिळाल्याने त्यांनी विजापूरचा सरदार खवासखान, मुधोळचे राजे बाजी घोरपडे आणि लखम सावंत ह्या तिघा दोस्तांचा पराभव केला. मुधोळचे राजे बाजी घोरपडे आणि लखम सावंत ह्या दोघांनी महाराजांचे मांडलिकत्व पत्करले तर विजापूरच्या सुलतानाने शहाजी राजे ह्यांच्यामार्फत महाराजांशी तह करून त्याना उत्तरेस कल्याण, दक्षिणेस फोंडा, पश्चिमेस दाभोळ, आणि पूर्वेस इंदापूर ह्या दरम्यानचा प्रदेश बहाल केला. (Gazetteer of Bombay Presidency, XXI, pg. 374) ह्या तहाला शिवाजी महाराजांनी कैद केलेल्या इंग्रज व्यापाऱ्यांनी दि. ६ फेब्रुवारी १६६३ रोजी सुरतेला पाठविलेल्या एका पत्रात दुजोरा दिला आहे. हे व्यापारी विजापूरकरांना शस्त्रे आणि दारूगोळा पुरवीत होते. म्हणून महाराजांनी त्यांना कैद केले होते.

इ. स. १६६३ साली औरंगजेब बादशहाने शाहिस्तेखानाला मोठे सैन्य देऊन शिवाजी महाराजांवर पाठविले. शिवाजी महाराजांना विजय मिळावा म्हणून गोव्याचा पोर्तुगीज व्हाइसराय आंतोनियु द मेलु द काश्तु (Antonio de Melo de Castro) ह्याने पुढील सदिच्छापर संदेश धाडला :—

"मी देशाहून वसईला आलो, तेव्हा आपणाला कळविले की, आपल्या दोन्हीही देशांना मान्य अशा मनुष्याची माझ्याकडे रवानगी करावी. परंतु उत्तर लांबल्यामुळे सरकारला सोयीस्कर अशा आज्ञा करता आल्या नाहीत. आता ह्या पत्रान्वये आपणाला कळवीत आहे की, आम्ही एका अनुभवी अधिकाऱ्याला उत्तरेकडे पाठवीत आहोत. हा अधिकारी आपणाशी सल्लामसलत करून आम्हाला आपले विचार विदित करील. ह्या अधिकाऱ्याचे नाव दों आल्व्हारू द आताइद (Dom Alvaro de Ataide) हे असून, तो आपल्या

लोकांचे अनहित करणारे असे कोणतेच कृत्य आपल्या हातून होऊ देणार नाही, ह्याची मला खात्री आहे. मी आपणाला वचन देतो की, माझ्याकडून आपणाला जी काही मदत हवी असेल ती देण्यास मी कधीच कुचराई करणार नाही. मला आशा आहे की, आपण विजयी व्हाल, आणि आपली कीर्ती आणि आपल्या देशबांधवांचा दरारा सर्वत्र पसरेल."

गोवा, २७ एप्रिल १६६३.

आंतोनियु द मेलु द काश्चु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2 FLS 14)

शिवाजी महाराजांनी शाहिस्तेखानावर पुणे येथे अचानक हल्ला करून त्याचा पुरता पराभव केला. ह्या विजयाचा उल्लेख फिलिप गाय्फोर्ड ह्या नावाच्या इंग्रजाने ईस्ट इंडिया कंपनीच्या सुरत येथील कचेरीला कोल्हापूरहून लिहिलेल्या पत्रात केला आहे. हे पत्र दि. २४ मे १६६३ चे आहे.

शिवाजी महाराजांनी सावंतवाडीवर स्वारी केली. डिचोली आणि सांखळी ह्या दोन्ही प्रांतांच्या सुभेदारांनी भीतीने पळ काढला. (English Records on Shivaji, pg. 55) गोव्याचा व्हाइसराय आंतोनियु द मेलु द काश्चु ह्याने पुढील पत्र पाठवून, महाराजांचे अभिनंदन केले :

"शिवाजी राजे ह्यांस—

आपले पत्र मिळण्यापूर्वीच मी रामजी शेणवी कोठारी ह्यांच्याकडे अभिनंदनपर पत्र देऊन आपणांकडे रवाना केले होते. आपल्या विजयाबद्दल मी आपले अभिनंदन करतो ..........."

गोवा, ४ जून १६६३.

आंतोनियु द मेलु द काश्चु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2 FLS 17)

पोर्तुगीज व्हाइसरॉय आंतोनियु द मेलु द काश्चु ह्याने दि. १४ जानेवारी १६६४ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या पत्रात शिवाजी महाराजांनी शाहिस्तेखानावर मिळविलेल्या विजयाचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो :

"...... शिवाजी हा एक कष्टाळू आणि पराक्रमी राजा आहे. त्याने इनिझा मालुकु (Iniza Maluco ? ) चे राज्य बळकावले. हा प्रदेश डोंगराळ असल्याने त्याचे त्याला सुलभतेने रक्षण करता येते. इदालशा (आदिलशहा) च्या सैन्याशी त्याच्या अनेक लढाया झाल्या. पण त्या सर्व लढाया त्याने जिंकल्या. गेल्या वर्षी मोंगलांचे एक बलाढ्य सैन्य शिवाजीवर चालून आले. त्याने डोंगराळ प्रदेशाचा आसरा घेऊन मोगलांशी युद्ध सुरू

ठेवले. मोंगलांना आपल्या सैन्यास रसद पोचविणे अशक्य झाल्याने त्यांना माघार घ्यावी लागली. शिवाजीच्या सैन्याने एका अरुंद खिंडीत गाठून त्यांची धुळधाण उडवून दिली ............... ''

(LIVRO DAS MONÇÕES No. 29, FLS 83)

दि. २२ जून १६६३ रोजी ईस्ट इंडिया कंपनीचा प्रतिनिधी फिलीप गायफोर्ड हा गोव्याहून सुरतेला आपल्या मुख्य कचेरीला लिहितो, की, शिवाजी महाराज वेंगुर्ल्यास दोन हजार शिबंदी ठेवून माघारा परतले. (English Records on Shivaji) इ. स. १६६४ साली विजापूरच्या सुलतानाने शिवाजी महाराजांशी युद्ध पुकारले. दि. १४ मे १६६४ रोजी ईस्ट इंडिया कंपनीच्या कारवार शाखेतील इंग्रज कर्मचाऱ्यांनी सुरत येथील आपल्या मुख्य कचेरीला लिहिलेल्या पत्रात विजापूरच्या सुलतानाने शिवाजी महाराजांवर पाठविलेल्या सैन्यात ४,००० घोडेस्वार आहेत असे म्हटले आहे. (English Records on Shivaji, pgs. 56, 87, 91) विजापूरच्या सैन्याचे नेतृत्व सरदार कावसखान ह्याच्याकडे होते. शिवाजी महाराजांनी विजापूरच्या सैन्याचा पराभव केला. दि. २९ ऑक्टोबर १६६४ रोजी कारवारच्या इंग्रजांनी सुरतेला लिहिलेल्या पत्रात शिवाजी महाराजांनी विजापूरच्या सैन्याविरुद्ध मिळविलेल्या विजयाचा उल्लेख केला आहे.

प्रस्तुत विजयाबद्दल गोव्याच्या पोर्तुगीज व्हाइसरॉयने शिवाजी महाराजांना पत्र पाठवून त्यांचे अभिनंदन केले. हे पत्र दि. २९ नवंबर १६६४ चे आहे.

"शिवाजी राजे ह्यांस—

आपली ख्याली खुशाली आणि आपल्या यशाच्या बातम्या आम्हाला वरचेवर कळत आहेत. माझ्या पूर्वीचे व्हाइसरायची आणि आपली मैत्री होती व आपणा दोघांमध्ये पत्रव्यवहारही चालू होता ..............................

आपणाविषयी मलाही ओढा आहे ....................".

गोवा, २९ नवंबर १६६४.

(LIVRO DOS REIS VIZINHOS)

गोव्याच्या पोर्तुगीज व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास दि. ७ जानेवारी १६६५ रोजी लिहिलेल्या पत्रात शिवाजी महाराजांनी विजापूरचा सरदार खवासखान ह्याच्यावर मिळविलेल्या विजयाचा उल्लेख केला आहे, तो म्हणतो—

" महाराज

( ...............................................

Cavas can com dois mil cavalos e copia de infantaria en nossa visinhança the entron nas terras de Sivaji raze que facilmente rom-

peo, obrigando, a subir ogate e desemparar o Coneaŏ, e naŏ contente com isto passow oz mesmos montes que săŏ asperissimos, entrando o intarior do reino e pouca joruada de corte entendesse que os proprios capitães tem trato com Sivaji e concorrem dissimulando o em sua ruina por sen particular enteresse; ambos sue mandaram embaivadores. ......"

वरील परिच्छेदाचा सारांश पुढीलप्रमाणे आहे :

"विजापूरचा सेनापती खवासखान हा दोन हजार घोडेस्वार आणि मोठे पायदळ घेऊन चालून आला. शिवाजी राजांनी त्याला कोकण सोडून घाटावर जाण्यास भाग पाडले. इतकेच नव्हे तर दुर्गम पर्वत चढून त्याचा पाठलाग केला. आदिलशाहाच्या सरदारांचे शिवाजी राजे ह्यांच्याशी आतून संगनमत आहे. आपल्या वैयक्तिक स्वार्थासाठी ते आपल्या धन्याची नुकसानी करीत आहेत त्या दोघांनीही माझ्याकडे आपले वकील पाठविले. ......................".

गोवा, ७ जानेवारी १६६५

आंतोनियु द मेलु द काश्त्रुं

(LIVRO DAS MONÇÕES No. 31, FLS 20)

गोव्याच्या पोर्तुगीज व्हाइसरायने खवासखानास लिहिलेल्या पत्रात शिवाजी महाराजांच्या विजयाचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो की, शिवाजी महाराजांच्या भयाने सावंतवाडीचे पुष्कळ लोक गोव्यास पळून आले.
"दख्खनच्या राजाचे कोकणातील सुभेदार खवासखान ह्यांस--

आपल्या पत्रात आपण ज्या गोष्टीचा उल्लेख केला आहे, त्यासंबंधी मी आपणाला अनेकदा लिहिले आहे. आमच्या राज्यात जी माणसे येऊन राहिली आहेत त्यांना आमच्या हवाली करावे असे आपण जे लिहिता ते वाचून आश्चर्य वाटल्यावाचून राहात नाही. ते लोक शरणार्थी असून ते आपणावर हल्ला करू शकणार नाहीत. केशव नाईक ह्यानी चोरी केली असे आपण जे लिहिता तेही बरोबर नाही. त्यानी चोरीही केली नाही आणि शिवाजीलाही मदत केली नाही. उलट शिवाजीच्या भयाने ते इकडे पळून आले आहेत. इतर देसाई आणि बाकीचे लोक देखील आमच्या राज्यात शिवाजीच्याच भयाने पळून आले आहेत आणि वेंगुर्ल्याचे हवालदारही येथे सुखरूप आहेत........".

गोवा, १३ डिसेंबर १६६४

आंतोनियु द मेलु द काश्त्रुं

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 33)

इ. स. १६६५ साली शिवाजी महाराजांनी घाटमाथा आणि बारदेश महाल ह्यांमधल्या प्रदेशावर वर्चस्व प्रस्थापित केले होते. गोव्याचा व्हाइसरॉय शिवाजी महाराजांना दि. १६ एप्रिल १६६५ रोजी लिहितो—

"शिवाजी राजे ह्यांस—

आपल्या अधिकाऱ्यांच्या अतिरेकी वर्तनासंबंधाने मी आपणास ह्यापूर्वी लिहिले असून आता पुनः लिहीत आहे. ते लोक ह्या शहराकडे वहिवाटीच्या हक्का-प्रमाणे येणाऱ्या गुरांना अडथळा करतात आणि बारदेशहून इकडे अन्नधान्य घेऊन येणाऱ्या गोणीच्या बैलांकडील अर्धे धान्य काढून घेतात, अशी तक्रार आहे. असे कळते की, आपली नऊ जहाजे मुरगावच्या बेटानजीक आली व त्यानी कर्नाटकातून आमच्याकडे आलेला तांदूळ नेला व काही पोर्तुगीज लोकांना त्रास दिला. ते लोक आपल्या बायकांमुलांसह इकडे येत होते. ह्या सर्व घटनांवरून मला आता असे वाटू लागले आहे की, आपणाला पोर्तुगीजांशी सलोख्याचे संबंध ठेवायला नको आहेत. तरी ह्याचा खुलासा करावा. आमच्या आरमारी नौकांनी आपल्या ज्या नौका इकडे पकडून आणल्या आहेत, त्या मला जाळून टाकता आल्या असत्या. पण आपल्या स्नेहामुळे आम्ही तसे केले नाही. ह्या नौका आम्ही आता सोडून देत आहोत. मला आशा आहे की, अशा गोष्टी पुनः घडणार नाहीत. आपण सूज्ञ असल्याने फिरून आपणाला लिहिण्याची जरुरी नाही, आणि मी आपल्या निदर्शनास आणून देत आहे की, पोर्तुगीज लोक आपल्या मित्रांचे चांगले मित्र म्हणून वागत आले आहेत."

चोडणे, १६ एप्रिल १६६५

आंतोनियु द मेलु द काश्चुं

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 33)

इ. स. १६६५ च्या सुरुवातीला औरंगजेब बादशहाने महाराजा जयसिंग ह्यांना शिवाजी महाराजांचे पारिपत्य करण्यासाठी मोठे सैन्य देऊन पाठविले. जयसिंग पुण्यास दि. ३ मार्च १६६५ रोजी येऊन पोहोचले.

महाराजा जयसिंग ह्यांच्या शिवाजी महाराजांवरील स्वारीसंबंधाने गोव्याचा व्हाइसरॉय आपल्या राजास लिहितो :

"महाराज,

अली इदालशा (आदिलशहा) राजाच्या राज्याची सीमा साळ नदीला भिडली असून साष्टी महालातील ते शापोरापर्यंतचे शेवटचे बंदर आहे आणि शापोरा

हे देखील बारदेशचे शेवटचे बंदर आहे. बारदेशमध्ये सांप्रत मोठी धामधूम सुरू आहे. कारण, बऱ्याच वर्षांमागे शिवाजी ह्या नावाचा एक देशी मांडलिक राजा आदिलशहाविरुद्ध बंड करून उठला. आदिलशहाच्या सैन्याशी शिवाजीच्या अनेक झटपटी आणि लढाया झाल्या. पण त्या सर्व लढाया त्याने जिंकल्या. त्याचे कारण हे की, प्रदेश डोंगराळ असल्याने घोडदळाला त्या प्रदेशात हालचाली करता येत नाहीत. त्याचा फायदा शिवाजीला मिळाल्याने त्याने आदिलशहाच्या सैन्याचा लीलेने पराभव केला, इतकेच नव्हे, तर त्या सैन्याची मोठीच हानी केली. ते पाहून मोगल बादशहाने शिवाजीवर मोठे सैन्य धाडले. पण त्या जंगली लोकांच्या निष्काळजीपणाने म्हणा अथवा शिवाजीने त्यांना पैशांची लाच चारल्याने म्हणा, शिवाजी आपल्या दुर्गातून (किल्ला) निसटला व बरोबर आठ किंवा दहा हजार सैन्य घेऊन तो दोन्ही सैन्यांमधून एखाद्या वीजेप्रमाणे बाहेर पडला. तो थेट सुरतेवर चालून गेला त्याच्या हल्ल्याची कुणालाच कल्पना नसल्याने सुरतेचे लोक गाफील होते. त्यामुळे शिवाजीला मुळीच प्रतिकार झाला नाही. त्याने ते शहर खुशाल लुटले व सर्व लूट नौकांमध्ये भरून त्या त्याने आपल्या मुलखाला पाठवून दिल्या. शिवाजीने सुरतेवर हल्ला केल्याची वार्ता औरंगजेब बादशहाला कळताच त्याला भयंकर दुःख झाले व त्याने शिवाजीचे पारिपत्य करण्यासाठी महाराजा जयसिंग ह्या नावाच्या आपल्या एका मांडलिक राजाला मोठे सैन्य देऊन पाठविले. ह्या राजाने शिवाजीचे अनेक दुर्ग घेतले व त्याला मोगल बादशाहाचे मांडलिकत्व स्वीकारण्यास भाग पाडले ................ ".

गोवा, २८ जानेवारी १६६६

आंतोनियु द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS MONÇÕES No. 35, FLS 145).

इ. स. १६६६ साली शिवाजी महाराजांनी विजापूरकरांविरुद्ध औरंगजेब बादशहाशी दोस्ती करून फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला. परंतु पोर्तुगीजांनी विजापूरकरांना मदत केल्याने शिवाजी महाराजांना वेढा उठविणे भाग पडले. (LIVRO DOS REIS VIZINHOS)

दि. १२ मे १६६६ रोजी शिवाजी महाराज आग्र्याला औरंगजेबाच्या दरबारात दाखल झाले व दि. १९ ऑगस्टला कैदेतून निसटले. आग्र्याहून परतल्यावर त्यांनी विजापूरकरांशी पुन: युद्ध सुरू केले. (Faruki, Aurangzeb, And his Times) शिवाजी महाराजांच्या पलायनाचा वृत्तांत गोव्याच्या

व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजाला पाठविलेल्या पत्रात सादर केला आहे. तो म्हणतो :—

"महाराज,

प्रस्तुत पत्रानुसार मी आपणाला आमच्या मुलुखास लागून असलेल्या राजांची माहिती सादर करीत आहे. साष्टी आणि बारदेश ह्या महालांना अली इदालशा (आदिलशहा) ह्या राजाच्या राज्याची हद्द भिडते. हा राजा सांप्रत त्याचा एकेकाळचा मांडलिक शिवाजी ह्याच्याशी युद्धात गुंतला आहे. त्या दोघांचे युद्ध अनेक वर्षापासून चालू आहे. पण शिवाजीचा नेहमीच विजय होत आला आहे.

औरंगजेब हा मोगलांचा राजा आहे. त्याच्यापाशी मोठे घोडदळ आणि पायदळ आहे. गेल्या वर्षी आमच्या वसईच्या शेजारच्या प्रदेशात त्याचे मोठे सैन्य होते. त्या सैन्याचे अधिपत्य सेनापती मिर्झाराजा जयसिंग ह्यांच्याकडे होते. त्याने आमच्याकडे आपले दूत पाठवून व्यापार आणि मैत्री ह्यांच्या वृद्धीसंबंधाने आमच्याशी वाटाघाटी केल्या.,,

गोवा, २७ जानेवारी १६६७. काँट. व्हि. रेई.

(LIVRO DĀS MONÇOĒS)

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास पाठविलेल्या एका पत्रात शिवाजी महाराजांनी आग्र्याहून केलेल्या अद्‌भुतरम्य पलायनाचा वृत्तांत सादर केला आहे. ह्या पत्रात त्याने शिवाजी महाराजांची शिकंदर आणि ज्युलिअस सिझर ह्या प्राचीन कालच्या प्रख्यात वीरांशी तुलना केली आहे. तो म्हणतो

As ashieias, o valor, a actividade, e a prudencia militar deste homē que se pode igoalar Cō a doz Cesares e Alexandres, e fim sentoor he homē que estā em loda parte a nao tem logar cer.o em, menhüa e farguerra a Jōda Asia ........."

"शिवाजी एका फळांच्या पेटाऱ्यात बसून तुरुंगातून मोठ्या शिताफीने बाहेर पडला. तो छत्तीस तास पेटाऱ्यात होता. तो आपल्या देशास आल्याचे कळताच आदिलशहाने त्याच्या विरुद्ध हालचाली करण्यासाठी चाळीस हजार घोडेस्वार व मोठे पायदळ गोळा केले व तो घाटाखाली उतरला. तो आमच्या हद्दीपासून अवघ्या सहा मैलाच्या अंतरावर होता. त्याच्या सैन्याने सगळीकडे जाळपोळीचे आणि लुटमारीचे सत्र सुरू करताच शिवाजीने त्याच्या सेनापतीकडे एक मोठा नजराणा पाठविला. त्या नजराण्याने सेनापती खूष झाला व आपल्या सैन्यास त्याने आवरते घेतले. शिवाजी त्याचीच वाट पहात होता.

तो एकाद्या वीजेप्रमाणे कोकणात शिरला व आदिलशहाच्या सेनापतीला त्याने जे द्रव्य भेट म्हणून पाठविले होते त्या द्रव्याच्या तिप्पट द्रव्य त्याने त्याच्याकडून वसूल केले. त्याने कोकणातील अनेक देसायांना आपल्या अंकित केले, आणि आता तो फोंडा महालात आमच्या हद्दीपासून अगदी जवळ येऊन पोहोचला. आहे. धूर्तपणा, चातुर्य, पराक्रम, चपलता आणि लष्करी बुद्धी ह्या बाबतीत शिवाजीची तुलना करायची झाल्यास ती सीझर आणि सिकंदर ह्यांच्याशी करावी लागेल. तो नाही अशी एकही जागा नाही, तो सबंध आशियाशी युद्ध करीत आहे. मोगल बादशहापाशी लक्षावधी सैन्य आहे. पण ह्या सैन्याला न जुमानता त्याने सुरत शहर लुटले. मोगल सैन्याप्रमाणेच आदिलशहाचे सैन्यही त्याच्या दुसऱ्या बाजूस होते. परंतु ह्या दोन्ही बलाढ्य शत्रूंमधून तो सुरतेहून सुरक्षितपणे मागे परतला. जमिनीप्रमाणे समुद्रावरही त्याचा दरारा आहे. आम्हाला त्याच्या आरमाराची भिती वाटते. कारण, समुद्र किनाऱ्यावर त्याचे किल्ले आहेत. त्याच्यापाशी असलेल्या नौका जरी सगळ्याच मोठ्या नसल्या, तरी बऱ्याच लहान लढाऊ नौका त्याच्यापाशी आहेत ,,.

(MS. 33 BIBLIOTECA NACIONAL DE PARIS, FLS 129)

शेवटी शिवाजी महाराज व विजापूरचा सुलतान ह्या दोघांमध्ये तह होऊन युद्धास विराम पडला. शिवाजी महाराजांनी १६६७ सालच्या नवंबर महिन्यात पोर्तुगीजांच्या ताब्यात असलेल्या बार्देश महालावर स्वारी केली. दिनांक ७ जानेवारी १६६९ रोजी काश्त्रुं (CASTRO) व सांपायु (SAMPAIO) ह्या दोघा गव्हर्नरांनी पोर्तुगालला आपल्या राजास पुढील पत्र लिहिले. ह्या पत्रात त्यांनी शिवाजी महाराजांनी दिनांक २० नवंबर १६६७ रोजी बार्देशवर स्वारी केल्याचा उल्लेख केला आहे :—

" महाराज,

शिवाजी राजे ह्यांच्यासंबंधाने कॉंद व्ही. रेई ह्यांनी आपणाला बरीच माहिती सादर केली आहे. हा राजा अली आदिलशहा ह्याचा एक मनसबदार होता. त्याच्या हाताखाली असलेले सैन्य अगदीच लहान होते. त्याने आदिलशहा विरूद्ध बंड करून, त्याचा कोंकणांतील सर्व मुलुख काबीज केला. त्याचे तेवढ्याने समाधान झाले नाही. आपले राज्य वाढविण्याच्या हेतुने तो दिनांक २० नवंबर १६६७ साली आमच्या बार्देश महालांत शिरला..........................................'

गोवा, ७ जानेवारी १६६९.

आपले प्रजाजन

आंतोनियु मेलु द काश्त्रु–मानुपल कोर्तेरेयाल द सांपायु.

(LIVRO DAS MONÇOES No. 35, FLS 13)

शिवाजी महाराजांच्या बार्देश वरील स्वारीचा उल्लेख ईस्ट इंडिया कंपनीच्या गोव्यांतील प्रतिनिधीने दिनांक ३० नव्हंबर १६६७ रोजी आपल्या कंपनींच्या मुख्य कचेरीला लिहिलेल्या पत्रांत केला आहे. तो म्हणतो की, शिवाजी महाराज बार्देश महालांत शिरले व त्यांनी तिथल्या चार पाद्रयांची मुंडकी छाटली. त्यांच्या भयाने गोव्याच्या व्हाइसरॉयने (हिंदू विरूद्ध) काढलेला भयंकर हुकूम रद्द केला. शिवाजी महाराजांनी सबंध प्रदेशाची जाळपोळ केली. शेवटी ते १५० लक्ष पागोडा घेऊन बार्देशमधून बाहेर पडले. (ENGLISH RECORDS ON SHAIVJI, p. 119) शिवाजी महाराजांनी बार्देशवर जी स्वारी केली त्याला गोव्यातील हिंदूचा धार्मिक छळ हे मुख्य कारण होते. त्यांतच डचानीही त्यांना पोर्तुगिजांविरूद्ध चिथावणी दिली होती. तिसरे कारण म्हणजे लखम सावंत आणि केशव नाईक ह्या दोघां महाराजांच्या शत्रूंना पोर्तुगिजांनी आश्रय दिला होता हें.

पण केशव नाईक हा कोण होता? कॉजम द ग्वार्द (COSME DA GUARDA) हा म्हणतो :—

"शिवाजी कोकणांत शिरला व त्याने कोकणामध्ये राहाणाऱ्या देसायांपासून आपली मोहीम सुरू केली. लखम सावंत, केशव पोरूऊं..................................
केशव नाईक आणि राउळो शेणवी ह्यांच्यावर शिवाजी महाराजांच्या सैन्याची पहिली धाड आली. हे सर्व देसाई म्हणजे सम्राटाला खंडणी देऊन राज्य करणाऱ्या इटालीतील संस्थानिकांसारखे होते. कोकणातील देसाई हे आदिलशहाचे मांडलिक होते. ते गोवा शहराच्या जवळच राहात असत. ह्यांतला प्रत्येक देसाई एका लहानशा राज्यात ऐषआरामात राहात असे. कोकणात शिरल्यावर शिवाजीने पहिले काम कोणते केले असेल तर ते आपण कोकणचा सुभेदार म्हणून द्वाही फिरविण्याचे, राजा म्हणून नव्हे. पण त्याने स्वतःच वेंगुर्ला शहर लुटले–येथे डचांची व्यापारी वखार होती. पण तिला त्याने हात लावला नाही. व तो लखम सावंताच्या राज्यात बांद्यामध्ये शिरला. लखम सावंताने त्याचा थोडा प्रतिकार केला. पण नंतर त्याने जंगलात पळ काढल्याने त्याचा बचाव झाला. शिवाजीने लखम सावंताच्या राज्याची लुटालूट केली, व मग तो केशव नाईक व केशव पारूऊं ह्या दोघांच्या राज्यांत शिरला. ह्या दोघांकडून त्याला तीव्र प्रतिकार झाला,.......त्याची बरीच माणसे कामास आली पण अखेर त्याने त्यांना पिटाळून लावले. त्या दोघांनी मोठ्या विपन्नावस्थेत गोव्याचा आश्रय घेतला. राउळो शेणवी ह्याचीही तीच गत झाली. तोही गोव्याच्या आश्रयास आला."

(VIDA E ACÇOÊS DO FAMOSO E FELECISSIMO SEVAJI)

लखम सावंत हा सावंतवाडीचा राजा आणि केशव नाईक आराऱ्याचा देसाई होता.

शिवाजी महाराजांच्या गोव्यावरील स्वारीचा सुगावा गोव्याच्या व्हाईसरॉयला लागताच त्याने दिनांक १६ नवंबर १६६७ रोजी रासई, तिवी, शापूर, नारवे, पास्सु, सेकु आणि सांतियागु द भाणस्तरी येथील किल्लेदारांना, व रेवोडा आणि नादोडा येथील देसाई व राणे ह्यांच्या सहायक सैन्याला, तसेच पोर्तुगीज आरमाराचा कप्तान फेर्नाव वाज द सिकैरा ह्याला जागरूक राहाण्याचा इशारा दिला.

गोव्याचा व्हाइसरॉय सेक्रेटरीला लिहितो :—

" सेक्रेटरी ह्यांस—

मला आतांच कळले की, शिवाजीचे आणखी सैन्य आणि नौका चालून येत आहेत. तरी आपण बार्देशहून.........ह्याला माझ्याशी बोलणी करण्यास पाठवावे व तिवी आणि शापोरा येथील किल्लेदारांना हुश्शार राहण्याचा हुकूम धाडावा. त्याचप्रमाणे रेवोडा व नादोडा येथील राण्यांना सैन्याची जमवाजमव करण्याचा हुकूम धाडावा. त्यांना कळवावे की, परकी लोकांना आमच्या राज्यांत घेण्यास त्यांनी मनाई करावी. फक्त जे लोक वहिवाटीप्रमाणे येत होते त्यानाच येण्याची परवानगी द्यावी ............ आणि मला असे वाटते की सर्व राज्यांना त्यांच्या सैन्यासह जय्यत तयार राहण्याचा हुकूम धाडलेला बरा. त्यामुळे बार्देशमधील सर्व लष्करी अधिकाऱ्यांना जागरूक राहण्याचा इशारा मिळेल. आणि ज्या अर्थी सेनापती इकडे येणार आहेत, त्याअर्थी मी त्याना हाच इशारा देईन, आणि त्याला लगेच पाठवून देईन. आपण कॅप्टन फेर्नाव व्हाज द सिकैरा ह्यांना इशारा द्यावा, की, त्यांनी शिवाजीच्या युद्ध नौकाना तोंड देण्याची सर्व सिद्धता करावी, गाफील राहूं नये. सार्ज्रेत मोर ह्यांनाहि हाच इशारा द्यावा म्हणजे ते जय्यत तयार राहतील ...................... देव तुमचे रक्षण करो."

गोवा, १५ नवंबर १६६७.

कॉंद व्ही. रेई.

(LIVRO DAS CARTAS ORDES E PORTARIAS)

गोव्याचा व्हाइसरॉय रासईच्या किल्लेदारास शिवाजी महाराजांच्या बार्देश वरील स्वारीचा इशारा देऊन लिहितो :—

"रासईचे किल्लेदार ह्यांस—

" मला बातमी कळली आहे, की, शिवाजीचे मोठे सैन्य आणि आरमार चालून येत आहे. तरी मी तुम्हाला आज्ञा करतो की, तुम्ही तुमच्या सैन्यासह

जय्यत तयार रहावे. शत्रूकडून ज्या ठिकाणी किल्ल्याचा भेद होण्याची भीती असेल त्या ठिकाणी सैन्य ठेवण्याची दक्षता घ्यावी ........................ देव तुमचे रक्षण करो."

गोवा, १५ नवंबर १६६७ काँद व्ही. रेई.

(LIVRO DAS CARTAS ORDES E PORTARIAS)

"वार्दे, पास्सु सेकु, व सांतियागु येथील किल्लेदारांस--

मला बातमी कळली आहे की, शिवाजीचे सैन्य चालून येत आहे. त्याची तुम्हाला सूचना देणे हे माझे कर्तव्य आहे. तरी प्रतिकाराच्या तयारीने हत्यारबंद रहावे. देव तुमचे रक्षण करो".

गोवा, १५ नवंबर १६६७. काँद व्हि. रेई.

(LIVRO DAS CARTAS ORDES E PORTARIAS)

शिवाजी महाराजांनी बार्देशवर खरोखरच स्वारी केली की काय हा एक विवाद्य मुद्दा आहे. कांहीच्या मते शिवाजी महाराजांचे ५०० ते ६०० लोक बार्देशमध्ये शिरले होते, तर कांहींच्या मते ते ६,००० होते. कांहींच्या मते शिवाजी महाराज आपल्या सैन्याबरोबर बार्देशमध्ये जातीने हजर होते. तर कांहीच्या मते ते वेंगुर्ल्यास होते, बार्देशला आलेच नाहीत.

शिवाजी महाराज सहा हजार सैन्यासह बार्देशमध्ये घुसले नाहीत आणि त्यांच्या सैन्याने १६ खेडींहि जाळली नाहीत हे ईस्ट इंडिया कंपनीच्या कारवार शाखेने सुरतेला आपल्या मुख्य शाखेस दिनांक १६ डिसेंबर १६६८ रोजी पाठविलेल्या पत्रावरून सिद्ध होते. ह्या पत्रांत म्हटले आहे की, शिवाजी महाराजांचे ४०० ते ५०० लोक गोव्यामध्ये शिरले होते. पोर्तुगिजांचे सैन्य रात्रीचे बेसावध असतांना एक रस्ता काबीज करून आपले सैन्य गोव्यात घुसविण्याचा त्यांचा बेत होता. परंतु पोर्तुगिजांना त्यांच्या हालचालीचा सुगावा लागल्याने त्यांचा बेत फसला. शिवाजी महाराजांनी आपले सैन्य गोव्यांतून काढून घेतले. तदनंतर पोर्तुगीज व्हाइसरॉयच्या आणि त्यांच्या तहाच्या ज्या वाटाघाटी झाल्या त्यावेळी गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांना पुढील पत्र लिहिले :-

"शिवाजी राजे ह्यांना काँद व्हि. रेई लिहितो : मी ह्या राज्यांत आल्यावर आमच्या मित्रांशी आणि आशिया खंडातील सर्व राजांशी मी मैत्रीचे संबंध चालू ठेवण्याचा प्रयत्न केला. आपणाशी तर मी विशिष्ट मैत्रीने वागलो. मी आपणाकडे माझा दूत पाठविला आणि पहिले पत्र धाडले. पण आपल्याकडून उत्तर आले नाही आणि आपले जे पहिले पत्र आले ते आपले सैन्य माझ्या स्वामींच्या राज्यांत घुसल्यावर.

मी आपणांस कळवू इच्छितो की, आमच्या राज्यांत देसायांनीं आणि आदिलशहाच्या प्रजाजनांनी जो आश्रय घेतला आहे, तो कायदेशीर आहे. त्या कायद्याविरूद्ध आम्हाला वागता येत नाही. कारण, पोर्तुगीज लोक हे वचनाला जागणारे आणि श्रद्धेचे रक्षण करणारे आहेत, हे आपणाला आणि जगाला माहीत आहे. आमच्या राज्याचा आश्रय ज्या लोकांनी घेतला आहे, ते आमच्या राज्यांत राहून आपणाशी युद्ध करणार नाहीत ह्याची आम्ही हमी देतो. पण ते जर तुमच्या राज्यांत राहून तुम्हाला पीडा देऊ लागले तर त्याचा दोष आमच्यावर राहणार नाही. पोर्तुगीज हे आपल्या मित्रांना अंतःकरण देणारे असतात. शत्रूला मात्र ते कधीच जवळ करीत नाहीत. एवढे लिहून हे उत्तर पूर्ण करतो. देव आपले भले करो".

गोवा, २३ नवंबर, १६६७. काँद व्हि. रेई.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 73)

"शिवाजी राजे ह्यांस—

आपले दुसरे पत्र मिळाले. आपल्या पहिल्या पत्राचे जे उत्तर माझ्याकडून आपणाकडे रवाना झाले आहे, त्याच्यावरून शांततेच्या कराराचा आणि मैत्रीचा भंग करण्यास कोण जबाबदार आहे त्याची आपणाला कल्पना होईलच. आता आपण आमच्याकडे ज्या शांततेच्या कराराची मागणी करतां तो करार आपल्याच हातात आहे...................... देव आपले रक्षण करो व आपणावर दैवी अनुग्रह होवो."

गोवा, २४ नवंबर १६६७. काँद व्हि. रेई.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 73)

पोर्तुगीज व्हाइसरॉयने रामजी शेणवी कोठारी ह्या नांवाचा एक दूत तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी पाठविला, त्या प्रसंगी व्हाइसरॉयने शिवाजी महाराजांना पुढील पत्र धाडले :—

"शिवाजी राजे ह्यांस—

आपल्या विनंतीनुसार मी आपणाकडे आमचा दूत रामजी शेणवी कोठारी ह्यांना पाठवित आहे. तरी तहाच्या करारासंबंधाने आपले जे काय विचार असतील ते त्यांना विदित करावे."

गोवा, २४ नवंबर १६६७ काँद व्हि. रेई.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 71V)

'शिवाजी राजे ह्यांस—

रामजी शेणवी कोठारी ह्यांच्याकडे पाठविलेले पत्र पावले, आणि ते वाचून कळून चुकले की, आपल्या सैन्याने आमच्या राज्यांमध्ये घुसून जो आम्हा दोघांमधील मैत्रीचा भंग केला, ती मैत्री पुनः सांधण्याची आपली इच्छा आहे. मी आपणास कळवू इच्छितो कीं, आम्ही मैत्रीच्या वाटाघाटी करण्यास सदैव तयार आहोत. तरी आवश्यक ते अधिकार देऊन आपला दूत आमच्याकडे पाठवावा.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणाला प्रकाश दाखवो.

गोवा, २७ नव्हंबर १६६७.

काँद व्हि. रेई.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 71V)

पोर्तुगीजांशी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी शिवाजी महाराजांनी साकोपंत ह्या नांवाचा एक दूत आवश्यक ते अधिकार देऊन रवाना केला. पोर्तुगीजांनी पाद्री सेबास्तियांव मार्तीश ह्याला आपला दूत म्हणून शिवाजी महाराजांकडे तहाच्या करारावर त्यांची सही घेण्यासाठी पाठविले.

शिवाजी महाराजांचा पोर्तुगीजांशी जो शांततेचा आणि मैत्रीचा करार झाला त्याचा पोर्तुगीज आराखडा पुढील प्रमाणे आहे.

शिवाजी राजे आणि काँद व्हिसे रेई ह्यांच्यामधील मैत्रीच्या आणि शांततेच्या कराराची कलमे पुढील प्रमाणें आहेत :—

(१) दिनांक १९ नवंबर १६६७ रोजी शिवाजी राजांच्या सैन्याने बार्देशमध्ये शिरून जे पुरुष, स्त्रिया आणि मुले युद्ध कैदी म्हणून नेले व माझ्या राजाच्या प्रजाजनांची गुरे आणि बैल पळविले, त्यांना शिवाजी राजे ह्यांनी आमच्याकडून कोणतीच युद्ध खंडणी न घेतां आम्हास परत करावे.

(२) आमच्या राज्याच्या आश्रयास येऊन राहिलेल्या लखम सावंत आणि केशव नाईक ह्या देसायांना सक्त ताकीद देण्यात येईल की, त्यांनी आमच्या राज्यांत राहून शिवाजी राजे, त्यांचे प्रजाजन, आणि त्यांचे राज्य ह्या विरुद्ध कोणतीच कारवाई करू नये आणि त्यांच्या हातून तसे कृत्य घडल्याची जाणीव आम्हाला झाल्यास अथवा

शिवाजी राजांनी ते आमच्या निदर्शनास आणल्यास त्या देसायांना आमच्या स्वामींच्या राज्यांतून तावडतोब हांकलून देण्यात येईल. आमच्या स्वामींच्या राज्यात येऊन राहिलेले दुसरे दोन शरणार्थी नारबा सावंत आणि मालू शेणवी ह्यांनाहि अशीच ताकीद दिली जाईल. आणि सर्व प्रकारची अंदाधुंदी टाळण्यासाठी सदरहू देसाई जोपर्यंत आमच्या राज्यात असतील तोपर्यंत त्यांना गोवा बेटाबाहेर जाऊ दिले जाणार नाही.

(३) बालाघाटहून गोवा बेटांत आणि बंदरात आणि बार्देश व साष्टी महालांत जो माल आणि गुरे येतील ती अडविली जाऊ नयेत व त्यांच्यावर कर लादला जाऊं नये. त्याचप्रमाणे पोर्तुगालच्या राजाच्या ह्या राज्यातून आणि बेटातून जो माल बालाघाटला जाईल, त्याचीही अडवणूक होऊ नये अथवा त्याच्यावर कर लादला जाऊ नये. मग शिवाजी राजे व आदिलशहा ह्यांच्यामध्ये युद्ध चालू असो वा नसो.

(४) उभय पक्षांची दृढ आणि चांगली मैत्री असावी आणि समुद्रावर आणि जमिनीवर ही मैत्री टिकावी आणि उभय पक्षांपैकी कुणा एकाकडून या कराराचा भंग झाल्यास त्याने दुसऱ्याकडे तत्संबंधाने तक्रार करावी. आमच्याकडून आगळीक झाल्यास शिवाजी महाराजांनी आमच्याकडे तक्रार करावी आणि शिवाजी महाराजांकडून आगळीक झाल्यास आम्ही त्यांच्यापाशी तक्रार करावी.

(५) जर शिवाजी राजांना काँद व्हिसे रेई ह्यांच्याशी एखादा महत्त्वाचा सौदा करायचा असेल, तर त्यांना त्यांच्या विश्वासातील व्यक्तिमार्फत त्या वाटाघाटी करतां येतील.
गोवा, ५ डिसेंबर १६६७.

काँद व्हि. रेई.

(LIVRO DAS PAZES, FLS 169)

उपरिनिर्दिष्ट करारावर उभय पक्षांच्या सह्या झाल्या त्या दरम्यान मोगलांचे एक मोठे सैन्य शिवाजी महाराजांवर चालून येते होते. शिवाजी महाराजांना नेस्तनाबूद करण्यासाठी मोगलांनी पोर्तुगीजांपाशी मदत मागितली होती. तो प्रस्ताव गोव्याच्या व्हाइसरॉयने शिवाजी महाराजांना कळविला. शिवाजी महाराजांकडे तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी गेलेला गोव्याच्या व्हायसरॉयचा प्रतिनिधी पाद्री गोंसालु मार्तीश ह्याला व्हाइसरॉय लिहितो :

"पाद्री गोंसालु मार्तीश ह्यांस.......................................................

..............................................................................................

सुरतेच्या नबाबाकडून आज मला आलेल्या एका पत्रावरून असे कळते की, मोगलांचे एक प्रचंड सैन्य शिवाजीवर चालून येत आहे. सुरतेच्या नबाबांचे पत्र इकडे खास दूताकडे जहाजाने पाठविण्यात आले. त्या पत्रात मला विनंती करण्यात आली आहे, की, मी शिवाजीवर समुद्रमार्गे हल्ला करावा, तर सुरतेचे नबाब त्यांच्यावर जमिनीवरून हल्ला करतील. अशा रीतीने शिवाजीची सर्व बंदरे घेतली की, तो नामोहरम होईल व त्याची पुसट स्मृति देखील राहाणार नाही. सुरतेच्या नबाबांची पुढे अशी सूचना आहे की, त्यांच्या विनंतीप्रमाणे मी जर शिवाजीवर समुद्रमार्गे हल्ला केला, तर त्याची सर्व बंदरे आम्हाला मिळतील. तर सुरतेचा नबाब त्यांचा भू-प्रदेश घेईल. परंतु हा प्रलोभनाचा मोह मला होणे शक्य नाही. कारण, आम्ही मैत्रीला किमत देतो. मैत्रीसारखी श्रीमंती दुसरी कोणती नाही. देव तुमचे रक्षण करो ".

गोवा, १३ डिसेंबर १६६७.

कोंद व्हि. रेई.

(LIVRO DOS CARTAS ORDENS E PORTARIAS, No. 4, FLS 63)

शिवाजी महाराजांशी झालेल्या शांततेच्या आणि मैत्रीच्या कराराप्रमाणे पोर्तुगिजांनी लखम सावंत आणि इतर देसाई ह्यांना दिनांक १७ डिसेंबर १६६७ रोजी ताकीद दिली. त्याचप्रमाणे पोर्तुगीज आरमाराला आणि सैन्याला शिवाजी महाराजांची कुरापत न काढण्याचा हुकूम करण्यात आला. हा हुकूम दिनांक १९ डिसेंबर १६६७ रोजी काढण्यात आला. (LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 4 FLS 7 lV) शिवाजी महाराजांनी पोर्तुगिजांची पकडून नेलेली माणसे सोडून दिली.

दिनांक १९ डिसेंबर १६६७ रोजी गोव्याच्या व्हाइसरॉयने शिवाजी महाराजांना पुढील पत्र पाठविले :—

" शिवाजी राजे ह्यांस—

रेव्ह. पाद्री गोंसालु मार्तिश ह्यांच्याकडे पाठविलेले आपले पत्र मिळाले. रेव्ह. पाद्री गोंसालु मार्तिश ह्यांचा आपण जो चांगला आदरसत्कार केला व आमची पकडून नेलेली माणसे सोडून दिलीत त्याबद्दल आम्हास फार आनंद झाला.

आमच्या राज्यात जे देसाई येऊन राहिले आहेत, त्यांच्या विषयी आपण काही काळजी करू नये. ते गोवा बेटांतच राहणार असून आमच्या राज्यांत

अन्यत्र कुठे जाणार नाहीत. त्यांच्यावर आमची नजर राहाणार आहे. आपल्या बंदरांतील व्यापाऱ्यांना आणि प्रजाजनांना आमच्याकडून उपसर्ग पोचू नये अशी मागणी आपले वकील साकोपंत ह्यांनी आमच्याकडे केली होती. ती मागणी मान्य करून मी तत्संबंधीचे हुकूम काढीत आहे आणि आपल्याकडून अथवा आपल्या राज्याचे कारभारी दत्तो पंडीत ह्यांच्याकडून जर मदतीची मागणी आली तर आम्हा उभय पक्षांच्या मैत्रीला उजाळा देऊन ती मागणी मी तत्परतेने पूर्ण करण्याची दक्षता घेईन. आपणांकडूनही मी अशाच वागणुकीची अपेक्षा करीत आहे. देव आपणांवर प्रकाशाचा आणि त्याच्या दैवी अनुग्रहाचा वर्षाव करो."

गोवा, १९ डिसेंबर १६६७.

कोंद व्हि. रेई.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 74V)

पोर्तुगीज इतिहासकारांचे म्हणणे आहे कीं, मोगल बादशहाने गोव्याच्या व्हाइसरॉयकडे शिवाजी महाराजांविरुद्ध जी दोस्तीची मागणी केली होती ती त्याने शिवाजी महाराजांशी झालेल्या दोस्तीच्या करारास अनुसरून फेटाळून लावल्यामुळे, मोगल बादशहाला शिवाजीशी मिळते घेणे भाग पडले, इतकेच नव्हे, तर त्याने महाराजांना राजा हा किताब बहाल केला.

किंकेड (Kincaid) अथवा सरकार ह्या आंग्लो-हिंदी इतिहासकारांपैकी एकानेही ह्या गोष्टीचा उल्लेख केलेला नाही.

औरंगजेब बादशहाने शिवाजी महाराजांशी तह करून त्यांना राजा हा किताब बहाल केला, इतकेच नव्हे, तर त्यांना विजापूरकरांविरुद्ध मदत करून पुणे, चाकण, आणि सुपे हे परगणे देऊन टाकले. हा मुलुख शहाजी राजे ह्यांच्या जहागिरीत मोडत होता. औरंगजेबाने शिवाजी महाराजांना वऱ्हाड प्रांतही देऊन टाकला व त्यांनी कोकणांत जो मुलुख जिंकला होता त्या मुलुखावरील त्यांची सत्ताही त्याने मान्य केली.

इकडे विजापूरकर सतत चालू असलेल्या युद्धांमुळे टेकीस आले होते. शिवाजी महाराजांशी औरंगजेब बादशहाने दोस्ती केलेली पाहातांच विजापूरकरांचे धाबे दणाणले व त्यांनी शिवाजी महाराजांशी तह करून टाकला. त्या तहाच्या करारान्वये महाराजांना सोलापूरचा किल्ला व साडेतीन लक्ष रुपयांची युद्धखंडणी मिळाली. (Kincaid Parasnis, p. 19) १६६८ साली

विजापूरकरांकडून मिळालेल्या कोकणातील मुलुखावर शिवाजी महाराजांची सत्ता सुरू होती. तत्संबंधाने पोर्तुगीज गव्हर्नर कात्रु व सांपायु हे दोघे पोर्तुगालला आपल्या राजास दिनांक २८ जानेवारी १६७० रोजी लिहितात :

" महाराज

आमच्या राज्याला ज्या राज्याच्या सीमा भिडल्या आहेत तो अली इदालशा (अली आदिलशहा) राजा सांप्रत दुबळा झाला आहे. त्याचे सरदार आणि सुभेदार त्याला जुमानीत नाहीत. ते मन मानेल तसा कारभार हाकीत आहेत. आदिलशहा दुबळा झाल्याने मोगल बादशहाचे फावले असून त्याने त्याची काही शहरे घेऊन त्याला आपले मांडलिकत्व स्वीकारण्यास भाग पाडले आहे. ज्या राजाला त्याचे सेनापतीच जुमानीत नाहीत तो दुसऱ्यांवर सत्ता कशी गाजविणार ? कुणी शिवाजी राजे ह्या नावाच्या एकाने कोकणातील विजापूरकरांचा बहुतेक सर्व मुलूख बळकावला असून, तो त्या मुलुखाचा सारा वसूल करीत आहे व लोकांवर नवीन कर बसवीत आहे. कोकणातील रहिवाशी त्या अपमानास्पद वागणुकीला कंटाळून गावे सोडून निघून जात आहेत. शिवाजीचा मुलुख आमच्या शहराला भिडला असून तो एक वात्रट शेजारी आहे. शिवाजी स्वभावाने चंचल आहे. त्याच्या वचनावर कधीच विश्वास ठेवू नये. तो जेव्हा मैत्रीचे नाटक करतो, तेव्हा समजावे की त्यामागे काहीतरी काळेबेरे आहे. तो आपल्या शत्रूला गाफील ठेवून त्याच्यावर अचानकपणे हल्ला करतो. अशावेळी फार काळजी घ्यावी लागते. १६६७ साली शिवाजीने बार्देशवर स्वारी केली होती. आता तिकडे चांगला लष्करी बंदोबस्त ठेवण्यात आला आहे." (LIVRO DAS MONCOES, No. 34, FLS 301) दिनांक १० फेब्रुवारी १६७० साली पोर्तुगीजांचा आणि शिवाजी महाराजांचा नवीन करार झाला. त्या करारान्वये पोर्तुगिजांनी महाराजांना मस्कतच्या इमामाविरुद्ध मदत करण्याचे कबूल केले पण मोगलांविरुद्ध मदत करण्यास मात्र त्यांनी नकार दिला. पोर्तुगिजांनी सत्तेचा समतोलपणा राखण्यासाठी शिवाजी महाराजांचा शत्रू जो सिद्दी दंडा ह्याला आपल्या संरक्षणाखाली आणले. शिवाजी महाराजांचे कोकणातील राज्य गोव्याच्या सांखळी किंवा सतरी महालापर्यंत पसरलेले होते हे गोव्याच्या पोर्तुगीज व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या एका पत्रावरून कळून येते :–

" महाराज

राजा अली इदालशा (अली आदिलशहा) हा गोवा शहराचा अगदी जवळचा शेजारी आहे. त्याच्या राज्यात सांप्रत भयंकर अंदाधुंदी माजली आहे. त्याचे सरदार त्याचा तिरस्कार करतात, कारण तो गादीचा औरस वारस

नाही. काही वर्षांपासून शिवाजी राजे ह्यांनी उठावणी करून, उत्तरेस चौल बंदरापासून दक्षिणेस सांखळीपर्यंतचा मुलुख आपल्या अमलाखाली आणला आहे. शिवाजी राजे एवढे धाडसी आहेत की, त्यांनी बिनधोकपणे मोगलांच्या मुलुखांत शिरून लुटालूट केली. लुटलेल्या बंदरांमध्ये सुरतेचे एक बंदर आहे. ह्या बंदरांत इंग्रज, फरेंच, डच ह्यांच्या वखारी आहेत. शिवाजीपाशी आरमारही आहे. मुंबईहून मला हेन्री गॅरी ह्यानी कळविले आहे की, शिवाजीने मोगलांच्या मुलुखांत शिरून तीनदा लुटालूट केली. त्यामुळे बादशहा भयंकर क्रोधाविष्ट झाला असून शिवाजीचे पारिपत्य करण्यासाठी त्याने एक मोठें घोडदळ आणि पायदळ रवाना केले आहे ....................................".

गोवा, ३ ऑक्टोबर १६७१

लुईज द मेंदोंसा फुर्ताद्.

(LIVRO DAS MONÇOES, No. 36, FLS 382)

शिवाजी महाराजांनी गोव्यातील डिचोली महालापैकी नार्वे येथे एक मंदिर बांधले. त्या मंदिरातील देवाची पूजाअर्चा नियमितपणे सुरळीत पार पडावी व इतर धार्मिक विधी आणि उत्सव वेळोवेळी व्हावेत म्हणून महाराजांनी त्या मंदिराला जमीन आणि उत्पन्न तोडून दिले होते असे मान्युयल आंतोनियु द मैरेलिज ह्या नावाच्या एका पोर्तुगीज गृहस्थाच्या पत्रावरून कळते.

(RELAÇAO DOS FELIXES SUCCESSOS DESOE JANEIRO DE 1749 E 1750)

डिचोली हा महाल पूर्वी सावंतवाडीचे भोसले ह्यांच्या राज्यात मोडत होता. हा महाल सावंतवाडीकरांकडे असतानाच शिवाजी महाराजांनी नार्वे येथे उपरिनिर्दिष्ट मंदिर बांधिले होते. हा महाल पोर्तुगीजांनी घेतल्यावर तेथे पोर्तुगीजांचा धार्मिक छळ सुरू झाला, व त्याची झळ शिवाजी महाराजांनी- बांधिलेल्या नार्वे येथील मंदिराला पोचून तिथल्या देवाची पूजाअर्चा बंद पडली. ही वार्ता संभाजी राजांनी कळली तेव्हा त्यानी सातार्याला शाहूराजे ह्यांच्या- कडे तक्रार केली. असे मान्युएल आंतोनियु द मैरेलिज ह्याच्या पत्रावरून कळते.

इ. स. १६७१ सालच्या पावसाळ्यात शिवाजी महाराजांनी बार्देश आणि साष्टी महालांवर स्वारी केली. दिनांक २४ ऑगस्ट १६७२ रोजी गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र लिहिले त्या पत्रात तो म्हणतो :—

आमच्या राज्याच्या शेजारी जे राजे आहेत, त्यांच्याविषयी मला ह्या पत्रात आणखी काही लिहायचे नाही. त्यांच्यासंबंधाने गतसालच्या ३ ऑक्टोबरला

मी आपणांला जे पत्र लिहिले त्यात सर्व माहिती दिली आहे. प्रस्तुत पत्रात मला आपणांस कळवायचे आहे की, अली आदिलशहा ह्यांच्या विरुद्ध बंड करून उठलेले शिवाजी राजे ह्यांनी ह्या पावसाळ्यात बार्देश व साष्टी ह्या महालांत शिरून दंगेधोपे माजविले. परंतु मी काळजी घेतल्यामुळे शिवाजींना आपल्या हेतूपासून पराङमुख व्हावे लागले. आपणांला देव उदंड आयुष्य देवो."

लुईज द मेंदोंसा फर्तादु

(LIVRO DAS MONÇOÊS No. 37 FLS 149).

इ. स. १६७२ साल अखेर शिवाजी महाराजांचे राज्य कोकणात फोंड्या-पर्यंत पसरलेले होते व पेडणे, डिचोली आणि साखळी ह्या तीन महालांचा त्यांच्या राज्यात अंतर्भाव होत होता. (KINCAID AND PARASNIS, HIST. M. PEOPLE, page 89).

विजापूरच्या कारवार येथील सुभेदाराने बंड पुकारल्यामुळे विजापूरमध्ये जो गोंधळ माजला त्याचा फायदा शिवाजी महाराजांनी घेऊन १६७३ सालच्या सप्टेंबर महिन्यात त्यांनी फोंड्यास वेढा घातला. परंतु विजापूरचे सैन्य पन्हाळ्या-वर चाल करून आल्याने महाराजांना फोंड्याचा वेढा उठवून पन्हाळ्याकडे कूच करावे लागले. इ. स. १६७४ सालच्या सप्टेंबर महिन्यात महाराजांच्या एका सरदाराने फोंड्यास पुनः वेढा घातला. पण तिथल्या शिबंदीचा किल्लेदार महमदखान ह्याने किल्ला बरेच दिवस लढविल्यामुळे महाराजांच्या सरदाराला वेढा उठविणे भाग पडले.

प्रस्तुत वेढ्याचा उल्लेख वेंगुर्ला येथील इंग्रज वखारीतील एक अधिकारी अब्राहम ल. फेबर ह्याने डच गव्हर्नर जनरल जॉन मॅस्ट्स्युइकर (John Mastsuiker) ह्याला लिहिलेल्या एका पत्रात केला आहे. तो म्हणतो की, महाराजांचे सैन्य ३,००० असून त्याचे अधिपत्य आमासी (आमात्य?) ह्या नावाच्या सेनापतीकडे आहे. (S. N. Sen, Foreign Biographics of Shivaji page 389) इ. स. १६७२ साली विजापूरचा सुलतान अली आदिलशहा हा मरण पावला. त्याच्या पश्चात विजापूरच्या राज्यात जी दुही माजली त्याची संधी साधून शिवाजी महाराजांनी १६७५ सालच्या एप्रिल महिन्यात फोंड्यास वेढा घातला.

प्रस्तुत वेढ्याचा उल्लेख इंग्रजी कागदपत्रांत आढळतो. पहिला उल्लेख राजापूरच्या इंग्रजांनी दिनांक ६ फेब्रुवारी १६७५ रोजी मुंबईला पाठविलेल्या पत्रातील असून दुसरा कारवार येथील इंग्रजांच्या दिनांक १४ एप्रिल १६७५

मधल्या पत्रांतील आहे. शिवाजी महाराजांच्या सैन्यात २,००० घोडेस्वार आणि ७,००० पायदळ आहे असे दुसऱ्या पत्रात म्हटले आहे. ह्या युद्धात पोर्तुगीजांनी तटस्थपणा स्वीकारल्याचाही इंग्रजांच्या **पत्रात** उल्लेख आहे. (English Records on Shivaji).

कारवार येथील इंग्रजांनी दिनांक २२ एप्रिल १६७५ रोजी लिहिलेल्या एका पत्रात पोर्तुगिजांच्या हातातील कुकडी आणि पेरोडा ह्या साष्टी महालातील गावांवर मराठ्यांचा हल्ला झाल्याचा उल्लेख आढळतो. शिवाजी महाराजांचे सैन्य ३०,००० असल्याचेही ह्या पत्रात म्हटले आहे. (English Records on Shivaji, Cit 11, page 48).

शेवटी फोंड्याचा किल्ला महाराजांनी घेतला. त्यांचा उल्लेख इंग्रजांनी कारवारहून मुंबईला पाठविलेल्या दिनांक ८ मे १६७५ च्या पत्रात आढळतो. (English Records Cit. page 49).

शिवाजी महाराजांना दिनांक ३ एप्रिल १६८० रोजी रायगड येथे मृत्यू आला. पोर्तुगिजांकडून त्यांना शस्त्रे, घोडे आणि नौका ह्यांची मोठी मदत झाली. पोर्तुगिजांनी त्यांना कोकणच्या किनाऱ्यावर अनेक ठिकाणी जलदुर्ग आणि किल्ले बांधू दिले. त्याचा उल्लेख कौंट द आल्व्होर (Count de Alvor) ह्यांनी केला आहे. तो एक गोव्याचा व्हाइसरॉय होऊन गेला. तो म्हणतो : "..................... गोव्यापासून चौलपर्यंतच्या ६० कोसांच्या सागरी किनाऱ्यावर शिवाजीची सत्ता असून आमच्या कानाडोळ्यामुळे त्या प्रदेशात त्याला अनेक मोक्याच्या जागी तटबंदी करणे शक्य झाले."

(LIVRO DAS MONÇOĔS, No. 46, FLS 173)

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी महाराज गादीवर आले. ते जरी आपले वडील शिवाजी महाराज ह्यांच्यासारखे शूर आणि पराक्रमी असले, तरी शिवाजी महाराजांचे स्त्री दाक्षिण्य आणि सहिष्णु वृत्ती त्यांच्यामध्ये नव्हती असे फ्रान्सोआ कात्रू (Franc̦ois Catrou) ह्या नावाच्या एका फ्रेंच मिशनऱ्याचे म्हणणे आहे.

(Historie General de L'empire du mogol Sur Les memoirs Portugais de M. Manuchi, page 288).

शिवाजी महाराजांच्या शेवटच्या दिवसांत पोर्तुगजांनी त्यांच्याशी युद्ध पुकारण्याचा बेत केला होता, परंतु महाराजांच्या मृत्यूनंतर नवीन राजवट सुरू

झाल्याने त्यांनी युद्धाचा विचार सोडून दिला. तत्संबंधाने पोर्तुगीज व्हाईसरॉय पुढील पत्रात म्हणतो :—

"रामजी ठाकूर ह्यांस—

आपले पत्र पावले व आपल्या आरोग्याची बातमी वाचून आनंद झाला. संभाजी राजे ह्यांनी आपला दूत म्हणून आमच्याकडे पाठविण्यासाठी आपली जी निवड केली त्याबद्दल आम्हांला आनंद झाला. आपण चतुर आहात असे आम्ही ऐकतो. शिवाजी राजे ह्यांच्या सरदारांनी आमच्या राज्याविषयीचे जे धोरण स्वीकारले होते, त्यावरून युद्ध जाहीर करणे आम्हांस सोयीचे वाटत होते. कारण खोटया शांततेपेक्षा युद्ध केलेले बरे अशी आमची विचारसरणी आहे. मला कळले होते की, सरदार महादजी अनंत हे फोंडा येथे होते व शिवाजी राजे ह्यांचे इतर सरदारही आमच्या हद्दीवर फौजफाटा रवाना करीत होते. मी साष्टीतील आमच्या सेनापतीला फोंडयामध्ये घुसण्याची आज्ञा केली होती. पण अकस्मात शिवाजी राजे ह्यांच्या मृत्यूची वार्ता कळल्याने आमच्या सेनापतीला दिलेला हल्ल्याचा हुकूम मी मागे घेतला. त्याचे कारण हे की, जुन्या सरकारच्या आगळिकेबद्दल नवीन सरकारला जबाबदार धरणे बरोबर नाही अशी आमची विचारसरणी आहे. आता आपले इकडे आगमन होणार असल्याकारणे संभाजीराजे ह्यांचे विचार आणि त्यांच्या सोयी आम्हांला आपणांकडून कळतील व आमचेही विचार आपण जाणून घ्याल. वगैरे."

गोवा, ८ मे १६८०.

आंतोनियु पाइज द सांद

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 3, FLS 42 V)

संभाजी राजे ह्यांचे दूत रामजी ठाकूर ह्यांची पोर्तुगिजांशी तहासंबंधाने बोलणी झाली. त्याची माहिती पोर्तुगीज व्हाइसरॉयने संभाजीराजे ह्यांचे सरदार रायाजी पंडित ह्यांना कळविली. तो म्हणतो :

"संभाजी राजे ह्यांचे सरदार रायाजी पंडित ह्यांस : आपण संभाजी राजे ह्यांच्या भेटीला रवाना होत असल्याचे कळले. संभाजी राजे ह्यांचे दूत रामजी नाईक ठाकूर ह्यांच्याशी माझी जी मुलाखत झाली, तीत संभाजी राजांविषयी व आपणांविषयी मला संपूर्ण माहिती कळली.

रामजी नाईक ठाकूर ह्यांनी माझ्याकडे तहाच्या व शांततेच्या कराराचा जो प्रस्ताव आणला होता, त्या करारातील कलमांची उत्तरे मी त्यांच्याकडे पाठवून दिली आहेत. आता संभाजी राजे ह्यांनी काय तो निर्णय घ्यायचा

आहे. मी त्या करारावर माझे स्वामी जे पोर्तुगालचे राजे ह्यांच्यावतीने सही करीन. संभाजी राजे ह्यांच्या दूतांनी आम्हांला त्यांचा एक नजराणा आणला होता. तो त्यांनी आम्हांला सादर केला. आता त्यांच्याकडेच आम्ही संभाजी राजांना आपचा नजराणा परत भेट म्हणून पाठविला आहे".

गोवा, २५ मे १६८०.

आंतोनियु पाइस द सांद

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 43 V)

गोव्याच्या व्हाइसरॉयने संभाजी महाराज ह्यांच्याकडे शिवाजी महाराज ह्यांच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचा संदेश पाठविला.

"संभाजीराजे ह्यांस--

आपले दूत रामजी नाईक ठाकूर ह्यांच्याकडे पाठविलेले आपले पत्र मिळाले. आपल्या आरोग्याची जी वार्ता आपल्या पत्रात आहे ती वाचून आनंद झाला. आपले वडील शिवाजी राजे ह्यांच्या मृत्यूबद्दल आम्हांस जे दुःख झाले ते आम्ही प्रस्तुत पत्रातून व्यक्त करीत आहोत. मृत्यू हा कुणालाच चुकलेला नाही आणि चुकत नाही. दैवी इच्छेविरुद्ध कुणाचीच मात्रा चालत नाही. आपल्यासारखा शांततेने राज्य करणारा राजा आपल्या प्रजेला लाभला ह्याबद्दल आपली प्रजा अभिनंदनास पात्र आहे. प्रजेच्या दृष्टीने न्याय आणि शांतता ह्यासारखे सुख दुसरे कोणते नसते.

आपण लिहिता की, आमच्याशी मैत्रीचे आणि शांततेचे संबंध ठेवण्याची आपली इच्छा आहे. ह्या संदर्भात आपले दूत रामजी नाईक ठाकूर ह्यांनी मला भावी करारातील काही कलमे सादर केली आहेत. त्या कलमांची जी उत्तरे मी पाठविली आहेत ती आपल्या निदर्शनास येतीलच. करार कायम टिकावा म्हणून मी माझे काही विचारही व्यक्त केले आहेत. हा होऊ घातलेला करार कायम टिकावा इतकेच नव्हे, तर तो दृढ आणि खराखुरा व्हावा अशी माझी इच्छा आहे. आपणांला तहाची कलमे आणि माझे विचार कळावेत म्हणून मी रामजी नाईक ठाकूर ह्यांच्याकडे ते पाठविले आहेत. आपल्या निर्णयाची वाट पाहात आहे. आपल्या दूताला आपण खास अधिकार देऊन आमच्याकडे पाठवावे. म्हणजे तो आपल्या वतीने करारावर सही करील. माझे स्वामी पोर्तुगालचे जे राजे ह्यांच्या वतीने त्या करारावर मी सही करीन.

आपले सेनापती रायाजी पंडित ह्यांचे वर्तन उल्लेखनीय आहे. ते चतुर आणि धोरणी आहेत. आपले दूत रामजी नाईक ठाकूर हेही त्याबाबतीत

काही कमी नाहीत. दोघेही आपणांकडे जाण्याच्या घाईत असल्याने त्यांच्याशी मी माझे सर्व विचार आणि प्रेम व्यक्त करू शकलो नाही.

रामजी नाईक ठाकूर ह्यांच्याकडे पाठविलेला नजराणा त्यांनी मला सादर केला. आता मी त्यांच्याकडेच आपणासाठी परत भेट म्हणून एक नजराणा मैत्रीचे प्रतीक म्हणून पाठवीत आहे. तरी आपण त्याचा स्वीकार करण्याची कृपा करावी.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणाला प्रकाश दाखवो."

गोवा, २९ मे १६८०.

आंतोनियु पाइश द सांद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 43)

काही औपचारिक बाबींच्या अभावामुळे संभाजी राजे व पोर्तुगीज ह्यांच्यामधील शांततेचा करार होऊ शकला नाही. त्याचा उल्लेख पोर्तुगीज व्हाइसरॉयने संभाजी महाराजांना पाठविलेल्या पत्रात केला आहे :--

"संभाजी राजे ह्यांस—

आपले दूत येसाजी गंभीर ह्यांच्याकडून कळले की, आपले आरोग्य उत्तम आहे. ते ऐकून फार आनंद झाला. त्यांच्याकडून असेही कळले की, आमच्या देशाशी दीर्घ मुदतीचा एक भरभक्कम आणि खराखुरा शांततेचा करार करण्याचा आपला विचार आहे, परंतु आपल्या दूताने जे प्रमाणपत्र आणले ते विश्वास ठेवण्यायोग्य आहे असे आम्हाला वाटले नाही. तसेच आपल्या दूताने करारावर सह्या करण्याचे आवश्यक ते अधिकारही आणले नव्हते. त्यामुळे आपणाकडूनच नवीन हुकूम येईपर्यंत करार तहकूब ठेवावा लागत आहे......

देव आपणावर आपल्या दैवी अनुग्रहाने प्रकाश पाडो."

गोवा, २० जून १६८०.

आंतोनियु पाइश द सांद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 51).

संभाजी महाराज व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये शांततेच्या कराराच्या वाटाघाटी चालू असता डिचोलीचा मराठा सुभेदार आणि पोर्तुगीज ह्या

दोघांचे व्यापारावरून बिनसल्याने त्या वाटाघाटीत व्यत्यय आला. पोर्तुगीजांनी तद्संबंधाने संभाजी महाराजांना लिहिलेल्या एका पत्रात तक्रार केली आहे :--

"संभाजी राजे ह्यांस--

आपले वडील शिवाजी राजे ह्यांच्या निधनानंतर आपण मला लिहिले होते की, आमच्याशी दीर्घ मुदतीचा एक शांततेचा करार करण्याची आपली इच्छा आहे. तरी आपण माझ्या सूचनेचा विचार करावा. त्या पत्राला मी उत्तर पाठविले की, मागच्या राजवटीच्या सर्व प्रमादांकडे दुर्लक्ष करून आपल्या शत्रूविरूद्ध आम्ही आपणाशी आपणास हवा असलेला शांततेचा आणि मैत्रीचा करार करण्यास तयार आहोत. ते पत्र मी तहाच्या कलमांसह आपले सरदार रायाजी पंडीत ह्यांच्यामार्फत आपणाला रवाना केले होते. परंतु त्या पत्राचे अद्याप उत्तर नाही. सरदार रायाजी पंडीत ह्यांच्याबरोबर आमच्याकडे आलेले आपले खास दूत रामजी नाईक ठाकूर हेही होते.

चालू जून महिन्याच्या पहिल्या तारखेस आपले जे पत्र आले ते वाचून आम्हास आश्चर्याचा धक्काच बसला. आपण सूज्ञ असून माझ्या पत्रातील तहाच्या कलमासंबंधाने आपण माझ्याशी बोलू नये आणि एका वर्षापूर्वी आमच्या-कडून झालेल्या तथाकथीत आगळिकेसंबंधाने आमच्याशी तक्रार करावी ह्याचे मला मोठेच नवल वाटले. मला आपल्या निदर्शनास आणावयाचे आहे की, आपण ज्या आपल्या काही अधिकाऱ्यांच्या विद्यमाने माझ्याकडे तक्रार करता, त्या अधिकाऱ्यांपैकी काही अधिकारी विशेषेकरून डिचोलीचा सुभेदार हा एक हडेलहप्पी आणि आपल्या प्रजेची सर्व बाजूने नागवणूक करणारा लबाड मनुष्य आहे. आमच्या दोन्ही राज्यांमधील शांततेचा भंग करण्यास हा मनुष्य जबाबदार आहे. तव्हा मला आशा आहे की, दुर्बळांचा छळ करणाऱ्या व सार्वजनिक पैशांचा अपहार करणाऱ्या ह्या उर्मट मनुष्याला आपण योग्य ती शिक्षा केल्यावाचून राहाणार नाही. ह्या पाजी मनुष्याने आमच्या दोन्ही राज्यांमधील मैत्रीच्या संबंधात वितुष्ट आणण्याचा अनेकदा प्रयत्न केला आहे.

आमच्या राज्यात येण्याची ज्या देसायांनी इच्छा दर्शविली आहे, त्यांना मी तशी परवानगी दिली आहे..................आपल्या डिचोलीच्या सुभेदाराने त्यांच्याविषयी आपणांकडे चुगली करून त्यांच्याविषयी आपले मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला आहे. पण मी आपणांला कळवू इच्छितो, की, सदरहू देसायांपैकी एकानेही आपल्या प्रजेची कोणत्याच प्रकारची नुकसानी अथवा लुटालूट केलेली नाही. केवळ डिचोलींच्या सुभेदाराच्या जाचाला कंटाळून ते आमच्या बाजूला येऊ पाहातात.

रामजी नाईक ठाकूर ह्यांच्यासंबंधाने मला आपणास कळवायचे आहे, की, ह्या प्रकरणी मीच फिर्यादी आहे. कारण ह्या मनुष्याने आपणाशी दगलबाजी करूनही ( ते आपणास एका वर्षानंतर कळले) तो आमच्याकडे तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपला दूत म्हणून प्रमाणपत्र घेऊन आला. त्याला आमची दोघांची गुपिते जाणून घ्यायची होती हे आता सिद्ध झालेच आहे. आपल्या प्रस्तुत पत्रापूर्वी मला आपले आणखी पत्र मिळाले नाही. कदाचित आपली अमदानी नुकतीच सुरू झाली असल्याने आपले लक्ष राज्य कारभारात गुंतले असेल व त्यामुळे आम्हास पत्र लिहिण्यास आपणांस सवड झाली नसेल. आपणांस मी कळवू इच्छितो, की, अशा गोष्टींच्या बाबतीत जो निष्काळजीपणा होत आहे त्याची काळजी घेण्याची जबाबदारी आता माझ्यावर नाही.

आपले वडील शिवाजी राजे ह्यांच्या मृत्यूनंतर आपण आमच्याकडे शांततेच्या आणि मैत्रीच्या कराराची मागणी केली होती. परंतु आपल्या मंत्र्यांच्या आणि अधिकाऱ्यांच्या अधिक्षेपामुळे हा करार अद्याप होऊ शकला नाही. त्याची मी आपणाला पुन: आठवण करून देत आहे. आमच्या वतीने हा करार होण्याच्या मार्गात कोणताच अडथळा नाही, हे मी आपणांला कळवू इच्छितो. आपण सूज्ञ आहात तरी वेळीच खबरदारी घ्यावी. आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, ४ जून १६८१.                आंतोनियु पाइज द सांद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 54).



डिचोलीच्या सुभेदाराचा जुलूम पोर्तुगीज व्हाइसरॉयने फोंड्याच्या सुभेदाराला कळविला :—

"फोंड्याचे सुभेदार धर्माजी नागनाथ ह्यास—

चालू जून महिन्याच्या सुरूवातीला संभाजी राजे ह्यांच्याकडून आम्हाला एक पत्र आले. ते पत्र जो दूत घेऊन आला होता, त्याच्याविषयी आम्हाला संशय आल्याने आम्ही त्या पत्राचे उत्तर त्याच्याकडे दिले नाही. नंतर सुचले, की डिचोलीच्या सुभेदाराच्या दुष्कृत्यांची माहिती देण्याच्या बाबतीत माझ्या हातून हलगर्जीपणा होऊ नये, म्हणून त्या पत्राचे उत्तर आपणामार्फत पाठवावे. आपल्यामार्फत ते पत्र पाठविले तर ते सुरक्षित जाईल असे वाटले. दुसरे पत्र अण्णाजी पंडीत ह्यांचे आहे."

गोवा, ६ जुलै १६८१.                आंतोनियु पाइज द सांद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 54).

शिवाजी महाराजाचा उत्कृष्ट राज्यकारभार त्यांच्या नंतर चालत नसल्याची तक्रार पोर्तुगीज व्हाइसरॉयने संभाजी राजे ह्यांचे एक सरदार अण्णाजी पंडीत ह्यांना पाठविलेल्या पत्रात केली आहे.

"संभाजी राजे ह्यांचे कॅप्टन जनरल, अण्णाजी पंडीत, ह्यांस—

आपले दिवंगत स्वामी शिवाजी राजे ह्यांना आपण मोठ्या चातुर्याने आणि इमाने इतबारे राज्यकारभार हाकण्यास मदत करीत होता हे मला माहीत होते. त्याच भक्तीने आपण शिवाजी राजे ह्यांचे पुत्र संभाजी राजे ह्यांचीही सेवा करीत आहात असे मला कळले आहे. परंतु मला शंका येते, की, आपल्या राज्याचा सांप्रतचा कारभार शिवाजी राजे ह्यांचा कारभारासारखा चालत नसावा. आपण आमची जुनी मैत्री लक्षात घेऊन संभाजी राजे ह्यांना सल्ला द्यावा, की, त्यांनी पोर्तुगीजांवर विश्वास टाकून आपल्या शत्रूंशी निर्धास्त-पणे मुकाबला करावा. आमच्या स्वामींच्या राज्याला त्यांच्या राज्याची जी सीमा भिडलेली आहे त्या सीमेच्या रक्षणासाठी त्यांना एका शिपायाचीही जरूरी नाही हे आपण त्यांना विदीत करावे."

गोवा, ४ जून १६८१. आंतोनियु पाइज द सांद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3, FLS 55).

डिचोलीच्या जुलमी सुभेदाराविरुद्ध संभाजी राजे ह्यांनी उपाययोजना न केलेली पाहून पोर्तुगीज व्हाइसरॉयचा मनोभंग झाला. त्याची छटा संभाजी राजे ह्यांचे एक सरदार, अण्णाजी पंडीत, ह्यांना व्हाइसरॉयने पाठविलेल्या पत्रात प्रतिबिंबित झाली आहे.

"संभाजी राजे ह्यांचे कॅप्टन जनरल, अण्णाजी पंडीत ह्यांस—

राज्याचे दुभाषी, नारायणराव शेणवी ह्यांच्याकडून आपली ख्याली खुशाली कळली. माझे विचार आणि माझी इच्छा आपण जाणून घेतलीत असेही त्यांनी सांगितले. इतर तपशिलांचे बाबतीत मला एका गोष्टीचे आश्चर्य वाटले ते हे की, डिचोलीच्या कक्षेतील रस्त्यांवरील बंदी उठविण्यात आली, परंतु ज्याने प्रजेची पिळवणूक आणि छळ केला त्या डिचोलीच्या सुभेदाराविरुद्ध कोणताच इलाज करण्यात आला नाही. ही बाब क्षुल्लक आहे अशी तर आपली समजूत नाही ना?

ज्या राज्याशी संभाजी राजे ह्यांच्या वडीलांची मैत्री होती व ज्यांनी त्यांना आजचे वैभव मिळवून देण्याच्या कामी मदत केली, त्यांची संभाजी राजे ह्यांनी कदर करू नये ह्याचे राहून राहून दुःख होते.

आपण चतुर आणि राज्यकारभारात निष्णात आहात, तेव्हा आपणाला अधिक काही लिहिण्याची आवश्यकता नाही............... वगैरे".

गोवा, २६ जुलै, १६८१

आंतोनियु पाइज द सांद

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 3 FLS 55V)

संभाजी राजे ह्यांनी शांततेच्या आणि मैत्रीच्या कराराबाबत कोणतीच हालचाल केली नाही, म्हणून गोव्याच्या व्हाइसरॉयने संभाजी राजे ह्यांचे सरदार अण्णाजी पंडीत ह्यांना पाठविलेल्या पत्रात त्या गोष्टीचा फिरून उल्लेख केला आहे. संभाजी महाराजांकडून अस्सल अधिकारपत्रे आल्याशिवाय त्यांच्या दूताशी आपण कराराच्या वाटाघाटी करणार नाही, असे पोर्तुगीज व्हाइसरॉयने अण्णाजी पंडीत ह्यांना निक्षून लिहिले आहे:—

"संभाजी राजे ह्यांचे कॅप्टन जनरल, अण्णाजी पंडीत, ह्यांस,

आपली ख्याली खुशाली कळली. मागे मी आपणाला फोंड्याचे सुभेदार ह्यांच्यामार्फत एक पत्र पाठविले होते. परंतु त्या पत्रातील मुद्यासंबंधाने ह्या पत्रात ज्याअर्थी कोणताच उल्लेख नाही त्याअर्थी ते पत्र आपणाला मिळाले नसावे असे वाटते.

आपल्या पत्रात दोन गोष्टींचा उल्लेख आहे. येसाजी गंभीर यांना संभाजी राजे ह्यांनी आमच्याकडे एक किंवा दोन प्रश्नांबाबत वाटाघाटी करण्यासाठी आपला दूत म्हणून पाठविले. दुसरी गोष्ट म्हणजे ह्या शहरातील व्यापाऱ्यांच्या तक्रारी मिटवून दोन्ही देशांमधील सलोखा आणि शांतता दृढ होण्यासाठी प्रयत्न करण्याकरिता आपण लवकरच डिचोलीला येणार.

पहिल्या गोष्टीविषयी मी आपणाला कळवू इच्छितो की, राजे लोक आपली पत्रे खास अधिकार असलेल्या दूतांकडे न पाठविता साधी पाठवितात. ते जे आपले दूत म्हणून पाठवितात ते दूतही नसतात आणि वकीलही नसतात. म्हणून मी संभाजी राजे ह्यांना कळविले की, ते जे दूत पाठवितील त्यांच्यावर आम्हाला विश्वास ठेवता यावा म्हणून त्यांना त्यांनी खास अधिकार पत्रे देऊन पाठवावे. ज्या दूतांकडे आधिकारपत्रे नसतील त्यांना आमची मुलाखत मिळणार नाही.

दुसऱ्या मुद्याविषयी मला आपणास लिहायचे आहे की, संभाजी राजे ह्यांनी आपले वडील शिवाजी राजे ह्यांच्या मृत्यूनंतर आमच्याशी शांततेचा

आणि सलोख्याचा करार करण्यासाठी एक दूत पाठविला होता. ह्या शांततेच्या आणि स्नेहाच्या कराराची कलमे मी त्यांच्या दूताकडे सरदार राघोजी पंडीत ह्यांच्याबरोबर पाठविली होती. मला कळविण्यात आले की, ती कलमे संभाजी राजे ह्यांना सादर करण्यात आली. परंतु तत्संबंधीचा जबाब मला अद्याप मिळालेला नाही. अशा परिस्थितीत मला वाटते की, प्रथम शांततेच्या वाटाघाटी झाल्याविना इतर गोष्टींना हात घालणे बरोबर नाही........वगैरे".

गोवा, २६ जुलै, १६८१

आंतोनियु पाइज द सांद

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 2, FLS 55)

डिचोलीच्या जुलमी सुभेदाराविरुद्ध इलाज व्हावा म्हणून पोर्तुगीज व्हाइसरॉयने संभाजी राजे व त्यांचे सरदार अण्णाजी पंडीत ह्यांच्याकडे वारंवार जी निदर्शने केली, त्यांची अखेर दाद घेण्यात येऊन त्या सुभेदाराची डिचोलीहून उचलबांगडी करण्यात आली. ह्या प्रकरणी व्हाइसरॉय लिहितो :

संभाजी राजे ह्यांचे दूत येसाजी गंभीरराव ह्यांस व्हाइसरॉय ह्यांचे उत्तर :—

"आपले पत्र पावले. सभाजी राजे ह्यांना आपण डिचोलीचे सुभेदार मोरो दादाजी ह्यांच्या छळाची व दंडेलीची बातमी देऊन, त्यांची उचलबांगडी करून त्यांचे जागी शिवाजी बडनाईक ह्यांची नेमणूक केल्याची बातमी कळून पूर्ण खात्री झाली की, ह्या दोन्ही राज्यांमध्ये सलोखा निर्माण व्हावा अशी आपली तळमळीची इच्छा आहे............ वगैरे".

गोवा, १ जानेवारी, १६८२

फान्सिस्कुद तौरा

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 4 FLS 53)

संभाजी महाराजांनी कारवारच्या किनाऱ्यावरील आंजेदिव (हे बेट अद्याप पोर्तुगीजांच्या ताब्यात आहे) ह्या बेटाची तटबंदी करण्याचे ठरविले असता ते व्यापण्याचा हुकूम पोर्तुगीज आरमाराला गोव्याच्या व्हाइसरॉयने दिलेला पाहताच संभाजी महाराज पोर्तुगीजांवर रागावले.

आंजेदिव हे बेट व्यापण्यासंबंधीचे खलबत गोवा राज्याच्या सल्लागार मंडळाच्या बैठकीत झाले. त्या बैठकीत जो निर्णय घेण्यात आला, त्याचा गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :—

संभाजी राजे ह्यांनी आंजेदिव बेटाची तटबंदी करू नये म्हणून ते बेट व्यापण्याचा निर्णय घेण्यात आला.

सोमवार दि. २७ एप्रिल १६८२ रोजी दुपारी पणजी येथील किल्ल्यात हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल आणि व्हाइसरॉय सिंज्योर फान्सिस्कु द तौरा, सल्लागार मंडळाचे सदस्य, आर्चबिशप प्रिमज दों मान्युएल द सौझ, उ सिंज्योर दौतोर फान्सिश्कु देल्गादु द मानुश, इंक्विझितोर मान्युएल फुर्तादु, आंतोनियु कोर्तरेयाल द सांपायु, ज्युआंव द मेलु द सांपायु, दों मिगेल द आल्मैदा, किस्तोव्हां द सौझ कौतिन्यु, वगैरे सर्व लोक एकत्र जमले असता सिंज्योर व्हिसेरेई त्यांना म्हणाले की, एका खास गोटातून मला बातमी कळली आहे की, संभाजी राजे ह्यांनी आंजेदिव बेटाची तटबंदी करण्याचा विचार केला आहे. हे बेट आमच्या राज्याच्या अगदी जवळ असून ह्या शहरापासून ते अवघे बारा कोसांवर आहे. संभाजी राजे व आमचे शत्रू जे अरब, ह्यांचे सूत जमले आहे. अरबांनी संभाजी राजे ह्यांना सिद्दी दांडा ह्याचे पारिपत्य करण्याच्या कामी मदत करण्याचे आश्वासन दिले असून, त्याच्या बदली संभाजी राजे ह्यांच्याकडे त्यांनी त्यांच्या राज्यात व्यापार करण्याची सवलत मागितली आहे. तसे जर झाले, तर आंजेदिव बेट हे अरबांच्या व्यापारी मार्गावरील एक बंदर बनेल व त्यामुळे आमच्या प्रजाजनांना त्याची झळ पोहोचेल. कारण, आमच्या शहराला कर्नाटकातून पुरवठा होतो. तो ह्याच मार्गाने की, ज्या मार्गावर आंजेदिव बेट आहे. अन्न पुरवठ्याप्रमाणेच आमच्या राज्याला आणि गोवा शहराच्या तटबंदीला अरबांकडून उपद्रव पोहोचण्याचा धोका आहे.

आंजेदिव हे बेट हिंदुस्थानच्या शोधाचे वेळी पोर्तुगीज नावाड्यांनी व्यापिले होते. पुढे त्या बेटापेक्षाअधिक महत्त्वाची ठाणी पोर्तुगीजांच्या हातात पडल्यामुळे त्यांनी ते बेट सोडून दिले. तेव्हापासून ते निर्जनच होते. परंतु ज्या ज्या वेळी समुद्रात तुफान होई त्या त्या वेळी आमची जहाजे त्या बेटाच्या आश्रयार्थ जात असत. आता असे कळते की, संभाजी राजे ह्यांनी त्या बेटाच्या तटबंदीचा नकाशासुद्धा तयार केला असून त्या कामास लवकरच सुरवात होणार आहे.

आमच्या उत्तरेकडील चौल येथील किल्ल्यासमोर संभाजी राजे ह्यांची खांदेरी उंदेरी ही जी तटबंदीची बेटे आहेत, त्या बेटांपासून आमच्या जहाजांना उपद्रव पोचत आला आहे, हे आपणाला माहीत आहेच. ह्या दोन्ही तळावरील संभाजीची जहाजे आमच्या जहाजांवर हल्ले करतात. आता जर संभाजी राजे ह्यांनी आंजेदिव बेटाची तटबंदी केली, तर आमच्या दक्षिणेकडील सागरी

वाहतुकीला असाच उपद्रव पोहोचणार आहे. दुसरी गोष्ट ही की, आंजेदिव बेट संभाजी राजे ह्यांनी व्यापिले नसल्यास ते सिद्दी दांड्याकडून व्यापिले जाण्याचा संभव आहे. संभाजी राजे ह्यांच्या राज्यावर हल्ला करण्यासाठी सिद्दीला त्या राज्याच्या किनाऱ्यावर एक तळ हवाच आहे. परंतु संभाजी राजे ह्यांच्यापेक्षा सिद्दीचा शेजार हा देखील आम्हाला चांगला नाही. त्या दोघां-पैकी जरी कुणीही एकाने ते बेट व्यापिले तर आम्हाला त्याच्यापासून धोका हा आहेच. म्हणून माझा असा विचार आहे की, ते बेट आम्ही ताब्यात घ्यावे, तेथे तटबंदी उभारावी व तिच्यावर सहा तोफा मांडाव्या आणि हे काम पावसाळा सुरू होण्यापूर्वी झाले पाहिजे. कारण पावसाळ्यात सामुग्री नेता येत नाही. सिज्योर व्हिसेरेइ ह्यांनी आपल्या विचाराप्रमाणे ही योजना मान्य केली. आंजेदिव बेटाची तटबंदी करण्याचा हुकूम ते लवकरच देणार आहेत. व्हिसेरेइ ह्यांच्या निर्णयाला सल्लागार मंडळाच्या सदस्यांनी मान्यता दिली व ठरावावर सह्या केल्या आणि मी सेक्रेतारियु लुईज गोंसाल्व्हिश द् कोत ह्याने हे सर्व लिहून काढले. (LIVRO DOS ASSENTOS DOCON CELHO DO ESTADO DE 1677-1699, F LS102)

पोर्तुगीजांनी आंजेदिव बेट व्यापल्यावर संभाजी महाराज ह्यांचे पोर्तु-गीजांकडील वकील येसाजी गंभीरराव व पोर्तुगीज व्हाइसरॉय ह्यांचा सेक्रेटरी लुईज गोंसाल्विज कोत ह्या दोघांमध्ये तत्संबंधाने पत्रव्यवहार झाला. व्हाइस-रॉयचा सेक्रेटरी लुईज गोंसाल्विज कोत ह्याचे पणजीहून दि. २७ मे १६८२ साली लिहिलेले एक पत्र उपलब्ध आहे. परंतु ते विशेष महत्त्वाचे नसल्याने ते येथे देण्यात येत नाही.

नारबाराव देसाई ह्या नावाच्या डिचोलीच्या एका देसायाचा पाठलाग करताना डिचोलीच्या सुभेदाराने पोर्तुगिजांच्या चोडणे ह्या नावाच्या खेड्यात प्रवेश केल्याने पोर्तुगीजांचा संताप झाला. त्या घटनेबद्दल निषेध व्यक्त करण्या-साठी गोव्याच्या व्हाइसरॉयने संभाजी राजे ह्यांचे पोर्तुगीजांकडील वकील येसाजी गंभीरराव ह्यांना एक पत्र लिहिले :—

"येसाजी गंभीर ह्यांस—

डिचोलीचे सुभेदार जिवाजी नाईक ह्यांनी, देसाई नारबाराव ह्यांचा पाठलाग करण्यासाठी आमच्या हद्दीतील चोडणे बेटापर्यंत आक्रमण करून अनेक लोकांना ठार आणि जखमी केले. ठार झालेल्यांपैकी एक पोर्तुगीज आणि दोघे ख्रिश्चन आहेत. मला कळले आहे की, ठार झालेले लोक निरपराध होते, त्यांनी जिवाजी नाईक ह्यांचे काहीच वाईट केले नव्हते.

सदरहू सुभेदाराच्या हातून घडलेला प्रसंग अत्यंत गर्हणीय आहे ह्यात शंका नाही. परंतु तेवढयाने त्याचे समाधान झालेले नाही. त्याने देसाई नारबाराव ह्यांची व त्यांच्या कुटुंबातील माणसांची आमच्याकडे मागणी केली आहे. ही मागणी उर्मटपणाची असून शरणागताला अभय देण्याच्या नीती-विरुद्ध आहे. आणि पुनः ती पोर्तुगीजांकडे करण्यात आली आहे. पोर्तुगीज लोक शरणांगतांना आसरा देण्यात फार प्रसिद्ध आहेत. उपरिनिर्दिष्ट सुभेदाराचे कृत्य उर्मटपणाचे असून त्याबद्दल त्याला शासन झाले पाहिजे. सुभेदाराचे आव्हान मी स्वीकारले आहे हे मी आपल्या निदर्शनास आणू इच्छितो".

गोवा, १३ एप्रिल, १६८२ फान्सिस्कु द तौरा

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 4, FLS 10)

संभाजी राजे ह्यांनी औरंगजेब बादशहाचा पुत्र अकबर ह्याला आश्रय दिल्याबद्दल, औरंगजेब बादशहा त्यांच्यावर क्रोधाविष्ट झाला व त्याने इ. स. १६८२ साली त्यांच्याशी युद्ध पुकारले. त्याने संभाजी महाराजांविरुद्ध पोर्तुगीजांची मदत मिळविण्यासाठी त्यांच्याकडे आपला एक वकील रवाना केला. ह्या प्रकरणी कारवारचे इंग्रज दि. ३० जुलै १६८२ रोजी लिहिलेल्या एका पत्रात म्हणतात :—

"औरंगजेबाचा संभाजीवर एवढा कोप झाला आहे की, त्याला ठार किंवा कैद अथवा त्याचा पराभव केल्याशिवाय आपण आपला मंदील डोक्यावर चढविणार नाही आणि तलवार हाती धरणार नाही. असा त्याने पण केला आहे." (History of Aurangazeb: J. Sarkar, VL IV, page 298) औरंगजेबाने संभाजी महाराज ह्यांच्यावर जे सैन्य पाठविले त्यासंबंधी गोव्याचा व्हाइसरॉय दि. २४ जानेवारी १६८३ रोजी पोर्तुगालला लिहिलेल्या एका पत्रात म्हणतो :—

"गेल्या ऑगस्ट महिन्यात मी मोगलांच्या सैन्यासंबंधाने लिहिले होते. हे सैन्य शिवाजीच्या मुलुखात तीन बाजूने शिरले आहे. या सैन्याबरोबर जे सरदार आहेत, ते जिंकलेल्या प्रदेशात तटबंद्या उभारीत आहेत. कारण, त्यांनी संभाजीचे राज्य खालसा करण्याचा पण यापूर्वी कधी केला नव्हता.

मराठ्यांचे राज्य जिंकण्याच्या उद्देशाने सुरतेहून निघालेले मोगलांचे एक प्रचंड आरमार सांप्रत मुंबई बेटानजीक येऊन दाखल झाले आहे. ह्या आर-मारात लहान मोठ्या अगणीत नौका आहेत. बहुतेक नौका पुरवठा घेऊन आल्या आहेत. मुंबई बेटानजीकचा एक किल्ला इंग्रजांनी मोगलांना विकला अशी बातमी आहे. ही बातमी कळल्यावर पुढे जे काय घडणार आहे तत्संबंधाने मी मुंबई बेटाच्या गव्हर्नरांना एक पत्र लिहिले होते परंतु त्या पत्राचे मला अद्याप उत्तर आलेले नाही.

मी त्या पत्रांत अशी तक्रार केली आहे की, इंग्रजांना किल्ला मोगलांना विकायचा झाल्यास प्रथम त्यांनी मला ह्या सौद्यासंबंधाने समज देणे आवश्यक होते. कारण ही बातमी मला कळल्याशिवाय राहाणार नव्हती.

ज्या मोगल सैन्याचा मी वर उल्लेख केला आहे ते सैन्य आमची परवानगी घेऊन आमच्या मुलुखांतून कोणतीच हानी न करता पुढे गेले. त्यांनी आपल्या सामर्थ्याचा उपयोग केला नाही. येथे मोगल सम्राटाचा एक वकील आहे. आतां पर्यंत सर्व सुरळीत चालले आहे. परंतु मौरांवर (मुसलमानांवर) फार विश्वास ठेवणे इष्ट नाही, आणि विशेषेकरून ह्या मूसलमानांवर. ते जसे दगलबाज आहेत तसेच ते बेशरमही आहेत. त्यांना आपला दर्जा सांभाळतां येत नाही म्हणून महाराज माझी आपणाला विनंती आहे, की, आपण हिंदुस्थानला (गोव्याला) मदत करावी. कारण मुसलमानांविषयी गैरसावध राहून उपयोगाचे नाही. मोगलांचा आमच्यावर कधी हल्ला होईल त्याचा नेम. नाही. केवळ मोगलांच्या हल्ल्याच्याच भीतीने नव्हे तर राज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनेही मदत हवी आहे.

ह्या राजाचा (औरंगजेबाचा) पुत्र संभाजीबरोबर होताच. आतां तो दुसरीकडे निघून गेला आहे बहुधा तो आता कर्नाटकांत असावा. तिथून त्याने माझ्याकडे आपला एक दूत पाठविला आहे. त्याने माझ्याकडे गोव्यांत आपले जडजवाहीर विकण्याची परवानगी मागितली आहे. बापाचे व आपले वितुष्ट का आले तीही हकीगत त्याने मला कळविली आहे. मी त्याला मोघम असे उत्तर पाठविले असून त्यांत त्याच्या विषयी थोडी सहानुभूति व्यक्त केली आहे. त्याला मी इकडे त्याचे जडजवाहीर विकण्यास परवानगी दिली आहे. त्या परवानगीचा उपयोग त्याने अद्याप केलेला नाही. त्याच्या बापाचा वकील सांप्रत इकडे असल्याने तो थांबला असावा...................................".

गोवा, २४ जानेवारी १६८३.

(LIVRO DAS MONÇOÃS No. 49, FLS 242)

मराठ्यांविरूद्ध पोर्तुगीजांशी दोस्ती करण्याचा प्रयत्न मोगल बादशाहाने ह्यापूर्वी केला होता. परंतु १६६७ साली गोव्याचा व्हाईसरॉय कौंट द सां व्हिसेंत ह्याने तो प्रस्ताव फेटाळून लावला होता. पोर्तुगीज व्हाईसरॉयने संभाजीशी असलेल्या शांततेच्या कराराचा भंग होऊ नये म्हणून मोगलांशी मैत्रीचा करार केला नाही. परंतु असे जरी असले तरी, मोगलांना काही सवलती देणे पोर्तुगीजांना भाग पडले. ते जेव्हा संभाजी महाराजांना कळले तेव्हा त्यांना पोर्तुगीजांचा राग आला व त्यांनी गोव्यावर स्वारी केली.

दिनांक २४ नवंबर १६८३ रोजी गोव्याच्या व्हाइसरॉयने युद्ध खर्चासाठी ३ लक्ष असुरप्यांची रक्कम गोळा करण्यासाठी, खानदानी वर्ग, पुरोहित (पाद्री) वर्ग आणि प्रजा ह्यांची एक सभा बोलविली. संभाजी महाराजांचे सैन्य चौल, सां. इस्तेव्हांव (सेंट स्टिपन) बार्देश आणि साष्टी ह्या पोर्तुगीज मुलखांत शिरल्याने पोर्तुगिजांच्या तोंडचे पाणीच पळाले.

उपरिनिर्दिष्ट तिन्ही वर्गाच्या लोकांची सभा गोवा शहरांतील किल्ल्यांत राज्याच्या दरबारांत भरली होती. त्या सभेचा जो वृतांत व्हाइसरॉयच्या चिटणीसाने लिहून ठेवला आहे त्याचा सारांश पुढील प्रमाणे आहे :—

आमचा शत्रू संभाजी राजे ह्याचे सैन्य आमच्या प्रदेशांत घुसल्यामुळे सदरहू संभाजी राजे ह्याच्याशी युद्ध करण्याच्या खर्चासाठी म्हणून ३ लक्ष असुरप्या उभारण्याकरितां व्हिसेरेइ सिन्योर फ्रान्सिस्कु ताव्होरा, कौंट द आल्व्होर ह्यांनी खानदानी वर्ग (Nobres) पुरोहित वर्ग (Clero) व प्रजा (Dovo) ह्यांची एक सभा गोव्याच्या किल्ल्यांत दरबार हॉलमध्ये दिनांक २४ नवंबर १६८३ रोजी बोलाविली. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी सभेला माहिती सादर केली कीं, शत्रू संभाजी ह्याचे सैन्य आमच्या राज्यांत सर्व प्रांतामध्ये घुसले आहे. ह्या सैन्यांत मोठे घोडदळ आणि पायदळ असून उत्तरेस वसई, दमण, चौल आणि खाली गोवा बेट, सां इस्तेव्हांव, साष्टी, बार्देश वगैरे प्रांतांत ह्या सैन्याने शिरून सगळीकडे लुटालुट सुरू केली आहे. आमचा प्रदेश उजाड असल्याकारणे त्या सैन्याचा प्रतिकार करण्यात आवश्यक असलेले मोठे मनुष्य बळ आमच्यापाशी नाही. मायदेशाहून यायची कुमकही अद्याप आलेली नाही. जे कांही मूठभर पोर्तुगीज आणि इतर धर्माचे लोक किल्ले, तटबंद्या आणि खिंडी लढवित आहेत, त्यांच्या खर्चासाठी आमच्या स्वामीच्या राज्याच्या खजिन्यांत सांप्रत पैसा नाही. तो पैसा उभारण्यासाठी कोणत्या मार्गाचा अवलंब करावा त्याचा खल करण्यासाठी ही सभा बोलविण्यांत आली आहे. ........................................., .................................. वगैरे."

लुईजगों साल्विज द कोता
चिटणीस,

(LIVRO DAS MONÇOÃS, No. 49, FLS 258)

संभाजी महाराजांच्या स्वारीमुळे गोव्यांत एवढी आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली, कीं, व्हाइसरॉयला कैद्यांना मुक्त करून शिपाई म्हणून सरहद्दीवर पाठविणे भाग पडले. कैद्यांना मुक्त करण्याचा निर्णय राज्याच्या सल्लागार मंडळाच्या दिनांक २६ नवंबर १६८३ रोजी भरलेल्या बैठकीत घेण्यांत आला.

संभाजी महाराजांच्या स्वारीविषयी गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो---

" महाराज :

चालू वर्षाच्या २५ जानेवारीस मी आपणास जे पत्र लिहिले होते, त्यांत ज्या अनेक गोष्टी होत्या त्यांत मोगल बादशहाचा एक वकील येथे आल्याचे मी आपण.ला कळविले होते. हा वकील इकडे कशासाठी आला होता, ते मला त्यावेळी माहीत नव्हते.

म्हणून ते मी पत्रांत नमूद केले नव्हते.

ह्या वकीलाने मला विदीत केले, की, त्याच्या बादशहाने संभाजीशी युद्ध करण्याचा निर्णय घेतला असून त्याला अनेक कारणे आहेत. त्याच्या बादशहाची अशी इच्छा होती की याच्याबरोबर आम्हीही संभाजीशी युद्ध पुकारावे. त्या सदर्भात त्याची मागणी होती, की, आमच्या आरमाराने त्यांच्या सुरतेहून येणाऱ्या आरमाराच्या मार्गात अडथळे आणू नयेत, आमच्या प्रदेशांतील नद्यांतून त्यांच्या जहाजांना वाहतूक करण्याची मुभा असावी, व आमच्या राज्यांत त्यांच्या नौकांच्या कप्तानांना युद्ध सामुग्री आणि पुरवठा खरेदी करण्याची आम्ही त्यांना परवानगी द्यावी.

प्रस्तुत मागण्यांचा सहानुभूतीने विचार केला जाईल असे मोघम उत्तर मी दिले. कारण, त्याच्या बादशहाने आम्हाला जो खलिता पाठविला त्यात आमच्या पाठिंब्याची अपेक्षा व्यक्त केली होती. त्या मागणीची कदर करणे आवश्यक होते. मी त्यांना नंतर कळविले की, संभाजीशी आमचे शांततेचे संबंध असल्या-कारणे त्याच्याशी आम्हाला युद्ध करतां येत नाही. कारण, तसेच जबरदस्त कारण घडल्यावाचून दुसऱ्यांशी युद्ध करण्याची पोर्तुगीजांची नीती नाही. तथापि मी मोगलांना आमच्या राज्यात बेगमी खरेदी करण्याची परवानगी दिली, व त्यांच्या आरमाराला आमच्या आरमाराकडून मुंबईपर्यंत कोणताच उपद्रव पोहोचणार नाही असे वचन दिले. मोगल जहाजांना आमच्या नद्यांतून वाहतूक करू देण्याची परवानगी मी सल्लागार मंडळावर सोपविली त्याचे कारण हे की, ह्या जहाजांतून जे साहित्य येणार होते ते भिवंडी आणि कल्याण परगण्यांमध्ये ठाण मांडून बसलेल्या मोगल सैन्याला पोहोचण्याची शक्यता होती. आमच्याकडून मिळालेल्या आश्वासनांनी मोगलांचा वकील खुष झाला व मला एक नजराणा देऊन तो निघून गेला. त्याच्या प्रयाणानंतर इकडे बातमी आली, की, मोगल सैन्याने माघार घेतली आहे. संभाजीच्या सैन्याने त्यांना मागे हटविले म्हणून नव्हे, तर संभाजीने त्यांना जो पैसा चारला त्यामुळे संतुष्ट होऊन.

मोगल निघून जाताच त्यांच्यावर रोखलेले हत्यार संभाजीने आमच्यावर फिरविले. त्याच कारण त्याने असे दिले की, त्याच्या राज्यात शिरलेल्या मोगल सैन्याला आम्ही प्रतिबंध केला नाही. त्याच्या सैन्याने आमच्या डहाणू, असेरी (?) सायबाण (?) आणि तारापूर ह्या चार ठाण्यांवर हल्ले चढविले. पण ते सर्व हल्ले निष्फळ झाले. तारापूर हे ठाणे कापितांव (कॅप्टन) मानुएल ताव्हरिज द गामा ह्या नावाच्या आमच्या अधिकाऱ्याने सतत अठवडाभर मोठ्या शौर्याने लढविले. चौलालाही शत्रूने वेढा घातला आहे. सहा महिने होत आले हे ठाणे अद्याप आमच्या हातांत आहे. ह्या ठाण्यावर शत्रूने एक जोरदार हल्ला चढविला परंतु त्यात त्याची फार प्राणहानी झाली. तो एक चमत्कारच आहे, अशी माझी भावना आहे. त्याबद्दल मला बिलकूल संदेह वाटत नाही. ईश्वरी कृपेशिवाय असे घडणे शक्य नाही कारण आमचे लोक मूठभर असल्याकारणे प्रबल शत्रूचा हल्ला परतवून लावणे त्यांना दैवी कृपेशिवाय शक्य झाले नसते. आमच्या राज्यावर सर्व बाजूंनी हल्ले होत आहेत. परंतु ते सर्व परतवून लावण्यात येत आहेत. इतकेच नव्हे तर आमच्या सैन्याने शत्रू प्रदेशात शिरून त्याची जबरदस्त हानी केली आहे. शत्रूचा चौलभोवती पडलेला वेढा ढिला व्हावा म्हणून शत्रूला हुलकावणी देण्यासाठी मी पायदळ, समुद्रावरील लोक व रंगरूट ह्यांच्यातले पाचशे लोक जमविले व ज्यांचा कशासाठीच उपयोग व्हायचा नव्हता अशा साष्टी महालातील दोन हजार कानारीना (एतद्देशीय लोक) घेऊन मी नदी ओलांडून दुर्भाट मार्गे फोंड्यावर चालून गेलो. तेथे मी सतत नऊ दिवस लढलो. परंतु तुफान पावसामुळे ठरलेल्या मुदतीत फोंडा काबीज करण्याचे उद्दीष्ट साध्य करता आले नाही. त्याचा फायदा संभाजीला मिळाला. तो जातीने सैन्य घेऊन फोंडा येथील आपल्या शिबंदीच्या मदतीला आला. त्याच्यापाशी चांगले घोडदळ असल्यामुळे त्याला परिस्थितीवर मात करणे शक्य झाले. आमची परिस्थिती मात्र शोचनीय झाली. कारण आम्हांला कुमक मिळण्याची आशा नव्हती. म्हणून यत्किंचीतही गोंधळ माजू न देता शत्रूशी लढत लढत मी शिस्तीत माघार घेतली. दोन रात्री मी वाटेत काढल्या. एका कोसचे अंतर तोडण्यास मला दोन दिवस लागले. परंतु सगळा तोफखाना आणि नेलेले सर्व सामान सुरक्षित परत आणण्यात मी यशस्वी झालो.

मी गोव्याला येऊन पोहोचल्यावर अवघ्याच दिवसांत शत्रूने सां इश्तेव्हांव (सेंट स्टिफन) ह्या बेटावर हल्ला चढविला. ती बातमी कळताच माझ्या हाताशी जे मूठभर लोक होते त्यांना घेऊन दुसऱ्या दिवशी मी शत्रूवर चाल करून गेलो. आम्ही ज्या निश्चयाने शत्रूवर हल्ला चढविला तो निश्चय पाहून शत्रू भ्याला व त्याने पळ काढण्यास सुरुवात केली. परंतु आमच्या सैनिकांच्या

हातून जे वर्तन घडले ते अतिशय लाजीरवाणे होते. शत्रूचे एक लहानसे घोडदळ तेथे होते. ते घोडेस्वार पाहून आमच्या सैनिकांना ते आपणावर चालून येत असावेत असे वाटले व त्यांनी शत्रूला पाठ दाखवून पळ काढण्यास सुरुवात केली. शत्रूची आमच्या सैन्याने एवढी दहशत घेतली की, त्या भरांत त्यांनी एकदम नदीत उडया टाकल्या. काही सैनिक नदीत बुडून मेले. शेवटी ५० माणसांसह मी माघारा परतलो. शत्रूने आमचा पाठलाग केला पण नंतर त्याने तो नाद सोडून दिला. त्याच रात्री मी नदी ओलांडली व आमच्या उत्तरेकडील आरमारातील काही नौकांना सां इस्तेव्हांव बेटाकडे जाण्याचा हुकूम केला. त्या युद्ध नौकांच्या भीतीने म्हणा अथवा अन्य कोणत्याही जबरदस्त कारणामुळे म्हणा शत्रूने किल्ला खाली करून पैलतीर गाठले. त्याला माघार घेण्याची एवढी घाई झाली की, त्याने केवळ आपला तोफखानाच नव्हे तर पुष्कळ सामान मागे टाकले............ त्याने वापरलेली हत्यारे नदीत सापडतात. दोन दिवसांनी संभाजीने राजपुत्र अकबर आपल्या बरोबर असल्याचा बहाणा करून तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आमच्याकडे एक दूत पाठविला, परंतु त्या दूताने आधिकारपत्र आणले नव्हते म्हणून आम्ही त्याला आधिकृत दूत म्हणून मानण्यास नकार दिला.

मोगल बादशहा संभाजीवर गेल्या वर्षाप्रमाणे यंदाही स्वारी करणार असल्याची वदंता आहे. त्याने जर चिकाटीने स्वारी केली तर त्याला संभाजीचा नाश करणे अशक्य होणार नाही. परंतु मोगल बादशहा हा स्वभावाने चंचल असल्याकारणे त्याच्यावर विश्वास ठेवावा असे वाटत नाही. संभाजीशी आम्हांस पुन: तह करता येईल. परंतु मोंगलांशी त्याचे जे युद्ध होणार आहे, त्या युद्धातून मोकळा झाल्यावर त्याने जर वचनभंग करून आमच्यावर स्वारी केली, तर पुढे काय करायचे? म्हणून महाराज माझी आपणाला विनंती आहे की, आपण ह्या राज्याच्या रक्षणाच्या प्रश्नाकडे गंभीरपणे बघावे. आम्हांला सैन्य, शस्त्रे, दारूगोळा आणि कसलेले सेनापती तर पाहिजेच आहेत, पण त्याचबरोबर पैशाचीही मदत हवी आहे. कारण, ह्या राज्याचा जो महसूल मिळतो तो खर्चालाच पुरत नाही. मग युद्धाचा खर्च कसा भागवायचा?................."

गोवा, १६ डिसेंबर १६८३.

(LIVRO DAS MONCOÊS, No. 48, FLS 180)

सेंट झेवियरने चमत्कार करून संभाजी महाराजांची स्वारी परतवून लावली असे सांगण्यात येते. तत्संबंधी व्हाईसरॉय म्हणतो :

............................ उत्तरेकडील आरमारातील काही युद्धनौका मी

बेटाकडे (सेंट स्टिफन) पाठवून दिल्या. ह्या नौका निघण्याच्या बेतात होत्या. त्यांच्या भीतीमुळे म्हणा किंवा अन्य कोणत्याही प्रबल कारणामुळे म्हणा शत्रूने किल्ला खाली करून एवढ्या घाईत माघार घेतली की, त्याला आपला तोफखाना, शस्त्रे आणि युद्धकैदीदेखील मागे टाकावे लागले. व्हाइसरॉयच्या पत्रातील चमत्काराचा हा एवढाच उल्लेख आहे.

जेसुईट इतिहासकारांना ह्या संबंधीची अधिक माहिती असायला हवी होती, पण ते चमत्काराचा इन्कार करतात.

फ्रान्सिस्कु द सौझ हा जेसुईट इतिहासकार म्हणतो की, औरंगजेबाच्या सैन्याच्या दडपणामुळे संभाजीने सां. इश्तेव्हांव ह्या बेटाचा वेढा उठविण्यापूर्वी व्हाइसरॉयने आपला राजदंड सेंट झेवियरच्या हवाली केला होता. ह्याच्या उलट पियर द ओर्लेयां (Pier D'orlens) हा फ्रेंच जेसुईट इतिहासकार म्हणतो की, शत्रूने माघार घेतली म्हणून केवळ कृतज्ञता व्यक्त करण्याकरता व्हाइसरॉयने आपला राजदंड सेंट झेवियरला अर्पण केला.

फरान्सिस्कु द सौझ हा पाद्री (Oriente Conqvista do) ह्या ग्रंथात म्हणतो :

"एका बलाढ्य शत्रूने चोहोबाजूंनी हल्ला केल्याचे पाहून लोक गर्भगळीत होऊन गेले. त्यातच उपासमारीने पीडलेल्या सैनिकांचाही धीर खचला होता. आता सगळीकडे विनाशाशिवाय दुसरे काहीच दिसत नव्हते. म्हणून अखेरचा उपाय म्हणून सेंट झेवियरला शरण जाण्याचे ठरले. लोक झेवियरच्या चर्चमध्ये गोळा झाले व त्यांनी त्याची करुणा भाकली व नंतर सगळेजण मशाली पेटवून तळघरात गेले व त्यांनी त्याचा चबुतरा उघडला. व्हाइसरॉयने आपला राजदंड आणि इतर राजचिन्हे त्याच्या पायापाशी ठेवली. त्या राजचिन्हांबरोबर व्हाइसरॉयच्या सहीचा एक कागद होता. त्या कागदात त्याने पोर्तुगलाच्या राजाच्या वतीने गोव्याचे राज्य सेंट झेवियरला अर्पण केले होते, व त्याने चमत्कार करून शत्रूला माघारा परतवून लावावे अशी याचना केली होती. व्हाइसरॉय मग सेंट झेवियरच्या डोक्याजवळ गेला व डोळ्यात अश्रू आणून त्याने त्याची करुणा भाकली.

इकडे संभाजीने गोवा शहरास वेढा घातला असता तिकडे औरंगजेबाचा थोरला पुत्र मोठ्या सैन्यासह मराठ्यांवर चालून आला. संभाजीला ती वार्ता कळताच तो गोवा शहराचा वेढा उठवून मोगल सैन्याच्या पारिपत्यास निघाला. अशी घटना त्या राज्याच्या इतिहासात तत्पूर्वी कधी घडली नव्हती. संभाजीच्या सैन्यापासून गोवा शहराचे रक्षण करण्यासाठी सेंट झेवियरने तो चमत्कार केला."

आता पिपर जोसेफ द ओर्लेयां हा फरेंच जेसुईट इंग्रजीत भाषांतरीत झालेल्या त्याच्या (History of Sevaji and of his successor recent conquerors of India) ह्या ग्रंथात म्हणतो :

"इ. स. १६८३ सालअखेर म्हणजे नाताळच्या सुमारास गोवा शहर संभाजीच्या धोक्यापासून मुक्त झाले. व्हाइसरॉयची अशी भावना झाली की, प्रस्तुत संकट टळले ते आपला पराक्रम, धैर्य आणि निश्चय ह्यांमुळे नसून दैवी कृपेमुळे, विशेषेकरून सेंट झेवियरने त्या शहराचे रक्षण केल्याबद्दल व्हाइस-रॉयची त्याच्यावर भक्ती बसण्याचे कारण की, तो लढाईत प्राणांतिक जखमी झाला असता ती जखम सेंट झेवियरच्या चबुत-यासमोर बरी झाली होती. गोवा शहरावरील संकट टळलेले पाहून केवळ कृतज्ञता म्हणून व्हाइसरॉयने आपली सर्व राजचिन्हे सेंट झेवियरला अर्पण केली, व यापुढे आपण झेवियरच्या वतीने राज्य करणार असे जाहीर केले."

आता ह्या दोन्ही हकीकतींपैकी खरी हकीकत कुणाची मानायची ?

पाद्री ओर्लेयां ह्यांचा वृत्तांत पॅरिस शहरात इ. स. १६८८ साली प्रसिद्ध झाला. तर पाद्री फरान्सिस्कु द सौझ ह्यांचा ग्रंथ त्यांच्या कोंपानिया द झेजूश (Companhia de jesus) ह्या संघाने इ. स. १६९७ साली छापला.

व्हाइसरॉय जबर जखमी झाल्याने त्याने गर्भगळीत होऊन गोव्यावरील संकट टळावे म्हणून आपली राजचिन्हे आणि दंड सेंट झेवियरच्या पायापाशी ठेवला असेल का ? कदाचित वरील दोन्ही वृत्तांतांतील तफावत हीच असण्याची शक्यता आहे.

ते काहीही असो, परंतु एक मात्र खरे की, सेंट झेवियर हा गोव्याचा आश्रयदाता संत म्हणून संभाजी महाराजांच्या स्वारीपूर्वी पुष्कळ वर्षांपासून प्रसिद्ध होता.

गोवा शहरावर मराठे पुनः हल्ला करतील ह्या भीतीने पोर्तुगीजांनी आपली राजधानी मार्मागोव्याला हलविण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय गोवा राज्याच्या सल्लागार मंडळाच्या दि. १० जानेवारी १६८४ रोजी भरलेल्या बैठकीत घेण्यात आला.

(LIVRO DOS ASSENTOS DO CONCELHO DO ESTADO DE 1677 A 1699)

राजधानी बदलण्याचा ठराव व्हाइसरॉय ह्यांचा होता. त्याला सर्व सदस्यांनी मान्यता दिली.

गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. २५ जानेवारी १६८४ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र लिहिले त्यातून संभाजी महाराजांच्या स्वारीचा वृत्तांत त्याला कळविला :

" महाराज,

संभाजीने साष्टी आणि बार्देशमध्ये आक्रमण केल्याचे मी आपणांस मागे कळविलेच आहे. तेथे बावीस दिवस राहून त्याने तिवी येथील दोन आणि शापोरा येथील एक असे तीन किल्ले काबीज केले. दोन किल्ल्यांपैकी, सां मिगेल हा किल्ला अल्प प्रतिकाराने आणि दुसरा सां क्रिस्तोव्हांव हा जरा जास्त प्रतिकाराने शत्रूच्या हातात पडला, परंतु काही झाले तरी मोठा प्रतिकार न होता हे दोन्ही किल्ले शत्रूने घेतले ही शरमेची गोष्ट आहे. युरोपात आतालाइया ( Atalaia ) म्हणजे टेहळणीचे किल्ले असे ज्यांना म्हणतात त्या नमुन्याचे हे किल्ले आहेत. ह्या किल्ल्यांकडून शत्रूला जरी मोठा प्रतिकार झाला नसला तरी त्यांचे महत्त्व त्यामुळे कमी होत नाही. हे दोन्हीही किल्ले उत्कृष्ट होते व ते लढविता आले असते. साष्टीतील काही गावांतून शत्रूला चांगलाच प्रतिकार झाला. परंतु शत्रू सैन्य गटागटांनी अथवा तुकड्यातुकड्यांनी आल्यामुळे त्यांचा संघटितपणे प्रतिकार करता आला नाही. शेवटी ही खेडी व्यापिल्यावर शत्रू रासईच्या किल्ल्यावर चालून आला. त्या किल्ल्याच्या आजूबाजूचा प्रदेश त्याने प्रथम व्यापिला व मग त्याला वेढा घातला. किल्ला सहा दिवसपर्यंत लढविण्यात आला. सहा दिवसांनी वेढा उठविण्यात आला. बार्देशमध्ये शत्रूचे सैन्य थोडे असल्यामुळे मी तो किल्ला व्यापण्याचा हुकूम सोडला. परिस्थिती अशी असता व तहाच्या वाटाघाटी चालू असता (त्या अजून चालू आहेत) औरंगजेब बादशहाचा लाडका पुत्र शहा आलम हा मोठ्या सैन्यासह घाट उतरून कोकणात शिरला. डिचोलीला आल्यावर राजपुत्र शहा आलम ह्याने माझ्याकडे वकील आणि पत्रे पाठवून मला कळविले की, त्याच्या बापाने त्याला मोठे सैन्य देऊन आमच्या मदतीला म्हणून पाठविले आहे त्याचे आणखीही सैन्य संभाजीवर वेगवेगळ्या मार्गांनी चालून येत असल्याचे मला त्याच्या पत्रावरून कळले. एकूण संभाजीला नेस्तनाबूद करण्याच्या हेतूनेच तो आला होता. ह्या कामी आमची आपणांला मदत व्हावी अशी त्याने अपेक्षा व्यक्त केली होती.

मोगलांच्या आरमाराने सुरतेहून जो मोठा पुरवठा आणला होता, तो आपल्या सैन्याला पोचणे शक्य व्हावे म्हणून आपल्या गलबतांना आमच्या बंदरांतून आणि नद्यांतून वाहतूक करण्याची आम्ही परवानगी द्यावी अशी त्याने मागणी केली होती. त्या मागणीची उपयुक्तता पाहून व राजपुत्राकडून

आम्हांला मदत घेणे शक्य आहे की नाही, त्याचा साधक बाधक विचार करून मी त्याला शापूरच्या बाजूने त्याच्या सैन्याला जहाजांतून पुरवठा करण्याची परवानगी दिली. हा निर्णय घेतल्यामुळे मी शापूरच्या किल्ल्यात तोफखाना पाठविला नव्हता. हेतू हा की, राजपुत्राच्या मार्गात अडथळा आणण्याचा आमचा कोणताच विचार नाही हे त्याच्या निदर्शनास यावे. मी परवानगी दिलेली पाहून राजपुत्र खूष झाला व त्याने आमचे आभार मानले. त्याच्याकडे मी आमचा वकील पाठविण्याचे ठरविले आहे. कारण त्याच्याशी संबंध ठेवून काही गोष्टी साधल्या तर ते आम्हांला हवे आहे.

चौलहून आलेल्या पत्रातून कळते की, शत्रूने वेढा उठविला आहे. उत्तरेकडेही शत्रूने बराच मुलूख जिंकला होता व मनोद आणि सैबाण (?) व कंबा येथील प्रागाणा ही ठाणी त्याने नष्ट केली होती. तिथून त्याने आता माघार घेतली आहे. परंतु ह्या बातम्यांना मी दुजोरा देऊ शकत नाही. कारण उत्तरेकडील प्रदेशाच्या कॅप्टन जनरलचा अधिकृत अहवाल अद्याप आलेला नाही.

आमच्या राज्याची स्थिती ही अशी आहे. मोगलांनी जर आमच्यावर हल्ला करण्याचे ठरविले तर आमची स्थिती ह्यापेक्षाही वाईट होईल. आणि हे सैन्य जरी निघून गेले, तरी संभाजीच्या स्वारीचा धोका पुन: आहे तो आहेच. मग त्यांच्याशी आमचा तह होवो अथवा न होवो. त्याचे सैन्य जर चालून आले (आणि ते आल्याशिवाय राहाणार नाही) तर त्याचा प्रतिकार करणे आम्हांला कठीण जाईल.

पहिली गोष्ट म्हणजे आमच्या आरमारात माणसे नाहीत, ठाण्याच्या रक्षणाची जबाबदारी टाकण्यासारखे विश्वासू अधिकारी नाहीत, किल्ले निरुपयोगी झाले आहेत, स्थापत्य विशारद, यंत्रतज्ञ, तोफखान्यावरील अधिकारी, दारूगोळा ह्या सर्व गोष्टींची भयंकर कमतरता आहे. तीच गोष्ट द्रव्य टंचाईचीही आहे. खजिना रिकामा पडला आहे. तरी महाराज आपणांला प्रार्थना आहे की, हिंदुस्थानातील ह्या राज्याकडे लक्ष देण्याची कृपा करावी. आपणांकडून मदत आली नसल्यास हे राज्य आमच्या हातातून निसटण्याची भीती आहे.

माझ्या बलशाली आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख देऊन त्याचे रक्षण करो".

फोर्ट सांतियागु, दि. २५ जानेवारी १६८४.

(LIVRO DOS RE IS VIZINHOS No. 48, FLS 183)

लिस्बन येथील राष्ट्रीय ग्रंथालयात (Biblioteca Nacional) संभाजी महाराजांच्या गोव्यावरील स्वारीसंबंधी व्हाइसरॉयने पोर्तुगालला सादर केलेल्या अहवालाचे हस्तलिखित आहे. तो अहवाल थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे :—

दि. २ जानेवारी १६८३ ते ५ जानेवारी १६८४ ह्या दरम्यानच्या कालात हिंदुस्थानच्या (गोव्यात) राज्यात जे काय घडले त्याचा अस्सल वृत्तांत—

दि. १५ जानेवारी १६८३ रोजी गोव्याबाहेर उत्तरेकडील आरमार येऊन दाखल झाले. त्या आरमाराचे कप्तान कापितांव मोर मानुयल द सौझ परैरा ह्यांनी बातमी आणली की, मोगलांचे आरमार मुंबई आणि वसई बंदरात येऊन दाखल झाले आहे. हे मोगल आरमार आमच्या वसईच्या पाण्यात शिरले असून दुसऱ्या बाजूने मोगल सैन्याने संभाजीचे कल्याण हे शहर विशेष प्रतिकार न होता घेतले आहे.

दि. ५ फेब्रुवारीस मोगलांचे शिष्टमंडळ आले. त्या शिष्टमंडळातील वकिलाने अशी मागणी आणली होती की, मोगल सैन्याला संभाजीवर हल्ला करण्यासाठी आमच्या मुलुखातून वाट देण्यात यावी. तसेच आमच्या राज्याने मोगल सम्राटाशी दोस्ती करावी.

दि. १५ फेब्रुवारीस संभाजी एक हजार घोडेस्वार आणि दोन हजार पायदळ घेऊन तारापूर ह्या नावाच्या आमच्या ठाण्यावर चालून आला. ते ठाणे खुले होते, त्यामुळे संभाजीला ते जाळून टाकता आले. त्या ठाण्याबरोबरच त्याने दमण आणि वसई नजीकची आणखी काही गावे जाळली. तारापूरच्या ठाण्याचा सेनापती मानुयल ताव्हारिज ह्याने किल्ल्यात माघार घेतली. पण त्याने तिथून शत्रूवर हल्ले चढवून त्याची पुष्कळ हानी केली.

मे महिन्याच्या सुरुवातीला चौल शहराचा सेनापती कापितांव दों फ्रान्सिस्कु द कोश्त ह्याने बालेकिल्ल्यावरील तोफखान्याला संभाजीच्या चौल ह्या नावाच्या खेड्यावर तोफा डागण्याचा हुकूम केला. तोफांच्या सरवत्तीमुळे त्या खेड्याचा काही भाग उद्ध्वस्त झाला. त्या खेड्यात संघाच्या एका पाद्रीला कैद करण्यात आले होते, म्हणून हा तोफांचा भडीमार करण्यात आला.

दि. १२ मेला दों मिगेल द आल्मैद ह्याने हुकूम काढला की, साष्टी प्रांतात शस्त्रे हातात धरण्यासारखे जे धडधाकट कानारी (एतद्देशीय) पुरुष असतील त्यांनी मडगाव आणि रासई ह्या दरम्यानच्या एका मैदानात गोळा व्हावे. त्याने त्यांना सक्त ताकीद दिली की, जो कुणी ह्या हुकुमाचा भंग

करील तो देहान्त शिक्षेस पात्र होईल. त्या हुकुमाप्रमाणे उपरिनिर्दिष्ट मैदानात लोक गोळा झाले. ते त्या ठिकाणी सतत आठवडाभर रखरखीत उन्हात होते. एके रात्री एक हिंदू त्याची बायको अत्यवस्थ होती म्हणून आपल्या कॅप्टनची परवानगी घेऊन तिला भेटावयास घरी गेला. त्याच रात्री तो छावणीत परतला त्याच्या गैरहजेरीत ती बातमी दों मिगेल द आल्मैद ह्याला कळली असता त्याने त्या हिंदूला कैद करून फासावर लटकविण्याचा हुकूम दिला. ती वार्ता छावणीतील इतर लोकांना कळताच त्यांनी पाद्री तेवोतोनियु ह्याला विनंती केली की, त्याने सेनापतीपाशी त्या दुर्दैवी मनुष्या-विषयी रदबदली करावी. परंतु सदरहू पाद्रीने त्या हिंदूचा प्राण वाचविण्याची खटपट तर केली नाहीच, उलट सेनापतीलाच त्याला फाशी देण्याचा त्याने सल्ला दिला. तो सेनापतीच्या भेटीहून परतल्यावर देशी लोकांना धमकी देत म्हणाला की, तुम्ही संघाचे (Companhia de Jesus) जे वाईट केले आहे त्याचे फळ तुम्हांला भोगणे भाग आहे. ते ऐकताच लोक रागाने बेफाम झाले व त्यांनी सेनापतीविरुद्ध हल्ला करण्याची तयारी केली. लोकांचा तो निर्धार पाहून सेनापती गडबडला व त्यांना शांत करण्यासाठी त्याने पकड-लेल्या हिंदूस सोडून दिले. व्हाइसरॉय फ्रान्सिस्कु द ताव्होरा ह्यांच्या पहिल्या वर्षाच्या कारकिर्दीत पटकीची भयंकर साथ आली व दुसऱ्या वर्षी मोठे अवर्षण पडले.

दि. २ ऑगस्टला संभाजीच्या सैन्याने चौलच्या किल्ल्याला वेढा घातला. त्या सैन्यात दोन हजार घोडेस्वार आणि सहा हजार पायदळ होते. ह्या सैन्यापासून शहराला गंभीर स्वरूपाचा धोका निर्माण झाला. शहर पडण्याची परिस्थिती निर्माण झाली. शत्रू सैन्याने तटास शिड्या लावून वर चढण्याचा प्रयत्न केला. पण तो प्रयत्न हाणून पाडण्यात आला. शत्रूने तटापासून माघार घेताच किल्ल्यातून त्यांच्यावर तोफा डागण्याचा हुकूम झाला. परंतु तोफा डागताक्षणी त्यांच्या गाड्यांची चाके मोडून त्या खाली जमिनीवर पडल्या गोळ्यांनीही नेम साधला नाही. दारू कोळशाची होती. काही तोफा तर पंधरा वर्षांमागे मून द मेलुव्हे कॅप्टन होते तेव्हा भरलेल्या होत्या. उत्तरेकडील सर्व ठाण्यात दारूगोळ्याची व्यवस्था पाद्रींच्या हातात असते. त्यांच्या परवानगी-शिवाय केवळ गोलंदाजांनाच नव्हे, तर खुद्द गव्हर्नरलाही तोफ डागता येत नाही. दारू अशी जपून वापरण्याचे कारण की, दारू जितकी शिल्लक राहते तितका ती विकत घेण्याचा पैसा पाद्रींच्या खिशात जातो.

तोफांच्या गाड्या नादुरुस्त झाल्याची बातमी गव्हर्नरने शहराच्या दारूगोळ्याचे कारभारी आणि पाद्रीच्या पाठशाळेचे रेइतोर (प्राचार्य) पाद्री

मिगेल गोमिश् ह्यांना कळविली. त्यांनी उत्तर केले की, तोफांच्या गाड्या शिल्लक नाहीत, आणि नवीन गाड्या बनविण्यासाठी लागणारे लाकूड हाताशी नाही. तीच कथा दारू आणि गोळे ह्यांचीही होती. शेवटी दारूगोळा विकत आणण्यासाठी शहरातील दरिद्री नागरिकांकडून तीन हजार क्रुझादुश् (Cruzados) गोळा करून ते वसई येथे पाठवून देण्यात आले. त्याच-बरोबर उत्तरेकडील प्रदेशाचा सेनापती दों मानुएल द लोबो ह्याच्याकडेही मदतीची याचना करण्यात आली. त्याने ताबडतोब तोफांच्या गाड्या, दारू-गोळा आणि शंभर माणसे पाठवून दिली.

चौल येथील संघाच्या पाद्रीपाशी पाच हजार क्रुझादुश् आहेत, त्या रकमेचा उपयोग दारूगोळा खरेदी करण्यासाठी करता येईल. वसई येथे चौदा हजार आणि दमण येथे दहा हजार क्रुझादुश आहेत. लढाई असल्यास हे सर्व पैसे खर्च करण्यात येतात. काहीच शिल्लक उरत नाही. परंतु सर्व सामान्यतः ह्या भागात युद्धे क्वचितच होतात.

दि. २७ ऑगस्टला व्हाइसरॉयनी सर्व धर्माच्या लोकांना कळविले की, संभाजी एक मोठी फौज घेऊन गोवा शहरावर चाल करून येत आहे, तरी त्यांनी शहराच्या रक्षणासाठी आणि रक्षण करणारांना मदत करण्यासाठी जय्यत तयार रहावे.

दि. ७ सप्टेंबरला व्हाइसरॉयनी हुकूम काढला की, सर्व नागरिकांनी–विशेषेकरून साष्टी आणि बार्देश मधील लोकांनी–सात आणि आठ तारखेच्या रात्री संभाजीच्या प्रदेशात शिरून खेड्यांची लुटालूट आणि जाळपोळ करावी.

दि. २७ ऑक्टोबरला कौंट व्हाइसरॉय हे शहरातील सुमारे ४० घोडेस्वार घेऊन सां लौरेंसुला रवाना झाले व तिथुन त्यांनी फोंड्यास प्रयाण केले. दि. २८ ऑक्टोबरला त्यांनी आपल्या सैन्याची पहाणी केली. ते सैन्य पुढील-प्रमाणे होते. ६०० पगारी शिपाई, त्यातील पुष्कळशी पोरेंच होती. जवळ जवळ ३०० नौसैनिक, आणि ३०० इतर सैनिक, त्यातील काही घोडेस्वार तर इतर पायदळ होते. हे सर्व सैन्य एकूण १२० होते. त्यांना साष्टीतील २,००० कानारी (देशी) सैन्य येऊन मिळाले. त्यातील १,५०० बंदुकधारी तर ५०० इतर होते. साष्टीच्या सैन्याला पगार दिला नाही. पगारच नव्हे, तर बंदुका आणि दारूगोळादेखील त्यांना स्वतःच्या पैशातून विकत घ्यावा लागला. ह्या सैन्याने फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला. सतत पाच दिवसपर्यंत अविरत भडीमार करून किल्ला पडला नाही. ते पाहून व्हाइस-रॉय चिंतातूर झाले.

दि. ९ नवंबरला शत्रूला ९०० घोडेस्वारांची कुमक आली. शिवाय शत्रूचे पायदळही पुष्कळ होते. त्याच दिवशी व्हाइसरॉयनी आपल्या हाताखालच्या आधिकाऱ्यांशी विचारविनिमय करून वेढा उठविण्याचा निर्णय घेतला. दि. १० नवंबरला आमच्या सैन्याने माघार घेण्यास सुरुवात केली. कौंट व्हाइसरॉय चार दिवस पाद्रीच्या निवासस्थानी होते. तेथे त्यांनी कुणाचीच भेट घेतली नाही. दुसरी गोष्ट अशी की, पाद्रीना प्रथम कळविल्याशिवाय ते कुणालाच व्हाइसरॉयची भेट घेऊ देत नसत. व्हाइसरॉय त्यांच्या नुसते मुठीत आहेत असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. त्यामुळे ते कुणाचाही छळ करतात आणि कुणालाही वर काढतात. हे पाद्री हाताला लागेल ती वस्तु लंपास करतात, व धान्य आणि इतर वस्तूंचा राजरोस व्यापार करतात. दि. २४ नवंबरला रात्री १० वाजता संभाजीचे ४० काळे सैनिक सां इश्तेव्हांव बेटावर ओहोटीच्या वेळी जमिनीवरून उतरले. त्या बाजूला टेहळणी बिलकूल नव्हती. त्यामुळे त्यांना टेकडीवर चढून खिंडीच्या रक्षणासाठी उभारलेल्या तटबंदीत उतरणे शक्य झाले. त्यांनी म्हाताऱ्या कॅप्टनला आणि काही सैनिकांना कंठस्नान घातले. किल्लेदारही त्या झटापटीत ठार झाला.

दि. २५ नवंबर १६८३ रोजी सकाळी सात ते आठ ह्या दरम्यान व्हाइसरॉय ४०० सैनिकांसह सां कश्तेव्हांव बेटावर उतरले. त्यांनी किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी सैनिकांना जय्यत तयार राहाण्याचा हुकूम दिला. सैनिक घेऊन किल्ल्याच्या रोखाने निघाले. ज्या टेकडीवर किल्ला आहे त्या टेकडीवर व्हाइसरॉय चढले तेव्हा त्यांच्याबरोबर २३० लोक होते. टेकडीवर शत्रूचे ९०० बंदुकधारी शिपाई होते. व्हाइसरॉयनी त्यांच्यावर इतक्या त्वेषाने हल्ला केला की, त्या हल्ल्यासमोर निभाव न लागल्याने शत्रूने पळ काढण्यास सुरूवात केली. पण त्याचवेळी त्यांना ३०० घोडेस्वारांची कुमक आली. ते पाहाताच त्यांना चेव आला व त्यांनी आमच्या सैन्यावर प्रतिहल्ला चढविला. तो प्रतिहल्ला भयंकर तीव्र असाच होता. शत्रूचा जोर झालेला पाहून व्हाइसरॉयनी असा विचार केला की, आता लढाई चालू ठेवणे शहाणपणाचे नाही. म्हणून त्यांनी आपल्या तुकडीला माघार घेण्याचा हुकूम केला. तो हुकूम कानी पडताच आमच्या सैन्याने खाली सैरावैरा पळ काढण्यास सुरुवात केली. आपल्या सैन्याने शत्रूला पाठ दाखवून अशा रीतीने पळ काढलेला पाहून व्हाइसरॉयही सेनापती............. ह्यांच्यासह माघारा परतले. त्याच दुपारी ते सेनापती.............. ह्यांच्यासह सराकारी नौकेत बसले.

दुसऱ्या दिवशी शत्रूने सां इश्तेव्हांव येथील चर्च जाळून टाकले. दि. ११ डिसेंबरला शत्रूचे १६ हजार घोडदळ आणि ३ हजार पायदळ साष्टीत शिरले.

त्यांनी सगळीकडे लुटालुटीचे सत्र सुरू केले. अन्नधान्य, गुरेढोरे, थोडक्यात हातास लागेल ते त्यांनी लुटले.

दि. २५ डिसेंबरला मडगावच्या इगर्जीचे (चर्च) रक्षण करणारे लोक शत्रूला शरण गेले........... असोळणे हे गाव संघाच्या पाद्रीचे आहे. त्या गावचे वार्षिक उत्पन्न १८ हजार क्रुझादुश् आहे. साष्टीतील सर्व इगर्जीत अन्नसामुग्री आणि दारूगोळा भरपूर होता. शत्रूने त्या प्रदेशात शिरकाव केला तर त्या इगर्जी लोकांनी लढविण्याचा निर्धार केला होता. इगर्जीचे पाद्रीही लोकांच्या खांद्यास खांदा भिडवून लढणार होते. परंतु पाद्रीनीच पळ काढताच लोकांची पळापळ सुरू झाली. सर्व खेडी ओस पडल्याने शत्रूला कुठेच विरोध झाला नाही. फक्त सांकवाळ येथील इगर्जीने मात्र शत्रूशी मोठ्या नेटाने तोंड दिले. त्या इगर्जीचे पाद्री फांसिस्कु द कुंन्य हा त्याच गावचा होता म्हणून त्या गावचे लोक त्याच्या हाताखाली लढले. अशा रीतीने मडगावपेक्षाही इगर्जी शत्रूला घेणे जरा कठीण गेली.

बाणावली ह्या खेडयातला ज्यूलियु मोनिझ ह्या नावाचा ब्राह्मण शत्रूचे आगमन होताच काही लोकांना घेऊन आपल्या घरात जाऊन बसला व त्याने शत्रूशी चांगलाच मुकाबला केला. शत्रूला त्याचा प्रतिकार मुळीच मोडून काढता आला नाही. शत्रू ज्या दिवशी साष्टीत शिरला त्याच दिवशी तो बार्देशमध्येही शिरला. तिकडे तीन किल्ले आहेत. ह्या तीनही किल्ल्यात पोर्तुगीज सैनिकांच्या तीन कंपन्या होत्या. तिथल्या तोफाही चांगल्या स्थितीत होत्या. शत्रूचे आगमन होताच लोकांची पळापळ सुरू झाली. पोर्तुगीज सैनिकांकडून शत्रूला प्रतिकार झाला नाही. बार्देशच्या गव्हर्नरचे आणि सेनापतीचे नाव क्रिस्तोव्हांव द सौझ कौतिन्यु होते. शत्रूला ज्या घरातून आणि इगर्जीतून प्रतिकार झाला तिकडे तो गेला नाही. मात्र ज्या खेडयात त्याला विरोध झाला नाही, त्या खेडयात शिरून त्याने मनसोक्त लुटालूट केली. त्याने सर्व चीजवस्तु तर लुटलीच परंतु लोकांची गुरेढोरेदेखील नेली. तिवीचा किल्ला सतत दहा दिवसपर्यंत लढविण्यात आला. परंतु किल्ल्यात पाण्याची टंचाई निर्माण झाल्याने तो अखेर शत्रूच्या हवाली करावा लागला. उरलेलेही दोन्ही किल्ले पडले. शत्रूचे काळे सैनिक वचनाला जागले नाहीत. त्यांनी शरण येणाऱ्या पोर्तुगीज सैनिकांना कोणतीच मानहानी सहन करावी लागणार नाही असे वचन दिले होते. त्या वचनाप्रमाणे पोर्तुगीजांनी शरणागती पत्करल्यावर त्या काळ्या सैनिकांनी त्यांचे हात पाठीमागे बांधून त्यांना पुष्कळ मारहाण केली. तिन्ही किल्ल्यात एकूण १५० पोर्तुगीज शिपाई होते. त्या सगळ्यांना शत्रूने कैद केले.

शापुरा नदीच्या मुखावर असलेल्या किल्ल्यासही शत्रूने वेढा घातला. ह्या किल्ल्याच्या किल्लेदाराच्या बायकोने शत्रूची एवढी दहशत घेतली की, तिने किल्ला बिलकूल न लढविता तो शत्रूच्या ताब्यात देण्याचा आपल्या नवऱ्यास सल्ला दिला. ह्या किल्ल्याची दारे शत्रूला रात्री उघडण्यास आली. बार्देश आणि साष्टी ह्या दोन्ही प्रांतात शत्रू एक महीना होता. ह्या काळात त्याने सगळीकडे जाळपोळ आणि लुटालूट केली. त्याला कुणीही प्रतिकार केला नाही, आणि ज्याने प्रतिकार केला तो सहीसलामत सुटला नाही. बार्देशच्या किल्ल्यातून शत्रूने एकूण ४६ तोफा नेल्या.

२८ डिसेंबरला संभाजीचे चार वकील तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आले. दि. २ जानेवारी १६८४ रोजी संभाजीकडे तहाच्या करारावर सही करण्यासाठी गेलेला व्हाइसरॉयचा दूत मानुएल साराइव्ह द आल्बुकेर्क हा तहाच्या करारावर सही करून येताना तिकडून शत्रूने कैद करून नेलेली आमची सर्व माणसे घेऊन आला.

दि. १५ जानेवारी १६८४ रोजी औरंगजेबाच्या सैन्यापैकी काही सैन्य संभाजीच्या डिचोली प्रांतात शिरले. ह्या सैन्यात ४०,००० घोडेस्वार, ६०,००० पायदळ, १,००० हत्ती आणि २०,००० उंट असल्याची बातमी आहे.

दि. १८ जानेवारीस मोगलांचे एक प्रचंड आरमार गोव्याच्या पाण्यात येऊन दाखल झाले.

दि. १९ जानेवारीस मोगल राजपुत्र आणि त्याचा बाप ह्या दोघांचे दूत व्हाइसरॉयना भेटले. मोगल सम्राटाचा वकील मोगल आरमाराबरोबर आला होता."

इंग्रजांनी संभाजी महाराजांना दारूगोळ्याची मदत केल्याबद्दल गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो :—

"महाराज—

आपणास पत्र लिहिल्यावर मला उत्तरेकडील युद्ध परिस्थितीसंबंधाने जे पत्र आले, त्याची एक प्रत मी आपणाला पाठवित आहे. चौलचे गव्हर्नर दों. फ्रान्सिस्कु द कोश्त ह्यांनी मला कळविले आहे की, शत्रूने पुन: येऊन त्या ठाण्यास वेढा घातला आहे. सारेजण माझ्याकडे मदत मागतात. आणि ही मदत जर आकाशातून (देवाकडून) आली नाही तर ती आम्हाला कुठून येईल ते मी सांगू शकत नाही. हिंदुस्थानातील युरोपियन लोक हे तर आमचे सर्वात मोठे शत्रू आहेत. विशेषेकरून इंग्रजांनी तर संभाजीला आमच्याविरुद्ध

उघडपणे मदत करण्यास सुरूवात केली आहे. ते त्याला तोफा, तोफांचे गोळे, दारू, बंदुका आणि सर्व प्रकारची इतर शस्त्रे आणि हत्यारे पुरवित आहेत. पण आम्हाला मात्र त्यांनी चिमूटभर देखील दारू विकली नाही.

माझ्या बलशाली श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख संपत्ती देवो."

दि. २५ जानेवारी, १६८४ किल्ले सांतियागु

(LIVRO DOS MONÇOÊS, No. 48, FLS 185)

संभाजी महाराजांचा आणि पोर्तुगीजांचा तह झाल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. मोगलांचे सैन्य विजापूराकड वळताच संभाजी महाराजांनी तह गुंडाळून पोर्तुगीजांच्या वसई येथील ठाण्यावर हल्ले चढवून त्यांची काही ठाणी घेतली. कदाचित पोर्तुगीज आपणाविरुद्ध मोगलांशी संधान साधण्याचा प्रयत्न करीत असल्याचा त्यांना संशय आला असावा. गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. २० जानेवारी १६८५ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या पत्रात संभाजी महाराजांनी नवीन आक्रमण केल्याचा उल्लेख केला आहे. पोर्तुगीजांचे आणि संभाजी महाराजांचे युद्ध चालू राहिले. त्या दरम्यान पोर्तुगीजांनी कुडाळचे देसाई खेमसावंत ह्यांच्याशी मैत्रीचा करार करून त्यांना संभाजी महाराजांविरुद्ध चिथावणी दिली. खेमसांवंत हे लखमसावंत ह्याचे नातू आणि फोंडसावंत ह्यांचे पुत्र होत.

पोर्तुगीजांनी संभाजी महाराजांविरुद्ध जे कारस्थान रचले, त्याचा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयने दि. २४ जानेवारी १६८६ रोजी पोर्तुगालला आपल्या रजास लिहिलेल्या पत्रात आला आहे.

" महाराज—

संभाजीने शांततेच्या कराराचा भंग केल्याने त्याच्याविरुद्ध आम्हास युद्ध जाहीर करणे भाग पडले. महाराजांना हे गेल्यावर्षी सां फान्सिस्कु शाव्हिएर (सेंट झवियर) नौकेने पाठविलेल्या पत्रातून कळलेच असेल. तदनंतर ज्या घडामोडी झाल्या त्यांचा अहवाल मी आपणाला ह्या पत्रातून सादर करीत आहे.

मोगलांच्या सैन्याने विजापूरला वेढा घातला आहे. (हा वेढा त्यांनी आता आधिकच आवळीत आणला आहे.) ह्या वेढ्यामुळे संभाजीकडे मोगलांचे पुष्कळच दुर्लक्ष झाल्याने त्याचे फावले आहे. त्याच्या राज्यात जे देसाई आहेत त्यांच्यावर फार जुलूम आणि जबरदस्ती होत असल्याने त्यांना मी संभाजी-विरुद्ध बंड करण्यास चिथावणी दिली आहे. महाराजांच्या राजवटीचे ते जर

मांडलिक झाले, तर त्यांना कोणकोणते फायदे मिळतील ते मी त्यांना समजाऊन सांगितले. ही बोलणी आमच्यामध्ये काही महिने चालली होती. ती गेल्या फेब्रुवारी महिन्यात संपली. त्या वाटाघाटीचा अहवाल आपणाकडे जात आहे. (तो अहवाल अजून गूप्त आहे) ह्या लोकांनी गेल्या १० तारखेस सगळीकडे बंडाळी सुरू केली. त्यांना मदत व्हावी म्हणून मी आमच्या उत्तरेकडील आरमाराला वेंगुर्ला नदीच्या मुखाजवळ आणून ठेवले आहे. आमच्या आरमाराच्या उपस्थितीमुळे शत्रूला बाहेरून कुमक मिळणे अशक्य झाले आहे. परंतु समुद्रमार्गे कुमक पाठविणे अशक्य होताच त्याने घाटावरून घोडदळ आणले. ह्या घोडदळाच्या आगमनामुळे काही दिवस चकमकी थांबल्या. पण लगेच त्या पूर्वीपेक्षा उग्र स्वरूपात पुनः सुरू झाल्या. त्याचे कारण शत्रूला जी नवीन कुमक आली तिच्या सामर्थ्याची बंडखोरांना कल्पना आली नाही. ह्या लोकांनी संभाजीची जी हानी केली ती पुष्कळच मोठी आहे. त्यांची इच्छा असल्यास ते शत्रूची दुप्पट हानी करून सबंध कोकण घेऊ शकतील.

संभाजीचे बळ अशा रीतीने विखुरले गेल्याने व उत्तरेकडे त्याची नाममात्र सत्ता राहिल्याने त्याच्या राज्यातील काही तटबंदीची ठाणी घेणे शक्य आहे की काय ते पाहाण्याचा मी आमचे उत्तरेकडील प्रदेशाचे कापितांव जेराल (कॅप्टन जनरल) झुजे द मेलू द काश्चु ह्यांना हुकूम केला. त्यांनी माझ्या हुकूमाप्रमाणे झटपट हालचाल करून गिडीयान (?) टेकड्या, कामदुर्ग (?) बंदेवाडी (?) ही ठाणीं घेतली. ईश कृपेने सर्व गोष्टी सुरळीत पार पडल्या. आता आसेरीचे (?) ठाणे तेवढे घ्यावयाचे राहिले आहे. इतर मार्गांनी ते काम पूर्ण होणे जरी अशक्य असले, तरी काळ आणि पैसा ते पूर्ण करू शकतील अशी आशा आहे. आणि जोपर्यंत मी इकडे आहे, तोपर्यंत त्या कामाकडे दुर्लक्ष होणार नाही.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख समृद्धि देऊन त्याचे रक्षण करो."

गोवा, २४ जानेवारी १६८६

संभाजी महाराजांविरुद्ध कुडाळचे देसाई आणि पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये जो गुप्त करार झाला, त्या करारातील पोर्तुगीज व्हाइसरॉयने देसायांना घातलेल्या अटी :—

१. ते (देसाई) कुडाळपासून अंकोलापर्यंत जो मुलूख घेतील त्या मुलखाची विभागणी तीन भागात करण्यात येईल. त्यातील दोन भाग आम्हाला मिळतील आणि एक भाग ते घेतील. त्या मुलूखात ज्या टेकड्या, किल्ले आणि सुपीक जमीन असेल त्यांची विभागणी उत्पन्नाप्रमाणे केली जाईल.

२. जो कुणी कुडाळपासून चौलपर्यंतचा मुलूख घेईल त्याला आम्ही समुद्रात एक आरमार ठेवून मदत करू. ह्या मदतीबद्दल त्यांनी त्या मुलूखाचा एक तृतियांश भाग आम्हाला द्यावा. अशीच विभागणी त्या मुलुखातील किल्ले आणि जमीनी ह्यांचीही व्हावी.

३. आमचे आरमार त्यांच्या शत्रूच्या केवढयाही बलाढय आरमारापासून त्यांचे रक्षण करील. ते ज्या ज्या ठिकाणी मुलूख जिंकण्यास जातील त्या त्या ठिकाणी हे आरमार त्यांच्या मदतीला जाईल.

त्या आरमारात जी माणसे असतील त्यांचा खर्च आमचे राज्य करील व त्यांना शस्त्रे, दारूगोळाही स्वतःच पुरविल.

४. ह्या आरमाराकडे ते जो कपडालत्ता, पैसा अडका अथवा अन्य कोणत्याही प्रकारचे कापड देतील, ते गोव्याला त्यांचे जे लोक ओलीस ठेवण्यात आलेले असतील त्यांच्या हवाली करण्यात येईल. ह्या पैशांतून त्यांच्या सैन्यात लढणाऱ्या लोकांचा पगार दिला जाईल.

५. आरमाराच्या मदतीशिवाय हे राज्य त्यांना दारूगोळाही पुरविल. त्याची किंमत त्यांना द्यावी लागणार नाही, अथवा त्या प्रकारचा दारूगोळाही त्यांना परत करावा लागणार नाही.

६. त्यांना जर मोगल सम्राटाचे मांडलिकत्व स्वीकारावयाचे असेल तर तत्संबंधीच्या वाटाघाटी त्यांच्यावतीने कौंट व्हाइसरॉय मोगल सम्राटाकडे आपली माणसे पाठवून करील.

७. हे युद्ध सुरू होण्यापूर्वी देसायांनी त्यांचा एक वजनदार मनुष्य गोव्याला ओलीस पाठवून द्यावा.

८. ते युद्धात विजयी झाले की, मोगल अमदानीत त्यांना जे स्वातंत्र्य होते आणि संभाजीच्या राजवटीत ते जे स्वातंत्र्य उपभोगीत आहेत ते स्वातंत्र्य त्यांना हे राज्य देईल. त्यांना त्यांच्या चालीरीती, आचारविचार आणि मूर्तिपूजा ह्यांचे स्वातंत्र्य राहील.

९. हे राज्य संभाजीशी तह करणार नाही, त्याचप्रमाणे त्यांनीही (देसायांनी) संभाजीच्या राज्यातील इंग्रज, डच, फ्रेंच आदि वखारवाल्यांशी संधान साधू नये.

१०. हे युद्ध सुरू करण्यासाठी त्यांना पैशांची आवश्यकता असल्यास हे राज्य त्यांना तो पैसा कर्ज म्हणून देईल. पण युद्ध सुरू झाल्यावरच ते कर्ज मिळेल.



११. ह्या अटी अंमलात याव्या म्हणून त्यांनी कौंट व्हाइसरॉय ह्यांच्या पसंतीस पडेल असा एक वजनदार मनुष्य ओलीस ठेवावा.

प्रस्तुत करार दि. ८ फेब्रुवारी १६८५ रोजी पार पडला. त्याची कौंट व्हाइसरॉय ह्यांची सही असलेली एक प्रत देसायांकडे नेण्यात आली. तर दुसऱ्या प्रतीवर खेमसावंत ह्यांच्यावतीने त्यांचे पुढील नोकर राम दळवी, भोसले, देव सावंत भोसले, मांगजी शेणवी लाड, व विठोजी शेणवी कर्णिक ह्यांनी सह्या करून खेम सावंत सरदेसाई ह्यांचा तिच्यावर शिक्का मारला.

(LIVRO DAS MONCOLS, No. 51A, FLS 207)

व्हाइसरॉयने खेम सावंत ह्यांना शस्त्रे पुरवून त्यांना कुडाळ व साखळी महालात बंडाळी सुरू करण्यास प्रवृत्त केले. पण त्याने बंडाळी सुरू न करता पोर्तुगीजांच्या प्रदेशातून फोंड्यास जाण्यास परवानगी मागितली. ती परवानगी व्हाइसरॉयने दिली नाही. राम दळवी ह्यांना पाठविलेल्या पत्रात व्हाइसरॉयचा चिटणीस म्हणतो की, खेमसावंत भोसले ह्यांना फोंड्यास जाण्यास परवानगी देता येणार नाही, त्याचे कारण हे की, तो मार्ग बालाघाटच्या व्यापारास खुला राहीला पाहिजे.

खेम सावंत ह्यांना संभाजी महाराजांविरुद्ध युद्ध सुरू करण्यास शस्त्रे आणि दारूगोळा पुरवून देखील ते कोणतीच हालचाल न करता स्वस्थ बसलेले पाहून व्हाइसरॉयनी राम दळवी ह्यांना पाठविलेल्या पत्रात त्याबद्दल तक्रार केली आहे. प्रस्तुत पत्र ६ ऑक्टोबर १६८७ मधले आहे.

व्हाइसरॉयने खेम सावंत ह्यांना आणखी शस्त्रे पुरविली. तत्संबंधाने व्हाइसरॉय राम दळवी ह्यांना पाठविलेल्या पुढील पत्रात म्हणतो :—

" राम दळवी ह्यांस--

राम दळवी ह्यांच्या प्रयत्नामुळे दारूगोळा पाठविला जात आहे. ते आणि इतर देसाई शत्रूच्या प्रदेशात बंडाळी सुरू करतील अशी आशा आहे. त्यांना जर तसे करायचे नसेल तर त्यांनी आपल्या लोकांना माघारी बोलवावे . . ."

गोवा, २२ नोव्हेंबर, १६८७ दो. र. द. कोश्त

(LIVRO DAS CARTAS ORDENS E PORTARIAS, No. 5, FLS 47V)

व्हाइसरॉयने आपल्या सल्लागार मंडळाची बैठक भरवून संभाजी महाराजांविरुद्ध बंड पुकारलेल्या देसायांना मोगलाच्या सैन्यात भरती होण्यासाठी परवानगी देण्याचा ठराव पास करून घेतला. तो निर्णय गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास कळविला. तो म्हणतो :—

" महाराज—

संभाजीच्या राज्यातील देसाई गेल्या चार वर्षांपासून वार्देशमध्ये व्हाइसरॉय कौंट द आल्व्होर ह्यांच्या परवानगीने आहेत. त्यांनी संभाजीविरुद्ध बंड पुकारल्याने त्यांना आमच्या राज्याचा आश्रय घ्यावा लागला होता. मोगल सम्राटाच्या वकीलांनी त्यांना मोगल सैन्यात भरती होण्यासाठी अनेकदा पाचारण केले. पण त्यासाठी त्यांना आमची परवानगी घ्यावीसी वाटली. ती परवानगी मी सल्लागार मंडळाची बैठक भरवून मंजूर करून घेतली. प्रस्तुत पत्रासोबत जो दस्तऐवज जात आहे तो नजरेखाली घातल्यावर मी त्यांना वरील परवानगी का दिली ते महाराजांच्या ध्यानी येण्यास उशीर लागणार नाही. माझ्या बलशाली आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख समृद्धि देऊन त्याचे रक्षण करो."

गोवा, २७ सप्टेंबर १६८८

दों. र. द. कोस्त.

(LIVRO DAS MONCOES, No. 53, FLS 329)

व्हाइसरॉयने देसायांना मोगलाच्या सैन्यात भरती होणे शक्य व्हावे म्हणून राज्याच्या सल्लागार मंडळाच्या बैठकीत जो ठराव मंजूर करून घेतला त्याचा आशय पुढीलप्रमाणे आहे :—

" राज्याचे सर्व सल्लागारांस त्याचप्रमाणे कुडाळचे खेम सावंत देसाई, राम दळवी, आणि इतर देसाई ह्यांना कळविण्यात येत आहे की, हे लोक व्हाइसरॉय कौंट द आल्व्होर ह्यांच्या कारकीर्दीत ह्या राज्याच्या आश्रयार्थ येऊन राहीले होते. त्यांनी संभाजीची सेवा सोडून त्याच्याविरुद्ध हत्यार उपसल्याने त्यांना आपल्या बायकामुलांसह आमच्या राज्यात पळून येणे भाग पडले होते. त्यांनी जेव्हा व्हाइसरॉय कौंट द आल्व्होर ह्यांच्यापाशी इकडे येण्याची परवानगी मागितली, तेव्हा ती त्यांना देण्यात आली. आता ज्या अर्थी मोगल बादशहाने विजापूर आणि गोवळकोंडा ही राज्ये खालसा करून बेळगावचाही किल्ला घेतला, त्याअर्थी मोगलांचा सरदार बहादूरखान ह्याने व त्यांच्या वकीलांनी देसायांना पत्रे लिहून मोगलांच्या सैन्यात भरती होण्यास

पाचारण केले. हे सैन्य लवकरच कोकण जिंकण्याच्या मोहिमेवर निघणार आहे. सदरहू देसाई हे कोकणातले असून तिथले देसाईही आहेत. त्यांनी मोगलांच्या सैन्यात भरती होण्यासाठी बार्देश सोडण्याची आपणास परवानगी असावी अशी माझ्याकडे मागणी केली आहे. तेव्हा माझी ह्या राज्याच्या सल्लागार मंडळाच्या सदस्याना विनंती आहे की, त्यानी देसायाच्या मागणीचा पूर्ण विचार करून त्याना ती मागणी देणे इष्ट आहे की नाही ते व्यक्त करून मला मदत करावी".

गोवा, १३ ऑगस्ट, १६८८

गव्हर्नरची सही

(LIVRO DAS MONCOES No. 53. 329)

सोंदेचा राजा व पोर्तुगीज ह्यांनी मोगलांना संभाजी महाराजांविरुद्ध मदत केली. सोंदेच्या राजाची आणि पोर्तुगीजांची दोस्ती होती हे सोंदेच्या छेन्नुआडला व्हाइसरॉयने पाठविलेल्या पुढील पत्रावरून दिसून येते.

"सोंदेच्या राजाचे छेन्नुआड (?) ह्यांस—

आपले दि. ३० ऑक्टोबरचे पत्र मिळाले, व आपले क्षेम कुशल कळून आनंद झाला. संभाजीचे राज्य घेण्याच्या मोहिमेवर आपली नेमणूक झाली असून आपण त्याचे दोन गड घेतले असल्याची आपल्या पत्रातील बातमी उत्साह-जनक आहे. तसेच आपण फोंड्यावर येण्यास निघाल्याची बातमीही वाचून आनंद झाला. कोकणच्या राज्यात पूर्वी जे स्वास्थ्य होते ते स्वास्थ्य त्याला फिरून आपल्या मोहिमेमुळे लाभणार आहे म्हणून समाधान झाले. आपणाशी आमचे नेहमीच स्नेहाचे संबंध राहतील. तसेच मोगल सम्राटाशी आमचे जे स्नेहाचे संबंध आहेत त्याना अनुसरून मी आमच्या साष्टीतील सेनापतीस आपणास जरूर ती मदत करण्याची आज्ञा करीत आहे आपणाला माझी एक विनंती आहे की, कोल्ल (?) हे खेडे माझ्या स्वामीच्या एका प्रजाजनाच्या मालकीचे आहे. ह्या खेड्यात साप्रत शत्रूने धुडगूस घातला आहे. तरी हे खेडे ज्याचे आहे त्याला ते परत मिळवून द्यावे.

देव आपले भले करो."

गोवा, ६ नवंबर १६८८ दों. रूद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 4, FLS 68)

फोंड्याच्या सरदेसायानीही मोगलाना संभाजी महाराजाविरुद्ध मदत केली. पोर्तुगीजाचे आणि फोंड्याच्या सरदेसायाचे संभाजी महाराजांविरुद्ध संधान होते हे व्हाइसरॉयच्या पुढील पत्रावरून सिद्ध होते.

"फोंड्याचे देलबा नाईक सरदेसाई ह्यांस—

फोंड्याचे सरदेसाई देलबा नाईक ह्यांचे दि. २३ जानेवारीचे पत्र मिळाले. त्यांनी मोगलांची चाकरी पत्करल्याचे वाचून व ते सांप्रत नबाब बहादूरखान ह्यांच्या छावणीत असून व नबाबांनी त्यांचा सत्कार केल्याचे कळून आनंद झाला. मोगल सम्राटाच्या मंत्र्यांनी त्यांनी आमच्याविषयीं चांगली माहिती पुरविली ह्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे............ वगैरे".

देव आपले भले करो." दो. रूद्रिगु द कोश

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 4, FLS 69V)

मोगलांनी संभाजी महाराजांना दि. २८ डिसेंबर १६८८ रोजी कैद केले व दि. ११ मार्च १६८९ रोजी मोगल सम्राटांच्या आज्ञेवरून त्यांचा वध झाला. ह्या संदर्भात गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला दि. ३१ जानेवारी १६८९ रोजी लिहितो :—

"मोगल सैन्याने विजापूरचे व गोवळकोंड्याचे राज्य घेऊन त्या दोन्ही राज्यांच्या सुलतानांना कैद केले आहे. मोगलांनी मदरा आणि म्हैसूर ह्या दोन्ही राज्यांचाही बराच मुलुख घेतला.

आम्ही चोर संभाजीच्या दुष्ट शेजारापासून आता मुक्त झालो आहोत मोगलांनी संभाजीचे कोकणातील सर्व राज्य घेऊन आमच्या गोव्याच्या राज्याला लागून असलेले त्याचे प्रख्यात फोंडा शहरही घेतले आहे. मोगल सम्राट आणखी काही वर्षे जगला तर तो संभाजीला पूर्णपणे नष्ट केल्याशिवाय राहाणार नाही. मोगलांचे आणि आमचे संबंध चांगले आहेत. त्यांचा एक वकील आमच्याकडे आला असून त्याने आमची मोगलांचेकडील मैत्री चालू रहावी अशी मागणी केली आहे. सां. थॉमे हे शहर व त्या लगतची काही खेडी आम्हाला देण्याचे त्याने कबूल केले आहे. परवा दि. २९ जानेवारीस आमचे उत्तरेकडील आरमार गोव्यास आले. मोगल बादशहाचा प्रतिनिधी सांप्रत इकडेच आहे. मोगल जहाजांना आणि सैन्याला आमच्या प्रदेशातून फोंड्यास जाण्याची परवानगी मिळावी अशी त्याने मागणी केली आहे".

(MSS. 647, COLECCAO POMBALINA DE BIBLIOTECA NACIONAL DE LISBOA—EXTRACTO DAS NOVAS QUE VIERAM DO ORIENTE

इ. स. १६८९ साली फोंड्याचा अन्तर्भाव मोगल साम्राज्यात करण्यात आला व मोगल बादशहाने सरबाज ( Sarbag ) खान ह्याची फोंड्याचा सुभेदार म्हणून नेमणूक केली.

मोगल बादशहाने संभाजी महाराजांचे कोकणातील राज्य घेतल्याबद्दल आनंद व्यक्त करून व्हाइसरॉयने पोर्तुगालला पत्र लिहिले. परंतु नंतर त्याला उपरती झाली व मोगलांचा शेजार हा धोक्याचा असल्याचे त्याने पोर्तुगालला आपल्या राजास कळविले तो त्या पत्रात म्हणतो की, मोगलांचा शेजार हा धोक्याचा असून त्यांचा गोव्यावर केव्हा हल्ला होईल त्याचा नेम नाही.
(LIVRO DAS MONCOES, No. 53, FLS 369)

संभाजी महाराजांच्या वधानंतर राजाराम महाराजांनी मोगलांच्या अटकेत असलेले त्यांचे पुतणे संभाजी महाराजांचे पुत्र शिवाजी दुसरे ऊर्फ शाहू राजे ह्यांच्यावतीने मराठ्यांचा राज्याचा राज्यकारभार पहाण्यास सुरूवात केली व मोगलांचा प्रतिकार चालू ठेवला.
PEOPLE, 2nd EDITION, Pg 156, Kin-Para.

मोगल सरदार बहादुरखान ह्याने पोर्तुगीज व्हाइसरॉयला कळविले की, राजाराम महाराज बाइरी (?) च्या गडावरून जावळीच्या किल्ल्यात आश्रयार्थ गेले असून, तिथून कर्नाटकात जाण्याचा त्यांचा विचार आहे. तरी ते कर्नाटकातून गोवामार्गे गेले, तर त्यांना अटक करण्यात यावी. त्या पत्रास गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :--

"मोगल बादशहाचे सरदार बहादुरखान ह्यांस--

आपले पत्र मिळाले. आपली ख्याली खुशाली कळली, व आपण आमच्या शेजारी आला आहात हे वाचून आनंद झाला. आपणास असेच उत्तम आरोग्य आणि सुख सौख्य लाभावे, अशी देवापाशी प्रार्थना आहे. आपल्या पत्रात आपण म्हणता की, राजारामने बाइरीच्या टेकड्यातून निसटून जावळीच्या किल्ल्याचा आश्रय घेतला आहे, तसेच त्याचा कर्नाटकात जाण्याचा विचार आहे. पण तो हुलकावण्या देत आहे. आपल्या बादशहांकडून आपणास हुकूम झाला आहे की, राजाराम जर ह्या राज्यातून गेला तर त्याला पकडण्याची आम्हाला आज्ञा करावी. राजारामने आमच्या राज्यातून निसटून जाऊ नये म्हणून मी सगळीकडे बंदोबस्त ठेवीत आहे. त्याला शिक्षा झालीच पाहिजे.
.................."

देव आपले भले करो.

गोवा, २२ मे १६८९ दों. रूद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 4, FLS 75)

बहादुरखान ह्यास पोर्तुगीज व्हाइसरॉयने आणखी एक पत्र लिहिले त्या पत्रातही राजाराम महाराजांच्या पलायनासंबंधीचा उल्लेख आहे.

"बेळगावचे सुभेदार नबाब बहादुरखान ह्यांस--

आपली दोन पत्रे मिळाली. पैकी एक पत्र अहमद सारंग ह्याने आणले तर दुसरे जहाजाने आले. ह्या दोन्ही पत्रांत आपण समुद्रावर आणि जमिनीवर अशा दोन्हीही ठिकाणी राजारामावर पाळत ठेवावी अशी आमच्याकडे मागणी केली आहे. आपण म्हणता की, राजाराम कर्नाटकात पळून जाण्याचा विचार करीत असून तिकडे एक मोठा खजिना त्याला मिळायचा आहे.

आपणास कळविण्यात येत आहे की, राजारामने ह्या बाजूने कर्नाटकात निसटू नये म्हणून सगळीकडे पहारे बसविण्यात आले आहेत. आपल्या पत्राप्रमाणे आता त्या पहाऱ्यात वाढ करीत आहे ............... ".

देव आपले भले करो.

गोवा, ३ सप्टेंबर १६८९.

दों रूद्रिगु द कोश्त.

(LIVRO DĀS MONÇOES No. 4, FLS 78)

खेम सावंत ह्यांनी मोगलांकडे चाकरी धरल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. पोर्तुगीज व्हाइसरॉयने त्यांना लिहिलेल्या एका पत्रात त्यांच्या मोगलनिष्ठेचा उल्लेख केला आहे :--

"देसाई खेम सावंत ह्यांस--

देसाई खेम सावंत ह्याचे पत्र मिळाले. ह्या पत्रात तू लिहितोस की नबाब बहादुरखान ह्याने आपला मान सन्मान केला. त्याचप्रमाणे बांदा येथे तू शत्रूवर मिळविलेल्या विजयाची आणि शत्रूने कुडाळ येथून घेतलेल्या माघारीचीही बातमी त्या पत्रात आहे. मागे तू मला लिहिल्याचे मला आठवते की, कुडाळला एक किल्ला बांधण्याचा आपला विचार आहे. आता ह्या पत्रात तू लिहितोस की, तो किल्ला बांधून काही उपयोग नाही. तुझ्या कुटुंबातील बारदेशला जी माणसे आहेत त्यांना भेटावयास येण्याची तू जी परवानगी मागितली आहेस ती परवानगी तुला मी देत आहे. तुझ्या बरोबरच्या इतर लोकांच्या कुटुंबातील माणसे पैल तडीस कधीच गेली आहेत".

गोवा. १० जून १६८९. दों रूद्रिगु द कोश्तु.

(LIVRO DAS MONÇOES, No. 4, FLS 76)

यशवंतराव दळवी ह्या नावाच्या मोगलांच्या एका सेनाधिकाऱ्या मराठ्यांच्या सैन्यावर कुडाळ येथे जो विजय मिळविला त्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयने त्याचे अभिनंदन केले––

"मोगलांच्या घोडदळातील एक सेनापती यशवंतराव दळवी ह्यांस––

आपले पत्र मिळाले. आपण कुडाळ येथे शत्रुवर विजय मिळविल्याची वार्ता ऐकून आनंद झाला. असेच विजय आपणास वरचेवर मिळतील व सबंध कोकण प्रांत मोगल बादशहाच्या अमलाखाली येईल अशी आशा आहे. आपण मला लिहिता की, आपल्या सैन्यातील जनावरांसाठी आपणाला ६० खंडी हरबरे, उडीद आणि इतर कडधान्ये हवी आहेत. आमच्यापाशी जर ही कडधान्ये असती तर ती आपणाला पुरविण्यास मला आनंद वाटला असता. परंतु प्रस्तुत कडधान्ये आमच्या राज्यात पिकत नाहीत, ती आम्हाला बाहेरून आणावी लागतात. इतर अन्न सामुग्री संबंधाने मी आपणाला कळवू इच्छितो की, ती पलीकडच्या बाजूला जाण्यास आमची कोणतीच आडकाठी नाही. आणि मला माहिती मिळाली आहे की, व्यापारी ती इकडून तिकडे वरचेवर नेतात आणि भरमसाट नफा उकळतात. इकडे तो माल त्यांना किफायतशीर मिळतो".

गोवा, २१ जून १६८९ दों रूद्रिगु द कोश्त.

मणेरी आणि सांखळी येथील देसाई राजाराम महाराजांना जाऊन मिळाले. राजाराम महाराजांभोवती आता उत्कृष्ट सैन्य गोळा झाले होते. ह्या सैन्याने सेनापती संताजी घोरपडे ह्यांच्या कुशल नेतृत्वाखाली गनिमीयुद्ध सुरू करून मोगलांना सळो की पळो करून सोडले. मराठ्यांच्या गनिमी हल्ल्यांमुळे औरंगजेब बादशहा इतका हैराण होऊन गेला की, त्याने पुढील उद्‌गार काढले. "माणसांच्या हातात काही नसते सर्व काही देवाच्या इच्छेवर अवलंबून असते."

(KINCAID-PARASNIS: HISTORY OF MARATHA PEOPLE, PAGE 180)

गोव्याचा व्हाइसरॉय मोगलांचा सरदार अब्दुल रजाखान ह्याला मणेरी व सांखळी येथील देसायासंबंधाने लिहितो:––

"मोगल बादशहाचे सरदार अब्दुल रजाखान ह्यांस––

अहमद सारंग ह्याने मला आपले पत्र आणून दिले. माझ्या पूर्वीचे व्हाइसरॉय दों रूद्रिगु द कोश्त ह्यांच्या मृत्युबद्दल आपण जे दुःख व्यक्त केले आहे व त्यांच्या जागी व्हाइसरॉय म्हणून माझी नेमणूक झाल्याबद्दल जे माझे अभिनंदन केले आहे त्याबद्दल मी आपणाला आभारी आहे.

माझ्या अमदानीत............ मोठी वाढ होण्याची आपण अपेक्षा करता. आपण म्हणता की, माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयचा आणि आपला विशेष पत्र-व्यवहार नव्हता. पण मला कळले आहे की, ते आपले पुष्कळच चहाते होते. आपली ती लायकी आहे हे तर झालेच परंतु ज्यांच्याशी आमची मैत्री आहे त्या मोगल बादशहाचे आपण सरदार आहात हे दुसरे कारण आहे. आमच्या राज्याचा कारभार चांगला चालावा म्हणून आपण जी सदिच्छा व्यक्त केली आहे, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. मी आपणास कळवू इच्छितो की, मोगल बादशहाच्या बाबतीत माझ्या हातून ज्या गोष्टी पार पडायच्या आहेत, त्या पार पाडण्याच्या बाबतीत मी मुळीच कसूर करणार नाही.

आपण माझ्याकडे मागणी केली आहे की, मोगल बादशहाविरुद्ध बंड करून उठलेले सांखळी आणि मणेरी येथील देसाई व सोनु शेणवी ह्यांना कैद करावे. ही मागणी आपण मागच्या पत्रातही केली होती. तिला मी उत्तर दिले होते की, त्यांना पकडण्याचे हुकूम सुटले आहेत. परंतु राज्याला सर्व प्रकारची काळजी घ्यावी लागते. माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयची अशी इच्छा होती की, बारदेशमध्ये जी देसाई कुटुंबे येऊन राहिलेली आहेत त्यांना पलीकडच्या बाजूला जाण्यास परवानगी देणे बरोबर नाही. परंतु आपण अनेक पत्रे लिहून आणि मागणी करून त्यांची मुक्तता करावयास लावली. आपण निर्वाळा दिला होता की, ते लोक बादशहांना इमानी आहेत. आपल्या रदबदलीमुळेच त्यांना पलीकडे जाण्यास परवानगी देणे भाग पडले. ह्या कुटुंबांबरोबरच मणेरीच्या देसायांनाही ती परवानगी द्यावी लागली. आता ज्याअर्थी, मला कळले आहे की, ह्या देसायांच्या उठावणीमागे राजारामाचा हात आहे, त्याअर्थी, त्यांना पकडण्यासाठी घोडदळ आणि पायदळ पाठविण्यात यावे व यत्किंचितही विलंब न लावता त्यांचा नाश करावा. कारण हे लोक बादशहाशी बेइमान झाले आहेत. संभाजीशी त्यांचा बेबनाव झाला तेव्हा आम्ही त्यांना कसे संरक्षण दिले ते महशूरच आहे. परंतु तो उपकार विसरून जाऊन त्यांनी कुंभारजुवे बेटावरील व बारदेशमधील लोकांची ह्या बाजूला चरावयास आलेली गुरे चोरली. आणि ज्याअर्थी, ते ह्या राज्याचा शत्रू राजाराम ह्याला जाऊन मिळाले आहेत, त्याअर्थी, ते ह्यापेक्षाही मोठे गुन्हे करण्यास कमी करणार नाहीत. म्हणून राजारामाने ह्या लोकांच्या मदतीने काही दंगेधोपे करू नयेत म्हणून जमिनीप्रमाणे नद्यांमध्ये देखील बंदोबस्त ठेवण्यात आला आहे.

आपण बादशहांना शिफारस केलीच आहे की, पोर्तुगीज हे कोणत्याही वेळी त्यांचे मित्र म्हणून त्यांच्या बाजूला आहेत."

देव आपले भले करो.

गोवा, १५ ऑगस्ट १६९०. दों मिगेल द आल्मैद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 4, FLS 87).

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास दि. १६ जानेवारी १६९१ रोजी जे पत्र धाडले त्यात त्याने दख्खनमधील राजकीय परिस्थितीचे सुंदर आणि सुस्पष्ट विवेचन केले आहे. तो म्हणतो —

" महाराज––

आमच्या राज्यात सांप्रत शांतता आणि स्वास्थ्य नांदत आहे, त्याचे कारण हे की, आमच्या राज्याच्या सीमांना ज्या दोन राजांच्या राज्याच्या सीमा भिडल्या आहेत ते दोन्ही राजे एकमेकांशी युद्धात गुंतले असल्याने त्यांचे आमच्याकडे दुर्लक्ष झाले आहे. ह्या दोन्ही राज्यांमध्ये जे युद्ध चालू आहे, त्याचा वृत्तांत मी आपणाला ह्या पत्राचे द्वारा सादर करीत आहे —

महाराज, मोगल बादशहाने संभाजीला पकडून त्याचा वध केल्यावर तो त्याचे राज्य जिंकण्याच्या मार्गास लागला. संभाजीचा भाऊ राजाराम ह्याने पन्हाळ्याच्या टेकड्यांचा आश्रय घेतला होता. मोगलांनी पन्हाळ्यास वेढा घालताच राजाराम तिथून निसटला व त्याने कर्नाटकच्या राणीच्या राज्यातून पुढे पळ काढला. ती बातमी बादशहाला कळताच त्याने कर्नाटकाच्या राणीवर आपले सैन्य धाडले. ह्या सैन्याचे अधिपत्य राजपुत्र सुलतान ह्याच्याकडे होते. ह्या राजपुत्राने राणीचे काही किल्ले घेऊन तिची राजधानी बेद्रुड (?) ही सर केली. राणीने राजधानीतून कधीच पळ काढला होता. तीने राजपुत्राशी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या. तिने त्याला तीन किल्ले आणि दरवर्षी सहा लाखप्रमाणे अठरा लाख पागोडा युद्ध खंडणी देण्याचे कबूल केले. हे अठरा लाख पागोडा म्हणजे खरोखर अठरा कोट आहेत. राणीने तहाच्या करारातील अटीप्रमाणे राजपुत्राला सहा लक्ष पागोडा दिले. बादशहाला जेव्हा ह्या कराराची वार्ता कळली, तेव्हा आपल्या मुलाने आपणाला न कळविता तो करार पार पाडलेला पाहून बादशहा त्याच्यावर भयंकर संतप्त झाला व त्याने त्याला माघारा बोलविले. बादशहाला बेद्रुडच्या राणीशी तह करावयाचा नव्हता. त्याला विजापूर आणि गोवळकोंडा ह्या राज्यांप्रमाणे ते राज्य खालसा करायचे होते. राजपुत्र सुलतान बापाच्या आज्ञेप्रमाणे

माघारा परतला नाही. आपले भवितव्य त्याला माहीत होते. आपल्या बापाचा क्रोध त्याला माहीत होता. त्याचा थोरला भाऊ इ. स. १६८४ साली कोंकणच्या स्वारीवर आला तेव्हा त्याला कोकण जिंकता न आलेले पाहून, तो बादशहाच्या मर्जीतून उतरला होता. बादशहाने त्याला माघारा बोलावून त्याचा शिरच्छेद केला होता. आपलीही गत तीच होईल ह्या भीतीने त्याने बापाची आज्ञा धुडकावून एका दुर्गम पर्वताचा आश्रय घेतला. त्याचे हे कृत्य म्हणजे उघडउघड बंडखोरीच आहे.

बादशहाची छावणी विजापूरपासून जवळच एका खेड्यात होती. त्याला ज्या मुलुखात सैन्य पाठवायचे असे तिकडे तो आपल्या सरदारांना पाठवित असे. आम्ही असे ऐकतो की, त्याच्या सैन्यात पटकीच्या साथीचा प्रादुर्भाव होऊन जवळजवळ एक लाख माणसे, पुष्कळ घोडे, हत्ती आणि उंट मेले. ते पाहून बादशहाने आपली छावणी बेद्री (?) ह्या नावाच्या दूरच्या खेड्यात हलविली. परंतु बादशहाचे सैन्य आता पुष्कळच कमी झालेले होते. ती संधी राजारामाच्या सरदारांनी साधली व त्यांनी मोठे घोडदळ आणि पायदळ आणून शाही सैन्याला उपद्रव देण्यास सुरुवात केली मात्र बादशहाच्या छावणीला तोफांचे संरक्षण असल्याकारणे त्या छावणीवर समोरासमोर हल्ला करण्याचे धाडस मराठे सरदारांना झाले नाही. तथापि, त्यांनी मोगल सरदारांशी संधान साधून व त्यांना पैशाची लाच देऊन युद्धाचा जोर कमी केला. दोन्हीही पक्षांची हानी होऊ नये अशा रीतीने त्यांनी हे युद्ध चालू ठेवले आहे. मोगल सरदारांनाही ह्या युद्धाचा निकाल झटपट लागलेला नको आहे. कारण, युद्ध चालू असते तेव्हा ह्या लोकांची चंगळ असते. त्यांना खायला प्यायला भरपूर मिळते हे तर झालेच, शिवाय अवांतर कमाईही होते. फक्त बादशहाच्या डोळ्यांना पाणी लावण्यासाठी ते युद्धाचा बहाणा करतात. एकूण ती एक दिशाभूलच आहे.

कर्नाटकाच्या राणीला मोठी युद्धखंडणी द्यावी लागल्याने तिला आपल्या प्रजेवर कर बसविणे भाग पडले. परंतु तो कर बसवूनदेखील खंडणीचा पैसा गोळा होणे अशक्य झाल्याने तिला बार्सेलोर (?) नदीवरील एक किल्ला अडराय (?) ह्याला तीन लक्ष पागोडांना विकावा लागला. राणीला पैसे लवकर हवे आहेत, तर अडराय किल्ला ताब्यात मिळाल्याशिवाय पैसे मोजण्यास तयार नाही.

इकडे कोकणात मोगल बादशहाची पकड ढिली झाल्याने व त्याच्याकडे मागण्यात आलेली कुमक न आल्याने तिथल्या देसायांनी बादशहाची सत्ता

झुगारून देऊन राजारामाशी संधान साधले आहे. तसे पाहिले तर राजारामानेच त्यांना मोगल बादशहाविरुद्ध चिथावणी दिली आहे. ते मोगलांविरुद्ध उलटले त्याचे कारण हे की, ते राजारामाच्या जातीचे आहेत हे तर झालेच, परंतु मुसलमानांच्या अरेरावीची आणि उर्मटपणाची त्यांना चीड आली आहे. मुसलमानांनी हिंदु स्त्रीया व हिंदू मंदिरे भ्रष्ट केल्याने हे देसाई त्यांच्याविरुद्ध उठले असल्यास नवल नाही. सर्व देसायांनी एकत्र होऊन फोंडयाचा सुभेदार सरबजखान व सरदार अब्दुल रजाखान ह्यांच्याविरुद्ध उठाव केला. अब्दुल रजाखान कुडाळला होता. तो डिचोलीला पळून आला आहे. ह्या दोघांना राजारामाच्या सैन्याची भीती वाटते.

मराठयांनी फोंडयाच्या जवळपासची खेडी लुटली व फोंडयास वेढा घातला. मोगलांपाशी घोडदळ नाही. जे काय थोडे फार होते ते मरून गेले. सरदार अब्दुल रजाखान ह्याने आपली बायकामुले आणि इतर चीजवस्तू नदीतील एका बेटावर सुरक्षिततेसाठी पाठवून दिली होती. ह्याबाबतीत त्याला आमची मदत झाली. त्याला बादशहाने आपणाकडे बोलावले असल्याने तो आपल्या जनानखान्यासह तिकडे रवाना झाला आहे. निघताना पत्र लिहून त्याने आमचे आभार मानले होते व बादशहापाशी आमचे काही काम असल्यास ते आपण आनंदाने करू असे पत्रातून कळविले होते. आम्ही त्याला उलट पत्र लिहून त्याने जो मुलुख काबीज केला, त्याबद्दल त्याचे अभिनंदन केले व आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवून पत्रव्यवहार चालू ठेवण्याची इच्छा दर्शविली.

एकेबाजूने आम्ही बादशहाच्या प्रजाजनांना आमच्या राज्यातून बाहेर जाण्यास वाट देत आहोत, तर दुसऱ्या बाजूने राजारामाशीही धूर्तपणाने वागत आहोत. राजारामाने व्हाईसरॉय दों रूद्रिगु द कोश्त व व्हाइसरॉय दों मिगेल द अलमैंद ह्या दोघांना पत्रे लिहून त्याचे वडील शिवाजी राजे ह्यांच्याशी जसे आमचे मैत्रीचे संबंध होते, तसेच मैत्रीचे संबंध आपणाशीही ठेवण्याची विनंती केली होती. त्याला आम्ही उत्तर पाठवून त्याच्याशी मैत्री ठेवण्याची आमची इच्छा असल्याचे कळविले आहे.

अशा रीतीने बादशहाचे अधिकारी आणि राजाराम ह्या दोघांचाही आम्ही विश्वास संपादन केला आहे. ते दोघेही आम्हांला मानतात व आम्ही त्यांचे मित्र असल्याचे समजतात.

अशी वार्ता आहे की, राजारामाच्या लोकांनी आणि देसायांनी फोंडे आणि डिचोली हे दोन्ही प्रांत घेतले आहेत. आमच्या राज्याला मुसलमानां-पेक्षा हिंदू शेजारीच बरे असे आम्हांला वाटते. मुसलमानांवर कधीच विश्वास ठेवू नये.

त्यांना वचनाची किंमत नसते. ते उर्मट आणि भांडखोर असतात. तथापि, असे जरी असले तरी दोघांशीही आमचे संबंध तटस्थतेचे आहेत असे आम्ही भासवितो. त्यांच्याशी असलेले मतभेद आम्ही कधीच उघड केलेले नाहीत. आम्ही नेहमीच जागरूक आणि तयारीने असतो. आम्ही हत्यारबंद असून आमची ठाणी सुरक्षित आहेत. नदीत जहाजांची टेहळणी असून त्यांचे नेतृत्व कापितांव मोर ह्यांच्याकडे आहे. माझ्या बलाढ्य आणि सर्वश्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख समृद्धि देऊन त्याचे रक्षण करो".

गोवा, १६ जानेवारी १६९१.

(LIVRO DAS MONÇÕES, No. 55, FLS. 224)

इ. स. १६९२ साली पोर्तुगीजांकडून मराठ्यांना मदत होते म्हणून मोगलांचा सरदार मातबरखान ह्याने पोर्तुगीजांच्या उत्तरेकडील (वसई) प्रांतावर हल्ला केला. मोगलांच्या आणि पोर्तुगीजांच्या अनेक झटापटी होऊन त्यात पोर्तुगीजांचा पराभव झाला. शेवटी त्यांना वसईच्या किल्ल्याचा आश्रय घ्यावा लागला. मुसलमानांनी अनेक पोर्तुगीजांना आणि त्यांच्या बायकामुलांना कैद केले.

शेवटी पोर्तुगीजांनी फ्रेइ मातियश ह्या नावाच्या एका पाद्र्याला औरंगजेब बादशहाकडे आपला दूत म्हणून पाठवून त्याच्याकडे तहाची याचना केली. औरंगजेबाला पोर्तुगीजांची दया आली व त्याने मातबरखानाला त्याने पकडलें पोर्तुगीज व त्यांची बायकामुले आणि लूट मुक्त करण्याचा हुकूम धाडला. एका पोर्तुगीज पत्रावरून असे कळते की, सरदार मातबरखान ह्याने औरंगजेबाच्या परवानगीविना पोर्तुगीज प्रदेशात शिरून लुटालूट केल्याबद्दल त्याला दोन लक्ष रुपयांचा दंड केला.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 4, FLS. 119)

मराठ्यांच्या जहाजांकडून पोर्तुगीज जहाजांवर हल्ले होत असावेत त्याचा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयने खेम सावंत ह्यांना पाठविलेल्या एका पत्रात आला आहे. ते पत्र पुढीलप्रमाणे आहे:—

"खेम सावंत ह्यांस—

खेम सावंत सरदेसाई ह्यांचे पत्र मिळाले व ते वाचून मजकूर समजला. राजापूर नदीतील चाच्यांच्या नौकेसंबंधाने त्यांनी जी कामगिरी बजावली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत. मला माहीत आहे की, खेम सावंत

सरदेसाई हे आमच्या राज्याचे हितींचतक आहेत. हल्ली मराठ्यांच्या जहाजां-कडून आम्हांला पुष्कळच उपसर्ग पोचू लागला आहे. ते आमचे मित्र म्हण-वितात आणि आमची गलबते खुशाल लुटतात. गेल्यावर्षी त्यांनी ह्या बंदरांतील एक जहाज लुटले. त्यांची जहाजे समुद्र किनाऱ्यावर भक्षाच्या शोधार्थ हिंडत असतात. त्यातील एका जहाजाचा आमच्या जहाजाने पाठलाग केला. ते जहाज एका खेड्याच्या किनाऱ्याला लागले असता आमच्या लोकांनी त्या किनाऱ्यावर उतरून ते खेडे जाळून बेचिराख केले.

सरदेसाई खेम सावंत ह्याना माझी विनंती आहे की, राजापूर आणि मेलोंडी (?) येथील चाचांच्या कप्तानाशी आणि मराठ्यांच्या ठाणेदारांशी त्याचा जर पत्रव्यवहार असेल तर, त्यांनी त्यांना कळवावे की, पोर्तुगीजांच्या शिक्षेचा तो एक नमूना होतो. त्यांना जर आमच्याशी शांततेचे आणि सलोख्याचे संबंध ठेवायचे असतील तर त्यांनी आमची जहाजे आम्हांला परत करावी व यापुढे आमच्या जहाजांवर हल्ले करण्याचा उद्धटपणा करु नये. ते जर माझ्या सूचनेप्रमाणे वागले तर, माझी मर्जी संपादन करण्यात त्यांना यश येईल. सरदेसाई ह्यांनी जो विजय मिळविला त्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. देव आपले भले करो, वगैरे".

पानेली, २३ ऑक्टोबर १६९४.

कौंट द व्हिला व्हेर्द.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 6, FLS. 18V)

गोव्याच्या व्हाइसरॉयने मराठ्यांना बदला घेण्याची धमकी देऊनदेखील त्यांचा त्रास कमी झाला नाही, हे गोव्याच्या व्हाइसरॉयने फोंड्याचा सुभेदार एक्लसखान ह्याला पाठविलेल्या पत्रावरून दिसून येते :—

" फोंड्याचे नबाब एखलासखान ह्यांस—

शत्रूचा बंदोबस्त कसा करायचा तत्संबंधाने अहमद सारंग हे आपणाशी बोलणी करतील. शत्रू नेमका कुठे आहे ते मला कळविण्याची कृपा करावी, म्हणजे माझे लोक त्यांच्या बंदोबस्तास गेले तर त्यांच्याकडून आपल्या प्रजेला उपसर्ग पोचू नये म्हणून त्यांना ताकीद देणे मला शक्य होईल. माझ्या लोकांना वाट देण्याबद्दल आपण त्यांना हुकूम करावा.

बार्देशहून माझ्याकडे काही लष्करी कैदी पाठविण्यात आले आहेत. आमच्या सैन्याने शत्रूवर जो अचानक हल्ला केला त्यात त्यांच्या हाताला हे कैदी लागले ह्या छाप्यात शत्रूचे बरेच लोक गारद झाले व त्यांचे काही

घोडेही आम्हाला मिळाले. पकडून आणलेल्या शिपायांचे असे म्हणणे आहे की, ते तुमच्या पूर्वीचे सुभेदार सरबाजखान ह्यांच्या सैन्यातील शिपाई आहेत. ते डिचोलीला होते. तिथून मग पळून आले. मला असे वाटते की ते पळपुटे आहेत. त्यांनी आपल्याकडची चाकरी सोडून शत्रूकडे चाकरी धरली असावी. अहमदकडे त्या लोकांची नावे पाठविली आहेत. तरी हे लोक आपलेच आहेत की, शत्रूचे त्याची चौकशी करावी. ते जर आपले लोक असतील तर त्यांना शिक्षा करावी की, सोडून द्यावे तेही कळवावे".

गोवा, १२ नवंबर १६९४

कोंद द व्हिला व्हेर्दे

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 6, FLS 18V)

मराठे सैनिकांनी बार्देशमध्ये शिरून लुटालूट केली अशी तक्रार गोव्याच्या व्हाइसरॉयने रायाजी शामराव ह्यांना पाठविलेल्या पत्रात केली आहे :—

"रायाजी शामराव ह्यांस—

मागे आपणाकडून रामचंद्र पंडित (राजाराम महाराज जिंजीला होते तेव्हा त्यांनी रामचंद्र पंडित ह्यांना दख्खनचा पेशवा म्हणून नेमले होते) ह्यांच्याकडून व संताजी घोरपडे ह्यांच्याकडून जी पत्रे आली होती, त्यात आपण ह्या राज्याचे मित्र असल्याचे त्यांनी कळविले होते. परंतु आज ते उलटे दिसत आहे. कारण आपण घाट उतरून आमच्या राज्यात शिरलात व लुटालूट केलीत. हे कृत्य अत्यंत विलक्षण आहे. त्यामुळे आपणावर विश्वास ठेवणे कठीण झाले आहे. मी चौलला कुलाबा आणि खांदेरी ही बेटे व्यापण्याचा व त्या बेटांकडे अन्न पुरवठा न पाठविण्याचा हुकूम घाडला होता. हा हुकूम अमलात आलेला पाहून आपण गडबडून गेला असाल. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, पोर्तुगीज हे तशाच काही सबळ कारणाशिवाय आपल्या मित्रांकडील संबंध तोडीत नाहीत. मला वाटते की, आपल्या ज्या शिलेदारांनी बार्देशमधे शिरून लुटालूट केली त्याची आपणाला माहिती नसावी. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपल्या सैनिकांच्या बेशिस्तपणाची चौकशी करून आपण त्यांना योग्य ती शिक्षा करावी. तसेच आपणाला युद्ध हवे की शांतता तेही आम्हाला कळवावे. आमच्याशी जर आपणाला युद्ध करायचे असेल तर त्याला आमची तयारी आहे आणि आमचे सैनिकही लढाईला उत्सुक आहेत. आपणाला युद्ध नको असल्यास आपण ते प्रत्यक्ष कृतीने दाखविले पाहिजे. आपण आमच्या राज्यात शिरलेल्या आपल्या

शिपायांना माघारा बोलवावे. व त्यांच्या हातून यापुढे अशी आगळीक न होऊ देण्याची खबरदारी घ्यावी. तसेच आपण आमच्याशी तहही करावा. माझी अशी समजूत आहे की, आमच्या राज्याला लागून जी राज्ये आहेत, त्यांनी आमच्याशी मैत्री ठेवली नाही, म्हणून त्यांचा नाश झाला.

आपण आमच्याशीं सलोख्याचे संबंध ठेवू इच्छिता, त्याचे कारण हे की, माझ्या हाताशी मोठे सैन्य असून यंदा युरोपातून आम्हाला मोठी कुमक आली आहे हे आपणाला कळले आहे.

मी हे पत्र रामकृष्ण नाईक ह्यांच्याबरोबर पाठवित आहे. ते आपणाला काय करायचे ते सर्व समजाऊन सांगतील."

गोवा, १३ नवंबर १६९४. कॉट द व्हिला व्हेर्द

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 6, FLS 18V)

मणेरीच्या देसायांचा उठाव मोडून काढण्यासाठी पोर्तुगिजांनी मोगलांना कशी कशी मदत केली ते गोव्याच्या व्हाइसरॉयच्या पुढील पत्रावरून कळून येते :--

फोंड्याचे सुभेदार ह्यांस :--

अहमद्द सारंग ह्याच्याकडे आपण जो निरोप पाठविला होता, त्या निरोपाप्रमाणे मी मणेरीला एक हजार बंदुकधारी सैनिक आणि पन्नास घोडेस्वार पाठविले ते तेथे काल सकाळी दहा वाजता जाऊन पोहोचले. ते लगेच मैदानाकडे रवाना झाले, परंतु त्यांना तिथे कुणीच आढळला नाही. माझी अशी समजूत आहे की, माझे सैन्य बलाढ्य असल्याकारणे शत्रूने पळ काढला असावा. माझ्या सेनापतीने शत्रूचा दोन कोस पाठलाग केला. आपण मला लिहिले होते, की, आपलेही सैन्य तेथे असेल. परंतु आपले सैन्य आमच्या सैन्याला तेथे आढळले नाही. त्यावरून असा निष्कर्ष निघतो की, आमच्या सैन्याला शत्रूच्या तोंडी देण्याचा आपला विचार होता. किंवा शत्रूशी मुकाबला करण्यास आपणापाशी सैन्य नव्हते, आणि आता आपण कळविता की डिचोलीला शक्य तितक्या लवकर सैन्य पाठवावे. ही गोष्ट अशक्य आहे कारण मी सैन्य साष्टी आणि बार्देश येथे पाठविले आहे. त्या सैन्याची जमवाजमव करण्यास उशीर लागेल. आणि मला आश्चर्य वाटते ते हे की, आपण शत्रूच्या इतक्या जवळ असून त्याचा प्रतिकार का करीत नाही ?

गोवा, १७ नवंबर १६९४. कॉट द व्हिला व्हेर्द

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 6, FLS 17)

गोव्याचे पोर्तुगीज एकेबाजूने देसायांचा बंदोबस्त करण्यासाठी मोगलांना मदत करण्याचा बहाणा करीत होते, तर दुसऱ्या बाजूने देसायांना आपल्या राज्यात आश्रय देत होते. कदाचित देसायांच्या बंडाळीला त्यांची आतून फूसही असावी. कारण मोगलांच्या मुलुखात शांतता नांदलेली त्यांना नको होती. कारण, ते दगलबाज असल्याची त्यांची समजूत असल्याने त्यांच्याकडून गोव्यावर केव्हां हल्ला होईल त्याचा नेम नाही अशी त्याना सदैव भीती वाटत असे. अशारीतीने पोर्तुगिजांनी साखळी व डिचोळी येथील देसायांना आश्रय दिल्याबद्दल फोंड्याच्या मोगल सुभेदाराने पोर्तुगिजांकडे तक्रार केली. त्यांतच अरबांनी गोवा घेण्यासाठी मोंगलांकडे मदत मागितली असल्याची खळबळजनक बातमी त्याना कळली.

मोंगल सुभेदाराच्या तक्रारीचा व त्याच्या पत्रातील अरबांच्या गोव्यावरील संभाव्य स्वारी संबंधीच्या बातमीचा खल दिनांक २३ ऑगस्ट १६९५ रोजी भरलेल्या गोव्याच्या सल्लागार मंडळाच्या बैठकीत करण्यात आला.

(LIVRO DOS ASSENTOS OCOCONCELHO DOESTADO DE 1677 1699 FLS 162).

कुडाळचे खेम सावंत ह्यांचे आणि मराठ्यांचे पुनः वितुष्ट आल्याने त्यांनी पोर्तुगिजांकडे मराठ्यांविरुद्ध मदत मागितली. ती मदत गोव्याच्या व्हाइसरॉयला राज्याच्या सल्लागार मंडळाची बैठक भरविल्याशिवाय देता येत नव्हती म्हणून त्याने दिनांक १३ अगस्ट १६९५ रोजी ती बैठक बोलविली व तिच्या समोर खेम सावंत ह्यांच्या पत्रांतील मदतीच्या मागणीचा प्रस्ताव मांडला. त्या बैठकीच्या कामकाजाचा वृत्तांत पुढीलप्रमाणे आहे.

गोव्याचे व्हाइसराय आणि हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल दों पेद्रु आंतोनियु द नोरान्य कॅट द व्हिला व्हेर्द ह्यांनी राज्य सल्लागार मंडळाला विदीत केले की, कुडाळचे सरदेसाई खेम सावंत ह्यांनी मराठ्यांपासून फुटून निघण्याच्या इरादाने आपली आठ गलबते आणि काही होड्या मराठ्यांविरुद्ध पाठविल्या. गोव्याचे एक माजी व्हाइसराय कॉंद आल्व्हेरा ह्यांनी हसदहू खेम सावंत ह्यांना त्याला जरूर लागेल तेव्हा मदत करण्याचे वचन दिले होते. त्या वचनाप्रमाणे त्यांनी आता आमच्याकडे मदतीची मागणी केली आहे. त्यांची आम्हाला अशी सूचना आहे की, आमच्या आरमाराने आणि त्यांच्या आठ गलबतांनी मराठ्यांच्या बंदरांवर आणि त्यांच्या आरमारावर मिळेल त्या ठिकाणी हल्ले चढवावेत.

हा प्रस्ताव ऐकून घेतल्यावर सल्लागार मंडळाच्या सदस्यांनी असे मत प्रकट केले, की, माजी व्हाइसरॉय कॉंट द आल्व्होर ह्यांनी जर कुडाळचे

सरदेसाई खेम सावंत ह्यांना मदत करण्याचे वचन दिले असेल, तर त्या वचनाप्रमाणे सरदेसाई खेम सावंत ह्यांना मदत जरूर द्यावी. मात्र आमच्या आरमाराने खेम सावंत ह्यांच्या आरमाराबरोबर मराठ्यांच्या बंदरांवर आणि आरमारावर संयुक्तपणे हल्ले करू नयेत. तथापि, सरदेसाई ह्यांच्या गलबतांना व्यापारासाठी उत्तरेकडे अथवा दक्षिणेकडे जायचे असल्यास आमच्या राज्याचे मित्र ह्या नात्याने त्यांच्या गलबतांना आमच्या आरमाराने संरक्षण द्यावे. सल्लागार मंडळाचा हा दृष्टिकोन काँट व्हाइसरॉय ह्यांना पसंत पडला व त्यांनी त्या दृष्टिकोनास मंजुरी दिली. त्या ठरावावर सल्लागार मंडळाच्या सर्व सदस्यांनी सह्या केल्या.

हा वृत्तांत चिटणीस मान्युयल पेरैरा ह्याने लिहून काढला.

(LIVRO DOS ASSEMTOS DOCONCELHO DO ESTADO 1677-99, FLS 165).

मोगलांच्या राज्यात जे देसाई होते, त्यांचा फोंड्याचा मोगल दिवाण महमद रफीखान ह्याच्याकडून भयंकर छळ झाल्याने त्यांनी पोतुगीज हद्दीत आश्रय घेतला. महमद रफीखान ह्याला पोर्तुगिजांनी देसायांना आश्रय दिलेले आवडले नाही. त्याने पोर्तुगीजांकडे त्याबद्दल तक्रार करून देसाई हे मोगल बादशहाचे शत्रू आहेत. सबब त्यांना आपल्या हवाली करावे अशी मागणी केली. ती मागणी पोर्तुगीज व्हाइसरॉयने फेटाळून तर लावलीच परंतु, महमद रफीखान ह्यांच्या छळाची वार्ता सुरतेच्या नबाबांना आणि बादशहालाही कळविण्याची व्यवस्था केली. ह्या बाबतीत रूस्तुम ह्या नावाच्या एका मोगल अधिकाऱ्याला लिहिलेल्या पत्रात गोव्याचा व्हाइसरॉय म्हणतो :

हे देसाई म्हणजे काही खेड्यांचे प्रमुख आहेत. त्यांच्यापाशी जरी थोडेफार हत्यारी लोक असले, तरी ते मोंगल सम्राटाचे मांडलिकत्व अमान्य करीत नाहीत. ते त्याला कर भरतात आणि सारा वसूल करून देतात. परंतु हे दिवाण त्यांच्याकडून जादा कर उकळण्याचा प्रयत्न करतो. त्याला ह्या देसायांची तयारी नाही. त्यामुळे त्याने चिडून जाऊन त्यांच्या हक्कांवर गदा आणली आहे. त्याने त्यांच्या जमिनी काढून घेऊन त्यांना तुरूंगात टाकण्याचे व त्यांना फटके देण्याचे सत्र सुरू केले आहे." शेवटी ह्या पत्रात व्हाइसरॉयने रुस्तुमला विनंती केली आहे, की, त्याने अहमद रफीखान ह्याच्या जुलुमाची वार्ता सुरतेच्या नबाबांना कळवून त्याला शिक्षा करण्याचा त्याला सल्ला द्यावा.

(LIVRO DOS ASSENTOS DOCONCELHO DO ESTADO DE 1677-99, FLS 165).

कुडाळचे सरदेसाई खेम सावंत भोसले ह्यांचे आणि मराठ्यांचे बिन-सल्ल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. त्यांनी कुडाळचा किल्ला घेतल्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांचे पुढील पत्रात अभिनंदन केले आहे.

" खेम सावंत ह्यांस––

देसाई खेम सावंत ह्यांनी कुडाळचा किल्ला घेतल्याची वार्ता ऐकून फार आनंद झाला. हा किल्ला त्यांच्या शत्रूने बळकावला होता. तो घेऊन सदरहू खेम सावंत भोसले ह्यांनी त्यांचे स्वामी जे मोंगल बादशहा ह्यांची मोठीच सेवा केली आहे. त्यांच्या सेवेचे चीज बादशहांकडून झाल्यावाचून राहाणार नाही, अशी आशा आहे."

गोवा, १७ ऑगस्ट १६९६ कोंट द व्हिला व्हेर्द

(LIVRD DOS REIS VIZINHOS, Nc,6: FLS ISV)

फोंड्याच्या मोगल दिवाणाने पोर्तुगीजांकडे खेम सावंत भोसले ह्यांच्या-विरुद्ध तक्रार केली होती, त्यालाच व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :

" फोंड्याचे दिवाण ह्यांस––

आपणाकडे प्रस्तुत पत्र जात आहे. देसाई खेम सावंत ह्यांच्या विषयी मला आपणास कळवायचे आहे की, ते महान मोंगल सम्राटांचे मांडलिक आहेत म्हणून मी त्यांना मदत केली. ते सम्राटांचे निःसिम सेवक आहेत अशी माझी समजूत होती. ते जर आता बादशहांशी इमानी नसतील तर मी त्यांना यापुढे जवळ करणार नाही, ह्याबद्दल निश्चित असावे.......................... .................. मी राजारामाच्या चांचे प्रजाननांविरुद्ध नौका पाठविल्या आहेत. तो बादशहाचा मोठा शत्रू आहे आणि आपण ज्याअर्थी म्हणालात की खेम सावंत भोसले हे वेंगुर्ल्याच्या किल्ल्यावर चालून गेले, त्याअर्थी मी त्यांना खरमरीत पत्र लिहून बादशहाच्या किल्ल्याकडे वक्रदृष्टीने बघीतल्याबद्दल त्यांची निर्भत्सना केली आणि त्यानी जर मला पत्र लिहून खुलासा केला नसता, तर त्याना मी शिक्षा करण्यास देखील कमी केले नसते. त्यांचे असे म्हणणे आहे की, बादशहाचे किल्ले घेण्यामागे त्यांचा दुष्ट हेतू नव्हता ते किल्ले बादशहांचेच रहावे व शत्रूपासून त्यांचे रक्षण करावे म्हणून त्यांनी ते घेतले.................... मला बातमी कळली आहे की, मराठ्यानी मोठे आरमार गोळा करून कुडाळच्या मुलुखात लटालूट करण्यात सुरुवात केली आहे. त्यांनी जर तो मुलुख घेतला, तर मोंगल बादशहांची मोठी हानी होईल.

तूर्त आमच्या समोर मोठा प्रश्न म्हणजे हाच आहे. मराठ्यांनी हा मुलुख घेऊ नये म्हणून त्यांना प्रतिबंध केला पाहिजे. आणि हे काम आपण शक्य तितक्या लवकर करावे. आपण म्हणता की, ह्या बेईमान देसायांना शिक्षा ही झालीच पाहिजे. ती शिक्षा त्यांना करणे हे एक सोपे काम आहे. आणि ज्याअर्थी बादशहांशी आमची दोस्ती आहे, त्याअर्थी त्यांच्या उपयोगी कसे पडावे ते मला चांगले कळते. आपणाला उत्तर पाठविणे हे माझे पहिले काम असे मला वाटते, म्हणून हे पत्र लिहित आहे.

गोवा, २२ ऑक्टोबर १६९६. कौंट द व्हिला व्हेर्द

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 6, FLS 43V).

उपरिनिर्दिष्ट पत्राने फोंड्याच्या दिवाणाचे समाधान न झाल्याने त्याने खेम सावंत भोसले ह्यांच्या संदर्भात व्हाइसरॉयना पुनः पत्र लिहिले. त्या पत्रात व्हाइसरॉयनी पुढील उत्तर पाठविले.

" फोंड्याचे दिवाण ह्यांस––

आपले पत्र मिळाले. मी आपणास लगेच उत्तर पाठवू शकलो नाही, कारण मी आमच्या आरमाराच्या मोहिमेच्या तयारीत गुंतलो होतो. आपण आमच्या मैत्रीसंबंधाने जो उल्लेख केला आहे, तो अनावश्यक आहे. कारण पोर्तुगिजांनी मैत्री नेहमीच टिकविली आहे. त्यांच्या ह्या धोरणात मुळीच बदल होणार नाही. खेम सावंत ह्यांच्याविषयी आम्हाला सहानुभूती वाटते आणि ते आमच्या मर्जीतील आहेत हे खरे आहे. कारण ते महान मोंगल बादशहांचे मांडलिक आहेत. पण त्यांच्या हातून जर बेईमानपणा घडला.................. कारण ते नेहमीच बादशहांचे मांडलिक आहेत....................................... .............सर्वात मोठी काळजी ही मराठ्यांसंबंधीची आहे की, जे बादशहांचा मुलुख घेऊ पाहातात आणि ज्या मुलुखावर आपण राज्यकरता. आपण गुर्की शेणवी ह्यांना आमच्याकडे पाठविण्याचा विचार करता. आपल्या विनंतीप्रमाणे मी त्यांचे स्वागत करीन व त्यांच्याशी महत्वाच्या प्रश्नावर वाटाघाटी करीन".

गोवा, २९ डिसेंबर १६९६. कौंट द व्हिला व्हेर्द

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 6, FLS 44V).

धारगडच्या किल्ल्यास कुडाळच्या भोसल्यांनी वेढा घातला असता फोंड्याचा सुभेदार रफीखान ह्याने पोर्तुगीजांकडे मदत मागितली. रफीखानाने व्हाइसरॉयनां जे पत्र लिहिले ते पुढीलप्रमाणे आहे :—

महान देशाचा प्रतिनिधी, सगळीकडे प्रख्यात असलेला आणि सुदैवी, राजेरजवाड्यांमधून निवडली गेलेली बडी आसामी की जिची राजवट पोर्तुगिज प्रदेशांत सदैव टिको.

आपले पत्र मिळाले व ते वाचून फार आनंद झाला. मला आशा आहे की, देव आम्हां दोघांमधील मैत्री वृद्धिंगत करील. मोंगल सम्राटाने आपले स्वामी पोर्तुगालचे राजे ह्यांना एक पत्र पाठविले असल्याचे आपल्या पत्रावरून कळले. ह्या तपशिलाबाबत मी अहमद सारंग ह्याला लिहिलेच आहे. तो आपणास प्रत्यक्ष भेटून सर्व काही विदीत करील. आपण मला लिहिता की मोंबासाला आपण आरमार पाठविले आहे. आपणाला देव यश देईल ह्यांत तिळमात्रही शंका नाही. मीही धारगळला थोडा फौजफाटा पाठविण्याचे ठरविले आहे. माझा बंधु अहमद सारंग ह्याच्यामार्फत मी आपणाला ही गोष्ट कळविलीच आहे. मला आशा आहे की, आपली मदत आल्यावाचून राहाणार नाही, इतकेच नव्हे तर अडचणीच्या वेळी ती आम्हाला त्वरीत आणि मोठ्या प्रमाणात मिळेल अशी मी आशा बाळगतो.

बंडखोर खेम सावंत ह्यांच्याविषयी आपण मला कळविलेच आहे की, त्यांच्या हातून जे प्रमाद घडले आहेत ते आपण त्याला क्षमा करणार नाही. मीही आपणाला कळवू इच्छितो की, त्याचे अपराध खरोखरच अक्षम्य आहेत. त्या अपराधांबद्दल त्याला शिक्षा ही झालीच पाहिजे. माझ्या स्वामीच्या सरदाराकडूनही त्याला शिक्षा करण्याची मला अनुमती मिळाली आहे. देवाची जर इच्छा असेल आणि आपली जर मदत मिळेल, तर धारगळचा किल्ला मी पुनः काबीज केल्यावाचून राहाणार नाही. त्यावेळी मी बंडखोर खेम सावंत ह्याला शिक्षा करीन व तो मला ज्या ठिकाणी भेटेल तिथून त्याला हांकलून लावीन. सोंदेच्या राजाची मदत आली आहे. लवकरच मी बंडखोराविरुद्ध मोहीम सुरू करीत आहे. तत्पूर्वी दोन दिवस अगोदर आपणाला मदत पाठविण्याबद्दल कळविन. मला आशा आहे की, आपण मदत पाठविल्यावाचून राहाणार नाही. आपण जी दारूची पिपे आणि गोळे पाठविले होते ते मिळाले. त्यांची मला वाण भासत नाही कारण परमेश्वाराच्या कृपेने आम्हां दोघांमध्ये कोणतेच मतभेद नाहीत.

देव आपले भले करो व आपणास उदंड आयुष्य देवो".

(LIVRO DAS MONCOES, No. 62, FLS 205).

पोर्तुगिजांनी मोगलांना धारगळचा किल्ला लढविण्यासाठी मराठ्याविरुद्ध मदत केली.

फोंड्याच्या नबाबाने पोर्तुगिजांकडे दारूगोळ्याची आणि इतर मदत पाठविण्याची मागणी केली होती, त्याला गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

फोंड्याचे नबाब ह्यांस—

आपले पत्र मिळाले व आपण खुशाल असल्याचे वाचून आनंद झाला. आपल्या स्वामीचे शत्रू कुडाळचे भोसले ह्यांच्याकडून फोंड्याच्या किल्ल्यास धोका आहे म्हणून आपण माझ्याकडे दारूगोळ्याची मागणी केली आहे. आपल्या पत्राप्रमाणे पाच पिपें दारू आणि थोडे गोळे पाठवित आहे. आमच्या राज्याला आपण जी मुलुखाची देणगी देऊ केली आहे, त्याबद्दल मी आपणाला आभारी आहे. ह्या तपशिलाबाबत आपण लवकरच वाटाघाटी करू या. धारगडचा किल्ला जमीनदोस्त करणे बरोबर होणार नाही. कारण बंडखोरांनी माझ्याकडे दयेची याचना केली आहे. ज्या वेळी त्यांच्या आणि माझ्या वाटाघाटी होतील तेव्हा मी त्यांना आपल्या बादशहाचे आणि त्याच्या प्रजाजनांचे जे काय त्यांनी घेतले आहे ते त्यांना परत करावयास लावीन. मी आमच्या बार्देशच्या सेनापतीला धारगळच्या किल्ल्यास जी काय मदत लागेल ती करण्याबद्दल कळविले आहे."

गोवा, १० नवंबर १६९८ आंतोनियु लुईस द कामारा कौतुन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 6, FLS 64).

कुडाळचे सरदेसाई खेम सावंत भोसले ह्यांनी सांखळी व डिचोली येथील मोंगलांचे दोन किल्ले घेऊन फोंड्यास वेढा घातला. पोर्तुगिजांनी मोंगलांना भोसल्याविरुद्ध मदत केली. त्या मदतीबद्दल मोगलांनी पोर्तुगिजांना बार्देशच्या हद्दीवरील मुलुख तोडून देण्याचे कबूल केले.

ह्या संबंधाने गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो

..........................................................................................

खेम सावंत भोसले ह्यांनी फोंड्याच्या नबाबाविरुद्ध बंड पुकारून मोगल बादशहाचे साखळी व डिचोळी येथील दोन किल्ले घेतले. फोंड्याच्या नबाबाकडे दारूगोळा आणि माणसे ह्याची टंचाई असल्याचे भोसल्यांना कळले होते. ही संधी साधून त्यांनी फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला.

फोंडयाच्या नवाबांना जर आमच्याकडून मदत झाली नसती, तर फोंड्याचा किल्ला खेम सावंत भोसले ह्यांच्या हाती पडल्याशिवाय राहिला नसता.

मोगलांनी आमच्या मदतीबद्दल कृतज्ञता व्यक्त केली असून आमची मदत झाली नसती तर फोंडे खेम सावंत भोंसले ह्यानी घेतले असते अशी कबुली दिली आहे. ती मदत मोगलांना द्यावी असे मला वाटते. कारण मोगल बादशहा हा हिंदुस्थानांतील सर्वात मोठा आणि बलाढ्य राजा आहे हे तर झालेच, परतु त्याच्या बंदरात आमच्या जहाजांना चांगली वागणूक मिळते. तिसरी गोष्ट ही की, फोंड्याचा किल्ला जर खेम सावंत ह्याच्या हाती पडला असता, तर त्यामुळे गोव्याच्या व्यापारात व्यत्यय आला असता. तसे जर झाले असते तर मोगल बादशहाने त्याच्यावर मोठे सैन्य पाठविले असते. त्या सैन्याचा उपसर्ग केवळ खेम सावंत भोसले आणि मराठे ह्यांनाच नव्हे, तर आम्हालाही पोहोचला असता. आमच्यावर उपासमारीचे संकट कोसळले असते. फोंड्याच्या नबाबाला आमच्याकडून जी मदत झाली, त्याचा मोबदला म्हणून त्याने आम्हाला बार्देश मधील चोवीस खेडी देण्याचे वचन दिले आहे. ह्या खेड्यांचा महसूल चांगलाच मिळेल असे वाटते. परंतु ह्या सौद्याला बादशहाची संमति हवी आहे. फोंड्याचे नवाब बादशहाच्या उत्तराची वाट पाहात आहेत. माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य आणि सुख सौख्य देऊन त्याचे रक्षण करो."

गोवा, १५ डिसेंबर १६९८

(LIVRO DAS MONCOES, No. 62, FLS 203).

गोव्याचा व्हाइसरॉय फोंड्याच्या सुभेदारास पाठविलेल्या पत्रात म्हणतो की, पोर्तुगीजांच्या मदतीमुळेच गोव्याचे रक्षण झाले.

कुडाळचे सरदेसाई खेम सावंत भोसले ह्यांचा मोगलांविरूद्धचा उठाव फसल्यामुळे त्यांना अखेर पोर्तुगिजांचा आश्रय घ्यावा लागला. त्यांनी पोर्तुगिजांकडे तहाची व मैत्रीची जी मागणी केली त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

"खेम सावंत ह्यांस—

खेम सावंत ह्यांनी लिहिलेले पत्र मिळाले, ते माझ्या अविश्वासास पात्र झाल्याची जी कारणे उपलब्ध झाली आहेत ती त्यांनी मान्य करून माझ्या तक्रारीचे परिमार्जन करावे. तसे जर झाले तर त्यांना ही संधी साधून त्यांनी गमावलेली ह्या राज्याची मैत्री परत साधतां येईल. मी हरी शेणवी बोरकर

ह्यांच्याकडे जी कामगिरी सोपविली आहे ते ती पार पाडतील. त्या कामगिरी संबंधाने खेम सावंत ह्यांना माझी सूचना आहे की, त्यांनी ह्या कामगिरीबाबत काय तो निर्णय घ्यावा. म्हणजे त्यांचा आणि आमचा पुनः एकदा समझोता होऊ शकेल. मोंबासा पडल्याबद्दल खेम सावंत ह्यांनी आपल्या पत्रात जे दु:ख व्यक्त केले आहे त्यासंबंधाने मला त्यांना कळवायचे आहे, की, ह्या राज्याचा आणि त्या घटनेचा कांही संबंध नाही.......................................वगैरे".

गोवा, १७ जुलै १६९९.

आंतोनि यु लुईज गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHUS, No. 5, FLS 11).

दिनांक २ सप्टेंबर १६९९ रोजी खेम सावंत भोसले ह्यांनी पोर्तुगालच्या राजाचे मांडलिकत्व पत्करले. गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांना संरक्षण देण्याचे कबूल केले. पोर्तुगॉलच्या राजाचे मांडलिकत्व पत्करताना व गोव्याचा आश्रय घेताना गोव्याच्या व्हाइसरॉयने खेम सावंत भोसले ह्यांच्यावर ज्या अटी लादल्या त्या पुढील प्रमाणे आहेत :

सरदेसाई खेम सावंत ह्यांनी पोर्तुगीज व मराठे ह्यांचे युद्ध चालू असतां, ज्या कळकळीने, इमानाने व तत्परतेने पोर्तुगीजांना मदत केली, त्याबद्दल त्यांना ह्या राज्याकडून वारंवार आश्रय मिळत आला आहे. ह्या राज्याच्या अति टोकाला त्यांच्याकडून पीरखान ह्याची हत्या घडली म्हणून त्यांच्या सर्व सवलती आणि अधिकार काढून घेण्यात आल्याने त्यांना ह्या राज्याचा आश्रय घेणे भाग पडले. त्यांनी आतां पोर्तुगालच्या अतिप्रशांत राजाचे मांडलि-कत्व पत्करून त्याची सेवा करण्याचे कबूल केले आहे.

त्यांच्या हातुन जो प्रमाद घडला तो हेतु पुरस्सर नसून भावनेच्या भरात घडला. माझ्या तक्रारीचे परिमार्जन ज्याअर्थी त्यांनी केले आहे, त्यावरून त्यांच्या इमानीपणाबद्दल शंका घेण्यास आता जागा उरलेली नाही. त्यांनी आपला ध्वज माझ्या पायापाशी ठेवून माझ्या पोर्तुगालच्या स्वामीचे मांडलीकत्व स्वीका-रण्याचे कबूल केले. ते आता स्वामीची कोणतीही सेवा करण्यास व ह्या राज्याच्या रक्षणार्थ झटण्यास बद्धपरिकर झाले आहेत. म्हणून त्यांच्या हातून जो अपराध घटला त्याकडे दुर्लक्ष करून ह्या हुकूमान्वये त्यांच्या सर्व सवलती त्यांना देण्यात येत आहेत.

मराठे, अरब, आणि मलबारी ह्यांच्यापासून त्यांना आता संरक्षण मिळेल, इतकेच नव्हे, तर त्यांच्या विरूद्ध लढण्यासाठीही त्यांना मदत केली जाईल. ही

मदत जमिनीवर आणि सागरावर, तशीच दारूगोळा आणि आरमार ह्यांच्याद्वारा केली जाईल. फक्त मोगल बादशाविरूद्ध मात्र त्यांना मदत केली जाणार नाही. त्याचे कारण हे की मोगल बादशहा हा आमच्या राज्याचा दोस्त आहे.

खेम सावंत भोसले ह्यांना सहकुटुंब सहपरिवार बार्देशमध्ये राहाण्याची पारवानगी देण्यात येत आहे. त्या ठिकाणी ते पूर्वी होते.

ज्याअर्थी त्यांनी माझ्या पोर्तुगालच्या स्वामीचे मांडलिकत्व पत्करले आहे त्याअर्थी ते आतां त्यांचे सेवक बनले आहेत. आतां त्यांना ह्या राज्याच्या रक्षणार्थ आमच्या शत्रूशी लढावे लागेल. मात्र हे युद्ध आपल्याच राज्याच्या रक्षणाचे आहे असे मानून त्यांच्या माणसांचा खर्च त्यांना स्वतःच करावा लागेल.

गोवा, २ सप्टेंबर १६९९.

आंतोन्यु लुईज गोंसाल्व्हिश कामारा कौतिन्यु

पोर्तुगीजांच्या अटी खेम सावंत भोसले ह्यांनी मान्य केल्या.

(LIVRO PRIMEIRO DAS PAZES, FLS 259).

अठराव्या शतकाच्या सुरवातीला गोव्याच्या व्हाइसरॉयने हिंदुस्थानातील तत्कालीन घडामोडींचा आढावा घेऊन पोर्तुगालला आपल्या राजास एक पत्र लिहिले. असा अहवाल आपल्या राजास सादर करण्याची गोव्याच्या व्हाइसरायची प्रथा होती. या अहवालात त्याने खेम सावंत भोसले ह्यांनी मोंगलांचे डिचोली आणि साखळी हे दोन प्रांत घेतले असे म्हटले आहे. ते प्रांत घेण्यासाठी त्यांना पोर्तुगिजांची आंतून फूस होती हे व्हाइसरॉयच्या पत्रातील पुढील परिच्छेदावरून दिसून येते................
..........................................................................................

गेल्या चार वर्षामागे फोंड्यांच्या मोंगल सुभेदाराने आमच्या बार्देश प्रांताच्या सरहद्दीवर एक किल्ला बांधून सिद्दी अदुल ह्या नावांच्या मुसलमानाची तेथे किल्लेदार म्हणून नेमणूक केली होती. हा किल्लेदार लोकांकडून भरमसाट जकात वसूल करीत असे. मी इकडे आल्यावर कांही दिवसांनी खेम सावंत भोसले ह्यांनी मोगलांविरूद्ध बंड पुकारले. त्यांना आमच्याशिवाय आणखी कुणाकडून मदत होत नसे. परंतु ज्या वाटेने त्यांना आमच्याकडून अन्नधान्य आणि इतर वस्तू जात असत त्या वाटेवर हा किल्ला असल्याने त्या मदतीच्या मार्गात त्याचा अडथळा येत असे, आम्ही खेम सावंत ह्यांना मदत करीत आहोत हे मोंगलांना माहीत नव्हते, कारण, ते आम्हाला आपले दोस्त समजत असत. व आम्हीही त्यांना उघडपणे ते आमचे दोस्त आहेत असे सांगून त्यांना मदत करीत असू.

फोंड्याच्या सुभेदाराने आमच्या बार्देशच्या मुलुखानजीक बांधलेला हा किल्ला आम्हाला अशा रीतीने मारक होता. म्हणून मी मोंगल सेनापतीला पटवून देण्याचा प्रयत्न केला, की, तो किल्ला जर खेम सावंत भोसले ह्यांच्या हातात पडला, तर ते आम्हा दोघानांही त्रासदायक होईल. म्हणून हा किल्ला पाडून टाकलेला बरा.

मोगल सेनापतिस माझा सल्ला पटला व त्याने तो किल्ला पाडून टाकण्याचा हुकूम केला. तो किल्ला असतांना खेम सावंत भोसले ह्यांना आमची मदत मिळण्यास अडथळा होत असे. आतां तो पाडून टाकण्यांत येताच त्यांचे चांगलेच फावले. त्यांना आमच्याकडून भरपूर मदत मिळू लागली. त्या मदतीच्या बळावर त्यांनी अल्पावधीत साखळी आणि डिचोळी हे दोन्ही प्रांत मोगलाकडून सर केले. आता आम्हाला चांगला शेजारी लाभला आहे. मुसलमान हे वाईट शेजारी असतात असा आमचा अनुभव आहे. त्यांच्या शेजारापेक्षां हिंदूचा शेजार बरा.

परंतु मोगलांना मी ह्या गोष्टीचा अद्याप सुगावा लागू दिलेला नाही. आम्ही आपले मित्र आहोत अशी त्यांची समजूत असल्याने, आम्ही त्यांना उघडपणे जी मदत करतो त्याबद्दल ते कृतज्ञता दर्शवितात."

गोवा, १९ जानेवारी १७०१

(LIVRO DAS MONCOES No. 64, FLS 247).

मोगल सरदार बसालतखान ह्याने पोर्तुगिजांकडे मदतीची मागणी केली होती. त्याला गोव्याच्या व्हाइसरॉयने उत्तर पाठविले, व फोंड्याला पळून गेलेल्या निग्रो सैनिकांना परत करण्याची मागणी केली.

"बसालतखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले व सयद गुलाम इब्राहिम ह्यांच्या मदतीसंबंधाने कळले. मोगल बादशहाच्या राज्याची माझ्या हातून जी सेवा घडायची असेल ती करण्याच्या बाबतीत मी कधीच कुचराई करणार नाही. तीच गोष्ट मुलुख परत करण्याच्या प्रश्नासंबंधीचीही आहे. भोंसल्यानी फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला तेव्हां मी आपणाला केवढी मदत केली ते आपणाला माहीत आहेच. आता आपणही माझे एक काम केले पाहिजे. माझ्या स्वामीचे कांही काफीर (काफ्री) प्रजाजन फोंड्याला पळून गेले आहेत. तरी त्यांना परत करण्याची कृपा करावी. आमच्यामधील मैत्रीला अनुसरून आपण हे काम कराल अशी आशा आहे."

देव आपले भले करो.

गोवा, २३ जानेवारी १७०० आंतान्यु लुईस गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु

पोर्तुगिजांचे मोगलांशी जसे मैत्रीचे संबंध होते, तसेच मैत्रीचे संबंध त्यांचे मोगलांचे शत्रू कुडाळचे सरदेसाई सावंत भोसले ह्यांच्याशी होते.

खेम सावंत भोसले ह्यांस––

सरदेसाई खेम सावंत भोसले ह्यांचे एक पत्र मिळाले. त्यांनी पत्रात जी परवानगी मागितली आहे ती त्यांना देण्यात येत आहे.

गोवा, १ मार्च १७००

आंतोनियु लुईस गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु

राजाराम महाराजांचे एक प्रधान परशुरामपंत ह्यांनी पोर्तुगीज युद्ध-नौकांनी मराठ्यांच्या एका नदीत अतिक्रमण केल्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरायकडे तक्रार केली होती. त्या तक्रारीला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले. (LIVRO DO REIS VIZINHOS, No. 5, FLS 22).

रामराजे ह्यांचे सरदार परशुरामपंत ह्यांस––

आपले पत्र मिळाले, झमगिझर (?) नदीत आमच्या आरमार प्रवेश केल्याबद्दल आपण जी तक्रार केली आहे ती निराधार आहे. आपण म्हणतां की रामराजे ह्यांनी ह्या राज्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ह्या राज्यांतील माझ्या कारकीर्दीत तरी अनुभव उलट आहे.

गेल्यावर्षी दोनदा आमच्या उत्तरेकडील प्रदेशांत खेडी लूटण्यांत आली. आणि आपल्या गलबतांनीही आमच्या जहाजांवर हल्ले करून ती लुटली. ती जहाजे अन्नधान्य घेऊन ह्या शहराकडे येत होती. आणि वर आपण म्हणतां, की, आपण शांतता पाळत आलो आहोंत. मी आपणाला कळवू इच्छितो की, ह्या कुरापती आम्ही चालू देणार नाही. आमच्याशी जर आपणाला सलोख्याचे संबंध ठेवावयाचे असतील तर, गेल्यावर्षी लुटण्यांत आलेला आमचा माल आम्हांला परत करावा."

गोवा, २३ मार्च १७००

आंतोन्यु लुईस गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 24).

फोंड्याचा किल्लेदार सयद गुलाम इब्राहीम हा भोसल्यांशीं झालेल्या लढाईत प्राणांतिक जखमी झाल्याची वार्ता गोव्याच्या व्हाइसरॉयला कळली, तेव्हा त्याने त्याला पुढील पत्र लिहिले :

"फोंड्याचा किल्लेदार सयद गुलाम इब्राहीम, ह्यास—

भोसल्यांशी झालेल्या एका लढाईत आपण जखमी झाल्याचे नार्वेच्या किल्लेदाराकडून कळले. ही बातमी ऐकूण मला फार वाईट वाटले. तरी हे पत्र मिळतांक्षणी आपल्या जखमा गंभीर स्वरुपाच्या आहेत की काय आणि आपणाला औषधांची जरूरी आहे की काय ते त्वरीत कळवावे. मी नार्वेच्या किल्लेदारास आज्ञा केली आहे, की, आपले जे जखमी सैनिक आमच्या हद्दीत येतील त्यांना मोगल सम्राटांशी असलेल्या आमच्या मैत्रीस अनुसरून चांगली वागणूक द्यावी.

गोवा, ३० एप्रिल १७००

आंतोनियु लुईस गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 29).

भोसल्याशी झालेल्या लढाईत प्राणांतीक जखमी झालेला फोंड्याचा किल्लेदार मरण पावल्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयने बसतलतखान ह्यास दुखवटयाचा संदेश पाठविला :—

"बसालतखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले, माझ्या पत्रातील मजकूर आपण जाणून घेतला ह्याबद्दल समाधान वाटलें. ज्या राजाशी आमची मैत्री आहे त्या मोगल बादशाहाचे सहीत हे प्रजाजन असल्याने, त्यांना मी अटक करणे शक्य नव्हते. फोंड्याच्या किल्लेदारास मदत पाठवून मी आमची मैत्री उघड केलीच आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही, की, सदरहू फोंड्याचे किल्लेदार हे भोसल्यांशी झालेल्या लढाईत प्राणांतिक जखमी होऊन निधन पावले. ते जखमी झाल्याचे मला कळले. तेव्हां मी त्यांना पत्र घालून औषधोपचारासाठी इकडे येण्याबद्दल कळविले होते. परंतु माझे पत्र पोहोचण्यापूर्वीच त्यांचे देहावसान झाले. तरी वार्ता ऐकून मला मनस्वी दुःख झाले. कारण ते एक मोठ्या तोलाचे शिपाईगडी होते. आम्ही आपल्या दुःखात सहभागी आहोत.

आपणाला मदत करण्यास माझ्याकडून कधींच कसूर झालेली नाही. बादशहाना आपण जी माहिती दिलीत त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे.

देव आपले भले करो."

गोवा, ८ मे १७००

आंतोनियु लुईस गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 30).

वसालतखान ह्याने आपल्या बंधूस सैन्य देऊन खेम सावंतांचे पारिपत्य करण्यास पाठविले. परंतु त्याच्याकडून ती कामगिरी कितपत पार पडेल त्याचा. आत्मविश्वास नसल्याने त्याने पोर्तुगिजांना त्याला मदत करण्याची विनंती केली. वसलतखानाच्या पत्रास गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

"बसालत खान ह्यांस—

आपले पत्र मिळाले. आपल्या बंधूना खेम सावंत ह्यांचे पारिपत्य करण्यासाठी पाठविले असल्याचे आपल्या पत्रावरून कळले. आपण आमच्यापाशीं आपल्या बंधूस मदत करण्याची मागणी केली आहे. आपणाला माहीत आहेच, की, आम्ही आपल्याला नेहमीच मदत करीत आलो आहोंत. आमच्यामधील मैत्रीला अनुसरून यावेळीही मी आपणाला मदत करण्यास मागे राहाणार नाही ह्या बद्दल निश्चिंत असावे.

देव आपले भले करो."

गोवा, १८ मे १७००.

आंतोन्यु लुईस गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 30).

मोगल सरदार इझा कातुला ह्याने पोर्तुगिजांकडे मदतीची याचना केली होती. त्याला गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

वसालतखान ह्यांचे बंधू इसाक कातुला, ह्यांस—

आपले पत्र मिळाले. आपण अडचणीत असल्याचे वाचून फार वाईट वाटले. बादशहाच्या सैन्याला पुष्कळ कुमक यावी अशी इच्छा करतो. आपल्या मागणी-प्रमाणे दियोग मिनेझिश ह्यांच्याकडे दारूगोळा पाठवित आहे. आपण यशस्वी झालात तर मला आनंद होईल.

देव आपले भले करो."

गोवा, १८ मे १७००.

आंतोनियु लुईस गोंसाल्विश द कामारा कौतिन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 31V).

मोगलांचे सैन्य भोसल्याचे पारिपत्य करण्यासाठी डिचोली येथे आले होते त्या सैन्याला दारूगोळ्याची आणि इतर मदत करावी अशी फोंड्याचे मोगल

किल्लेदार रसूलखान ह्याने पोर्तुगिजांकडे मागणी केली असतां गोव्याच्या व्हाइसरॉयने त्याला पुढील उत्तर पाठविले :—

"फोंड्यांचे किल्लेदार रसूलखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले व तें वाचून बादशहाचे सैन्य भोसल्यांचे पारिपत्य करण्यासाठी डिचोलीला येऊन दाखल झाल्याचे कळले.

माझ्या हातात जी साधने आहेत त्या साधनाप्रमाणे मी ह्या सैन्याला शक्य तेवढी मदत केली आहे, आणि यापुढेही ती करीत राहीन. परंतु अरब लोक जेव्हा आमच्या राज्यावर आक्रमण करतात तेव्हां मोगल राज्यावर संकट आले असता आम्ही जसे त्यांच्या मदतीला जातो, तसे ते आमच्या मदतीला येत नाहीत इतकेच नव्हे, तर आम्ही मोगल सरदारांना अशा वेळी जी मदत करतो, त्याची वार्ता ते बादशाहाच्या कानावर घालण्याचे देखील सौजन्य दाखवित नाहीत. तरीही आम्ही केवळ बादशाहाच्या मैत्रीस स्मरून त्याच्या सैन्याला मदत करतो. पण त्यावेळी बादशहाच्या सरदारांना आमच्या मैत्रीची आवश्यकता नसते, तेव्हा ते आम्हाला लगेच विसरून जातात.....................................................................

...........................................................................................................

गोवा, २१ मे १७००.

आंतोनियु लुईस गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 31V).

मोगल सरदार बसालतखान ह्याने गोव्याच्या व्हाइसरॉयकडे खेम सावंत भोसले ह्यांच्याविरूद्ध मदत मागितली होती.

(हा सरदार पोर्तुगीजांकडे वारंवार मदतीची याचना करीत होता, हे गोव्याच्या व्हाइसरॉयच्या पत्रावरून दिसून येते). ती मदत पोर्तुगिजांनी मोगलांना पाठविली. पण तरीही त्याने पोर्तुगिजांच्या नकळत भोसल्यांशी तह केला. त्याचा गोव्याच्या व्हाइसरॉयला विषाद वाटून त्याने बसालतखान ह्यास पुढील पत्र लिहिले :—

"बसालतखान ह्यांस—

आपले दिनांक २४ मे चे पत्र मिळाले. डिचोळी येथील मोगल सैन्याला मदत करण्याची आपण आम्हाला विनंती केली होती. ते सैन्य तिकडे असेपर्यंत आम्ही त्याला आमच्याशी असलेल्या साधनांच्या मर्यादेत मदत केली. परंतु आता असे कळते की, ह्या सैन्याने आमच्या नकळत भोसल्यांशी तह करून फोंड्याचा वेढा उठविला आहे. महान मोगल बादशहांच्या इभ्रतीवर हा मोठाच आघात आहे

ही मोठ्या नामुष्कीची गोष्ट आहे. आपण वेढा उठविणार असल्याचे जर मला कळले असते, तर मी आपणाला तसे न करण्याचा सल्ला दिला असता. आणि आपणास आणखी मदत पाठविली असती. पण ज्याअर्थी आता वेढा उठविण्यात आला आहे, व सैन्य निघून गेले आहे, आणि पावसाळाही डोक्यावर आला आहे, त्याअर्थी लष्करी हालचाली सुरू करणे ही कठीण गोष्ट आहे. तथापि एक गोष्ट आपण ध्यानांत ठेवावी की, मोगल बादशहाच्या शत्रूचा निःपात करण्यासाठी हे राज्य त्याला केव्हाही मदत करील.

देव आपले भले करो."

गोवा, २ जून १७००.

आंतोनियु लुईस गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 34V).

मोगल आणि भोसले ह्यांच्याशी वागताना गोव्याच्या व्हाइसरॉयने दुटप्पी धोरणाचा अवलंब केला होता. तो दोघांनाही मदत करीत होता हे त्याच्या पुढील पत्रावरून दिसून येते.

"खेम सावंत ह्यांस---

सरदेसाई खेम सावंत यांचे पत्र मिळाले. त्यांचा ब्राह्मण दूत पुंडलिक शेणवी ह्याने मला जे काय कळविले ते त्या पत्रात आहे. तो इथून दारूगोळा घेऊन जात आहे. यावेळी हरी गांवस ह्यांचा कायमचा निकाल लावलेला बरा."

गोवा, १५ फेब्रुवारी १७०१. आंतोनियु लुईस गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 45).

खोरजुवे ह्या नावाचे एक बेट खेम सावंत भोसले ह्यांनी मोगलांकडून घेतले होते. ते बेट पोर्तुगीजांना देऊन टाकण्याबद्दल बादशाहाने एक आज्ञापत्रक काढले होते. पण ते पत्रक गोव्याच्या व्हाइसरॉयला न मिळल्याने, त्याने फोंड्याच्या किल्लेदारास त्याबद्दल लिहिले :

"फोंड्याचे किल्लेदार ह्यांस---

काल वाघ मिळाला. त्याबद्दल आनंद वाटला. आताच बेळगावच्या नबाबांना मला हवी असलेली माहिती पाठविण्याबद्दल एक पत्र पाठवित आहे. असे कळते की, बादशहांनी आम्हांला खोरजुवे बेट देऊन टाकण्याबद्दल आज्ञापत्रक काढले आहे."

गोवा, १५ फेब्रुवारी १७०१.

आंतोनियु लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 45)

खेम सावंत भोसले ह्यांच्या माणसांनी गोव्याच्या हद्दीत शिरून गुरेढोरे आणि माणसे पळविली. त्या घटनेबद्दल गोव्याचे हंगामी गव्हर्नर आर्चबिशप प्रिमज् दों. व्हाश्कु लुईज कौतिन्यु ह्यांनी खेम सावंत भोसले ह्यांच्याकडे निषेधाचा खलिता पाठवून पळवून नेलेली गुरे आणि माणसे परत करण्याची मागणी केली.

"खेम सावंत ह्यांस—

आम्हांला निश्चीतपणे कळले आहे, की देसाई खेम सावंत ह्यांनी आपल्या निरनिराळ्या किल्ल्यांतील एकशेबत्तीस शिपाई गोळा करून त्यांना आमच्या बार्देश प्रांतातील अ.............. खेड्यात लुटालूट करण्यासाठी पाठविले. ह्या शिपायांनी ते खेडे लुटून गुरेढोरे आणि काही माणसे पळविली. देसाई खेम सावंत ह्यांचे आणि आमचे सलोख्याचे संबंध असता त्यांच्या शिपायांनी आमच्या हद्दीत शिरून लूटमार केल्याचे कळताच आम्हांला मनस्वी दुःख झाले. आम्ही दियोग रोइझ ह्या नावाच्या आधिकाऱ्याला त्यांच्याकडे पाठवित आहोत. तरी त्यांच्या शिपायांनी जी गुरे आणि माणसे पळविली आहेत, ती त्यांच्या हवाली करण्यात यावी. त्यांनी जर तसे केले नाही, तर त्यांना आमच्याशी सलोखा ठेवणे नको आहे असे आम्ही समजू, व त्यांनी आमची जी आगळीक केली आहे त्याचा जरूर बदला घेऊ."

गोवा, २ मार्च १७०२.

आर्चबिशप प्रिमज् दों. व्हाश्कु लुईज कौतिन्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 59)

मराठ्यांच्या आरमाराने पोर्तुगीजांचे एक जहाज पकडले होते. ते परत न केलेले पाहून गोव्याच्या हंगामी गव्हर्नरने मेलुंडी (?) सुभेदार मोहिते ह्यांना पत्र पाठवून त्यांना ते जहाज परत करण्याची विनंती केली व ते परत केले नाही तर बदला घेण्याची धमकी दिली.

"मेलुंडीचे सुभेदार भगवानजी मोहिते ह्यांस—

काही दिवसांमागे मी आपणाला पत्र घातले असता आपण मला उलटपत्री कळविले होते, की तुमच्या बंदरात आमचे जे जहाज त्याच्यावरील खलाशांसह अटकेत आहे ते मुक्त करण्यात येईल. आमच्या खलाशांना आपणाकडून जी वागणूक मिळाली त्याबद्दल मी आपले आभार मानले होते. परंतु त्या जहाजाच्या कप्तानाकडून आम्हांला नुकतेच जे पत्र आले आहे, त्यावरून कळते की,

त्या जहाजाची मुक्तता करण्याच्या बाबतीत आपण कोणतीच हालचाल केलेली नाही. आपण ते जहाज इतके दिवस का ठेवून घेतले तेच आम्हांला कळत नाही. शिवाजी राजे ह्यांचे आणि आमचे संबंध चांगले असता आपणाकडून आम्हांला अशी वागणूक मिळावी ह्याचे आश्चर्य वाटते. ह्या चांगल्या संबंधाचा पुरावा मी आपणाला सादर केलाच आहे. शिवाजी राजे ह्यांनी परशुराम पंडीत ह्यांचे मार्फत आम्हांला जे पत्र पाठविले होते ते आम्ही आपल्या अवलोकनार्थ आणलेच आहे. तरीही आपण ज्याअर्थी, शिवाजी राजांचे आणि आमचे संबंध बिघडवून टाकण्याचा आपला विचार आहे हे त्यावरून सिद्ध होते.

आपण जर आमच्या जहाजाची त्वरीत मुक्तता केली नाही, तर ती करण्याचा आम्ही असा काही मार्ग अवलंबू की, तो आपणाला खचित रुचणार नाही. तरी प्रकरण त्या थरापर्यंत जाऊ नये म्हणून जहाजाची मुक्तता करावी.

गोवा, २२ मार्च १७०२.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5. FLS 59 V)

मराठ्यांचे सरदार बसरोजी घोरपडे हे घाटावरून कोकणात उतरल्याची बातमी खेम सावंत भोसले ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळविल्याबद्दल त्याने त्यांचे पुढील पत्रात आभार मानले.

"कुडाळचे सरदेसाई खेम सावंत ह्यांस—

सरदेसाई खेम सावंत ह्यांचे पत्र मिळाले. त्यांनी त्या पत्रात बसरोजी घोरपडे ह्यांनी भीमगडावरून कोकणात उतरून तिथल्या हवालदारावर आणि कारभाऱ्यावर हल्ला केल्याची बातमी दिली आहे. सरदेसाई खेम सावंत ह्यांनी बसरोजी घोरपडे ह्यांच्या पुढील हेतूंची बातमी काढून ती आम्हांस कळविली ह्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

घोरपडे ह्यांच्यापासून आपला बचाव करण्यासाठी सरदेसाई खेम सावंत ह्यांनी जागरूक रहावे."

गोवा, २७ जुलै १७०२.

आर्चबिशप प्रिमश् दों. व्हास्कु लुईज कौतिन्यु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 65)

पोर्तुगीजांचा उत्तरेकडील प्रदेशाचा सेनापती जनरल पेद्रु व्हाज सोआरिश इ बालेसार ह्याने मराठ्यांशी तह केल्याची वार्ता पोर्तुगालच्या राजाला कळली असता त्याने गोव्याचा व्हाइसरॉय कौंट द आल्व्होर ह्याला कळविले की, उपरिनिर्दिष्ट सेनापतीने आपल्या बुद्धीने जर मराठ्यांशी तह केला असेल तर ती गोष्ट शिस्तीच्या दृष्टीने तर वाईट आहेच, परंतु मुत्सद्दीपणाचे दृष्टीनेही वाईट आहे. कारण, ह्या तहाची बातमी जर मोगल बादशहाला कळली, तर त्याचा पोर्तुगीजांवर रोष होऊन पोर्तुगीजांच्या आणि त्याच्या मैत्रीच्या संबंधात बिघाड होण्यात त्याची परिणती होईल. कारण मराठे हे मोगलांचे शत्रू आहेत.

पोर्तुगालच्या राजाने ह्या घटनेची चौकशी करून उपरोक्त सेनापतीवर शिस्तभंगाचा इलाज करावा असा व्हाइसरॉयला हुकूम केला आहे. त्याच्या मते मराठे आणि पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये असा करार होणे पोर्तुगीजांचे हिताचे दृष्टीने चांगले नाही. पोर्तुगालचा राजा म्हणतो की, हा करार अमलात आला तर बादशहाची पोर्तुगीजांवर अवकृपा होऊन त्यामुळे त्यांच्या हिंदुस्थानांतील राज्यालाही धोका पोचण्याची भीती आहे. म्हणून त्याने असा सल्ला दिला आहे की, पोर्तुगीजांनी मराठ्यांशी मैत्रीचा करार न करता आहे त्या परिस्थितींतच संबंध सुधारण्याचा प्रयत्न करावा.

प्रस्तुत पत्र पोर्तुगालच्या राजाने आपली राजधानी जे लिस्बन (लिश्बोआ) शहर इथून दि. १२ ऑक्टोबर १७०२ रोजी लिहिले.

(LIVRO DAS MONCOES, No. 67, FLS 9).

मराठ्यांनी फोंड्याच्या किल्ल्यास वेढा घातला असता ती वार्ता खेम सावंत भोसले ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळविली. त्याने भोसले ह्यांना मोगलांच्या मदतीस जाण्याचा सल्ला दिला.

"कुडाळचे देसाई खेम सावंत ह्यांस--

देसाई खेम सावंत ह्यांचे पत्र मिळाले. मी त्यांच्या आदल्या पत्रास उत्तर पाठविले नाही अशी त्यांची तक्रार आहे. त्यांना कळविण्यात येत आहे की, त्यांनी ते पत्र जासुदाकडे पाठविले होते. त्याच जासुदाकडे त्या पत्राचे उत्तरही पाठविले आहे. फोंड्याच्या वेढ्यासंबंधी त्यांना कळविण्यात येत आहे की, त्यांनी त्वरीत त्या किल्ल्याच्या मदतीला जावे. हे ठाणे जर मराठ्यांनी घेतले, तर खेम सावंत ह्यांना त्यांच्यापासून उपसर्ग

पोहचल्यावाचून राहाणार नाही. आमच्या बाबतीत बोलायचे झाल्यास मोगल बादशहाला मदत करण्याची आमची नेहमीच तयारी असते. त्यांच्या ठाण्याच्या मदतीला आमची नेहमीच कुमक रवाना होत असते."

गोवा, ३१ ऑक्टोबर १७०२. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 66)

बेळगावचा नवाब सैफखान ह्याने पोर्तुगीजांकडे फोंड्याला दोनशे सैनिकांची कुमक धाडण्याची विनंती केली असता, त्या विनंतीस गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर धाडले :

"बेळगावचे नवाब सैफखान ह्यांस––

आपले पत्र मिळाले. त्यात आपण म्हणता की, आमची हरकत नसल्यास दोनशे पोर्तुगीज शिपाई फोंड्याकडे पाठवून द्यावे. ह्या शिपायांमध्ये काही गोलंदाजही असावेत अशी आपली मागणी आहे. मोगल बादशहांच्या मदतीला जाण्यास आम्हांस आनंद वाटला असता, परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, शत्रूने फोंड्याची नाकेबंदी करून सर्व रस्ते रोखून धरले आहेत. आपल्या पत्रात आपण ह्या गोष्टीचा निर्देश केलाच आहे. अशा परिस्थितीत आपण पाठवा म्हणून सांगितलेले दोनशे शिपाई कसे पाठवायाचे ? शत्रूचा सगळीकडे पहारा असताना, ह्या सैनिकांना किल्ल्यात पाठविण्याच्या मार्गात मोठाच धोका आहे. दुसरी गोष्ट ही की, शत्रू सुसज्ज आणि संख्याबलानेही मोठा असल्या-कारणे त्याच्यासमोर ह्या दोनशे सैनिकांचा निभाव कितपत लागेल हा प्रश्नच आहे. आमचे आरमारही सध्या इकडे नाही. आरमार उत्तरेकडे निघण्याच्या तयारीत असता काही सैनिक अजारी पडले. बाकीचे सैनिक आमच्या राज्याचे रक्षण करीत आहेत. शत्रूने आमच्या राज्यात शिरून लूटमार करू नये म्हणून ठाण्यांचे रक्षण करावे लागते. परिस्थिती जर अशी नसती तर आपल्या मागणीप्रमाणे मी कुमक पाठविली असती.

फोंड्याच्या नवाबानेही आमच्याकडे दारूगोळ्याची मदत मागितली होती. नवाबांचे विश्वासू दूत अहमद सारंग ह्यांच्याबरोबर ती पाठवून दिली आहे. मागितलेला सगळाच दारूगोळा पाठवित नाही. कारण, रस्ते मराठ्यांच्या हातात असल्याने हा दारूगोळा त्यांच्या हातात पडण्याचा धोका आहे. मी अशी एक अफवा उठवून दिली आहे की, काही पोर्तुगीज सैनिक फोंड्याच्या किल्ल्यात लढत आहेत.

देव आपले रक्षण करो."

गोवा, ४ नोव्हेंबर १७०२. कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5. FLS 66)

पोर्तुगीजांचा उत्तरेकडील सेनापती पेद्रु व्हाज सोआरिश बालेसार ह्याने मराठ्यांशी तह करून काही आघाड्यांवर युद्धबंदी केल्याची बातमी पोर्तुगालच्या राजास कळल्याने त्याने त्या प्रकरणाची चौकशी करण्याचा आदेश गोव्याच्या व्हाइसरॉयला दिला होता, हे मागे आलेच आहे. त्या आदेशाप्रमाणे गोव्याच्या व्हाइसरॉयने त्या घटनेची चौकशी केली असता सदरहू सेनापतीने मराठ्यांशी कोणत्याच प्रकारचा तह केला नसल्याचे त्याला आढळून आले. फक्त त्याने काही ठिकाणी युद्ध बंद ठेवले होते, एवढेच. व्हाइसरॉयलाही उपरिनिर्दिष्ट उत्तरेकडील सेनापतीचे धोरण पसंत पडले. त्याने पोर्तुगीज सेनाधिकाऱ्यांना सूचना केली, की त्यांनी मराठ्यांशी युद्ध न करता त्यांच्याशी सलोख्याचे संबंध ठेवून युद्ध टाळावे. मात्र मराठ्यांशी आपले स्नेहाचे संबंध आहेत असा त्यांनी गवगवा करू नये. कारण ते जर मोगल बादशहाला कळले, तर त्याला ते आवडणार नाही. त्याचा निष्कारण पोर्तुगीजांवर रोष होईल.

गोव्याच्या व्हाइसरॉयने हा अहवाल पोर्तुगालला आपल्या राजास दि. ११ डिसेंबर १७०२ रोजी पाठविला.

(LIVRO DAS MONCOES, No. 67, FLS 10).

छत्रपतीचे सेनापती हिंदुराव घोरपडे ह्यांनी पोर्तुगीजांकडे खास दूतामार्फत पत्रे पाठवून उभय पक्षांमध्ये मैत्रीचे संबंध प्रस्थापित व्हावेत अशी मागणी केली होती. त्या पत्रांना गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले:

" हिंदुराव ह्यांस—

आपली दोन्ही पत्रे मिळाली. पहिल्या पत्राचे उत्तर लगेच केले नाही. कारण ते पत्र घेऊन येणारे आपले जासूद गणेश विठ्ठल हे लवकरच आपले दुसरे पत्र घेऊन येणार आहेत असे कळले होते. मला कळलेल्या वार्तेप्रमाणे त्यांनी ते पत्र मला आणून दिले.

आपल्या दोन्ही पत्रांवरून कळून चुकले, की माझे वडील ह्या राज्याचे व्हाइसरॉय होते. तेव्हा ज्याप्रमाणे आपले स्वामी छत्रपती ह्यांचा आणि पोर्तुगीजांचा सलोखा होता, तसाच सलोखा आता उभय पक्षांमध्ये प्रस्थापित व्हावा अशी आपली इच्छा आहे.

मी आपणास कळवू इच्छितो, की असे संबंध प्रस्थापित होण्याच्या मार्गात आमची कोणतीच आडकाठी नाही. तरी आपण आपल्या समुद्रावरील आणि जमिनीवरील सैन्याला हुकम करावा, की त्यांनी आमची कोणत्याच प्रकारची

कुरापत काढू नये, व आमच्या राज्यातील प्रजेला उपद्रव देऊ नये आणि आमच्या आरमारावर हल्ले चढवू नयेत.

आपल्या पत्रात आपण काही विजय मिळविले अशी बातमी आहे. ती बातमी वाचून आम्हांला आनंद झाला. आपणाला असेच विजय मिळावेत आणि त्यांची सुरुवात आमच्या हद्दीला लागून असलेल्या ठाण्यापासून व्हावी अशी इच्छा करतो. त्यामुळे आपण जे काय गमावले ते पुनः मिळवू शकाल. आपल्या इच्छेप्रमाणे आपले दूत गणेश विठ्ठल ह्यांच्याशी माझ्या दोन मुलाखती झाल्या. ज्या तपशीलाबाबत त्यांना माहिती हवी होती, ती मी तोंडीच दिली आहे. ते आपणाला आमच्या मुलाखतीचा अहवाल सादर करतीलच. त्याच-प्रमाणे आपणाला उपयुक्त अशा आणखीही काही गोष्टी मी त्यांना विदित करणार आहे, की ज्या गोष्टीमुळे आमच्या मधील सलोखा टिकेल आणि तो वृद्धिंगत होईल अशी मला आशा वाटते.

देव आपले भले करो."

गोवा, १४ डिसेंबर १७०२. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 68V)

हिंदुराव घोरपडे ह्यांच्याप्रमाणेच छत्रपतींचे आणखी एक सरदार कृष्णाजी अनंत उर्फ कुष्टाजी पंत ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र धाडून छत्रपतींचे आणि पोर्तुगीजांचे मैत्रीचे संबंध प्रस्थापित व्हावेत अशी मागणी केली होती. गोव्याच्या व्हाइसरॉयने कुष्टाजी पंत ह्यांना पुढील उत्तर पाठविले :

"कुष्टाजीपंत ऊर्फ कृष्णाजी अनंत ह्यांस--

आपले पत्र पावले व त्यावरून आपल्या सैन्याने मोठा विजय मिळ-विल्याची बातमी कळली. आपल्या सैन्याला असेच विजय मिळत रहावेत अशी इच्छा करतो. ह्या देशातील सर्व मोठ्यांशी आमच्या राज्याचे स्नेहाचे संबंध असावेत अशी माझी इच्छा आहे. सरदार हिंदुराव ह्यांनाही पाठ-विलेल्या पत्रात मी ही इच्छा प्रकट केली आहे. गणेश विठ्ठल ह्यांच्याकडून मला नवीन बातम्या कळतीलच. मी त्यांचे आनंदाने स्वागत करीन. आपणास मोठे यश मिळावे अशी इच्छा करतो."

गोवा, १४ डिसेंबर १७०२. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 69).

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र पाठविले त्यात त्याने कोकणातील तत्कालीन राजकीय घडामोडींचा आढावा घेतला आहे :

मी इकडे आलो तेव्हा मराठ्यांशी युद्ध चालू नसल्याचे कळले. सांप्रत इकडे शांतता आहे. आमच्याशी आपणास सलोख्याने वागायचे आहे हे मराठ्यांनी सक्रीय दाखवून दिले आहे.

आमची दोन गलबते वाईट हवेमुळे मराठ्यांच्या बंदरात शिरली होती. त्या जहाजांना त्यांनी अटकेत ठेवले होते. पण आता त्यांची मुक्तता करण्यात आली आहे, इतकेच नव्हे तर, किनाऱ्यावर चांचेगिरी होते म्हणून मराठ्यांच्या युद्धनौकांनी त्या जहाजांना सोबत करून इथपर्यंत आणून पोहोचविले. अशा रीतीने आमचे मराठ्यांशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित झाले आहेत.

मराठ्यांच्या आणि आमच्या चकमकी मुख्यत्वे आमच्या उत्तरेकडील प्रदेशात होत आल्या आहेत, तेथे आता कोणत्याही परिस्थितीत युद्धाचे कारण घडता कामा नये.

मराठ्यांनी अलीकडे मोगलांनी त्यांचा जो मुलूख जिकला होता तो परत घेण्याचा सपाटा सुरू केला आहे. मी इकडे येऊन राज्याची सूत्रे हाती घेतल्या-वर त्यांनी फोंड्यास वेढा घातला. शहर लवकरच पडले. परंतु गड सर झाला नाही. तो अजून मोगलांच्या हातात असून ते कुमकेची वाट पहात आहेत. परंतु पुरवठ्याच्या अभावी ते लवकरच शरण येण्याची चिन्हे दिसत आहेत. फोंड्याच्या नबाबाने माझ्याकडे दारूगोळ्याची आणि मनुष्यबलाची मदत मागितली होती. मी त्याला कळविले, की आमचे आरमार साप्रत बाहेर गेले असून आमचे काही सैनिक आजारी आहेत. जे सैनिक हाताशी आहेत ते शत्रूने आमच्या प्रदेशात शिरून दरोडेखोरी करू नये म्हणून ठाण्याचे रक्षण करीत आहेत. अशा परिस्थितीत कुमक पाठविता येत नाही. दारू-गोळा मात्र थोडा पाठवून दिला. ही मागणी बादशहाच्या मोठ्या उमरावाने बादशहाच्या वतीने केली होती. जे जासूद पत्र घेऊन आले होते त्यांना मी खुष करून पाठवून दिले.

शिवाजी दुसरे ह्यांनीही फोंडे घेतल्यावर आमच्याकडे पत्र पाठवून आपल्या वाडवडिलांप्रमाणे आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची इच्छा व्यक्त केली. ह्या बाबतीत मी राज्य सल्लागार मंडळाची बैठक भरवून मंडळाच्या सदस्यांचा दृष्टिकोन ऐकून घेऊन शिवाजी राजे ह्यांना उत्तर पाठविले.

मराठ्यांचे सध्या उत्कर्षाचे दिवस असल्याने त्यांना दुखविणे फायद्याचे नाही म्हणून मी शिवाजी राजे ह्यांना पाठविलेल्या पत्रात त्यांच्याशी मैत्रीचे संबंध ठेवण्याची आमची इच्छा असल्याचे त्यांना कळविले आहे.

गोवा, ६ जानेवारी १७०३.

(LIVRO DAS MONCOES, No. 66, FLS 275).

मराठे व सोंदेचा राजा ह्यांच्यामध्ये झालेल्या लढाईत मराठ्यांची काही शस्त्रे पोर्तुगीजांच्या हातास लागली होती. ती परत करण्याची मागणी फोंड्याचे सुभेदार कुष्टाजीपंत ह्यांनी केली असता गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांना पुढील जबाब पाठविला :---

"फोंड्याचे सुभेदार कुष्टाजीपंत ह्यांस--

आपले पत्र मिळाले. आपले आरोग्य उत्तम असल्याचे वाचून आनंद झाला. सोंदेच्या राजाच्या सैनिकांशी आपल्या सैनिकांची चकमक झाली असता आपल्या जखमी सैनिकांना आम्ही जो प्रथमोपचार दिला, त्याची आपण आपल्या पत्रात दखल घेतलेली पाहून समाधान वाटले.

हत्यारांसंबंधी आपण जे लिहिले आहे, त्यासंबंधी मला आपणास कळवायचे आहे की, ती शस्त्रे आमच्या शिपायांनी जिवाची तमा न बाळगता नदीत उड्या टाकून वर काढली. ती आपणाला परत करण्याचा हुकूम आमच्या साष्टीच्या सेनापतीला देण्यात आला आहे. घोड्यासंबंधी जरा वांधा निर्माण झाला आहे. त्या घोड्यावर ज्या प्रमाणे आपला दावा आहे त्याचप्रमाणे सोंदेच्या राजाचाही आहे. तेव्हा तो खरोखर कुणाचा आहे ते सिद्ध होईपर्यंत ते आम्ही आमच्याकडे ठेवून देत आहोत.

देव आपले भले करो".

गोवा, ३ फेब्रुवारी १७०३.

कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 69V).

मोंगल बादशहाचा आपणावर रोष होईल ह्या भीतीने पोर्तुगीजांनी जरी मराठ्यांशी मैत्रीचा करार केला नसला तरी त्यांचे आतून मराठ्यांशी मैत्रीचे संबंध होते. मराठ्यांना त्यांच्याकडून पुरवठा होत असे व त्यांची

जहाजे पोर्तुगीज बंदरांना लागत असत. ते जेव्हां सुरतेच्या नवाबाला कळले तेव्हा त्याने गोव्याच्या व्हाइसरॉयकडे तक्रार केली. त्या तक्रारीला व्हाइसरॉयने उत्तर पाठवून सुरतेच्या नबाबाला कळविले की, असे प्रकार जर पोर्तुगीजांच्या उत्तरेकडील मुलुखात घडले तर, त्या मुलुखाच्या सेनापतीला त्याबाबत जाब विचारण्यात येईल. आणि तो जर दोषी ठरला तर त्याला शासन करण्यात येईल.

गोव्याच्या व्हाइसरॉयने सुरतेच्या नबाबाला पाठविलेले हे पत्र दि. २१ फेब्रुवारी १७०३ मधले आहे.

(LIVRO DOS REIS VIZINHOS. No, 5, FLS 70)

फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपंत ह्यांनी पोर्तुगीजांकडे खाद्य वस्तूंची मागणी केली होती. त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

"फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपंत ह्यांस--

कुष्टाजीपंत ह्यांचे पत्र मिळाले व त्यांचे क्षेम कुशल कळून आनंद झाला. त्यांनी माझ्याकडे खाद्य वस्तूंची मागणी केली होती. त्यासंबंधी मला त्याना कळवायचे आहे की, आमच्या राज्यात ह्या वस्तूंची टंचाई असल्याने त्यांची निर्यात मला थांबवावी लागली होती. परंतु आता ती टंचाई दूर झाल्याने, कुष्टाजीपंत ह्यांच्या मागणीकडे लक्ष देऊन त्यांच्याकडे त्या वस्तू पाठवित आहे. मला कुष्टाजीपंत ह्यांच्या निदर्शनास आणावयचे आहे की, सिंधुदुर्ग किल्ल्यातील मराठे सैनिकांनी आमचे एक जहाज पकडले व दोन पाद्री आणि चार इतर लोक ह्यांना सिंधुदुर्गमध्ये कैद करून ठेवले आहे. एके ठिकाणी आमचे आणि तुमचे संबंध मित्रत्वाचे आहेत तर दुसरे ठिकाणी ते शत्रूत्वाचे आहेत. हे कसे काय याचा मला उलगडा होत नाही. मला आपणाकडून ह्या गोष्टीचा खुलासा हवा आहे. म्हणजे मलाही माझ्या बुद्धीप्रमाणे वागता येईल".

गोवा, ९ मार्च १७०३ — कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 71).

खेम सावंत भोसले ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे पुरवठ्याची मागणी केली होती. गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांना कळविले की, सध्या आपणाकडे वस्तूंची टंचाई असल्याने आपण पुरवठ्याची तरतूद करण्यास असमर्थ आहोत.

"खेम सावंत भोसले ह्यांस—

खेम सावंत भोसले ह्यांचे पत्र मिळाले. त्यांनी त्या पत्रात ज्या वस्तूंची मागणी केली आहे ती सांप्रत आम्ही त्यांना पुरविण्यास असमर्थ आहोत. कारण, इकडे त्या वस्तूंची टंचाई आहे. तथापि, दक्षिणेकडून लवकरच आरमार आणि काफिला येणार आहे. त्यावेळी भोसल्यांची आमच्या विषयीची निष्ठा लक्षात घेऊन आम्ही त्यांची मागणी पूर्ण करू. नरहरी शेणवी ह्यांना काही .................. खेम सावंत ह्यांना भेट म्हणून पाठविण्याबद्दल निरोप धाडला आहे. त्यांचा त्यांना उपयोग होईल. त्यांनी लगेच हालचाल करावी अशी इच्छा आहे. म्हणजे त्यांच्या सहकार्याबद्दल मला त्यांचे आभार मानता येतील. त्यांच्याकडून लवकर उत्तर येण्याची मी वाट पाहात आहे. म्हणजे मला त्याप्रमाणे निर्णय घेणे सुलभ होईल".

पणजी, २६ मार्च १७०३. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 70).

खेम सावंत भोसले ह्यांनी फिरून पुरवठ्याची मागणी केली असता गोव्याच्या व्हाइसरॉयने त्यांच्या पत्रास पुढील उत्तर पाठविले :—

"खेम सावंत भोसले ह्यांस—

खेम सावंत भोसले ह्यांचे पत्र मिळाले व त्यांच्या राज्यात दुष्काळ पडला असल्याचे कळले. आमच्या राज्यातही सांप्रत अन्न टंचाई आहे. म्हणून मला पुष्कळ पैसे देऊन आरमार आणि कापिला कर्नाटकात तांदूळ आणण्यासाठी पाठवावा लागला. तो पुरवठा आला की, खेम सावंत भोसले ह्यांची आमच्या संबंधीची निष्ठा लक्षात घेऊन त्यांची गरज भागविली जाईल. निदान त्यांची अर्धी मागणी तरी पूर्ण केली जाईल. काफिला बंदरास लागण्यास निदान पाचसहा दिवस तरी लागतील असे वाटते. खेम सावंत भोसले ह्यांनी त्यावेळी वस्तू नेण्याकरिता आपला मनुष्या इकडे पाठवावा. त्यावेळी मी त्यांना हुकूम करीन की, त्या वस्तू इकडे आमच्या नागरिकाना ज्या किमतीला मिळतील त्याच किमतीला त्यांनी त्या तिकडे विकल्या पाहिजेत".

पणजी, १० मार्च १७०३. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 70).

कुडाळचे सरदेसाई खेम सावंत भोसले हे आपले निष्ठावंत दोस्त आहेत असे गोव्याचा व्हाइसरॉय दाखवित असे. परंतु त्यांचे आणि पोर्तुगीजांचे हरी गांवस देसाई ह्यांच्यावरून बिनसले असावे असे हरी गांवस ह्यांना पोर्तुगीज व्हाइसरायने पाठविलेल्या पत्रावरून दिसून येते :—

"हरी गांवस ह्यांस—

हरी गांवस ह्यांचे पत्र मिळाले व ते वाचून मजकूर समजला. त्या पत्रात त्यांनी खेम सावंत भोसले ह्यांच्याकडून आपणाला हानी पोहोचल्याचा उल्लेख केला आहे व ह्या राज्याशी इमानी राहाण्याची इच्छा दर्शविली आहे. तसेच खेम सावंत भोसले ह्यांच्याकडून ह्या राज्याच्या नागरिकांची जी नुकसानी झाली आहे व त्यांनी ज्या चोऱ्या केल्या आहेत त्याबद्दल त्यांना शिक्षा व्हावी अशी मागणी केली आहे.

मी हरी गांवस ह्यांना कळवू इच्छितो की, खेम सावंत भोसले ह्यांच्याकडून जी आगळीक घडली आहे, त्याचा जाब त्यांना द्यावा लागेल".

गोवा, १५ मे १७०५ कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 73).

फोंड्याचे सुभेदार कुष्टाजीपंत ह्यांनी आपल्या बधूच्या औषधोपचारासाठी गोव्याला जाण्याची इच्छा व्यक्त करून गोव्याच्या व्हाइसरॉयकडे परवानगी मागितली होती. कुष्टाजीपंत ह्यांच्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

"फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपत ह्यांस—

फोंड्याचे हवालदार कुष्टाजीपंत ह्यांनी खेम सावंत भोसले ह्यांच्या बरोबर आपल्या भावाच्या औषधोपचारासाठी इकडे येण्याची परवानगी मागितली आहे. काही अपरिहार्य कारणावरून कुष्टाजीपंत ह्यांना ती परवानगी नाकारणे भाग पडत आहे. परंतु त्यांना जर त्यांच्या भावाला इकडे पाठवायचे असेल तर त्याच्यावरोबर आणखी दोन माणसे देऊन त्याला पाठविता येईल. त्यांना इकडे येण्यास राजवाड्याकडून प्रतिबंध होऊ नये म्हणून परवाना पाठविण्यात येत आहे".

पणजी, १६ मे १७०३ कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS).

हरी गांवस देसाई ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे खेम सावंत भोसले ह्यांना शासन करण्याची पुनः विनंती केली होती. त्या विनंतीला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

"हरी गांवस ह्यांस--

हरी गांवस देसाई ह्यांनी ह्या राज्याची सेवा करण्याची जी इच्छा दर्शविली आहे ती कळली, त्यांना मी कळवू इच्छितो की, त्यांच्या सेवेचा मोबदला त्यांना मिळाल्यावाचून राहाणार नाही. बंडखोर खेम सावंत ह्यांना शिक्षा व्हावी अशी त्यांनी आपल्या पत्रात मागणी केली आहे. त्यांना ह्यासबंधी कळविण्यात येत आहे की, पावसाळ्यामुळे खेम सावंत ह्यांच्याविरुद्ध लष्करी हालचाल करणे अशक्य झाले आहे. त्यांनी जे दरोडे घातले आहेत आणि त्याच्या हातून जी अतिरेकी कृत्ये घडली आहेत, ती मी कधीच विसरणे शक्य नाही. पावसाळ्याचा जोर कमी झाल्यावर मी त्यांच्याविरुद्ध मोहीम सुरू करणार आहे. हा निर्णय घेण्यापूर्वी हरी गांवस देसाई ह्यांना मी त्यांची माणसे जय्यत तयार ठेवण्याबद्दल पूर्व सूचना देईन. ह्या दगलबाज मनुष्याचा नाश मी करणारच आहे. त्या मोहिमेसाठी मला हरी गांवस देसाई ह्यांचे सहाय्य हवे आहे ".

गोवा, २३ मे १७०३ कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 74).

कान्होजी आंग्रे ह्यांनी पोर्तुगीजांकडे दूत पाठवून उभय पक्षांमध्ये मैत्री निर्माण व्हावी अशी इच्छा व्यक्त केली होती, गोव्याच्या व्हाइसरॉयने आंग्रे ह्यांना पुढील उत्तर पाठविले :--

"कान्होजी आंग्रेराव ह्यांस--

आपले पत्र पावले. मजकूर वाचून कळले की, ह्या पत्रापूर्वी आपण जे उत्तर मला पाठविले होते, ते घेऊन येणाऱ्या जासुदाच्या निष्काळजीपणामुळे अथवा नौकाभंगामुळे मला ते मिळाले नाही.

ह्या राज्याशी आपले नेहमीच मैत्रीचे संबंध होते असे आपण पत्रात म्हटलेच आहे. आमच्याशी मैत्री ठेवण्याची आपली इच्छा प्रामाणिक आहे, ह्याबद्दल मला तिळमात्रही संदेह वाटत नाही. मी आपणाला आश्वासन

देतो की, आम्हीही आपणाशी सलोख्याचे संबंध ठेवू इच्छितो हे कृतीने दाखविले पाहिजे. आपणाला मला आणखी एक सूचना करायची आहे ती ही की, आमच्यामधली ही मैत्री आणि शांतता उघड होऊ नये अशी माझी इच्छा आहे. त्याची कारणे रामाजी पंडित आणि अझमतखान हे दोघे आपणाला विदीत करतीलच. त्यांच्याशी मी ह्या तपशीलाविषयी बोललो आहे. ज्या राजांनी चोऱ्यामाऱ्यांचा किंवा इतर अतिरेकी कृत्यांचा अवलंब केला आहे त्यांना शिक्षा करण्याचा माझा ठाम निश्चय झाला आहे. नजराण्याबद्दल आभारी आहे. परंतु तो मी स्वीकारू शकत नाही. नजराण्याबद्दल पुन: एकदा आभार. आता पाऊस सुरू झाला असल्याने आणि हे जहाज परत जाऊ शकत नसल्याने अझमतखान व रामजीपंत ह्या दोघांना मी धोका नसल्यास पाठवून देत आहे."

गोवा, ८ जून १७०३. कायतान् द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS RAIS VIZINHOS, No. 5, FLS 73V).

खेम सावंत भोसले ह्यांनी पोर्तुगिजांची कुरापत काढल्याचा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयच्या एका पत्रात मागे आलाच आहे. कदाचित भोसल्यां-विरुद्ध पोर्तुगिजांनी मोहीमही सुरू केली असावी. कारण, कुणी मालोजी घाटगे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे खेम सावंत ह्यांच्यावतीने रदबदली केली असता व्हाइसरॉयच्या चिटणीसाने सदरहू घाटगे ह्यांना पुढील उत्तर पाठविले :—

"मालोजीराव घाटगे ह्यांस—

नामदार व्हाइसरॉय ह्यांना जी पत्रे येतात त्यातील महत्त्वाचा तपशील त्यांना कळविणे हे माझे काम असते. त्याप्रमाणे आपल्या पत्रातील महत्त्वाचा तपशील मी त्यांना विदीत केला असता त्यांनी आपले मुद्दे मान्य करण्यास साफ नकार दिला. खेम सावंत भोसले ह्यांच्यासाठी आम्ही जे काय केले ते आपल्याला माहीत असून देखील त्यांच्यासाठी आपण रदबदली करता हे पाहून नामदार व्हाइसरॉय ह्यांना नवल वाटले. खेम सावंत भोसले ह्यांचा उद्धटपणा फार मोठा आहे. त्यांनी इकडे येणाऱ्या जहाजांची लुटालूट केली, इतकेच नव्हे तर, ह्या राज्याच्या काही प्रजाजनांना जिवंत ठार मारले. अशा भयंकर मनुष्याला त्याचे गुन्हे माफ करता येणे शक्य आहे का? नामदार व्हाइसरॉय ह्यांची अशा गुन्हेगारांना क्षमा करण्याची रीत नाही.

खेम सावंत भोसले ह्यांना जर आमच्याशी तह करायचा असता, तर त्यांना आमच्याकडे आपली माणसे पाठविता आली असती अशी रीतच आहे. मोठमोठ्या राजांना जेव्हा आमच्याशी महत्त्वाच्या प्रश्नाबाबत वाटाघाटी करायच्या असतात, तेव्हा ते आमच्याकडे आपले वकील पाठवितात. त्याप्रमाणे आपण जर मला कळविले असते की, खेम सावंत भोसले ह्यांच्यासाठी रदबदली करण्यासाठी आपला इकडे येण्याचा विचार आहे, तरी नामदार व्हाइसरॉय ह्यांची परवानगी काढावी, तर ह्या बाबतीत माझ्याकडून आपणाला थोडी फार मदत झाली असती. आणि हा फायदा काही थोडा थोडका नसतो. कारण ज्यावेळी वाटाघाटींची मुदत टळून गेलेली असते तेव्हा नामदार व्हाइसरॉय हे बंडखोरांविरुद्ध शेवटचा इलाज करतात. तो इलाज एवढा मोठा असतो की, यापुढे बंडखोराला आमच्या राज्याचे संरक्षण नाही हे त्याच्या शेजाऱ्यांना कळून चुकते. आणि त्याच्या बाबतीत ह्या सारखे दुर्दैव दुसरे कोणते नसते".

गोवा, १० सप्टेंबर १७०३. आंतोनियु द फ्रँर द आंद्राद.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 74V).

मेलुंदी (?) चे किल्लेदार भगवानजी मोहिते ह्यांनी पोर्तुगीजांना कळविले की, त्यांची जी जहाजे त्यांच्या उत्तरेकडील प्रदेशातून गोव्याला जातील त्यांनी आपली परवानगी घेतली पाहिजे. त्या पत्रास गोव्याच्या व्हाइसरॉयच्या चिटणीसाने पुढील उत्तर पाठविले :—

"मेलुंदीचे किल्लेदार भगवानजी मोहिते ह्यांस—

नामदार व्हाइसरॉयना आपण जे पत्र पाठविले होते, ते राज्याचा चिटणीस ह्या नात्याने माझ्याकडे देण्यात आले. मी ते नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या अवलोकनास आणले असता त्यांना एकदम आठवण झाली की, मेलुंदीच्या लोकांकडून आमच्या लोकांना वाईट वागणूक मिळाली आहे. त्या लोकांनी आमची गलबते अडविली व त्यातून प्रवास करणाऱ्या लोकांना अटक करून, त्यांची सर्व चीजवस्तू काढून घेऊन त्यांना वाईट वागणूक दिली आणि मग त्यांना इकडे आणून सोडले. ह्या अत्याचारांतून गरीब बिचारे पाद्री लोक देखील सुटले नाहीत. आणि आता आपण अम्हाला कळविता की, आमच्या उत्तरेकडील मुलुखातील जी जहाजे इकडे येतील ती सुरक्षितपणे इकडे पोहोचावीत म्हणून त्यांनी आमचा परवाना घ्यावा. ही गोष्ट आपले

स्वामी छत्रपती ह्यांच्याशी जो आमचा शांततेचा करार आहे त्याच्याविरुद्ध आहे. ह्या कराराची पायमल्ली करून आपण आपल्या स्वामीविरुद्ध बंडखोरी केली आहे. आपल्या स्वामीच्या नजरेला आम्ही ही गोष्ट आणीत आहोत. आपल्या हातून हा जो बंडखोरपणा घडलेला आहे त्याचे प्रायश्चित आपणाला मिळाल्यावाचून राहणार नाही. आणि आम्हाला आशा वाटते की, छत्रपतीं-कडून आपणाला शासन खचितच होईल. ज्या दोन लहान जहाजांविषयी आपण लिहिले आहे ती जहाजे शापुरच्या किल्लेदाराने खेम सावंत भोसले ह्यांची असतील म्हणून घेतली. पण त्यात जो माल होता तो दोनशे असुरप्यांहून अधिक नव्हता. तो माल शिपायांनी आपसांमध्ये वाटून घेतला. तरी बरे, ही जहाजे आपली आहेत हे त्यावेळी उघडकीस आले नाही. ती आपली असल्याचे जर आमच्या नावाड्यांना कळते, तर मागे मेलुंदी येथे आमच्या लोकांना जी वाईट वागणूक मिळाली त्याचा बदला ह्या जहाजांच्या नावाड्यां-वर त्यांनी घेतला असता. ह्या सर्व गोष्टी लक्षात घेता माझा आपणाला सल्ला आहे, की, आपल्या सुरक्षिततेसाठी आपण ह्या सर्व गोष्टींचा विचार करावा. न झाल्यास आपल्या हातून आपल्या राजाच्या आज्ञेची जी पायमल्ली झाली त्याचे प्रायश्चित आपणाला मिळाल्यावाचून राहणार नाही.

गोवा, २० सप्टेंबर १७०३. फान्सिस्कु द आझावेद सांद.

सरदार हिंदुराव घोरपडे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र पाठवून पोर्तुगीज आणि मराठे ह्यांचा सलोखा व्हावा अशी इच्छा व्यक्त केली होती. त्या पत्राला व्हाइसरॉयने जे उत्तर पाठविले त्यांत त्याने हिंदुराव घोरपडे ह्यांना खेम सावंत भोसले ह्यांच्याविरुद्ध चिथावणी दिली आहे.

"हिंदुराव ह्यांस--

आपले आणि कृष्टाजीपंत ह्या दोघांची पत्रे मिळाली. आपले पत्र वाचल्यावर मला कळून चुकले की, ह्या राज्याचे आणि महाराजांचे संबंध सलोख्याचे असावेत ही आपली इच्छा आहे. महाराजांचे आणि आमचे संबंध चांगले असावेत अशी आमचीही इच्छा आहे. परंतु तत्पूर्वी आमच्या गाऱ्हाण्याची दाद लागली पाहिजे.

मेलुंदी बंदरात आणि खांदेरी बेटावर आमच्या लोकांवर अत्याचार होऊन त्यांची जी लुटालूट झाली ती लूट आमच्या लोकांना परत मिळाली पाहिजे, ह्या अत्याचाराला जबाबदार असलेल्या अधिकाऱ्यांची आणि

सुभेदारांची डोकी उडविण्यात यावी. म्हणजे माझ्या संशयाला जागा उरणार नाही. आपण आम्हाला ह्या राज्यातील आणि तुमच्या राज्यांतील प्रजाजनांच्या मैत्रीची आठवण करून दिली आहे. ती जुनी मैत्री प्रस्थापित व्हावी म्हणून मी आज्ञा करीन.

खेम सावंत हा एक बदमाश मनुष्य आहे. ह्या राज्याने त्याच्यासाठी जे काय केले ते तो विसरला, आणि कृतघ्न झाला. त्याचे आम्ही अनेक मोठ्या संकटातून रक्षण केले व मातबर शत्रूपासून त्याला आश्रय दिला. परंतु आपल्या महत्त्वकांक्षेला बळी पडून तो ते सर्व विसरून गेला. हेच कारण त्याला प्रायश्चित देण्यास बस आहे. त्याच्याविरूद्ध लोकांच्या इतक्या तक्रारी आहेत, की, ह्या लोकांनाही जर मी त्याचा सूड घेण्याची चिथावणी दिली तर माझा हेतू सफल होईल. ह्या बंडखोराला शिक्षा व्हावी म्हणून महाराजांनी आग्रह धरला पाहिजे. कारण महाराजांशीही त्याने दगलबाजी केली आहे. फोंड्याचा किल्ला घेण्यासाठी आपण त्याला मदतीस बोलाविले असता तो स्वतःच किल्ला बळकावून बसला. माझी अशी समजूत आहे की, खेम सावंत ह्याला नेस्तनाबूद करण्याच्या बाबतीत आपले दुमत होणार नाही. ह्या कामी आपणाला मदत हवी असल्यास मी ती देण्यास तयार आहे. खेम सावंत भोसले नष्ट झाला, तर आमची एका वाईट शेजाऱ्यापासून मुक्तता होईल. ह्या बाबतीत मी कृष्टाजीपंत ह्यांना लवकरच लिहित आहे".

गोवा, २८ सप्टेंबर १७०३.

कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 74V).

कृष्टाजीपंत ह्यांचे गोव्याच्या व्हाइसरॉयला जे पत्र आले, त्या पत्राला पाठविलेल्या उत्तरात त्याने खेम सावंत भोसले ह्यांना दगलबाज म्हणून संबोधले आहे, व त्यांचा नाश करण्याची चिथावणी कृष्टाजीपंत ह्यांना दिली आहे :—

"कृष्टाजीपंत ह्यांस—

हिंदुराव ह्यांच्या पत्रासोबत आपलेही पत्र माझ्या हवाली करण्यात आले. ह्या दोन्हीही पत्रातील मजकुरावरून मला कळून येते की, दगलबाज खेम सावंत भोसले ह्याला शासन करण्याच्या कामी आपण मला मदत देण्यास तयार आहात.

सदरहू खेम सावंत ह्याला शिक्षा करण्याबाबत आपण हिंदुराव ह्यां-च्याशी सहमत आहात असे मी गृहीत धरतो. कारण फोंड्याचा किल्ला त्याने कसा बळकावला ते आपणाला माहित आहेच. त्याला वास्तविक मराठ्यांनी आपल्या मदतीला म्हणून पाचारण केले होते, परंतु तो आता तो किल्लाच बळकावून बसला आहे. आम्ही त्यावर अगणीत उपकार केले. परंतु तो ते सर्व विसरून जाऊन आमच्यावर उलटला न झाल्यास तो आमची जहाजे लुटता ना.

खांदेरी बेटावर आणि मेलुंदीच्या बंदरांत आमच्या जहाजांची जी लुटालूट झाली त्याची नुकसान भरपाई आम्हाला मिळाली पाहिजे, असे आम्ही महाराजांना कळविलेच आहे. मला आशा आहे की, खेम सावंत भोसले ह्यांचा नाश करण्याकरिता हिंदुराव आणि कुष्टाजीपंत हे दोघे त्याच्या विरुद्ध जी मोहीम करणार आहेत त्या मोहीमेला आमची मदत व्हावी म्हणून महाराज आमची मागणी मान्य करतील अशी आशा आहे. खेम सावंताविरुद्ध कुणा-लाही मदत करण्याची आमची तयारी आहे. मी हिंदुराव ह्यांनाही असेच कळविले आहे".

गोवा, २८ सप्टेंबर १७०३.

कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DGS REIS VIZINHOS, No. 5, FLS 75V).

खेम सावंत भोसले आणि पोर्तुगीज ह्या दोघांचे संबंध केवढ्या विकोपाला गेले होते, ते गोव्याच्या व्हाइसरॉयने हिंदुराव आणि कुष्टाजीपंत ह्या दोघांना पाठविलेल्या पत्रावरून दिसून येतेच. मोगल बादशहाचा एक मांडलिक सोंदेचा राजा ह्याला पाठविलेल्या पत्रातही गोव्याच्या व्हाइसरॉयनें खेम सावंत ह्याना प्रायश्चित देण्याचा आपला निर्धार व्यक्त केला असून, सोंदेच्या राजा-लाही खेम सावंताविरुद्ध मदत करण्याचे आश्वासन दिले आहे. हे पत्र विशेष महत्त्वाचे नसल्याने ते येथे देण्यात येत नाही.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 76).

कान्होजी आग्रे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला एक नजराणा पाठविला होता. तो नजराणा म्हणजे एक नौका होती. व्हाइसरॉयने तिचा स्वीकार करण्यास साभार नाकार दिला होता. ह्या पत्रात त्या भेटीचा पुनः निर्देश आला आहे.

"मराठ्यांच्या आरमाराचे सुभेदार कान्होजी आंग्रे ह्यांस—

आपण पाठविलेली पत्रे पोहोचली. आपल्या सदिच्छेबद्दल आभारी आहे. आपण पाठविलेल्या भेटीचा मला स्वीकार करता येत नसल्याचे मी आपणाला मागेच कळविले आहे. ज्या कारणास्तव ती नौका मला स्वीकारता आली नाही, त्याच कारणावरून मी ह्या शहरातील नागरिकांना विकण्यासही मी मनाई केली. परंतु त्यामुळे आपली नुकसानी होऊ नये म्हणून मी ती जी बंदरे परदेशी लोकांना बंद असतील त्या बंदरात विकण्याची परवानगी दिली. मी आपणाला जो हा फायदा करून दिला तो आपण मान्य कराल व त्याबद्दल आमचे आभार मानाल अशी आशा आहे. त्या नौकेबरोबर जी माणसे इकडे आली होती, त्यांची चांगली बडदास्त ठेवण्याचा मी हुकूम केला होता. त्यांच्या खर्चासाठी मी शंभर असुरप्या मंजूर केल्या होत्या.

काशी कामत आणि अहमद नाईक ह्या दोघांनी दमास्कसच्या कापडाचे चार आणि चौकोट्यांचा एक मिळून पाच तागे आणून दिले. त्यांच्याबरोबर आपणासाठी परत भेट पाठविली आहे. त्यांनी जो माल इकडे आणला होता तो विकत घेण्यासाठी महसूल खात्याला सौदा पटविण्याची मी आज्ञा केली आहे."

गोवा, ८ नोव्हेंबर १७०३. कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 76V)

हिंदुराव घोरपडे आणि कृष्टाजीपंत ह्या दोघांनी खेम सावंत भोसले ह्यांचा नाश करण्याच्या कामी आपणाला पोर्तुगीजांची मदत व्हावी म्हणून गोव्याच्या व्हाइसरॉयकडे मागणी केली होती. त्या दोघांच्या पत्रांना त्याने उत्तरें पाठविली होती. पण त्याच संदर्भात त्याने कृष्टाजीपंत ह्यांना पुनः लिहिले.

"कृष्टाजीपंत ह्यांस—

कृष्टाजीपंत व हिंदुराव ह्या दोघांची पत्रे मिळाली. बंडखोर खेम सावंत ह्याला शासन करण्याच्या बाबतीत मी हिंदुराव ह्यांना वचन दिले होते ते वचन मी मागे घेत नाही. खेम सावंत भोसले ह्याने जी दगलबाजी केली आहे, व ह्या राज्याच्या प्रजाजनांची जी लुटालूट केली आहे, त्याबद्दल त्याला शासन हे झालेच पाहिजे......... त्याच्या नाशाची तयारी लवकर व्हावी. माझ्यापुरते बोलायचे झाल्यास मी आपणाला आश्वासन देतो की, त्याच्यावर हल्ला करण्याच्या बाबतीत मी मागे राहाणार नाही. हिंदुराव ह्यांचे आगमन लवकर व्हावे म्हणून कृष्टाजीपंत हे शक्यतो प्रयत्न करतील अशी आशा आहे.

अशा रीतीने कृष्टाजीपंत ह्यांनी कबुली दिल्याप्रमाणे ही दोस्ती आणि सहकार्य टिकावे".

गोवा, १४ नोव्हेंबर १७०३.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 5, FLS 79).

खेम सावंत भोसले ह्यांना शासन करण्याच्या बाबतीत हिंदुराव ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला जे पत्र घातले त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

"हिंदुराव ह्यांस—

आपले पत्र मिळाले. खेम सावंत भोसले ह्याने जी दगलबाजी केली त्याचे प्रायश्चित त्याला दिले पाहिजे असे आपण पत्रात जे म्हटले आहे, ते वाचले. बंडखोर खेम सावंत ह्याच्या बाबतीत मीही फिर्यादी आहे, हे आपणाला माहीत आहेच. मी त्याची खोड मोडीनच. परंतु आपणाला जी काय मदत हवी असेल तीही देईन. उदाहरणार्थ मी आपणाला दारूचा पुरवठा करू शकेन. आमच्या शिपायांना जंगलातून फिरण्याची संवय नाही. जंगलातून फिरणारें सैन्य माझ्यापाशी नाही, म्हणून मला अद्याप खेम सावंत ह्याला शिक्षा करता आलेली नाही. परंतु ज्याअर्थी, त्याने आमच्याबरोबर आपली ही कुरापत काढली आहे, त्याअर्थी, त्याचा विनाश आता दूर नाही.

आमची मैत्री आणि सहकार्य सदैव टिकावे अशी इच्छा करतो".

गोवा, १० नोव्हेंबर १७०३ कायतानु द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 78).

मणेरीचे देसाई हरी गांवस हे खेम सावंत भोसले ह्यांचे आणखी एक शत्रू होते. ह्या देसायांची खेम सावंत ह्यांनी काही कुरापत काढली होती, म्हणून त्यांनी पोर्तुगीजांशी संगनमत करून खेम सावंत ह्यांच्यावर सूड उगविण्याचे ठरविले होते. तत्संबंधाने हरी गांवस ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला जे पत्र पाठविले होते, त्याचे उत्तर व्हाइसरॉयच्या चिटणीसांनी पुढीलप्रमाणे पाठविले :—

"मणेरीचे हरी गांवस देसाई ह्यांस—

हरी गांवस ह्यांचे पत्र मिळाले व ह्या राज्याची सेवा करण्याची त्यांनी जी इच्छा प्रकट केली आहे त्याबद्दल समाधान वाटले.

हरी गांवस ह्यांच्यापाशी तीनशे माणसे असून देसाई हिरोजी राणे ह्यांच्या माणसांची मदत घेऊन ते बंडखोर खेम सावंत ह्यांच्यावर हल्ला करू पहातात. हे बळ मर्यादीत स्वरूपाचे आहे ह्यात शंका नाही. त्यांना दीड हजार माणसांची मदत देण्याचे वचन दिले होते, व ह्या लोकांसह त्यांनी मोहीम सुरू करावी असे ठरले होते. त्या वचनाप्रमाणे हरी गांवस ह्यांना आम्ही खेम सांवताविरुद्ध मदत करण्यास तयार आहोत".

गोवा, १७ नवंबर १७०३ कायतानु द मेलु द कास्त्रु
(LIVRO DOS REIS VIZINHOS).

हिरोजी राणे हा खेम सावंत ह्यांचा आणखी एक शत्रू. पोर्तुगीजांनी त्यालाही हाताशी धरले होते. त्याला पाठविलेल्या एका पत्रात व्हाइसरॉय म्हणतो :—

"देसाई हिरोजी राणे ह्यांस—

देसाई हिरोजी राणे ह्यांची मला जी पत्रे आली ती वाचल्यावर कळून चुकले की, ह्या राज्याची सेवा करण्याची त्यांची इच्छा आहे. त्यांच्यापाशी दारूगोळा नाही असे कळले. त्यांना दारूचे एक पीप आणि गोळ्यांची एक पेटी देण्याचा हुकूम मी केला आहे. त्यांच्यापाशी असलेले मनुष्यबळ अगदीच मर्यादीत आहे. त्यांनी आणखी माणसे गोळा करावी. आणि ज्या वेळी मी त्यांना इशारा देईन तेव्हा त्यांनी चकमकींना सुरुवात करावी. त्या वेळी त्यांना आणखी दारूगोळा पाठविला जाईल."

गोवा, १८ नवंबर १७०३ कायतानु द मेलु द कास्त्रु
(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 70).

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगीजांच्या हातात असलेल्या उत्तरेकडील प्रदेशातील आणि गोव्यातील त्यांच्या फौजांना मराठ्यांशी चकमकी टाळण्याचा हुकूम दिला होता. हे व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास पाठविलेल्या पुढील पत्रावरून कळून येते :—

"महाराज—

पेद्रु व्हाज सोआरिश बालेसार हे उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती होत तेव्हा त्यांनी मराठ्यांशी तह करून युद्ध बंदी केल्याची वार्ता कानी पडल्याने मी त्या बातमीची चौकशी करण्याचा हुकूम सोडला होता. परंतु ही बातमी

निराधार असल्याचे चौकशीअंती कळले. फक्त सदरहू सेनापतीने एकदोन ठिकाणी चकमकी बंद ठेवल्या होत्या इतकेच. ही युद्धबंदी उत्तरेकडील प्रदेशाप्रमाणे गोव्यातही अमलात आली आहे. उत्तरेकडील युद्ध हे तर अलीकडे मारक आणि हानीकारक होऊन बसले आहे. मी आमच्या उत्तरेकडील आणि इकडील सैन्याला सूचना केली आहे की, मोगलांना संशय येणार नाही अशा रीतीने त्यांनी मराठ्यांशी दोस्ती आणि सहकार्य करावे".

गोवा, ११ डिसेंबर १७०३.

(LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 76, FLS 10).

वरील पत्राला पोर्तुगालच्या राजाने पुढील उत्तर पाठविले.

"हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयना राजे आपली सदिच्छा पाठवित आहेत. त्यांनी आपल्या पत्रात जो अहवाल सादर केला आहे, तो नजरेखालून घातला. मोगल आणि मराठे ह्या दोघांशीही त्यांनी जी मैत्री ठेवण्याचे धोरण अवलंबिले आहे, ते बरोबर आहे असे मला वाटते. परंतु त्याची वाच्यता होऊ न देण्याची त्यांनी खबरदारी घ्यावी. मराठ्यांशी आमच्या सैन्याने लढण्याचे सोडून दिले आहे हे जर मोगल बादशहाला कळले, तर त्याची आमच्यावर अवकृपा होईल. कारण आशिया खंडातील तो सर्वात मोठा बलाढ्य राजा आहे. मराठ्यांशी असलेली मैत्री जितके दिवस गुप्त ठेवता येईल तितके दिवस ठेवावी".

लिस्बोअ, (लिस्बन) १० जानेवारी १७०४

राजा

(LIVRO DAS MUNCOES, No. 68, FLS 133).

शिवाजी राजे ह्यांनी आपल्या काही मुलुखाचा राज्यकारभार श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविल्याचे पोर्तुगीजांना कळले, तेव्हा त्यांनी शिवाजी-राजे ह्यांना पुढील पत्र पाठविले.

"शिवाजी राजे ह्यांस---

आपले पत्र मिळाले. आपल्या राज्यातील काही प्रदेशाचा कारभार आपण श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविल्याचे कळले. श्रीनिवास माधवराव ह्यांनी आमच्या राज्याला लागून असलेल्या काही जिल्ह्यांवर सोनु शेणवी ह्यांची कारभारी म्हणून नेमणूक केली असल्याचे त्यांच्याकडून आम्हाला कळविण्यात आले आहे. तसेच बंडखोर खेम सावंत ह्याचा नाश करण्या-

करताही त्यांनी आमच्याकडे मदत मागितली आहे. खेम सावंत भोसले ह्याचा नाश व्हावा अशी आमचीही इच्छा आहे. त्याने समुद्रावर आमची काही जहाजे लुटली व जमिनीवरही आमच्या प्रदेशात शिरून आमच्या प्रजेची लूटमार केली. म्हणून जो कोणी त्याच्याशी युद्ध करून त्याला नष्ट करील त्याला आम्ही मदत करू".

गोवा, १८ मार्च १७०४ कायतानु द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS).

फोंड्याचे सुभेदार सोनाजी शामराज ह्यांना गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील पत्र पाठविले.

फोंड्याचे सुभेदार सोनाजी शामराज ह्यांस--

शिवाजी राजे ह्यांचे पत्र मला पोहोचते करण्यात आले. त्या पत्रा-वरून मला कळून चुकले की, त्यांनी आपल्या राज्यापैकी काही मुलुखाचा कारभार श्रीनिवास माधवराव ह्यांच्याकडे सोपविला आहे. श्रीनिवास माधवराव ह्यांनी बंडखोर खेम सावंत ह्यांचे पारिपत्य करावे, व ती काम-गिरी सोनाजी शामराज ह्यांच्याकडे सोपवावी. मीही त्या मोहीमेला पाठिंबा देईन. कारण, बंडखोर खेम सावंत ह्याने ह्या राज्यात शिरून माझ्या स्वामीच्या काही प्रजाजनांना लुटले आहे. सोनाजी शामराज ह्यांनी श्रीनिवास माधवराव ह्यांना कळवावे की, त्यांनी जर खेम सावंत भोसले ह्यांच्याविरुद्ध मोहीम सुरू केली तर त्या मोहिमेला आम्ही हातभार लावू".

देव आपले भले करो.

गोवा, १८ मार्च १७०४

कायतानु द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 82).

कान्होजी आंग्रे ह्यांच्या आरमारातील काही तांडेलांना पोर्तुगीजांनी कैद केले होते. त्यांची मुक्तता केल्याबद्दल मेलुंदीचे सुभेदार भगवानजी मोहिते ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयचे आभार मानून जे पत्र लिहिले त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :---

"मेलुंदीचे सुभेदार भगवानजी मोहिते ह्यांस--

आपले पत्र मिळाले. माझ्या हुकूमान्वये ज्या तांडेलांना येथे कैद करून ठेवण्यात आले होते, त्या तांडेलांची सुटका झाल्याबद्दल आपण पत्रात माझे

आभार मानले आहेत. त्या तांडेलांची सुटका व्हावी म्हणून आपण कान्होजी आंग्रे ह्यांच्यावतीने आमच्याकडे रदबदली केली होती. कान्होजी आंग्रे ह्यांच्याशी असलेले आमचे स्नेहाचे संबंध लक्षात घेऊन मी त्या तांडेलांची मुक्तता केली.

आपणाला जर आपल्या जहाजांतून काही माल विक्रीसाठी आणायचा असेल तर विक्रीची व्यवस्था आम्ही करू. तरी करार करावा. शिवाजी राजे ह्यांच्या संबंधाने मला आपणास कळवायचे आहे की, त्यांनी मला जर तपशील कळविला तर त्यांना मी उत्तर पाठवीन".

गोवा, १२ जुलै १७०४

कायतानु द मेलु द कास्त्रु

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 92V).

छत्रपतींचे आमात्य रामचंद्रपंत ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला एक पत्र धाडले होते. त्या पत्राला व्हाइसरॉयने जे उत्तर केले, त्यात त्याने अशी तक्रार केली आहे की, तो जेव्हा हिंदुस्थानातील पोर्तुगीज प्रदेशाचा व्हाइसरॉय म्हणून गोव्यास आला तेव्हा छत्रपतींनी त्यांचे स्वागत करून शिष्ठाचार म्हणून औपचारिक पत्र लिहिले नाही :—

"शिवाजीचे आमात्य रामचंद्रपंत ह्यांस—

अंताजीराम ह्याने मला आपले पत्र आणून दिले. त्या पत्रावरून मला कळले की, आमच्या राज्याचे आणि महाराजांच्या वाडवडिलांचे जे स्नेहाचे संबंध होते, त्या संबंधाना अनुसरून आपण मला एक भेट अर्पण करू इच्छिता. महाराजांशीही मी स्नेहाचे संबंध ठेवू इच्छितो. परंतु मला एक गोष्ट खटकली ती ही की, ह्या राज्याचा व्हाइसरॉय म्हणून मी इकडे आलो, तेव्हा आमच्या शेजारच्या सर्व राजांनी मुद्दाम पत्रे पाठवून माझे स्वागत केले. ह्या पत्रात महाराजांचे पत्र नव्हते. हा शिष्टाचार महाराजांनी न पाळलेला पाहून मला फार दुःख झाले. ही गोष्ट जर घडली नसती तर महाराजांकडे मी माझा दूत पाठवून दिला असता. माझ्या ह्या निष्काळजीपणाची आपण मला आठवण करून दिलीत. माझ्यामते दोन्हीही बाजूने हा जो निष्काळजीपणा घडला त्याचे कारण हे की, मोगल बादशहाला आमच्यामधील सलोख्याचा सुगावा लागू नये. हा सलोखा असाच चालू रहावा व त्याची वृद्धि व्हावी अशी माझी इच्छा आहे.

अंताजीराम त्यांनी मला जो तपशील विदीत केला त्याचे उत्तर मी त्याना प्रत्यक्षच दिले आहे की, जे त्यांनी आपणाला कळविले आहे. आणि आमच्या राज्य चिटणीसाना आपले जे पत्र मिळाले, त्याचे उत्तर पाठविण्याचा मी त्यांना हुकूम केला आहे. बंडखोराला शिक्षा करण्याच्या बाबतीत मी मदत करण्यास तयार आहे."

गोवा, ३० डिसेंबर १७०४: कायतानु द मेलु द काश्तु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS).

गोव्याच्या व्हाइसरॉयने आपला वकील छत्रपतींकडे पाठविला नाही म्हणून कान्होजी आंग्रे ह्याचे सुभेदार भगवानजी मोहिते ह्यांनीही पोर्तुगीजांकडे तक्रार केली होती. त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

"मेलुंदीचे सुभेदार भागवानजी मोहिते ह्यांस--

रामचंद्रपंतांचे आणि आपले पत्र मिळाले त्या पत्रावरून मला कळून चुकले की, माझ्या वकिलाने छत्रपतींची भेट घेतली नाही हे आपल्या लक्षांत राहिले. पण ह्या बाबतीत माझीही एक तक्रार आहे. मी इकडे व्हाइसरॉय म्हणून आलो, तेव्हा महाराजांनी मला पत्र पाठवून माझे स्वागत करणे आवश्यक होते. म्हणून मी माझा वकील त्याच्याकडे पाठविला नाही. पण मी तसे केले नाहीं हे चांगले झाले. कारण मी जर तसे केले असते तर मोंगल बादशहाला आमच्यामधील सलोख्याचे संबंध कळून चुकले असते.

अंताजीराम हे माझ्याशी ज्या इतर तपशीलाबाबत बोलले त्याची उत्तरे मी त्यांना दिली. त्याना मी आणखीही कांहीं गोष्टी विदीत केल्या आहेत. ते त्या आपणाला कळवितीलच. मला आशा आहे की, आपण त्या गोष्टीवर तोडगा काढाल. म्हणजे मी नुसता फिर्यादी म्हणून राहाणार नाही. आमच्यामधील मैत्रीचे संबंध असेच टिकून त्यांची वृद्धि व्हावी अशी इच्छा करतो."

गोवा, ३० डिसेंबर १७०४. कायतानु द मेलु द काश्तु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 90V).

गोव्याच्या व्हाइसरॉयने छत्रपती शिवाजी महाराज ह्यांना पत्र घालन पोर्तुगीज नौकांवर खांदेरी उदेरी बटावरून जे हल्ले होत होते यांना आळा

घालण्याची व पोर्तुगीजांची जी लुटालूट झाली ती परत करण्याची खालील पत्रात विनंती केली आहे:

" शिवाजी राजे ह्यांस---

गोविंद परबु ह्यांनी मला आपले पत्र आणून दिले त्या पत्रावरून आणि दुलवा नाईक व हरी गांवस ह्यांनी मला जे काय सांगितले त्यावरून आम्हा दोघामध्ये मैत्रीचे संबंध चालू रहावेत अशी त्या दोघांची इच्छा आहे. आपण आपले वडील आणि आजोबा हृया दोघांप्रमाणे आमच्याशी मैत्रीचे संबंध ठेवू इच्छिता. ही मैत्री प्रस्थापित होण्याच्या मार्गात माझी कोणतीच आडकाठी नाही. परंतु ह्या मार्गात अडथळे आणतात ते खांदेरी बेटावरील आणि मेलुंदी किल्ल्यातील अधिकारी. विशेषेकरून मेलुंदीच्या किल्ल्यातील लोकांकडून आम्हाला पुष्कळच उपद्रव होतो. त्याचे वर्तन जवळजवळ त्यांच्या-सारखेच आहे. हृया राज्याच्या प्रजाजनांची त्याच्याकडून फारच हानी झाली आहे. त्यांनी त्यांची लूटमार तर केलीच, पण त्यांना ठार करून काहीना, तुरुंगातही टाकले. त्यांच्या उपद्रवामुळे त्या किनाऱ्यावरील वाहतुक अशक्य होऊन बसली आहे. तरी माझी आपणाला विनंती आहे की, त्यांचा ह्या दुष्कृत्यांबद्दल आपण त्यांना योग्य ती शिक्षा करावी व त्यांनी आमच्या लोकांची जी लुटालूट चालविली आहे तिला पायबंद घालावा. हृया गोष्टी जर बंद झाल्या तर आमच्या दोन्ही राज्यांमध्ये पूर्वी जे मैत्रीचे संबंध होते ते पुन: प्रस्थापित होतील व आमची बंदरे आपणास व्यापाराला खुली होतील गोविंद परबु हृयांना मी हा तपशील विदीत केला आहे. ते हृया गोष्टी आपल्या कानी घालतीलच. त्याचप्रमाणे हरी गांवस हृयानाही मी या बाबतीत लिहावयास सांगितले आहे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो."

गोवा, ३ अक्टोबर १७०५: कायतानु द मेलु द काश्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 102V).

छत्रपतीचे आमात्य रामचंद्रपंत हृयांनीही गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र लिहून पोर्तुगिज आणि व्हाइसरॉय हृयांचा सलोखा साधावा अशी विनंती केली होती. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :

" शिवाजी राजे हृयांचे सरदार रामचंद्रपंत हृयांस---

गोविंद परबु हृयांच्याकडे पाठविलेले आपले पत्र पावले. त्यानी मला जे काय विदीत केले त्याचे उत्तर मी त्याना दिले आहे. दोन्ही राज्यांमध्ये सलोखा

निर्माण होण्यासबंधाने मी त्यांना कांही गोष्टी सांगितल्या आहेत. माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयची आणि शिवाजी राजे ह्यांची जी मैत्री होती, ती पुनः प्रस्थापित व्हावी आणि टिकावी अशी माझी इच्छा आहे. गोविंद परबु हे आपणाला ह्या गोष्टी विदीत करतील. दुलबा नाईक हे देखील आपणाला ह्यासंबंधी लिहिणार आहेत. "

गोवा, ३ अक्टोबर १७०५. कायनातु द मेलु द काश्यु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 105).

सरदार हिंदुराव घोरपडे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला एक पत्र पाठवून खेम सावंत भोसले ह्यांच्यासाठी त्यांच्याशी रदबदली केली होती. त्या पत्रात व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले. त्यात व्हाइसरॉयने सिंधुदुर्ग आणि खांदेरी उंदेरी येथील नाविक तळांवरून पोर्तुगीज जहाजांना जो उपद्रव होत होता, त्यासंबंधी तक्रार केली आहे :

"हिंदुराव घोरपडे ह्यांस--

बाळाजी राम व आपाजी नीळकंठ ह्या दोघांनी मला आपले पत्र आणून दिले. आपल्या आठवणीचे कौतुक वाटले. माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयचा आणि कृष्टाजीपंत ह्यांचा पत्रव्यवहार होता असे आपण पत्रांत म्हटले आहे. त्यावेळी आपण त्यांना ह्या राज्याच्या सीमेवरील प्रदेशाच्या कारभारांत मदत करीत होता.

मी आपणाला आश्वासन देतो की, सिधुंदुर्ग आणि खांदेरी उंदेरी बेटां-वरील नाविक तळांवरून आमच्या जहाजावर जे आपल्या युद्धनौकांकडून हल्ले होतात, त्यासंबंधाने मी जरी फिर्यादी असलो, तरी आपणाशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचा मी प्रयत्न करीन. मला आपल्या निदर्शनास आणावयचे आहे की, आपल्या युद्ध नौकांकडून उत्तर किनाऱ्यावर आणि उत्तर समुद्रांत आमच्या नौकायनाला फारच उपद्रव होत आहे. हे गुन्हे जे लोक करतात त्यांना मी अद्याप शिक्षा केलेली नाही. कारण, ह्या गोष्टी मी संभाजी (?) राजे ह्यांच्या कानावर घातल्या असून त्यांच्याकडून ह्या तक्रारीची चौकशी होऊन गुन्हेगारांना शिक्षा होते की काय त्याची मी वाट पाहात आहे. आमच्या प्रजाजनांची लुटालूट थांबावी आणि लुटलेली मालमत्ता परत करण्यांत यावी अशी मागणी मी त्यांच्यापाशी केली आहे. आमच्या मागण्या जर मान्य झाल्या तर हे राज्य, आणि संभाजी राजे ह्या दोघांमध्ये सलोख्याचे संबंध प्रस्थापित होण्यास अडचण उरणार नाही. आपण मला जे काय देऊ केले आहे, त्या संबंधाने मला आपणास कळवायचे आहे, की, खेम सावंत ह्यांनी आमची जी कुरापत काढली

त्याबद्दल मी त्याला चांगलीच अद्दल घडविली आहे त्याला क्षमा करावी असे आपण म्हणता. परंतु त्याला क्षमा करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. आणि ज्याअर्थी तो कुणी बलाढ्य शत्रु नाही. त्या अर्थी त्याला नामशेष करण्यास मला दुसऱ्यांची मदत घ्यावी लागणार नाही. आणि म्हणून मी आपली देणगी स्वीकारू शकत नाही. तथापि असे जरी असले, तरी ती देणगी देऊ केल्याबद्दल मी आपला आभारी आहे. देणगी मागील आपली सदिच्छाही मी विसरणार नाही. तसेच बाळाजी राम आणि आप्पाजी नीळकंठ ह्यांनी माझ्यासाठी जे काय केले आहे तेही मी विसरणार नाही."

गोवा, २ नोव्हेंबर १७०५ कायतानु द मेलु द काश्रु.

(LIVRO DOS REIS VIZINHOS No. 5, FLS 106).

मराठ्यांच्या आरमाराचे सुभेदार दाऊदखान ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र धातले होते. त्याला व्हाइसरॉयच्या चिटणीसाने पुढील उत्तर पाठविले :—

"मराठ्यांच्या आरमाराचे सुभेदार दाऊदखान ह्यांस—

आपणाकडून नामदार व्हाइसरॉय ह्यांना जे पत्र आले, त्याला राज्याच्या चिटणीस ह्या नात्याने उत्तर पाठविण्याची त्यांनी मला आज्ञा केली. मी ते पत्र वाचले, मजकूर कळला.

नामदार व्हाइसरॉय ह्यांची तब्येत जरा बरी नाही. त्यांतच आरमाराची सज्जता करण्याच्याही गडबडीत ते आहेत. त्यामुळे त्यांना पत्रें लिहिण्यास सवड नाही. म्हणून त्यांनी मला आपणास उत्तर पाठविण्याची आज्ञा केली.

खेम सावंत भोसले ह्यांच्या युद्ध नौकांना शासन करण्याचा जो निर्णय आपण घेतला तो अत्यंत स्वागतार्ह आहे. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी त्याबद्दल मला आपले अभिनंदन करावयास सांगितले आहे. आमचे आरमार लवकरच दक्षिणेकडे निघत असून त्याला आपणास मदत करण्याचा हुकूम देण्यांत येईल.

खेम सावंत भोसले ह्यांची जहाजे ज्या बंदरांत आहेत त्या जहाजांपैकी एका जहाजांत घोडे आहेत. ते घोडे आपणाला ह्या शहरांत आणतां येतील. आपण दारूगोळ्याची मागणी केली होती. पण तेवढा दारूगोळा आम्ही पाठवूं शकत नव्हतो. कारण आमच्याकडेच दारूगोळ्याची टंचाई आहे. डिचोली-च्या मोहिमेंत दारूगोळा फार लागला. तिकडे बंडखोर खेम सावंत ह्यांचे दोन

किल्ले होते, ते आम्ही पार जमीनदोस्त करून टाकले. आम्ही ह्या किल्ल्यांवर असा कांही भडिमार केला, की, त्या किल्ल्यांतील बालेकिल्ल्यांच्या भिंती पार उडून गेल्या. दारू बनविण्याचे काम सांप्रत चालू आहे. ज्या वेळी आपणाला गोळ्यांची आवश्यकता भासेल, तेव्हा आम्ही ते आपणाला पुरवूं."

गोवा, १८ डिसेंबर १७०५

फरान्सिस्कु द आझावेद सांदि

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 5, FLS 108V)

सरदार हिंदुराव घोरपडे ह्यांना गोव्यांच्या व्हाइसरॉयच्या चिटणीसाने पुढील पत्र पाठविले.

"हिंदुराव ह्यांस--

हे पत्र आपणास नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या आज्ञेवरून पाठविण्यांत येत आहे. ह्या राज्याशी आपले जे सलोख्याचे संबंध आहेत त्यांचे नामदार व्हाइसरॉय ह्यांना केवढें कौतुक वाटतें ते आपणास कळविण्यासाठी म्हणून आपणाला हे पत्र पाठविण्यांत येत आहे.

आपल्या आणि ह्या राज्याच्या मैत्रीत बिघाड यावा म्हणून खेम सावंत भोसले ह्यांनी आपणाकडे पोर्तुगिजांविरूद्ध मदत मागितली. पण ती मदत आपण त्यांना दिली नाही. ही गोष्ट आपल्या धोरणाला अनुसरून आहे. कारण, आपणाला जुनी मैत्री टिकवून ठेवायची आहे. नामदार व्हॉइसरॉय ह्यांनी ह्या गोष्टीची दखल घेतली असून, प्रसंगी त्याची फेड ते केल्यावाचून राहाणार नाहीत. परंतु नुकतीच त्यांच्या कानी बातमी आली आहे की, जांबावली येथें काही सैन्य आले असून ते राणीच्या (?) संमतीने खेम सावंत भोसले ह्यांच्या मदतीला आले आहे. हा निर्णय राणीनें आपल्या सल्ल्याविना कसा घेतला त्याचे आम्हाला आश्चर्य वाटते.

खेम सावंत भोसले हे राणीचे शत्रू होते, इतकेच नव्हे तर राणीने नामदार व्हाइसरॉय ह्यांना कळविले होते, की खेम सावंत भोसले ह्यांचा निःपात होईपर्यंत त्यांच्याशी युद्ध करण्याचा आपला विचार आहे. आणि आता तीच राणी खेम सावंत ह्यांना मदत पाठवित आहे. हे कसे काय ते आम्हाला कळत नाही.

खेम सावंत भोसले ह्यांनी राणीला एकादे वचन दिले आहे का? तसे जर असेल तर त्यांच्या वचनावर त्यांनी मुळीच विसंबून राहू नये. कारण,

हा मनुष्य वचन पाळणारा नाही. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी आपणाकडे मागणी केली आहे, की, आपण ह्या गोष्टीचा पूर्ण विचार करावा. आपणाला ती गोष्ट मान्य होणार नाही अशी त्यांना आशा वाटते."

गोवा, १० जानेवारी १७०६ फरान्सिस्कु द आझावेद द सांदि.

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 5, FLS 111V)

सरदार रामचंद्र पंडीत ह्यांनी गोव्यांतुन काही माल आणण्याकरता तिकडे शंभर माणसे पाठविण्यासाठी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे परवानगी मागितली होती. व्हॉइसरॉयने त्यांना पुढील उत्तर पाठविले.

"शिवाजीचे सरदार रामचंद्र पंडीत ह्यांस--

आपले पत्र मिळाले व ते वाचून कळून चुकले की, आपल्या जहागिरीत सांप्रत मालाचा तुटवडा असून तो माल नेण्यासाठी बार्देशमध्ये शंभर माणसे पाठविण्याचा आपला विचार आहे. हा माल नेण्याकरता आपण माझ्याकडे परवानगी मागितली आहे. ही परवानगी देण्यास कोणतीच हरकत नाही. मात्र माल नेण्यासाठी जी माणसे इकडे येणार आहेत ती खेम सावंत भोसले ह्यांच्या राज्यातून येता कामा नयेत. आपणाला माहीत आहेच की, खेम सावंत भोसले ह्यांचे आणि आमचे उघड युद्ध चालू आहे. म्हणून त्यांच्या राज्यांतील कुठल्याच मनुष्याला आमच्या राज्यांत प्रवेश मिळू नये असा आम्ही हुकूम काढला आहे. आपल्या पत्राप्रमाणे आपल्या माणसांना इकडे येण्यास परवानगी मिळेल, परंतु वरील अट आपणाला पाळावी लागेल. तसेंच माझी आपणाला विनंती आहे, की, आपण खेम सावंत भोसले ह्यांच्याशी युद्ध पुकारावे. आमच्या दोनही राज्यामध्ये असलेल्या ह्या शत्रूला जर आम्ही नेस्तनाबूद केला तर उभय राज्यांमध्ये असलेले दळवळण प्रस्थापित होऊन व्यापारही चांगला चालेल.

शिवाजी राजे ह्यांनी मला मागे खेम सावंत भोसले ह्यांना नष्ट करण्याचा आपला विचार चालला असल्याचे पत्र लिहिले होते, व मलाही त्यांच्यावर हल्ला करण्यास प्रवृत केले होते. असे जर घडले तर ह्या दरोडेखोरापासून आमची मुक्तता होण्यास वेळ लागणार नाही."

गोवा, २० मार्च १७०६. कायतानु द मेलु द काश्त्रु

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 5, FLS 115V)

सरदार रामचंद्र पंडीत ह्यांचे गोव्याच्या व्हाइसरॉयला एक पत्र आले होते. परंतु पत्राचा हा मायना बरोबर नव्हता म्हणून व्हाइसरायच्या चिटणीसाने रामचंद्र पंडीत ह्यांना पुढील पत्र लिहिले.

" शिवाजीचे सरदार रामचंद्र पंडीत ह्यांना व्हॉइसरॉयच्या सेक्रटरीचे पत्र.

आपला नोकर बाबाजी नारायण हा ह्या शहरी नामदार व्हॉइसरॉयाना आपले एक पत्र घेऊन आला. राज्याचा चिटणीस ह्या नात्याने तें पत्र माझ्याकडे देण्यांत आले असतां ते पत्र मला व्हाइसरॉय ह्यांच्या अवलोकनार्थ देणे प्रशस्त वाटले नाही. कारण, त्या पत्राचा मायना आणि भाषा एखाद्या राजाला उद्देशून लिहिल्यासारखी वाटत नव्हती. ज्या प्रमाणे आशिया खंडातील राजांना लिहिण्यांत येणारी पत्रें सन्मानपूर्वक लिहिली जातात त्याचप्रमाणे नामदार व्हाइसरॉय ह्यांना लिहिण्यांत येणारी पत्रे देखील तशीच सन्मान्पूर्वक लिहिली पाहिजेत. म्हणून आपल्या नावाने कुणी हे बनावट पत्र तर लिहिले नाही ना, असा मला संशय आला. कदाचित खेम सावंत ह्यानीही ते आपल्या नावाने लिहिले असण्याची शक्यता होती. कारण त्यांच्या राज्यांत वस्तूंचा तुटवडा असल्याने आम्हाला फसवून ते माल नेण्यास कमी करणारे नाहीत. म्हणून आपणाला माझी विनंती आहे की, यापुढे आपण नामदार व्हाइसरॉय ह्यांना जी पत्रें लिहाल त्यांचा मायना आणि भाषा बरोबर असावी. कारण नामदार व्हाइसरॉय ही बडी आसामी असल्याकारणाने त्यांना पाठवायची पत्रें त्यांच्या योग्यतेप्रमाणेच लिहिली पाहिजेत. आपले पत्र घेऊन येणाऱ्या इसमाला आल्या वाटेने परत जाण्याची परवानगी देण्यांत येत आहे."

गोवा, ४ सप्टेंबर १७०६.

फ्रान्सिस्कु द आझावेद द सांदि

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 5, FLS 118)

कान्होजी आंग्रे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्रें घालून पोर्तुगिजांशी सलोखा ठेवण्याची इच्छा दर्शविली होती. त्या पत्रास गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले -ग्र:—

" शिवाजीच्या आरमारचे सुभेदार कान्होजी आंग्रे ह्यास—

आपली पत्रें मिळाली व ती वाचून आमच्याशी सलोख्याचे व शांततेचे संबंध ठेवण्याची आपली इच्छा आहे हे कळले. पोर्तुगिजांचे मित्र म्हणून आपण वागाल अशी आशा बाळगतो. कारण जे शत्रु आमच्या प्रजाजनांची लूटमार

करतात त्यांना योग्य ते शासन करण्याचा माझा परिपाठ आहे. आपल्या पत्रांत महत्त्वाच्या आशयाचे उत्तर दामाजी परबु आणि ................................... ह्या दोघांकडे पाठवीत आहे. आपल्या पत्रांत आपण जे आश्वासन दिले आहे ते पूर्ण करावे. माझ्या वतीने मीही आपले काम करण्यास कुचराई करणार नाही. आपणाला माझ्या मदतीची आवश्यकता आहेच."

गोवा, १८ डिसेंबर १७०६. कायतानु द मेलु द कास्त्रु.

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 7, FLS 3)

खेम सावंत भोसले व पोर्तुगीज ह्या दोघांचे युद्ध होऊन त्यांत सावंताना पोर्तुगिजांना शरण जावे लागले. परंतु गोव्याच्या नवीन व्हॉइसरॉयच्या आगमनाची संधी साधून त्यानी त्यांचे स्वागत केले व पोर्तुगिजांची मैत्री साधण्याचा प्रयत्न केला. गोव्याच्या व्हॉइसरॉयने खेम सावंत ह्यांना पुढील उत्तर पाठविले :—

"कुडाळचे सरदेसाई खेम सावंत भोसले ह्यांचे पत्र मिळाले. माझ्या आगमनप्रसंगी मला त्यांनी जे स्वागतपर पत्र पाठविले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. ज्या राज्याशी त्यांचे मैत्रीचे संबध होते, व ज्या राज्याचे त्यांना नेहमीच संरक्षण मिळत आले, त्या राज्याशी त्यांनी शत्रुत्व केले ही खरोखरच त्यांच्या हातून मोठी वाईट गोष्ट घडली. परंतु आता ज्याअर्थी त्यांना आपल्या कृत्याचा पश्चाताप होत आहे, व माझ्या अनुग्रहाची त्यांनी ज्याअर्थी इच्छा केली आहे व ह्या राज्याशी आपली जुनी मैत्री प्रस्थापित करण्याचा हेतू स्पष्ट केला आहे, त्याअर्थी मला त्यांना आश्वसन द्यावयचे आहे की, त्यांचे म्हणणे ऐकून घेण्यास मी तयार आहे. तरी त्यांनी वाटाघाटीसाठी आपला दूत इकडे पाठवावा."

गोवा, २९ जानेवारी १७०८. दों. सदिगु द कोश्त

(LIVRO DOS RE IS VIZINHOS No. 7, FLS 12)

छत्रपतीनी गोव्याच्या व्हाइसरॉयला पत्र घालून पोर्तुगिजांशी सलोखा आणि मैत्री ठेवण्याची इच्छा दर्शविली होती त्या पत्रात गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :

"शिवाजी राजे ह्यांस—

सखारामजी नारायण व देवजी ......................... ह्यांनी मला आपलें पत्र आणून दिले. त्या पत्रांत आपण माझ्याशी व ह्या राज्यांशी मैत्रीचे संबंध

ठेवण्याची इच्छा दर्शविली आहे. आपल्या इच्छेनुसार मी आपणाला कळवू इच्छीतो की, आपण तहाच्या वाटाघाटीं करण्यासाठीं आवश्यक ते आधिकार देऊन आपला वकील आमच्याकडे पाठवावा.

भिकाजी मालार हे ह्या शहरी पोहोचले नाहीत. तसेच पत्रांतील आशया-पलीकडे सखारामजी नारायण व देवजी ह्या दोघानी मला अधिक काही सांगितलेले नाही.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, १२ मार्च १७०८

दों. रुद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 7, FLS 14V)

छत्रपतीनी पोर्तुगिजांकडे मैत्रीच्या वाटाघाटी करण्यासाठी आपले दोन दूत गोव्याला रवाना केले होते. त्या दूताकडे त्यांनी गोव्याच्या व्हॉइसरॉयला आपले पत्र दिले होते. परंतु त्या पत्रात्रें जे उत्तर व्हॉइसरॉयने त्यांना पाठविले, ते त्यांना मिळाले नसावे असे गोव्याच्या व्हॉइसरॉयच्या छत्रपतीना पाठविलेल्या दुसऱ्या एका पत्रावरून वाटते.

" शिवाजी राजे ह्यांस—

सखारामजी नारायण व देवजी सोळेकी (?) ह्यांच्याकडे आपण मला जे पत्र पाठविले, त्या पत्रांत आपण माझ्याशी स्नेहाचे संबंध ठेवण्याची इच्छा दर्शविली होती. त्याचप्रमाणे ह्या राज्यांतील सर्व प्रजाजनांशीही आपणाला सलोख्याचे संबंध ठेवायचे होते. त्या पत्राचे उत्तर मी आपल्या दूतांकडे दिले होते. परंतु ते आपणाला मिळाले नसावे असे वाटते. कारण, आपल्या ह्या पत्रांत माझ्या पत्रांतील मजकुराचा निर्देश नाही. मी त्या पत्रांत आपणाला कळविले होते की, आमच्याशी आपणाला जर मैत्री ठेवायची असेल तर कराराच्या वाटाघाटी करण्यासाठी आवश्यक ते अधिकार देऊन आपला वकील आमच्या-कडे पाठवावा."

गोवा, १४ मे १७०८

दों. रुद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 7, FLS 17V)



व्ही ५५५८–८अ

गोव्याच्या व्हॉइसरॉयने भगवानजी मोहिते ह्यांना जे पत्र पाठविले त्यांत त्याने छत्रपतीनी पोर्तुगिजांकडे तहाची जी इच्छा दर्शविली होती त्याचा उल्लेख केला आहे :

"स........................चे किल्लेदार भगवानजी मोहिते, ह्यांस---

अहमद सारंग हयांच्याकडे पाठविलेले पत्र मिळाले. माझी ख्याली खुशाली जाणून घेण्याची आपण जी इच्छा दर्शविली त्याबद्दल मी आपला आभारी आहे. माझ्याविषयी दाखविलेल्या प्रेमाबद्दलही आभारी आहे.

शिवाजी राजे हयांना मी तह्नच्या वाटाघाटी करण्यासाठी चतुर आणि विश्वासू मनुष्य आवश्यक ते अधिकार देऊन पाठविण्याबद्दल कळविले आहे."

गोवा, १४ मे १७०८

दों. रुद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 7, FLS 18)

रामचंद्र पंत आमात्य हयांना गोव्याच्या व्हॉइसरॉयने पुढील पत्र पाठविले:

"शिवाजी राजे हयांच्या मायेचे सरदार रामचंद्रपंत आमात्य हयांस—

आपले पत्र मिळाले व ते वाचून आनंद झाला. राज्यकारभारांत व्यग्र असल्यामुळे..............व काही तक्रारीवरून आपणाला लिहिता आले नाही. परंतु हया कारणावरून शिवाजी राजे हयांच्याशी हया राज्याची जी मैत्री आहे ती तुटावी असे मला वाटत नाही............................................"

गोवा, १० जुलै १७०८. दों. रुद्रिगु द कोश्त

(LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 7, FLS 19)

---

पोर्तुगिज आणि खेम सावंत ह्यांचा एक शांततेचा आणि दोस्तीचा करार व्हायचा होता. त्या करारामुळे आपल्या हितसंबंधाना बाध येईल ह्या भीतीने सोंदेच्या राजाने पोर्तुगालच्या राजास कळविले, की, हा करार आपल्या संमतीशिवाय होऊ नये. सोंदेच्या राजाचे पत्र मिळाल्यावर पोर्तुगालच्या राजाने गोव्याच्या व्हाइसरॉयला पुढील पत्र लिहिले :—

हिंदुस्थानचे व्हाइसरॉय दों रूद्रिगु द कोश्त ह्यांस राजा आपली सदिच्छा पाठवित आहे.

सोंदेच्या राजाकडून एक पत्र आले आहे. त्या पत्रांत त्यांनी कळविले आहे, की, आपल्या राज्याच्या हितसंबंधांची काळजी घेतल्याशिवाय आम्ही खेम सावंत भोसले ह्यांच्याशी शांततेचा आणि मैत्रीचा करार करू नये. ह्या करारासंबंधी आपला सल्ला घेण्याचीही मागणी त्यांनी केली आहे. सोंदेच्या राजाने ज्याअर्थी आमच्याशीं मैत्री ठेवण्याची व प्रसंगी आम्हाला मदत करण्याची इच्छा दर्शविली आहे, त्याअर्थी माझी आपणाला सूचना आहे, की, आपण त्यांच्याशी मैत्रीचे संबंध ठेवावे, व प्रसंगी त्याना मदत करावी."

लिश्बोअ (लिस्बन), २१ मार्च १७०९

राजा.

(2) LIVRO DAS MONCOES, No. 74

पोर्तुगिजांचे लोक (?) राजा आणि कान्होजी आग्रे ह्या दोघांशी युद्ध चालू होते. पैकी कोळी राजाने त्यांच्याशीं तहाची मागणी करून त्यांना सवलती दिल्या. उदाहरणार्थ पोर्तुगिज लोक ह्या राजाला जी खंडणी देत होते ती त्याने त्यांना माफ केली. ह्या विजयाबद्दल पोर्तुगालच्या राजाने गोव्याच्या व्हॉइसरॉयला पत्र लिहून त्याची आणि इतर अधिकाऱ्यांची पाठ थोपटली आहे.

कान्होजी आंग्रे ह्यांच्याशीं पोर्तुगिजांचे युद्ध चालूच राहिले. पोर्तुगालच्या राजाने व्हाइसरॉयला सल्ला दिला, की, आंग्र्यांना चोपल्याविना त्यांच्याशीं शांततेचा करार करू नये. ह्याच पत्रांत पोर्तुगालच्या राजाने हिंदुस्थानांत लढणाऱ्या दोन सेनाधिकाऱ्यांच्या पराक्रमाचा गौरव केला आहे. प्रस्तुत पत्र पोर्तुगालची राजधानी लिश्बोआ (लिस्बन) येथून दिनांक २४ ऑक्टोबर १७०९ रोजी लिहिण्यांत आले.

(7) LIVRO DAS MONCOES, No. 75, FLS 31

गोव्याच्या व्हाइसरॉयने आंग्रे व पोर्तुगिज ह्यांच्यामधील युद्धाचा आढावा पोर्तुगालला आपल्या राजास पाठविलेल्या पुढील पत्रांत घेतला आहे.

"महाराज—

शत्रू आणि बंडखोर कान्होजी आंग्रे ह्यांचे ह्या राज्याशी जे युद्ध चालू आहे त्यांत त्याची पुष्कळच हानी झाली आहे. त्याचे मनुष्यबळ कमी झाल्याने त्याने चौल येथील आमच्या ठाण्याचे सेनापतीमार्फत आमच्याशी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या. त्याने एकदाच नव्हे, तर तीनदा आमच्याकडे तहाची मागणी केली. हा करार व्हावा असे मलाही वाटल्याने मी तत्संबंधी ठराव राज्यसल्लागार मंडळासमोर मांडून तो मंजूर करून घेतला. हा करार व्हावा असे मला वाटले, त्याची दोन मुख्य कारणे आहेत. पहिले कारण हे की, हे युद्ध आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या अगदी नजीक लढले जात आहे. दुसरी गोष्ट म्हणजे शत्रूची जरी आम्ही हानी केली असली, तरी तो अद्याप बलाढ्य आहे. समुद्रावर आणि जमिनीवर दोन्हीही ठिकाणी तो प्रबल आहे. नुकतेंच त्याने आंद्रीकोची (?) हे शिवाजी दुसरा ह्यांचे बेट घेतल्याने त्याच्या सामर्थ्यात मोठीच भर पडली आहे. हा शत्रू आमच्या कारंजा ह्या नांवाच्या ठाण्यापासून अगदी जवळ आहे. त्या बेटामध्यें त्याच्या हाताला पंधरा गलबतें आणि दोन युद्धाची पाले लागली. ह्या युद्ध नौकांचा त्याने आपल्या आरमारात अंतर्भाव केल्याने त्याचे सागरी सामर्थ्य वाढले आहे. शिवाय त्या बेटावरील सोन्याचांदीची आणि दारूगोळ्याची लूट त्याने केली ती वेगळीच.

आमच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी त्याने आमच्या चौल येथील बंदरांत आपल्या एका भावाला पाठविले होते. परंतु त्याला तहाच्या करारावर सही करण्याचा अधिकार नव्हता म्हणून तो आमची तहाची कलमें घेऊन आंग्र्यांची राजधानी कुलाबा येथे निघून गेला. आम्ही आंग्रे यांची कलमे मान्य करण्यास तयार नसल्याने त्याने आमच्या कांही कलमांना आक्षेप घेतला. आमच्या कलमामध्ये आंग्रें यांनी आइपार आरांज्या ह्याचे जे पाले घेतले होते तें परत करावे असे एक कलम होते. ह्या पालांत बसून आरांज्या चौलचा गव्हर्नर म्हणून आपल्या लवाजम्यासह तिकडे जात होता. तो सगळा लवाजमा पालासह आंग्र्यांचे हाती पडला. ते पाले आंग्र्यांनी परत करण्यास नकार दिल्याने तहाच्या वाटाघाटी फिसकटल्या व युद्ध चालू राहिले.

आमच्या उत्तरेकडील प्रदेशाला शत्रूकडून उपद्रव होत असल्याने आमचे उत्तरेकडचे सेनापती आंतोनियु पेरैरा द सिकैरा ह्यांना कुमक पाठविणे भाग पडले. आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या किनाऱ्याची लांबी ३० कोस असल्याने

ह्या किनाऱ्याचे रक्षण करणे हे एक मोठे जिकीरीचे काम होऊन राहिले आहे. माझ्या सुदैवी स्वामीला देवाने उदंड आयुष्य आणि सुखसमृद्धि द्यावी अशी त्याच्यापाशी प्रार्थना आहे."

गोवा, ४ डिसेंबर १७१०

(29) LIVRO DAS MONCOES, No. 75, FLS 329

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगलला आपल्या राजास कळवितो, की, शिवाजीच्या राणीचे (?) सैन्य सांप्रत गोव्याच्या सिमेनजीक तळ ठोकून राहिले असल्याने आपणाला त्या सैन्याच्या भयाने कोंगो ह्या नांवाच्या ठाण्याच्या मदतीला आरमार पाठवितां येत नाही. तो आपल्या पत्रांत पुढे म्हणतो की, खेम सावंत व राणी ह्या दोघांमध्ये तह झाला की, आपण आरमार तावडतोब कोंगोला पाटवून देऊं. प्रस्तुत पत्र गोव्याहून ३ जानेवारी १७११ रोजीं लिहिलेले आहे.

(29) LIVRO DAS MONCOES, No. 75, FLS 389

कान्होजी आंग्रे ह्यांच्याशीं पोर्तुगिजांचे जे युद्ध चालू होते, त्याचा उल्लेख गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास पाठविलेल्या पत्रांत केला आहे :

" महाराज—

नोस्सा सिंज्योरा ह्या नौकेवर दिनांक ४ डिसेंबरला पाठविलेल्या पत्रांत मी आपणाला बंडखोर आंग्रे ह्यांच्याशी चालू असलेल्या युद्धाचा समग्र वृत्तांत पाठविलाच आहे. सध्या कान्होजी आंग्रे ह्याच्याकडून अद्याप तहासंबंधी कोणतीच हालचाल झाली नसल्याने युद्ध चालूंच आहे. त्याशिवाय आपणाला सादर करण्यासारख्या कोणत्याच घडामोडी इकडे घडलेल्या नाहीत.

माझ्या सुदैवी स्वामीला देवाने त्यांच्या प्रजेसह सुखांत ठेवावे."

गोवा, ९ डिसेंबर १७११.

(44) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 77, FLS 79

पोर्तुगालच्या राजाने गोव्याच्या व्हाइसरॉयच्या ४ डिसेंबरच्या पत्रात पुढील उत्तर पाठविले :—

" हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयला मी माझी सदिच्छा पाठवित आहे. आपले दिनांक ४ डिसेंबर १७१०चे पत्र मिळाले व ते वाचून मजकूर समजला. ह्या

पत्रांत आपण कान्होजी आंग्रे ह्यांच्याशी चालू असलेल्या युद्धाचा आढावा घेतला आहे. कान्होजी आंग्रे ह्यांच्या हट्टामुळे हे युद्ध चालू आहे हे आपल्या पत्रावरून स्पष्ट होते. उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीने आपणाकडे जी मदतीची मागणी केली होती, ती मदत मी त्यांना पाठविण्याचे ठरविले आहे. ही कुमक गेली की, बंडखोर कान्होजी आंग्रे हा आमची तहाची कलमे मान्य करील अशी आशा आहे. न झाल्यास आमच्या इतर शत्रूप्रमाणे त्याला शासन केले पाहिजे. मला आपणाला सांगायचे आहे की, ह्या राज्याला जेव्हां तहाची आवश्यकता भासेल, तेव्हा तो तह राज्याला अनुकूल होईल अशाच रीतीने करावा. मी ते आपल्या चातुर्यावर आणि मतावर सोपवीत आहे."

लिश्बोआ (लिस्बन), ११ जानेवारी १७१२.

राजा.

(45) LIVRO DAS MONCOES No. 78, FLS I.

कुडाळचे देसाई बाबू सावंत व गोव्याचा व्हाइसरॉय ह्यांच्यामध्ये झालेल्या तहान्वये पोर्तुगिजांनी बाबू देसाई ह्यांच्यावर पुढील अटी लादल्या :—

"कुडाळचे बाबू देसाई ह्यांनी गोव्याच्या राज्याविरुद्ध हत्यार उपसले त्याबद्दल त्यांना पश्चाताप होऊन नामदार व्हाइसरॉय ह्यांच्याकडे त्यांनी तहाची मागणी केली. ती मागणी नामदार व्हाइसरॉय ह्यांनी मान्य केली. सदर्हु बाबू देसाई ह्यांच्या वाडवडिलांचे पोर्तुगिजांशी नेहमीचे मैत्रीचे संबंध होते व त्यांना पोर्तुगिजांचे नेहमीच संरक्षण मिळत आले होते. त्या संबंधाना अनुसरून नामदार व्हाइसरॉय ह्यांनी बाबू देसाई ह्यांच्याशी तह करण्याचा निर्णय घेतला. बाबू देसाई ह्यांनी पुढील निर्बंध पाळायचे आहेत :—

(१) ह्या राज्याने सोंदेचे राजे ह्यांची फोंड्यांवरील सत्ता मान्य केली असल्याने बाबू देसाई ह्यांनी फोंड्यासाठी सोंदेच्या राजाशी कुरापत काढूं नये.

(२) ह्या राज्याचे प्रजाजन असलेल्या देसायांच्या वाटेला त्यांनी जाऊं नये. त्यांच्यापाशी जे काय आहे ते त्यांनी त्यांच्याकडेच राहू द्यावे. कारण, ह्या राज्याचे त्यांना संरक्षण असून त्यांच्या हितसंबंधाच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर आहे. शिवाजी अथवा मोंगल ह्यांच्या-काळी ते ज्या प्रदेशाची वहिवाट करीत होते तो प्रदेश त्यांच्याकडून बाबू देसाई ह्यांनी बळकावू नये.

(३) ह्या राज्याचे जे व्यापारी त्यांच्या राज्यांत व्यापारासाठी जातील त्यांच्याशी बाबू देसाई ह्यांनी शत्रुत्व करू नये व त्यांच्यावर

जादा कर लादू नये. त्यांच्याकडून नित्याचा कर घ्यावा. त्याचप्रमाणे जी व्यापारी जहाजे त्यांच्या बंदरांत जातील त्यानाही अशीच वागणूक मिळावी व त्यांच्या वाहतुकीच्या मार्गात त्यांनी अडथळे आणू नयेत.

(४) अरब लोक हे ह्या राज्याचे शत्रू आहेत म्हणून बाबू देसाई ह्यानी त्यांना आपल्या राज्यांत व्यापार करू देऊ नये. जर यदाकदाचित काही अरबी गलबतें त्यांच्या बंदरांत आली तर ती घेण्याची पोर्तुगिजांना कायदेशीर परवानगी असावी. ह्या कृत्याने तहाला बाध येऊ नये.

(५) जर काही पोर्तुगिज प्रजाजन नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या परवानगीविना बाबू देसाई ह्यांच्या राज्यांत शिरले, तर त्यांनी त्यांना अटक करावी. व ती बातमी बार्देशच्या सेनापतीला कळवावी. नंतर नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या आज्ञेप्रमाणे त्या लोकांना त्यांनी सदर्हु सेनापतीच्या ताब्यात द्यावे.

(६) बाबू देसाई ह्यांच्या राज्यांतील लोकांनी ह्या राज्यांतील नागरिकांना चोरीमारी ह्या गोष्टींसारखा उपद्रव देऊ नये. असे जर घडले, आणि फिर्यादी लोकांनी जर आपली नुकसानी शपथपूर्वक जाहीर केली, तर ती नुकसानी त्यांना भरून द्यावी लागेल. अशा प्रसंगी खून किंवा कुणी जखमी झाले तर गुन्हेगारांना बाबू देसाई ह्यांनी आमच्या हवाली करावे. म्हणजे त्यांच्या गुन्ह्याबद्दल त्याना योग्य ते शासन केले जाईल.

(७) जे निग्रो किंवा निग्रो स्त्रिया बाबू देसाई ह्यांच्या राज्यांत पळून जातील, त्याना त्यांनी ताबडतोब अटक करून बार्देशच्या सेनापतीच्या हवाली करावे. म्हणजे ते त्यांना त्यांच्या मालकांच्या हवाली करतील.

(८) पानेली आणि खोरजुवे ही बेटे व त्या बेटांलगतचा प्रदेश ह्या राज्यांत अंतर्भुत झाला असल्याने बाबू देसाई ह्यानी त्याच्यावर आपला अधिकार सांगू नये. कारण हा टापू खेम सावंत ह्यांना पोर्तुगिजांनी शासन केले, तेव्हां त्यांना मिळाला आहे, इतकेच नव्हे, तर मोंगल बादशहानेही ह्या प्रदेशाचे दान पोर्तुगिजांना केले आहे.

(९) रेवोडा येथील इगर्ज आणि इगर्जीच्या पाद्रीचें घर दुरूस्त करण्यासाठी बाबू देसाई ह्यांनी १० हजार असुरप्या पाठवून द्याव्या.

(१०) दरवर्षी दोन अरबी घोडे त्यांनी आमच्याकडे पाठवून द्यावे. त्याचप्रमाणे सतरी प्रांतात ते जे तीन हजार रुपयांचा महसूल वसूल करीत आहेत तो महसूल त्यांनी ह्या राज्यास द्यावा.

(प्रस्तुत कराराला बाबू देसाई ह्यांनी मराठींतून संमती दिली असून त्याच्यावर त्यांचे दोन शिक्केही आहेत. मराठी मजकुराचे पोर्तुगीजमध्ये भाषांतर करण्यांत आले आहे). बाबू देसाई ह्यांनी कराराला मंजुरी देतांना म्हटले आहे:

"प्रस्तुत कराराची सर्व कलमे मला मान्य असून त्यांचे पालन करण्याचे माझ्यावर बंधन आहे. पोर्तुगिजांचे मी संरक्षण घेतले आहे. आवश्यक असेल त्यावेळी त्या राज्याची मला मदत मिळेल असा विश्वास वाटतो."

१ रबिलावल सुबरस्सन, जोसाने अस्सरमिया अलफ याने ७ एप्रिल १७१२.

(49) LIVRO O DE PAZES, FLS 266.

आंग्रे व पोर्तुगिज ह्यांच्यामध्ये तह झाला नाही. तत्संबधाने गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो :—

"महाराज—

कान्होजी आंग्रे ह्यांनी चौलच्या किल्लेदारास जो तहाचा मसुदा सादर केला होता तो तह पार पडला नाही. कारण, त्या करारातील कलमें बदलण्यास आंग्र्यांनी नकार दिला. ह्या राज्याचा दर्जा लक्षांत घेऊन व त्याला मान देऊन त्या करारातील कलमें दुरुस्त होणें आवश्यक होते. जर आंग्रयांनी आपला हेका सोडून कलमांमध्यें बदल करण्यास मान्यता दिली, आणि तो करार जर आम्हाला सोयीचा वाटला तर आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही तो पार पाडू. न झाल्यास सांप्रत जी परिस्थिती आहे तीत बद्दल होणे अशक्य आहे. आणि माझी अशी श्रद्धा आहे, की, दैवी इच्छेप्रमाणे चांगले फळ मिळते.

माझ्या श्रेष्ठ आणि बलाढ्य स्वामीचे देव रक्षण करो व त्यांना जन्मभर सुखी ठेवावे."

गोवा, ५ नवंबर १७१२. व्हाइसरॉय.

(51) LIVRO DAS MONCOES, No. 78, FLS 2.

आंग्रे प्रबल झाले असून ते केवळ हिंदुस्थानांतील नव्हे तर युरोपिअन सत्तांना देखील भारी होऊन राहिले आहेत असे गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजाला लिहिलेल्या पत्रांत म्हणतो :—

"महाराज —

आंग्र्यांनी सांप्रत उत्तर समुद्र किनाऱ्यावर लुटालुटीची मोहीम सुरू केली आहे. त्यांना ते शक्य आहे, कारण कांही बंदरांचा त्यांना आश्रय मिळतो

केवळ हिंदुस्थानांतील सत्तांशीच नव्हे तर युरोपिअन सत्तांशी देखील त्यांच्या कुरापती चालू आहेत. त्यानी एवढे मोठे सामर्थ्य संपादन केले आहे की, सगळी-कडे त्यांचा दरारा चालू आहे. त्याच्याशी तह करणे आतां केवळ अशक्यच झाले आहे असे नाही, तर त्याची गोष्ट काढणे देखील कठीण होऊन बसले आहे. आता फक्त एकच मार्ग उरला आहे, आणि तो म्हणजे, त्यांच्याशी युद्ध करून त्यांना नष्ट करण्याचा. न झाल्यास अवध्याच वर्षात सर्व राष्ट्रांना ते भारी होऊन राहतील (......................................................................) त्याना नेस्तनाबूद कसे करता येईल ह्या विचारांशिवाय मला दुसरा कोणताच विचार सूचत नाही. तहाचा विचार तर आतां सोडून दिलेला बरा. माझ्या श्रेष्ट आणि बलाढ्य स्वामीचे देव रक्षण करो व त्याला सुखांत ठेवो."

गोवा, २७ डिसेंबर १७१२.

(56) LIVRO DAS MONCOES No. 76, FLS 227.

इ. स. १७१३ साली गोव्यांत नवीन व्हाइसरॉय आला. त्याने अधिकार-ग्रहण केल्यावर पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र लिहिले त्यांत त्याने आंग्र्यांचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो आंग्रे हे वैभवसंपन्न आणि बलाढ्य असून त्यांची आपणाला भीती वाटते. ह्या प्रदीर्घ पत्रांतील आंग्र्यांच्या संदर्भातील परिच्छेद पुढील प्रमाणे आहे :

" महाराज––

..............................................................................

..............................................................................

मी राज्याची सूत्रे हातात घेतली आहेत. परंतु खजिना रिकामा असून मनुष्य बलाचीही कमतरता आहे. मावळते व्हाइसरॉय दों. रुद्रिगु द कोश्त हे आपणाला साद्यंत हकीगत सादर करतीलच. आरमाराची योग्य त्यावेळी रवानगी करण्यासाठी एक ना दोन गोष्टीची आवश्यकता आहे; गेल्या वर्षी सबंध काफिल्याचा काफिला नष्ट होण्याचे दुर्दैव आमच्यावर ओढवले. हे कदाचित् आपणाला माहीत असेलच. ते दुर्दैव यंदा अनुभवाला येऊ नये म्हणून काळजी घेतली. काफिल्याबरोबर तीन फिरगेटस (Frigates), चार पाली (Pallas), एक पतास (Patactio) आणि दोन मचवें (Manchuas) अशा दहा युद्ध नौका काफिल्याबरोबर पाठविल्या. तरीही शत्रू आंग्रे हा गेल्यावर्षासारखे सावज उपटण्यासाठी यंदाही काफिल्याच्या मागावर आपल्या

सामर्थ्यासह होता. त्याने चार पाली आणि सहा गलबतें आमच्या काफिल्याच्या मागावर पाठविली. त्याने आमच्या काफिल्याच्या मागे असलेल्या दोन पालांवर आणि एका व्यापारी नौकेवर हल्ला चढविला. ही आरमारी लढाई सतत दोन दिवस आणि दोन रात्री चालू राहिली. तीत शत्रूचे पुष्कळ लोक घायाळ आणि ठार झाल्याने त्याला माघार घ्यावी लागली. ह्या लढाईत आमचे अवघे तीन लोक ठार झाले. त्यांत एक पाद्री आहे.

गेल्या वर्षी दों. पेद्रु द. केशत ह्यांनी जर आपल्याबरोबर कांहीं हलकीं जहाजे घेतली असती, तर, त्यांच्यावर सबंध काफिला गमावण्याचा घोर प्रसंग ओढवला नसता, व त्यामुळे कप्तानपदास मुकावे लागले नसते.

सांप्रत आंग्रे हा आमचा सगळ्यांत मोठा शत्रू आहे. तो धनवान, बलाढ्य आणि समृद्ध आहे. त्याने आतापर्यंत कित्येक श्रीमंत सावजांची शिकार केली आहे. त्याची मला भीती वाटते. (O Angria o iuaes prejudicial inimigo que leoje tem o estado, este he ve tas ricoe poderoso e opulento, com as muitas importantes presas que tem peito, que me poem hum continuo susto) कारण आमच्या उत्तरेकडील ठाण्यांचे संरक्षण कमकुवंत आहे. आणि हा काळा (आंग्रे) बलाढ्य होऊ नये म्हणून त्याचा पराभव करण्यासाठी ह्या उन्हाळ्यांत मी मोहीम सुरु करणार आहे.

आमचा उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती लुईस द मेलु द सांपायु ह्यांचा भाऊ लोपु द सांपायु ह्यालाही आंग्र्यांकडून एक पराभव खावा लागला. सदर्हु लोपु द सांपायु हा आंग्र्यांच्या प्रदेशांत आक्रमण करण्याकरतां माणसें जमवित असल्याची बातमी मला कळल्याने मी जनरल लुईश द मेलू द सांपायु ह्यांना कळविले की, आरमाराचे आगमन होण्यापूर्वी त्यांनी हे धाडस करू नये. माझ्या हुकुमाप्रमाणे ही मोहीम स्थगीत ठेवण्यात येत आहे असे त्यानी मला कळविले. परंतु काही दिवसांनी कोणतीच अनुचित घटना न घडतां त्यांनी आंग्र्यांच्या प्रदेशात प्रवेश केला, परंतु त्या धाडसाचा अगदी शोचनीय शेवट झाला. शत्रुचे सैन्य आमच्या सैन्याहून कमी असून देखील आमच्या सैन्याला पराभव खाऊन पळ काढावा लागला. केवढी शरमेची गोष्ट! त्या मोहिमेत आमचा एक सहायक आणि पुष्कळ सैनिक ठार होऊन बराच दारुगोळा मागे टाकावा लागला. ह्या अपयशामुळे मला लुईज द मेलु द सांपायु ह्यांची उचलबांगडी करून त्यांचे जागी ह्या राज्याचे एक सल्लागार मानुएल द. सौंझ मिनेझिश ह्यांची सेनापती म्हणून नेमणूक करावी लागली. ते जरी वृद्ध असले तरी अनुभवी आणि चतुर आहेत. ते उत्तरेकडील प्रदेशचे माजी गव्हर्नरही आहेत.

(प्रस्तुत पत्रावर तारीख नाही. परंतु ते १७१३ च्या जानेवारीत लिहिण्यात आले असावे असा अंदाज आहे.)

(28) LIVRO DAS MONCOES No. 78, FLS 124.

पोर्तुगिजांना आंग्र्यांचा पराभव करणे अशक्य झाल्याने त्यानी अखेर मोगल बादशहाला आंग्र्यांविरुद्ध चिथवणी देण्याकरतां एका पाद्रीची मोगल बादशहाकडे दूत म्हणून रवानगी केली. ह्या पाद्र्याला ज्या सूचना देण्यांत आल्या त्या पुढील प्रमाणे आहेत :

"पाद्री झुजे द. सिल्वा ह्यांनी बादशहाला नजराणा अर्पण करावा. ह्या नजराण्याबरोबर बादशहाला सादर करवयाची कैफियत जात आहे. पाद्री झुंजे द सिल्वा ह्यांनी बादशहाकडे मागणी करावी. की, आमच्या प्रदेशांला लागून जे नबाब आणि सरदार आहेत त्यांना त्याने आंग्र्याना कोणत्याच प्रकारची मदत न करण्याचा हुकूम करावा. कारण, ह्या नबाबांच्या आणि सरदारांच्या मदतीने प्रस्तुत राजे शिरजोर होतात, व लूटमार करतात. मोगल बादशहाला मी जे पत्र लिहिले आहे, त्यांत ह्या गोष्टीचा उल्लेख केला आहे. पाद्री झुंजे द सिल्वा ह्यांनी मोगल बादशहाची मर्जी संपदन करावी, व आंग्रे कोलराजा आणि सिद्दी ह्या तिघांना शासन करण्यास त्याला प्रवृत करावे. ह्या कामी त्यांनी पाद्री ज्यु आंव द आव्रेव ह्यांच्या बुद्धिचातुर्याचा आणि जुलियाना द कोश्त हिच्या मैत्रीचा उपयोग करावा.

बादशहाने कोल राजा व आंग्रे ह्यांना शासन करावे म्हणून पाद्री झुजे द सिल्वा ह्यांनी सर्व प्रकारची खटपट करावी. ह्या शासनाच्या इच्छेमागील कारणे उघडच आहेत. कोल राजाने आमच्या उत्तरेकडील प्रदेशांतील कांही खेड्यांत आक्रमंण केले व चौथाईचा प्रदेश त्याने काबीज केला.

बादशहाच्या मनांत आंग्र्याविषयी प्रतिकूल ग्रह निर्माण व्हावा म्हणून पाद्री झुजे द सिल्वा ह्याने शक्य तो प्रयत्न करावा. त्यांनी बादशहाच्या कानी घालावे, की, बादशहाचे जे शत्रू आहेत ते आंग्र्यांचे मित्र असून मराठ्यांच्या राणीने त्याला 'आंतेकेरी' चा किल्ला दिला आहे व तिचे मांडलिकत्व त्याने पत्करले आहे ..............................." वगैरे.

गोवा, २................१७१४.

व्हाश्कुं फेर्नांदिश सेझर मिनेझिश.

(63) LIVRO DE REGIMENTOS E INSTRUCOES No. 9.

गोव्याच्या व्हइसरॉयने हिंदुस्थानातील वार्षिक राजकीय घडामोडीचा आढावा घेऊन दिनांक १७ जानेवारी १७१४ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास जें पत्र लिहिले त्यांत त्याने पोर्तुगिजांच्या आंग्र्यांशी झालेल्या एका आरमारी लढाईचा उल्लेख केला आहे :—

गेल्या वर्षी मी चौलला माणसे, दारूगोळा आणि हत्यारे ह्यांच्यासह चोवीस तोफांचे एक फिरगेट पाठविले. ही सर्व मदत जमिनीवर उतरविल्यावर आंग्र्यांचे आरमार आमच्या युद्धनौकेच्या शोधार्थ आले. ह्या आरमारात पाच पाली आणि बारा गलबते होती. आमच्या युद्धनौकेच्या शोधार्थ ह्या आरमाराचा आणखी वेळ जाऊ नये, अथवा ज्या विजयाची आशा हे आरमार मनात बाळगून होते तो विजय पुढे जाऊ नये म्हणून आमच्या युद्धनौकेच्या कप्तानाने आंग्र्यांच्या आरमाराशी लढाई देण्याचे ठरविले. ही आरमारी लढाई बुधवारी सकाळी सुरू झाली व ती शुक्रवारी रात्र पडेपर्यंत चालली. आंग्र्यांच्या आरमाराचा ह्या लढाईत पराभव होऊन त्याला आपल्या बंदराचा आश्रय घ्यावा लागला. त्याच्या सर्व युद्धनौकांची मोडतोड झाली व एकाने तर पाण्याचा तळ गांठला. त्याचे १८० लोक ठार आणि १७६ जखमी झाले. आमचे १८ ठार आणि २२ जखमी झाले. आमच्या युद्ध नौकेचीही थोडी नुकसानी झाली.

ही लढाई चालू होती, तेव्हा इंग्रजांच्या दोन युद्धनौका (फिरगेट्स्) कुलाब्याला आंग्र्यांशी एक अपमानास्पद करार करण्यात गुंतल्या होत्या. सैन्य-बलाच्या अभावी मी आंग्र्यांशी युद्ध करू शकत नाही, तरी पण मी कुलाब्याची नाकेबंदी करण्यासाठी उत्तरेकडील आरमारातील पाच पाली, दोन मचवे आणि आठ गलबते मिळून पंधरा युद्धनौका तिकडे पाठविल्या आहेत. ह्या आरमारी तुकडीचे नेतृत्व कॅप्टन मोर आंतोनियु कार्दीम ह्यांच्याकडे आहे. तीन महिने झाले, आंग्र्यांचे आरमार त्याच्या तळाबाहेर पडलेले नाही.

माझ्या श्रेष्ठ आणि बलशाली स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखात ठेवो."

गोवा, १७ जानवारी १७१४.

(65) LIVRO DOS REIS VIZINHOS No. 79, FLS 254

गोव्याच्या व्हाइसरॉयने सरदार रामचंद्र पंडीत आमात्य ह्यांना पत्र घालून मराठ्यांशी सलोखा ठेवण्याची इच्छा दर्शविली.

संभाजी राजे ह्यांचे सरदार रामचंद्र पंडीत आमात्य ह्यांस—

आपले उत्तर मिळाले. फार आनंद झाला. आपणाविषयी आणि आपल्या स्नेहाविषयी मला नेहमीच कौतुक वाटत आले आहे. मला आपणास कळवायचे आहे की, मी आपणाला अभिनंदनपर पत्र लिहिले, त्याचवेळी आपणाला मी नजराणा पाठविणार होतो. परंतु संशय होता म्हणून तो पाठविला नाही. आता संशय फिटला आहे. माझी अशी समजूत आहे की, ह्या यशाबद्दल मला जो आनंद झाला तो केवळ आपणाशी असलेल्या स्नेहामुळे नसून चांगले राज-कारण आणि मैत्री ह्यामुळेही आहे, ह्याची आपणाला जाणीव आहेच. मला आपणाला सांगायचे आहे की, जी राणी ह्या प्रदेशावर राज्य करीत होती त्या राणीशी आमची खरी खुरी मैत्री असूनदेखील मेलुंदीच्या किल्लेदाराचे आणि आमचे कधीच पटले नाही. कारण, त्याच्या कारकीर्दीत आमच्या प्रजाजनांची नेहमीच लूटमार होत असे. चालू राजवटीत ह्या गोष्टी सुधारतील अशी आशा आहे. मला आपणास सूचना करायची आहे की, मेलुंदीच्या किल्लेदाराने ह्या राज्याचे जे काय घेतले आहे, ते परत करण्यात आले पाहिजे. तसेच उभय पक्षांमध्ये वैमनस्य आणि लूटमार ह्या सारख्या गोष्टी घडता कामा नयेत म्हणून एक करार होणेही आवश्यक आहे. ह्या प्रकरणी आपण लक्ष घालाल व आपणास आनंद होण्यासारखे प्रसंग घडतील अशी आशा आहे."

गोवा, ११ डिसेंबर १७१४.

व्हाइसरॉय

(89) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 9

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांना गोव्याच्या व्हाइसरॉयने पत्र घालून त्यांच्या राज्यात पळून गेलेल्या निग्रो गुलामांची त्यांच्याकडे मागणी केली :—

" कुडाळचे सरदेसाई फोंडू सावत ह्यांस—

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावत भोसले ह्यांचे पत्र मिळाले. त्यांनी माझी वास्तपूस केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

सोनार सिका ह्याला गिरफदार केले, कारण एकेकाळी तो ह्या राज्याचा प्रजाजन होता, परंतु त्याला आता सोडून देण्याचा हुकूम करण्यात आला आहे. त्याचे कारण सरदेसाई हे आमचे मित्र आहेत हे आहे. सरदेसाई फोंडू सावंत ह्यांच्याकडे आमची मागणी आहे की, त्यांच्या राज्यात जे आमचे गुलाम आणि खाप्री (निग्रो) पळून गेले आहेत त्यांना परत करण्याचा त्यांनी विचार

करावा. हा सगळा निष्काळजीपणा शिवभट ह्याचा आहे. ह्या बाबतीत त्याला मी वारंवार बोललो आहे. मला पुनः नुकतेच कळले आहे की, माझ्या नोकरीला असलेले दोन खाप्री (निग्रो) डिचोलीला आहेत किंवा ते तेथे पोहोचले आहेत. तरी त्यांना त्वरीत परत करण्यात यावे."

गोवा, ४ जानेवारी १७१५.

व्हाश्कु फेर्नंदिश सेझर द मेंदिश

## (98) LIVRO DOS REIS VIZINHOS

गोव्याच्या व्हाइसरॉयने ज्युआंव गोमिश फेबुश ह्या नावाच्या सुरत येथील आपल्या दूताला लिहिलेल्या एका पत्रात आंग्र्यांनी सुरतेची दोन जहाजे घेतली असे म्हटले आहे :—

"ज्युआंव गोमिश फेबुश ह्यांस—

पुष्कळ दिवस झाले आपले पत्र नाही.............................................
मला बातमी कळली आहे की, आंग्र्यांनी सुरतेची दोन जहाजे दमणनजीक पकडली. मला वाटते की, ह्या दरोडेखोरीला आणि उद्धटपणाला आळा घालण्यासाठी सुरतेच्या नागरिकांनी बादशहावर दडपण आणण्याची वेळ आज आलेली आहे. ह्या घटनांमुळे सुरतेच्या बंदरांची पुष्कळच हानी झाली आहे. आणि दुर्दैवाची गोष्ट ही की, सिद्दी आणि आंग्र्ये ह्या दोघांची मैत्री जुळल्यामुळे बादशहाच्या प्रजेला ही मैत्री बाधत आहे. बादशहाचा आपल्या नवाबांवर आणि सरदारांवर अद्याप विश्वास आहे की काय ते मी सांगू शकत नाही."

..........................................................................................

गोवा, २९ एप्रिल १७१५.

व्हाश्कु फेर्नांदिश सेझर द मेंदिश

## (120) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 16

गोव्याचा व्हाइसरॉय सुरत येथील आपला दूत ज्युआंव गोमिश फेबुश ह्याला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, आंग्र्यांच्या भयाने पोर्तुगीजांचा व्यापार बंद पडला आहे :—

"सुरत येथील ज्युआंव गोमिश फेबुश ह्यांस—

आपली दोन्ही पत्रे मिळाली..........................................................
..........................................................................................
सुरतेचा व्यापार बंद पडला आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

चालू मोसमात सुरतेहून स्ट्रेट (मलाया वगैरे देश) कडे आणि बंगालकडे व्यापारी जहाजे गेली नाहीत. जर आंग्र्यांविरुद्ध लवकर इलाज केला गेला नाही, तर परिस्थिती फार कठीण आहे. आपण काय ते पहावे."

गोवा, १५ मे १७१५. व्हास्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश

(122) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8 FLS 17V

गोव्याचा व्हाइसरॉय मोगल बादशहाच्या नोकरीला असलेल्या दों. दियोगु मेंदिश ह्या नावाच्या इसमाला आंग्र्यांच्यासंबंधी लिहितो :

"दों. दियोगु मेंदिश ह्यांस--

रेव्ह. पाद्री झुंजे द सिल्व्ह ह्यांनी मला कळविले आहे की, दों. दियोगु मेंदिश व दोना ज्युलियाना (मोगल बादशहाच्या दरबारातील एक पोर्तुगीज स्त्री) ह्या दोघांच्या मदतीमुळे आपली सर्व कामे पूर्ण होत आली आहेत.......

..........................................................................................

..........................................................................................

सिद्दीने आंग्रे ह्यांच्याशी तह केला आहे. ह्या चांच्याने बादशहाच्या प्रजाजनांना लूटून त्यांचा छळ करण्याचे जे सत्र सुरू केलेले आहे, त्याला अद्याप आळा बसलेला नाही. त्याने सुरतेच्या बंदराचा तर पुरताच नाश केला आहे. गेल्या वर्षी मी आंग्रे ह्यांची अलीबागेत नाकेबंदी केली. सिद्दीने जर जमिनीवरून आंग्रे ह्यांच्याविरुद्ध हालचाल केली असती, तर ह्या बंडखोराचा निःपात होण्यास वेळ लागला नसता..............................................................

..........................................................................................

गोवा, १५ मे १७१५ व्हास्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश

(125) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 19

अखेर आंग्र्यांचे पारिपत्य करण्यासाठी बादशहाने असगरअलीखान ह्या नावाच्या सरदाराची रवानगी केली. ह्या बातमीचे स्वागत करून गोव्याचा व्हाइसरॉय सुरत येथील ज्यु आंव गोमिश फेबुश ह्याला लिहितो :

"सुरत येथील ज्युआंव गोमिश फेबुश यांस---

आपले दि. २५ ऑक्टोबरचे पत्र मिळाले..............................................

..........................................................................................

सरदार असगर अलिखान ह्यांनी दख्खनच्या नबाबाला ज्याप्रमाणे वठणीवर

आणले त्याचप्रमाणे त्यांनी आंग्र्यांनाही शासन करण्याची आपली योजना अंमलात आणावी. त्या दरोडेखोराच्या नाशाचे मला विशेष काही वाटत नाही. मला एकाच गोष्टीचे महत्व वाटते आणि ते म्हणजे सुरतेचा व्यापार मारून टाकणाऱ्या ह्या चाच्यांचा कसा नाश होईल त्याचे. परंतु ज्याअर्थी, लाचलुचपतीला बळी पडणे हा मुळी मानवी स्वभावच आहे, आणि ज्याअर्थी, ही प्रवृत्ती आशियातील लोकांमध्ये अधिक आहे, त्याअर्थी, सदहू असगर अलि-खान हा आंग्र्यांच्या लाचाला बळी पडणार नाही असे सांगता येत नाही. आंग्र्यापाशी सोने विपुल आहे. त्याच्या बळावर तो मोगल सरदाराला आपलासा करून घेऊन त्याने बादशहाकडून जे हुकूम आणले आहेत ते त्याला तहकूब ठेवण्यास लावण्यास कमी करणार नाही.

देव आपणास उदंड आयुष्य देऊन आपले रक्षण करो".

गोवा, ३० नवंबर १७१५ व्हाश्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश

(138) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 23

गोव्याचा व्हाइसरॉय कोकणातील मोगल दिवाणाला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, पोर्तुगालचा राजा हा हिंदुस्थानच्या सागराचा स्वामी असल्या-कारणे ह्या सागरावरील चाच्यांचे पारिपत्य करण्याचा त्याच्यावतीने त्याच्या व्हाइसरॉयला अधिकार आहे. परंतु मोगल बादशहाने त्याला ह्या कामी मदत केली पाहिजे :—

"कोकणचे फौजदार आणि दिवाण मोतिमिनखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले. आपले आरोग्य उत्तम असल्याचे वाचून आनंद झाला.

माझे स्वामी पोर्तुगालचे राजे हे हिंदुस्थानच्या सागराचे स्वामी आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे. त्यांचे व्हाइसरॉय हे चाच्यांचे उच्चाटन करण्याचा शक्य तो प्रयत्न करतात. ते कार्य मी चालू ठेवावे म्हणून मोगल बादशहाने आरमाराचा कोणताच खर्च करण्याची जरूरी नाही. परंतु ज्याअर्थी, बंडखोर आंग्रे ह्याने बादशहाच्या बंदरातील व्यापार मारुन टाकला आहे, त्याअर्थी, त्याचा नि:पात करण्याच्या कामी त्याच्या सरदारांनी आमच्याशी सहकार्य केले पाहिजे.

सिद्दीला हे काम अशक्य व्हावे इतका काही आंग्रे बलाढ्य नाही. ही गोष्ट आपण महान मोगल बादशहांच्या कानी घातली पाहिजे, व सिद्दी आणि

इतर नबाब त्याला (आंग्र्यांना) जी मदत करतात ती बंद करण्यास त्यांना प्रवृत्त केले पाहिजे. तसे झाले तर मला त्याला शासन करणे सुलभ होईल.

देव आपले भले करो".

गोवा, १६ डिसेंबर १७१५

व्हाइसरॉय

(143) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 26

पोर्तूगिजांनी आंग्र्यांची एवढी दहशत घेतली होती की, गोव्याच्या व्हाइसरॉयकडून मोगलांच्या ज्या सरदारांना किंवा अधिकाऱ्यांना पत्रे जात त्यात आंग्र्यांना नष्ट करण्याच्या कामी आपणाला मदत करा अशी विनंती असे. अशीच विनंती गोव्याच्या व्हाइसरॉयकडून मोगलांचा सरसेनापती असिदन अलिखान ह्याला गेलेल्या पत्रातही आहे :—

"मोगल बादशहांचे सेनापती असिदन अलिखान ह्यांस—

आपल्या स्वामीचा अधिकार बेछुटपणे अमान्य करणाऱ्या बंडखोरांविरुद्ध आपण जो विजय मिळविला त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. जगात आपली सगळीकडे कीर्ती व्हावी म्हणून आपणाला असेच विजय मिळावेत अशी इच्छा करतो..............................................

महान मोगल बादशहाच्या बंदरांचा आणि त्याच्या प्रजेचा हा प्रश्न आहे. म्हणून बंडखोर आणि चाचा आंग्रे ह्याचा नाश झालाच पाहिजे. ही कामगिरी आपण हाती घेतल्याशिवाय राहणार नाही अशी मला आशा आहे. मीही माझे आरमार आपल्या मदतीला पाठवून देईन. आपल्या मर्जीप्रमाणे सर्व काही पार पडावे अशी माझी इच्छा आहे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, १२ जानेवारी १७१६

व्हाइसरॉय

(150) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 28V

पोर्तुगीज आणि मराठे ह्या दोघांमध्ये शांततेचा करार व्हावा अशी उभय पक्षांची इच्छा होऊन तत्संबंधाने प्रयत्न सुरू झाले असावेत असे गोव्याच्या

व्हाइसरॉयने सरदार रामचंद्र पंडीत अमात्य ह्यांना पाठविलेल्या पुढील पत्रा-वरून दिसून येते :—

"शिवाजी राजे ह्यांचे सरदार रामचंद्र पंडीत अमात्य हयांस—

आपल्या स्वामीना लिहिलेल्या पत्रावरून आपणाला कळून आलेच असेल, की, ह्या राज्यात आणि त्यांच्यामध्ये कोणतीच गैरसमजूत असू नये, हा त्या पत्रामागील हेतु आहे. मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे की, आपल्या स्वामीच्या मेलुंदी येथील तळावरील युद्ध नौका ह्या राज्याच्या व्यापारी नौकांची जी लुटालूट करतात ती गोष्ट खरोखरच शोचनीय आणि लज्जास्पद आहे. श्रीनिवासपंत ह्यांना मी इकडे येण्याबद्दल लिहिले होते. त्यांना मी परवानाही पाठविला आहे. शिवाजी राजे ह्यांनी त्यांना आवश्यक ते अधिकार देऊन इकडे पाठवावे. आपणही ह्या कामी मदत करावी, जर आपणाकडे तशी मागणी झाली तर, आंग्र्यांच्या नाशाचाही प्रश्न आहेच. आपणाकडून आदे-शाची वाट पाहत आहे.

देव आपले रक्षण करो"

गोवा, १७ फेब्रुवारी १७१६.

व्हास्कु फर्नांदिश सेझर मेंदिश

(160) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 30V

मेलुंदीचा किल्लेदार आणि पोर्तुगिज ह्या दोघांमध्ये तहाच्या वाटाघाटी व्हायच्या होत्या. परंतु हा किल्ला आपला आहे, सबब मेलुंदीच्या किल्लेदाराशी वाटाघाटी करू नयेत अशा आशयाचा लखिता शिवाजी राजे ह्यांच्याकडून गोव्याच्या व्हाइसरायकडे गेल्याने, त्याने ह्या वाटाघाटी बंद ठेवल्या. ह्या संदर्भात त्याने शिवाजी राजे हयांना जे पत्र लिहिले, त्यांत त्यांना आंग्र्यांना वठणीवर आणण्याकरता आपण मदत करण्यास तयार असल्याचे कळविले :—

शिवाजी राजे हयांस :—

मेलुंदीचे किल्लेदार व श्रीनिवासपंत ह्या दोघांनी माझ्याकडे इकडे येण्याची परवानगी मागितली होती. श्री निवासपंत हे इकडे मेलुंदीचे किल्लेदाराच्या वतीने आमच्याशी मैत्रीची बोलणी करण्यासाठी येणार होते. त्यांना मी इकडे येण्याची परवानगी दिली परंतु आपल्या पत्रांत आपण कळविले आहे, की, सदर्हू किल्ला आपला असल्याने त्या संबंधाने आम्ही श्रीनिवासपंत ह्यांच्याशी वाटाघाटी करू नयेत. आपल्या सूचनेप्रमाणे आम्ही आपणाला कळवू इच्छितो

की, मेलुंदीच्या किल्ल्यासंबंधी आम्ही श्रीनिवासपंत ह्यांच्याशी वाटाघाटी करणार नाही. तथापि असे जरी असले, तरी एक गोष्ट आम्हाला आपल्या निदर्शनास आणायची आहे, ती, ही की, मेलुंदीचा किल्ला हा जरी, आपल्या राजवटी पूर्वी, दुसऱ्या किल्लेदाराने ह्या राज्याची आणि ह्या राज्याच्या प्रजाजनाची जी नुकसानी केली, ती भरून काढण्याची जबाबदारी आपणावर पडते, अर्थात त्या लुटीचा फायदा आपणाला मिळाला असेल तरच हे बंधन आपणावर आहे. ज्या गलवताच्या कप्तानाने ह्या राज्यांतील व्यापाऱ्याला पकडण्याचे औद्धत्य केले, त्याच्या गुन्ह्याचा आपण जो निवाडा केलात त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आपल्या वडिलांशी आमचा सलोखा होताच. आतां त्या सलोख्याची वृद्धि होण्यास हरकत नाही. ह्या सलोख्याची वृद्धि होण्याचा मार्ग आपण सुचवाल अशी आशा आहे.

आंग्रे आपणाला जुमानीत नाही, आणि आपले अधिपत्य मान्य करायलाही तो तयार नाही. आपला अपमान करण्याइतका आत्मविश्वास त्याच्यामध्ये निर्माण झाला आहे. अशा परिस्थितीत जर आंगऱ्यांची खोड मोडण्याचा विचार आपण केला, तर आम्ही आपणाला मदत करू.

आपणाला ग्रियेंचा किल्ला घ्यायचा झाल्यास आपण त्या किल्ल्यावर खुष्कीच्या मार्गे फौज पाठवावी. म्हणजे येत्या महिन्याच्या पंधरा तारखेपर्यंत आम्ही तिकडे आमचे आरमार पाठवूं. असे जर झाले तर तो किल्ला घेणे आपणाला कठीण जाणार नाही. आरमार पाठवायचे की काय तत्संबंधीची अगाऊ सूचना करावी. परंतु आरमार आम्हाला वर उल्लेखिलेल्या अवधीतंच पाठविणे शक्य होईल हे लक्षांत ठेवावे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो."

गोवा, १७ फेब्रुवारी १७१६

व्हाश्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश

(161) LIVRO DOS RE IS VIZINHOS, NOo. 8, FLS 30V

मुंबईच्या नवीन इंग्रज गव्हर्नरच्या पत्राला गोव्याच्या व्हाइसरॉयने जे उत्तर पाठविले, त्यांत त्याने आंग्र्यांची नालस्ती करून त्यांच्याविषयी इंग्रज गव्हर्नरचे मन कलुषीत करण्याचा प्रयत्न केला आहे :—

"मुंबईचे सेनापति ह्यास,

आपली दिनांक ११ व १६ जानेवारीची पत्रे १७ मार्चला मिळाली· आपण मुबईला सुरक्षितपणे येऊन पोहोचल्याचे वाचून आनंद झाला. आपल्या कारकीर्दीत आपणाला उत्तम आरोग्य प्राप्त व्हावे अशी इच्छा करतो............

...................................................................................................

...................................................................................................

आंग्रे ह्यांच्या संबंधाने मला आपणास सांगायचे आहे की, आपल्या पूर्वीच्या मावळत्या सेनापतीनी त्यांच्याशी जो तह केला होता, तो चांगला की वाईट ते मी सागूं शकत नाही. कारण, त्या बाबतीत माझे मत व्यक्त करण्याची माझी इच्छा नाही. परंतु एक मात्र मी सागूं इच्छितो की, हा करार पार पडण्यामागील हेतु जरी सफल झाला असला तरी तो प्रत्यक्षांत अमलांत आलेला नाही. कारण ह्या करारप्रमाणे आंग्रे वागत नाही. तो मुंबईचा परवाना असलेली जहाजें बेधडकपणे पकडीत आहे. परवाच त्याने मुंबईच्या रहिवाश्यांची कांही जहाजे पकडली. सदहूं आंग्रे ह्याचा आमच्याशी मैत्रीचा करार होता, तेव्हां तो समुद्रावर लूटमार करून गबर झाला. ह्या राज्याचे भूतपूर्व व्हाइसरॉय कायतानु द मेलु कास्त्रु ह्यांच्या कारकीर्दीत आंग्र्यांचे आणि आमचे वितुष्ट आले. सतत अकरा वर्षेपर्यंत त्यांचा आणि आमचा मैत्रीचा करार होता. त्या कालावधीत तो चांचेगिरीवर मोठा झाला. ज्यावेळी तो आमच्या राज्याचा मित्र होता तेव्हां त्याच्यापाशी अवघी दोन पाली आणि कांही गलबतें होती. आतां त्याच्यापाशी किती युद्धनौका आहेत, त्याची आपणच गणती करावी. आणि हे सर्व आमच्या मैत्रीने साधले.

माझ्या आमदानीत व्यापारी जहाजांची राजरोस लूटालूट करणाऱ्या ह्या चांच्याची मी कधीच कदर केली नाही. संधी मिळेल तेव्हां मी त्याच्यांवर टोले हाणले. हिंदी समुद्रावर सगळीकडे त्याची चांचेगिरी चालते. शेवटी ह्या प्रश्नाकडे जरी मागे आपल्याकडून दुर्लक्ष झाले असले, तरी आपल्या कारकीर्दीत आपण ह्या शत्रूचा नाश करण्याचा विचार केला असेल असे गृहीत धरतो. आपल्या हातून ही कामगिरी पार पडेल अशी आशा आहे. कारण, आपण शूर आहांत.

जनरल दां ज्यु आंव फेर्नांदिज द आल्मैदा ह्यांना मी ही योजना कशी पार पडेल तत्संबंधी आपणाशी वाटाघाटी करण्याचा हुकूम केला आहे. ही योजना जर फलद्रुप झाली तर आमच्या दोन्ही राष्ट्रांचा सर्वत्र बोलबाला होईल.'

गोवा, १८ मार्च १७१६.

आपला सेवक.

व्हास्कु फेर्नांदिज, सेझर द मेंदिश

(165) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 33V

छत्रपति आणि पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये जो तह झाला त्याच्या पूर्व तयारी-साठी छत्रपतीचा एक दूत गोव्याला गेला होता. तत्संबंधी गोव्याचा व्हाइसरॉय श्रीनिवासपंत ह्यांना लिहितो :—

श्रीनिवास पंत ह्यांस :—

हरीपंत ह्यांच्यामार्फत पाठविण्यांत आलेले श्रीनिवास पंत ह्यांचे पत्र मिळाले. हरीपंतांची आणि माझी मुलाखत झाली. नंतर त्यांची राज्यचिटणीसांशी बोलणी होऊन पत्रांत जो कागद होता, त्याच्यावर त्यांनी सही केली. त्यांनी सांगितले, की, आतापर्यंत पूर्ण होत आलेल्या ह्या कामकाजाला मान्यता देण्याचा आपणास अधिकार नाही. तरी तहाची कलमे श्रीनिवास पंत ह्यांची संभाजी राजे ह्यांच्याकडे त्यांच्या मंजुरीसाठी पाठवावी. ह्याच दूताबरोबर मी मंजुर केलेली कलमे जात आहेत.

संभाजी राजे ह्यांना मी उत्तर पाठवीन. त्याचप्रमाणे रामचंद्र पंडीत आणि त्या किल्ल्याचा किल्लेदार ह्यांनाही पत्रें पाठविण्याची व्यवस्था केली जात आहे."

गोवा, २१ मार्च १७१६

व्हास्कु फेर्नांदिश सेझर द मेंदिश

(166) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 33

पोर्तुगिज आणि मराठे ह्यांच्यामधील तहाचा भंग काही मराठे किल्लेदा-रांनी केल्याने हा तह छत्रपति आणि पोर्तुगिज ह्यांच्यामध्ये पुन: करण्यांत आला. त्यांतील कलमें पुढील प्रमाणे आहेत :—

(१) संभाजी राजे ह्यांनी आंग्र्यांनी बळकावलेले त्यांचे उत्तर किनाऱ्यावरील किल्ले आणि जलदुर्ग विशेषेकरून ग्रियेचा किल्ला घेण्यासाठी आंग्रयांशी युद्ध करावे. हे राज्य त्यांना ह्या मोहिमेत मदत करील.

(२) मेलुदीच्या म्हाताऱ्या किल्लेदाराने ह्या राज्याच्या कांही प्रजाजनांची जहाजे बळकावली होती. संभाजी राजे गादीवर आले, तेव्हां त्यांच्या ताब्यांत ही जहाजे आली नाहीत. त्यांतील काही जहाजे मेलुंदीच्या बंदरांत आहेत असे कळते. परंतु ती जहाजे जरी तिथे नसली, तरी त्यांच्या ऐवजी इतर राष्ट्रांची जी जहाजे बळकावण्यांत आली, त्यांतील जहाजे ह्या राज्याला देण्यांत यावी. त्यांतील एक जहाज अहमद सारंग ह्यांचे असून, ते त्यांच्या मुलाचे हवाली केले जाईल. दुसरे जहाज आंजेदिवचे आहे. ते दोन वर्षामागे घेण्यांत आले.

त्याचप्रमाणे वरीष्ठ कोर्टाचे न्यायाधीश दोमिगुश दोइराडु द ओलिव्हैरा ह्यांच्या गलबतावरील ज्या दहा तोफा काढून घेण्यांत आल्या, त्याही परत केल्या जाव्या, त्या गलबतावरील सर्व माल मेलुंदीच्या बंदरांत राहीला होता.

(३) ह्या राज्याच्या आणि मेलुंदीच्या नागरिकांचा व्यापार जमिनीवरून तसाच समुद्रमार्गे अनिर्बंधपणे सुरू व्हावा.

(४) ह्या राज्याच्या नौकांना समुद्रावर अनिर्बंधपणे संचार करता यावा. मेलुंदीच्या युद्ध नौकांकडून त्यांना उपद्रव होऊ नये, अथवा त्यांनी त्यांना अटक करू नये. ह्या जहाजांपाशी अर्थात परवानग्या असतीलच. गोव्याच्या नौकापाशी गोव्याचे परवाने असतील. उत्तरेकडील पोर्तुगिज प्रदेशांतील नौकांपाशी त्या मुलुखाच्या सेनापतीचे अथवा बंदरांच्या कप्तानांचे परवाने असतील. दक्षिणेकडील नौकांपाशी कप्तानांचे अथवा वखारवाल्याचे परवाने असतील. संभाजी राजे ह्यांची जी जहाजे व्यापारासाठी ह्या राज्याच्या बंदरांत येतील त्यांच्यापाशीही परवाने असतील. कुठल्याही नौकांना ह्या किंवा त्या राज्याची नांगरपट्टी भरावी लागणार नाही.

(५) ह्या राज्याच्या नौकांना कारणपरत्वे मेलुंदिच्या किंवा संभाजी राजे ह्यांच्या राज्यांतील इतर बंदरांत जाता येईल. ही सवलत संभाजी राजे ह्यांच्या नौकांना ह्या राज्याच्या बंदरांत मिळेल.

(६) संभाजी राजे व आंग्रे ह्यांचे जर युद्ध जुपले, तर संभाजी राजे ह्यांनी ह्या राज्याकडे दारूगोळाचाची मदत मागितल्यास ती हे राज्य त्यांना देईल.

(७) कुडाळचे सरदेसाई नारबा सावंत भोसले हे जरी ह्या राज्याचे मित्र असले, आणि ते जरी ह्या राज्याला खंडणी देत असले, तरी संभाजी राजे आणि भोसले ह्यांचे युद्ध झाल्यास, प्रस्तुत करारान्वये पोर्तुगिजांनी भोसल्यांना मदत करू नये.

(८) मेलुंदीच्या नागरिकांना जर आपली जहाजे ह्या राज्याच्या आरामाराबरोबर उत्तरेकडे पाठवायची असतील, तर ती त्यांना पाठवितां येतील. तसेंच ह्याच आरमाराच्या संरक्षणांत त्यांना माघारी परतता येईल.

(९) संभाजी राजे ह्यांच्या जहाजांना बसरा किंवा कोंगोहून घोडे आणायचे झाल्यास त्यांना पोर्तुगिजांचे परवाने बाळगावे लागतील. ज्या जहाजांपाशी हे परवाने नसतील ती जहाजे पोर्तुगिज युद्ध नौकांकडून बुडविली गेल्यास त्याची जबाबदारी पोर्तुगिजांवर राहाणार नाही. ही काळजी घेण्याचे कारण, की, मस्कतच्या इमामाशी पोर्तुगिजांचे युद्ध चालू असल्याने, त्याच्याशी व्यापार करणारी राष्ट्रे पोर्तुगिजांची शत्रू आहेत असे ते मानतात.

सचिवालय, २३ मार्च १७१६

(ह्या कराराचे मराठी भाषांतर असून त्याची मंजुरी देखील मराठीत आहे.)

संभाजी राजे ह्यांचे दूत हरीपंत ह्यांनी ह्या करारावर असा शेरा मारला आहे, की, तोफांचे कलम सोडून इतर सर्व कलमांना मी मान्यता देत आहे. तोफांच्या कलमाला राजेश्री (संभाजी) ह्यांची परवानगी लागेल हे मी माझ्या स्वतःच्या हातानी लिहिले. हरीपंत—ज्.

(167) LIVRO DE PAZES 1, FLS 285

मराठ्यांचे सेनापती दाभाडे ह्यांनी गुजराथेंत शिरून चौथाई वसूल केली. सुरतेच्या नबाबाने त्यांचा प्रतिकार केला असता त्यांनी त्याला पिटाळून लावले. मग दाभाडे पोर्तुगिजांच्या ताब्यांत असलेल्या दमणवर चाल करून गेले. पोर्तुगिजांनी त्यांचा प्रतिकार केला. गोव्याच्या व्हाइसरॉयने ही खबर पोर्तुगालला आपल्या राजास कळविली असतां राजाकडून त्याला पुढील उत्तर आले :—

ईश कृपेने पोर्तुगाल आणि आल्गाव्हयु आणि आफ्रिकेंतील सागरोत्तर प्रदेशाचा आणि गिनीचा स्वामी दों ज्युआंव. मी हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल आणि व्हाइसरॉय ह्यांना कळवित आहे, की, चालू सालच्या १२ जानेवारीस आपण मला जो तिकडील घडामोडींचा आढावा सादर केला तो माझ्या अवलोकनांत आला.

शिवाजीचा बंडखोर सरदार दाभाडे हा मोगलांच्या मुलुखांत शिरला व त्याने काही खेडे जाळून काही कडून कर वसूल केला. सुरतेच्या नबाबाने दाभाड्याचा प्रतिकार केला असता, त्याच्या सैन्याने त्याला पिटाळून लावले. तो मग सुरतेच्या किल्ल्यांत जाऊन दारे लावून बसला. दाभाडे आपल्या बारा

हजार घोडेस्वारांसह बलसाड ह्या नांवाच्या खेडचांत छावणी ठोकून बसला. हे गांव दमणपासून चार कोसांवर आहे. त्याला कळले कीं, मोगलांच्या प्रदेशातील कांही देसाई आणि रहिवाशी दमणच्या आश्रयास जाऊन राहिले आहेत. ते लोक एकूण चौदा हजार होते. दाभाडेने त्या लोकांचा पाठलाग करण्यासाठी दमणमध्ये शिरण्याचा निर्णय घेतला. तत्पूर्वी त्याने दमणच्या आश्रयास जाऊन राहिलेल्या देसायांना आणि इतर रहिवाश्यांना आपल्या हवाली करण्याचा दमणच्या सेनापतीस निरोप धाडला. निर्वासितांना आपल्या स्वाधीन केले नसल्यास आपण दमण जाळून बेचिराख करू अशी त्याने धमकी दिली होती. त्या निर्वाणीच्या खलित्याला दमणच्या सेनापतीने योग्य तेच उत्तर दिले. त्यावेळी उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती वसई येथे होते. त्यांना दमणच्या सेनापतीने ही वार्ता कळविली आणि कुमक पाठविण्याची त्यांना विनंती केली. त्यांनी लगेच वसईला कुमक रवाना केली. परंतु ती कुमक येण्यापूर्वीच दाभाडेने दमणवर हल्ला केला. त्या हल्ल्यास दमणच्या सेनापतीने आपल्या हाताशी असलेल्या सैन्यासह निर्धाराने तोंड दिले. त्याला बार्लेतच्या समुद्रावरील आणि जमिनी-वरील कॅप्टनने मदत केली. शत्रूला एवढा तीव्र प्रतिकार झाला की, त्याने, वारंवार हल्ले चढवूनदेखील त्याला भयंकर प्राणहानी सोसून माघार घ्यावी लागली. त्याने पकडलेली कांही गुरेही परत हस्तगत करण्यांत आली.

उत्तरेकडील परगण्यांना शत्रुच्या हल्ल्याचा धोका असतो. आमच्या मुलखांत शत्रुने इतक्या सहजतेने आक्रमण करू नये म्हणून शक्यतो अडथळे उभारण्याचा मी हुकूम केला होता. आपणास कळविण्यांत येत आहे की, ही उपाययोजना करण्यांत आल्याचे मला कळविण्यांत आले आहे. आपण त्या राज्याच्या सेनापतीला त्याच्या संरक्षणाची यापेक्षांही अधिक काळजी घेण्याबद्दल कळवावे. म्हणजे शत्रूच्या आक्रमणापासून होणारी हानी टळेल. आपण बार्लेतच्या समुद्रावरील आणि जमिनीवरील सेनापतीला बोलवून घेऊन त्याने दमणच्या लढाईत दाभाडे विरूद्ध जो पराक्रम गाजविला, त्याबद्दल माझ्यावतीने त्यांचे अभिनंदन करावे. त्यांच्या शौर्यपूर्ण प्रतिकारामुळेच दमणची आणखी हानी टळली. आपल्या पत्रात त्याचा निर्देश आहेच."

हे पत्र लिस्बन येथे २६ जानेवारी १७१६ रोजी लिहिले गेले.

ज्युआंव तेलिश द सिल्वा
आंतोनियु रोइश द कोश्त

(189) LIVRO DAS MONCOES, No. 83, FLS 116

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील प्रदेशांच्या सेनापतीला आंग्र्यांवर स्वारी करण्याची पुढील पत्रांत आज्ञा केली :——

" उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्यांचे कॅप्टन जनरल बार्तोलोमेव द गमेलु सांपायु ह्यास :——

मी, व्हास्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश, हिंदुस्थानच्या राज्याचा सल्लागार, व्हाइसरॉय, आणि कॅप्टन जनरल, बार्तोलोमेव द मेलु सांपायु ह्यांना कळवित आहे की, आपणाविषयी मला आदर वाटतो. आपण अनुभवी असून किल्यांचे आणि उत्तरेकडील प्रदेशांचे सेनापती ह्या नात्याने आपण आपली लायकी सिद्ध केलेलीच आहे. मला आशा आहे की, आपल्या हातून अशी एक मोठी कामगिरी पार पडेल की जिच्यामुळे आमचे स्वामी जे पोर्तुगालचे राजे ते आपल्या प्रजाजनांचा त्यांच्या हातून होणाऱ्या असामान्य पराक्रमाबद्दल जो सत्कार करतात, तसा सत्कार त्यांच्याकडून आपला होईल.

आपणाला माहीत आहेच की, आंग्र्यांनी उत्तरेकडे मोठाच उपद्रव सुरू केला आहे. आमचा निष्काळजीपणा आणि त्यांची दरोडेखोरी ह्या मुळे........ आपण त्यांच्या अगदी शेजारी असल्याने, त्यांच्या लोकांना आणि जहाजांना .................................. ह्या यांच्याच्या उर्मटपणाबद्दल त्याला धडा हा शिकविलाच पाहिजे. आपण ह्या संबंधी विचार करावा व मार्ग शोधून काढावा. ह्या कामी आपणाला आपणाशी असलेल्या गलबतांशिवाय आणखी गलबतें हवी असल्यास आम्हांला कळवावे. म्हणजे आम्ही ती तयार करण्याचा हुकूम देऊ. ह्या शत्रूला वठणीवर आणण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे १७१३ मध्ये ज्याप्रमाणे मी कुलाब्यांचे बंदर घेण्याचा प्रयत्न केला त्याप्रमाणे त्याची नाकेबंदी करणे ".

हे पत्र गोवा येथे राज्य चिटणीस ज्युआंव रोआस मासादु ह्याने ९ डिसेंबर १७१६ रोजी लिहिले.

व्हास्कु फेर्नांदिश सेझर मेंदिश (व्हाइसरॉय)

## (197) LIVRO DOS REGIMENTOS E INTRUCODES, No. 9, FLS 181

कुडाळच्या सावंतावर स्वारी करण्याच्या इराद्याने संभाजी राजे ह्यांनी पोर्तुगिजांकडे दोस्त ह्या नात्याने मदतीची मागणी केली. त्या पत्राला गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :——

"संभाजी राजे ह्यांस :——.

ह्या राज्याशी असलेल्या आपल्या दोस्तीस अनुसरून आपल्या पत्राबद्दल आनंद झाला. माझ्या बतीने बोलायचे झाल्यास ह्या दोस्तीचे मी नेहमीच कौतुक करीत आलो आहे.

बंडखोर नारवा सावंत ह्याचा नाश करण्याचा आपला निश्चय झाला आहे हे आपल्या पत्रावरून कळले. ही मोहीम यशस्वी व्हावी म्हणून आपण माझ्याकडे मदतीची मागणी केली आहे. मित्र ह्या नात्याने ही मदत देण्यास मी मागे राहाणार नाही, परंतु आपले पत्र घेऊन आलेला दूत तितकासा हुषार नसल्याने व माझ्याशी ह्या प्रश्नावर वाटाघाटी करणे त्याला शक्य होणार नसल्याने आपण ही कामगिरी हिंदुराव घोरपडे ह्यांच्यावर सोपवावी. मात्र ते किंवा त्यांचा जो दूत येईल त्याने ह्या वाटाघाटी करण्यासाठी आपणाकडून अधिकार पत्र आणावे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणांवर प्रकाश पाडो."

गोवा, २४ जानेवारी १७१७ दों. सेबास्तियांव, आर्चबिशप गव्हर्नर

(207) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 351

मोंगल बादशहाचा एक सरदार फोंडे प्रांताचा ताबा घेण्यास आला असतां मराठ्यांच्या सैन्याने त्याचा पाठलाग केला. त्याने मराठ्यांना भिऊन पोर्तुगिजांचा आश्रय मागितला असता गोव्याच्या गव्हर्नरने मोंगलांचा व पोर्तुगिजांचा सलोखा लक्षात घेऊन त्याला त्याच्या परिवारासह कुंभारजुवे बेटावर येऊन राहाण्याची परवानगी दिली. तत्संबंधाने गोव्याच्या व्हाइसरॉयने त्या मोंगल सरदाराला जे पत्र पाठविले ते पुढील प्रमाणे आहे :—

" मोगल बादशहाचे सरदार मामघण (की महमदखान ?) ह्यांस :—

आपण फोंड्याचा व त्याच्या लगतच्या प्रदेशाचा ताबा घेण्यासाठी आलां असता आपणाभोवती व आपल्या घोडदळाभोवती वेढा पडल्याचे आपल्या पत्रावरून कळले. आपल्या पत्रांतील मजकूर हंगामी गव्हर्नरांच्या अवलोकनार्थ आणला असता त्यांनी आपल्या मागणीकडे लक्ष देण्याची आज्ञा केली. आपणाला आपल्या परिवारासह कुंभारजुवे बेटावर सुरक्षित नेण्याचा हुकूम गोवा नदीतील कॅप्टनला देण्यांत आला आहे. आपण जर कुंभारजुवे बेटावर जाऊन राहिलांत तर मराठ्यांच्या संभाव्य हल्ल्यापासून आपले रक्षण होईल. मोगल बादशहाशी आमची मोठी मैत्री असल्याकारणे ह्या प्रसंगी आपणाशी सहकार्य करणे आम्हाला भाग पडत आहे. नामदार गव्हर्नरसाहेबांची इच्छा आहे की, आपण मोगल बादशहाच्या पोर्तुगिज मित्रांच्या इमानीपणाचा अनुभव घ्यावा. आपल्या मित्रांचे कसे रक्षण करावे ते पोर्तुगिजांना चांगले माहित असते."

पानेली, २८ एप्रिल १७१७ ज्युआंव आब्रेव माशादु

(212) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 55.

कुडाळच्या सावंताची खोड मोडण्यासाठी संभाजी राजे ह्यांनी पोर्तुगिजांची मदत मागितली होती. त्या पत्रास मान देऊन गोव्याच्या गव्हर्नरने संभाजी राजे ह्यांना पत्र घालून आपणाकडे त्यांचा एक दूत वाटाघाटी करण्यासाठी पाठवून देण्याबद्दल कळविले होते. परंतु त्या वाटाघाटी होण्यापूर्वीच मराठ्यांचे एक सरदार रामराव ह्यांनी गोव्यांमध्ये शिरून लुटालूट केली. गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलने सभाजी राजे ह्यांना पत्र घालून त्या घटनेबद्दल निषेध व्यक्त केला.

"संभाजी राजे ह्यांस--

नारवा सावंत ह्यांची खोड मोडण्यासाठी आपण माझ्याकडे मदत मागितली होती. मी आपणाला कळविले होते कीं, आपणास जी काय मदत हवी असेल तिच्यासंबंधीच्या वाटाघाटी करण्यासाठी आपण हिंदुराव घोरपडे ह्यांना एकादा दूत पाठवून देण्याची आज्ञा करावी. मी आपणाला कळविले होते की, मित्र ह्यां नात्याने आम्ही आपणाला मदत करण्यास तयार आहोत. हिंदुराव घोरपडे ह्यांनीही आम्हाला ह्याच प्रश्नासंबंधी लिहिले होते. त्याचवेळी रामराव ह्यांनी आमच्या राज्यांत शिरून धुमाकूळ घातला. त्यांचे कृत्य शत्रूत्वाचे आहे तर आपले मित्रत्वाचे आहे. ह्या दोन्ही धोरणांचा ताळमेळ बसत नाही. हा आपला सरदार घोडदळ आणि पायदळ ह्यांच्यासह आमच्या प्रदेशांत लुटालूट करण्याच्या हेतुने शिरला होता. अशी गोष्ट कुठल्याच देशांत घडणे शक्य नाही. ती विश्वासाला आणि श्रद्धेला धक्का देणारी आहे. हे कृत्य उघड उघड शत्रुत्वाचे आणि विश्वासघाताचे आहे. ह्या घडटनेमुळे हिंदुराव घोरपडे ह्यांना पाठवावयाचे उत्तर तहकूब ठेवण्यांत आले आहे. आणि आता आपण त्याच प्रश्नासंबंधी पुनः लिहिता. आपणाला मला कळवायचे आहे की, रामराव ह्यांनी सोन्याचांदीच्या दागिन्यांची (................ ........................................... वस्तूंची मोठी लूट केली. ही लूट आम्हाला परत मिळाली पाहिजे. तरी आपण सदर्हू रामराव ह्यांना ती लूट आम्हाला परत करण्याचा हुकूम करावा, व त्यांच्या हातून हा जो गुन्हा घडला आहे त्याबद्दल त्यांना शिक्षा करावी. तरच आम्हाला आपणापाशी मैत्री ठेवतां येईल. आपण जर अशा रीतीने आमच्यामधील मैत्री दाखवून दिली तर आपल्या सरदारांना ज्याप्रमाणे आमच्या मैत्रीची प्रचीति आहे, त्याप्रमाणे कुडाळच्या सरदेसायांची खोड मोडण्याच्या कामी आम्ही आपणाला मदत करू. आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो."

गोवा, ६ मे १७१७ दों सेबास्तियाँव आर्चबिशप, गव्हर्नर.

(214) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 55

सरदार हिंदुराव घोरपडे ह्यांना लिहिलेल्या पत्रांतही गोव्याच्या हंगामी गव्हर्नरने सरदार रामराव ह्यांनी गोव्यांत शिरून जी लूटालूट केली तिचा निषेध केला आहे, व ती लूट आपणाला परत मिळाली पाहिजे आणि सरदार रामराव ह्यांना शासन झाले पाहिजे, तरच आपण संभाजी महाराजांना कुडाळच्या सरदेसायांविरूद्ध मदत करू असे खालील पत्रांत म्हटले आहे :—

"संभाजी राजे ह्यांचे सरदार हिंदुराव घोरपडे ह्यांस—

रामराव ह्यांनी साष्टीत शिरून काही खेडीं लुटल्यावर नंतर दोन दिवसांनी आपले पहिले पत्र माझ्या हाती पडले. अशी गोष्ट जगांत कुठेच घडलेली मी पाहिली नाही. एकेबाजूने आपण आपल्या राजाच्या वतीने माझ्याकडे आपल्या शत्रूविरूद्ध मदत मागतां तर दुसऱ्याबाजूने आपला एक सरदार आमच्या राज्यांत शिरून खुशाल लुटालूट करतो. हा सार्वजनिक विश्वासाचा उघडउघड भंग आहे. आमची अशी समजूत आहे, की, सदहू रामराव हा आपल्या हाताखालचा एक सेनाधिकारी आहे. आपल्या राजाने व आपण मला जी पत्रे लिहिली त्यांत आपण ही गोष्ट मान्य केली आहे. आपल्या पत्रांत आपण रामराव ह्यांना शिक्षा करण्याचे मला आश्वासन दिले आहे. परंतु नुसत्या आश्वासनांनी आमचे समाधान होणे शक्य नाहीं. सदहू रामराव ह्यांनी आमच्या राज्यांत शिरुन जी लुटालूट केली, ती आम्हाला परत करण्याचा सल्ला आपण आपल्या राजाला दिला पाहिजे. रामराव ह्यांनी साष्टीतील एक श्रीमत इगर्ज लुटली. ह्या इगर्जीतील सोन्याचांदीच्या वस्तूंची किंमत दहा लक्ष पार्दावाहून अधिक आहे. त्या शिवाय कपड्यांची किंमत आहे ती वेगळीच. ह्या सर्व वस्तू आम्हाला परत मिळाल्या पाहिजेत. तरच आम्ही आपणाशी मैत्री ठेवू, व कुडाळच्या सावंताविरूद्ध आपणाला मदत करू. ह्या सरदेसायांची खोड मोडण्यासाठी आपल्या राजाला आम्ही यापूर्वी मदत केली आहे. त्याची आपणाला आठवण असेलच."

गोवा, ६ मे १७१६ दों सेबास्तियाँव, आर्च बिशप, गव्हर्नर

(215) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 55V.

मराठे साष्टीवर चालून येत आहेत अशी बातमी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळताच त्याने फोंडेच्या सरदेसायाला त्याच्या हाताखालच्या लोकांसह सरहद्दीकडे जाण्याचा हुकूम केला :—

"मराठ्यांचे सैन्य साष्टीवर चालून येत असल्याची बातमी आहे. ह्या सैन्याने आमच्या प्रदेशात शिरू नये म्हणून प्रतिबंध केला पाहिजे. तरी फोंड्याचे

सरदेसाई कृष्टाजी नाईक ह्यांनी आपल्या हाताखालच्या हत्यारी लोकांसह ताबडतोब साष्टीकडे रवाना व्हावे. व त्यांना जो हुकूम होईल त्याप्रमाणे वागावे. ते आपले स्वामी पोर्तुगालचे राजे ह्यांची कळकळीने सेवा बजावतील अशी आशा आहे."

पानेली, २५ डिसेंबर १७१७

नामदार कौंट व्हाइसरॉय ह्यांची सही

(239) LIVRO DAS CARTAS ORDENS E PORTARIAS No. 12, FLS 49V

मराठ्यांच्या स्वारी सबंधाने गोव्याचा व्हाइसरॉय साष्टीच्या सेनापतीस लिहितो :—

"साष्टीचे सेनापती दों आंतोनियु कास्कु इमेलु ह्यांस :—

शत्रू साष्टीवर चालून येत असल्याची आपण पाठविलेली बातमी कळतांच मी देसायांना त्यांच्या हाताखालच्या हत्यारी लोकांसह साष्टीकडे जाण्याचा हुकुम केला. असाच हूकुम बार्देशमधील घोडदळाच्या तुकडीलाही करण्यांत आला आहे. उद्यां सकाळपर्यंत हे लोक आपल्या सैन्याला जाऊन मिळतील अशी आशा आहे. मी ताबडतोब रासईला जात आहे. आपण शत्रू हल्ल्याची भीति असलेल्या खेड्यांतील लोकांना त्यांच्या मौल्यवान वस्तूंसह किल्ल्याच्या आश्रयार्थ जाण्यास सांगावे. किंवा त्यांनी रासईच्या तोफखान्याच्या आश्रयास जावे. इगर्जीतील सोनेचांदी आणि दागदागिनेहि गोळा करून ते किल्ल्यांत आणून ठेवावे. इगर्जीवर पहारे बसवून काही फायदा व्हायचा नाही. खिंडी आणि अरूंद वाटा रोखून धराव्या, व शत्रूचे घोडदळ येताच गोळीबार करावा. ह्यां कामी चांगल्या खंबीर माणसांची नेमणूक करावी.

देव आपले रक्षण करो."

पानेली, २४ डिसेंबर १७१७ काऊंट दों लुईज द मिनेझिश

(240) LIVRO DAS CARTA ORDENS ES PORTARIAS,

साष्टीच्या सेनापतीने मराठ्यांच्या स्वारीचा धोका नसल्याचे व्हाइसरॉयला कळवितांच त्याने त्याला उत्तर पाठवून त्याची दिनांक २८ आणि दिनांक २९ ची दोन्ही पत्रें मिळाली असल्याचे कळविले. त्याने त्याला सूचना केली की,

शत्रूच्या स्वारीचा धोका टळला तर त्या प्रांतांतील देसायांना आणि त्यांच्या लोकांना रजा देण्यास हरकत नाही. कारण, कुकक्कीच्या मदतीमध्ये त्यांची पुष्कळच गैरसोय होत आहे. गुप्तहेर येईपर्यंत तेथे बार्देशचे सैन्य ठेवण्यास हरकत नाही.

प्रस्तुत पत्र गोव्याचे व्हाइसरॉय काउंट दों लुईज द मिनोझिश ह्यानी पानेलीहून दि. ३० डिसेंबर १७१७ राजी लिहिले.

(241) LIVRO DAS CARTAS ORDENS E PORTARIAS, No. 12, FLS 49V

मराठ्यांनी गोव्याच्या साष्टी प्रांतावर जी स्वारी केली तिचा वृत्तांत गोव्याच्या गव्हर्नरने पोर्तुगालला आपल्या राजास खालील पत्रात सादर केला आहे. ह्याच पत्रांत आंग्र्यांच्या एका आरमारी तुकडीची आणि पोर्तुगिजांच्या आरमाराची लढाई होऊन त्यात आंग्र्यांच्या आरमारी तुकडीचा पराभव झाला असे तो म्हणतो :—

" महाराज,

गत सालच्या २५ एप्रिलला मराठ्यांनी साष्टी प्रांतावर स्वारी केल्याने ह्या बेटांत (गोवा) आणि त्याच्या लगतच्या प्रदेशांत मोठा घबराट माजून राहिला. मराठ्यांच्या स्वारीत फार लोकांची हानी झाली नाही. फक्त कुकक्की, वेरडे आणि मडगांव ह्या तीन ठिकाणी जरा अधिक लुटालूट आणि विध्वंस झाला. जवळ जवळ ५ लक्ष असुर्प्या किंमतीचा माल लुटला गेला असावा असा अंदाज आहे. मराठ्यांची नजर इगर्जीवर होती. त्यांनी त्या भागांतील बहुतेक सर्व इगर्जी लुटल्या. नावेली येथील इगर्ज तर त्यांनी पार साफ केली. ही इगर्ज त्या भागांतील सर्वात मोठी इगर्ज असून ती श्रीमंतही होती.

शत्रू साष्टीत आल्याने तो नदी ओलांडून ह्या बेटांत शिरतो की काय अशी भीति ह्या बेटावरील रहिवाशांना पडली असल्यास नवल नव्हते. मी इकडे येऊन दाखल झालो तेव्हा मराठ्यांच्या दुसऱ्या स्वारीच्या अफवा इकडे उठल्या होत्या, परंतु त्या अखेर निराधार ठरल्या. हा शत्रू संबंध आशिया खंडातील अत्यंत दरिद्री (Miseravel), नीच (vil) आणि छोटा असल्याने तो स्वारीचे धाडस पुन: करील असे मला वाटत नाही. साष्टी प्रांताचे सेनापती दों. आंतोनिधु काश्कु इ मेलु हे खंबीरपणे राज्य कारभार पाहात असून गव्हर्नर आर्चबिशप ह्यांनी त्यांची दों लुईश कोश्त ह्यांचे जागीं गव्हर्नर म्हणून नेमणूक केली आहे. चांचा (Corsario) आंग्रे, ह्याने गेल्या कांही

दिवसांमागे आमच्या काही व्यापारी जहाजावर आंजेदिव बेटानजीक हल्ला करण्याचा प्रयत्न केला. त्याच्या आरमारी तुकडीत चार पाली आणि आठ गलबते होती. आमच्या पंधरा परांग्यांना दोन पालांचे संरक्षण होते. दों तोमाझ द ताव्होरा हे त्यांचे कप्तान होते. उभय पक्षांमध्ये जुपलेली ही आरमारी लढाई सतत दिवसभर चालली. शत्रुचे सामर्थ्य मोठे असून देखील त्याला आमची एकही व्यापारी नौका घेता आली नाही. त्याची भयंकर हानी झाली. शेवटी आमच्या युद्धनौकांसमोर निभाव न लागल्याने त्याने रात्रीच्या काळोखाची संधी साधून पळ काढला. आमच्या युद्धनौकांची बरीच मोडतोड होऊन आणि माणसे कमी असूनदेखील त्यांनी शत्रूचा बराच वेळ पाठलाग केला.

हा शत्रु मोठा (Formidavel) नसूनदेखील त्याने आमची फार हानी चालविली आहे. विशेषेकरून उत्तरेकडे तर त्याने आमची फार हानी केली आहे. त्याचा फडशा पाडण्याचा मी शक्यतो प्रयत्न चालविला आहे. परंतु त्याच्या युद्धनौका हलक्या असल्याने त्यांना लढाई करण्याचा प्रसंग येतांच चपळाईनें पळ काढणे शक्य होते.

माझ्या बलाढ्य स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्याचे रक्षण करो."

गोवा, २१ जानेवारी १७१८

(245) LIVRO DAS MONCOES, No. 83, FLS 309

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांनी गोव्याच्या नवीन व्हाइसरॉयला त्याच्या आगमनप्रसंगी अभिनंदनपर संदेश धाडून आंग्रे आणि मराठे ह्यांच्याविरूद्ध लढण्यासाठी त्याच्याकडे दारूगोळ्याची मागणी केली होती. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :—

"कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस :—

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांनी भरव शेणवी ह्यांच्याकडे पाठविलेली दोन्ही पत्रें मिळाली. मी फार गडबडीत होतो, त्यामुळे सरदेसाई फोंड सावंत ह्यांनी माझ्या आगमनाबद्दल पत्र पाठवून आनंद व्यक्त केला त्याबद्दल त्याचे आभार मानण्यास मला सवड झाली नाही. सदहूं फोंडू सावंत ह्यांच्या निष्ठेबद्दल मला आनंद होत आहे.

फोंडू सावंत भोसले ह्यांनी माझ्यापाशी २० पिपें दारू मागितली होती. ती पिपें लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु ह्यांच्याकडे देऊन पाठविली आहेत. ती पिपें त्याना पोहोचली असतीलच. त्याना ती पोहोचल्यावर ते आम्हा

दोघांच्या समायीक शत्रुविरुद्ध त्यांचा उपयोग करतील अशी आशा आहे. आम्ही गैरसावध राहू नये म्हणून शिवाजी (मराठे) आणि आंग्रे ह्यांच्या हालचालीची बातमी काढून ती फोंडू सावंत ह्यांनी आम्हाला पुरवावी."

गोवा, १५ फेब्रुवारी १७१८

काउंट लुईज गोंसाल्विज द मिनेझिश.

(248) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 68

पोर्तुगिज आणि इंग्रज ह्या दोघांना आंग्रे पुरून उरल्याने त्या दोघांनी त्यांच्यावर संयुक्तपणे हल्ला करण्याचा निर्णय घेतला. ह्या निर्णयाप्रमाणे गोव्याहून अलिबागला सैन्य पाठविण्यांत आले. तत्संबंधाने गोव्याचा व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहितो :—

" मुंबईचे सेनापति ह्यांस :—

कापितांव मोर बेर्नार्द तैशैरा हे आपणाला हे पत्र नेऊन देतील, व ग्रियेच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी आपली नेमणूक केली असल्याचे आपणाला विदीत करतील. ह्या मोहिमेवर मी त्यांची नेमणूक केली आहे. माझ्या अपेक्षे-प्रमाणे ह्या मोहिमेत ते यशस्वी होतील अशी आशा आहे. तसे जर झाले तर कुलाब्याचा पाडाव करण्याची आमची महत्त्वाकांक्षा फलद्रुप झाल्यावाचून राहाणार नाही.

कापितांव मोर बेर्नार्द तैशैरा ह्यांच्यावरोबर अलिबागवर मोठे सैन्य पाठविण्यात आले आहे. ह्या ठाण्याचे महत्त्व आपणाला माहीत आहेच. आपले उद्दीष्ट साध्य व्हावे म्हणून आलिबागवर हल्ला करणे आवश्यक आहे. आपण कापितांव मोरे बेर्नार्द तैशैरा ह्यांच्या मदतीला कमीतकमी पांचशे सैनिक तरी पाठविले पाहिजेत. ह्या दोन्ही सैन्यांनी एकवटून हल्ला केला, तरच इंग्लंडच्या मान्यवर कंपनीची हानी करणाऱ्या व उत्तर किनाऱ्यावरील व्यापार मारून टाकणाऱ्या ह्या आमच्या समायिक शत्रूचा नाश करणे शक्य होईल. मला आशा आहे की, केवळ आपल्या राष्ट्राच्या हितासाठीच नव्हे, तर ह्या चांच्यांच्या छळाला जे लोक बळी पडले आहेत आणि पडत आहेत त्यांच्या मुक्तीच्या ह्या मोहिमेत आपण भाग घेतला पाहिजे.

ह्या रानटी आंग्र्यांचा नाश का झाला पाहिजे त्याची कारणे मी वर दिलीच आहेत. मला आपणाला आठवण करून द्यायची आहे की, लिस्बन



व्ही ५५५८–१०अ

आणि लंडन ह्या दोन्ही राजधान्यांमध्ये आज जी मैत्री नांदत आहे, त्या मैत्रीसाठी तरी हे कार्य पार पडले पाहिजे."

देव आपणाला उदंड आयष्य देवो."

गोवा, ८ डिसेंबर १७१८ काऊंट दों लईज द मिनेझिश

(271) LIVRO DOS REIS VIZINHOS

गोव्याचा गव्हर्नर आंग्र्यांशी चालू असलेल्या युद्धाचा अहवाल पोर्तुगालला आपल्या राजास सादर करतो :—

" महाराज :—

चांचा (Corsario) आंग्रे ह्याने इंग्रज कंपनीकडून दारूगोळा आणि शस्त्रे ह्यांची मदत घेऊन त्यांचा उपयोग आमच्याविरुद्ध केल्यावर, तो इंग्रजावरही उलटला. त्याने त्यांची वेगवेगळ्या प्रकारची अनेक जहाजे त्यांच्यापासून कोणताच विरोध न होता घेतली. त्या जहाजांपैकी मद्रासहून मुंबईला निघालेल्या एका जहाजात तर १० लक्ष रुपये होते. आशिया खंडातील एका हलक्या दर्जाच्या, नीच (Vil) राष्ट्राकडून अशा रीतीने वारंवार मानखंडना होऊ लागल्याने इंग्रजांना आपल्या धोरणांत बद्दल करावा लागला. इंग्रज लोक मानखंडना सहन करतात म्हणून त्यांना पूर्वेकडील देशांत युरोपातील सर्व राष्ट्रामध्ये कमी मान आहे.

मुंबईचा सेनापती कांही लढाऊ नौका आणि सैन्य घेऊन आंग्र्यांच्या अंदेरी-चंदेरी बटावर चालून गेला. त्या बेटावर सैन्य उतरविण्यास त्याला कोणताच अडथळा झाला नाही, इतकेच नव्हे, तर त्या बेटावरील किल्ल्याचा दरवाजा जाळून टाकण्यांतही त्याला यश आले. परंतु त्या किल्ल्याचे रक्षण करणाऱ्या अवघ्या ६० शिपायांनी इंग्रजांचा एवढा प्राण पणास लावून प्रतिकार केला की, त्यांना किल्ल्यांत प्रवेश करण्याचे मुळीच धाडस झाले नाही. त्यांनी ताबडतोब माघार घेतली. केवढी नामुष्कीची गोष्ट. नंतर ह्याच सेनापतीने कुलाब्याची नाकेबंदी करून त्याच्यावर तोफा डागल्या. परंतु कुलाब्याला सैन्य उतरविण्याचे त्याला धाडस न झाल्याने तो मुंबईस माघारा परतला.

मुंबईच्या सेनापतीने मला कळविले की, आंग्र्यांचा नाश करावयाच्या मोहिमेंत मी भाग घ्यावा. मी त्याला उत्तर पाठविले की, ह्या मोहिमेंत भाग घेण्यास मी तयार आहे. ह्या शहरांत आणि आमच्या उत्तरेकडील प्रदेशांत

जे सैन्य आहे त्या सैन्यासह आमच्या युद्धनौका ह्या मोहिमेत भाग घेतील. परंतु इंग्रज हे नेहमी कचखाऊ वृत्तीचे असतात. हा अनुभव केवळ माझाच आहे असे नाही, तर तो माझ्यापूर्वीच्या व्हाइसरायनाही आलेला आहे. म्हणून मी मुंबईच्या इंग्रज गव्हर्नरला कळविले की, तुम्ही माहीम-मुंबईच्या किल्ल्यांत पोर्तुगीज शिबंदी ठेवून घ्यावी. तरच मी तुमच्याशी मदतीचा करार करीन, आणि तुम्हाला न कळवितां तह करणार नाही. परंतु इंग्रज सेनापतीला माझी मागणी मान्य झाली नाही. माझ्या अटीप्रमाणेच आमच्या उत्तरेकडील सेनापतीनेही इंग्रजांना एक अट घातली होती. आमच्या मुलुखांतील एकाद्या प्रतिष्ठीत गृहस्थाकडे त्यांनी एक लक्ष रुपये अनामत रक्कम म्हणून ठेवावी ही ती अट होती. परंतु ही अट त्यांना मान्य झाली नाही. ह्यावरून इंग्रजांमध्ये दृढनिश्चयाचा कसा अभाव आहे ते दिसून येते.

आंग्र्यांना आज जर कुणाची भीती वाटत असेल तर ती पोर्तुगिजांची परंतु गेल्या एक वर्षापासून त्यांनी आमच्याशी जरा नमते घेतले आहे असे वाटते. ते वसईमार्गे निर्भयपणे चौलला आपल्या मुलुखाला जातात. इंग्रज कुलाब्यावर हल्ला करण्यासाठी चौलला गोळा झाले आहेत असे जेव्हां मला कळले, तेव्हा मी गुप्तपणे आठ छोट्या युद्धनौका आणि एक फिरगेट सज्ज करण्याचा हुकूम केला. त्या युद्धनौकातून आठशे शिपाई अधिकारी होते. त्यांना ग्रियेच्या प्रदेशांत त्या शहरापासून उत्तरेस तीस कोसांवर उतरण्याचा हुकूम झाला होता.

ज्यावेळी आंग्र्यांची माणसे मोहिमेवर जात नाहीत, तेव्हां ती कुलाब्याला असतात व त्यांच्या नौका ग्रियेला असतात. मी उत्तरेकडील आमच्या सेनापतीला चौलवर हल्ला करण्याचा निरोप धाडला होता व त्यासाठी घोडदळ आणि पायदळ जय्यत तयार ठेवण्याचा हुकूम केला होता. मी त्याला असेही कळविले होते की, इंग्रज सेनापतीने जी मोहीम सुरू केली आहे, ती पार पडल्याशिवाय त्याने ती सोडू नये अशी त्याला सूचना करावी. परंतु इंग्रज सेनापतीने मला किंवा आमच्या उत्तरेकडील सेनापतीला न कळवितांच अलिबागचा वेढा उठविला. कदाचित त्याची समजूत झाली असेल की, त्या विजयाचे श्रेय आमच्याकडे येईल, किंवा वेढा उठविल्याने आपल्या वजनात भर पडेल. त्याने पांच पाली व गलबतें दक्षिणेकडे पाठविली. आमच्या आरमाराला ती वाटेत भेटली. ती बातमी कापितांव मोर बेर्नार्द तैशैरा ह्यांनी मला कळविली. त्या दरम्यान आंग्र्यांच्या युद्धनौका इंग्रज युद्धनौकांच्या पाठलागास निघाल्या होत्या. कापितांव मोरने इंग्रजांना आमच्या बंदराचा आश्रय घेण्यास सांगितले.

अशा रीतीने इंग्रजांची मोहिम अयशस्वी झाल्याचे पाहून वाईट वाटले. कारण इंग्लंड आणि पोर्तुगाल ही दोस्त राष्ट्रे आहेत.

आंग्र्यांनी तूर्त वरून आमच्याशी शांततेचे धोरण ठेवले आहे. जोपर्यंत इंग्रजांशी त्यांचे पटणार नाही तोपर्यंत त्यांची ही शांतता अशीच राहाणार आहे. आम्ही आणि इंग्रज आपणावर संयुक्तपणे हल्ला करू अशी त्यांना भीति वाटते.

माझ्या बलशाली आणि श्रेष्ठ स्वामीला देव सुखांत ठेवन त्याला उदंड आयुष्य देवो."

गोवा, १९ जानेवारी १७१९

(284) LIVRO DAS MONEOCS

---

गाजी बेग ह्या नावाच्या मोगल सरदाराने काही मराठा सरदारांशी संगनमत करून सोंदेच्या राजावर स्वारी केली असतां गोव्याच्या गव्हर्नरने कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यास पत्र पाठवून सावध रहाण्याचा इशारा दिला.

"कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस--

गाजी बेग ह्याने काही मराठा सरदारांशी संगनमत करून सोंदेच्या राजावर स्वारी करून समराणीचा किल्ला घेतल्याची वार्ता इकडे आली आहे. फोंड्यावर हल्ला करणे हा त्या स्वारीमागील मुख्य उद्देश आहे, असे कळते, ते लोक आपले उद्दीष्ट साध्य करतील असे वाटते. परंतु सरदेसाई फोंडू सावंत ह्यांना मी इशारा देत आहे की, ह्या लोकांनी त्यांच्या राज्यात शिरू नये म्हणून त्यांनी काळजी घ्यावी. त्यांनी सरहद्दीवर बंदोबस्त ठेवावा. आणि त्यांनी जरी हल्ला केला नसला, तरी देखील बंदोबस्ताकडे दुर्लक्ष करू नये. कारण ह्या बंदोबस्तामुळे मराठ्यांना त्यांच्याविषयी वचक वाटेल.

मी सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांना सुयश इच्छितो".

दिनांक २६ फेब्रुवारी १७२०. काउंट दों. लुईज द मिनेझिश्.

(6) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 94.

कुणी बाळू भट बाक्रे ह्या नावाच्या गृहस्थाने पोर्तुगीजांना बातमी कळविली होती, की मराठ्यांचा आणि कुडाळच्या सावंताचा समझौता झाला आहे. गोव्याच्या व्हाइसरॉयने सदर्हु बाळू भट ह्यास पुढील पत्र पाठविले :--

कुडाळच्या सरदेसायांच्या राज्यास लागून असलेले बाबू भट बाक्रे ह्यांस--

सरदेसायांचा आणि मराठ्यांचा समझौता झाला असून मराठ्यांकडून सरदेसायांना सवलती मिळाल्या असल्याची जी बातमी आपण आम्हाला पुरविली त्याबद्दल मी आपला आभारी आहे, मला आशा आहे की, आंग्र्यांच्या वजनामुळे सरदेसाई तिकडचा आणखी मुलुख जिंकणार नाहीत. कारण हा समायिक शत्रू वचनाला जागणारा नाही. तो तह अमलात असून देखील मोठे............

बाबू भट बाक्रे ह्यांच्याकडून मला अशीही बातमी कळली आहे, की शाहू राजे ह्यांच्या सैन्याच्या हालचाली सुरू झाल्या आहेत, ह्या लोकांवर माझा मुळीच विश्वास नसल्याने मी आमच्या सरहद्दीवर कडक बंदोबस्त ठेवला आहे".

गोवा, २ मार्च १७२०. काऊंट दों. लुईज द मिनेझिश्.

(7) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 94V.

गोव्याच्या व्हाइसरॉयने कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांना मराठे आणि सोंदेचा राजा ह्यांच्या संबंधाने पुढील पत्र पाठविले.

सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस--

गाजी बेग आणि मराठे ह्या दोघांनी चालू उन्हाळ्यात फोंड्यामध्ये प्रवेश केला नसावा असे मी गृहीत धरतो. कारण मला कळले आहे की, सोंदेच्या राजाने समराणीच्या किल्ल्याच्या मुक्ततेसाठी एक लक्ष रुपये भरले, त्याचप्रमाणे असेही कळले आहे की, सोंदेच्या राजाच्या कुठल्याच मुलुखावर हल्ला न करण्याचे वचन त्यांनी त्याला दिले आहे. सोंदेच्या राजाचे सैन्य अद्याप समराणीच्या रस्त्याचे रक्षण करीत आहेत. पैसे भरून देखील त्याची भिती अद्याप गेलेली नाही हे त्यावरून सिद्ध होते. सरदेसाई फोंडू सावंत ह्यांनी सोंदेच्या राजाशी मी समझौता करावा असा जो सल्ला दिला आहे, त्याचे मला कौतुक वाटते. परंतु सोंदेच्या राजापासून सरदेसाई ह्यांच्या काय अपेक्षा आहेत ते मला प्रथम जाणून घ्यायचे आहे. शेजारच्या राजाराजांमध्ये सलोखा असावा हे मला मान्य आहे. परंतु सरदेसायांना मला इशारा द्यावासा वाटतो की, फोंड्यावर चालून आलेल्या मराठ्यांनी त्यांच्या राज्यात शिरू नये म्हणून त्यांनी काळजी घ्यावीं. भोसले ह्यांना त्यांच्या शत्रूविरुद्ध विशेषेकरून आंग्र्यांविरुद्ध यश यावे, अशी देवापाशी माझी प्रार्थना आहे. आंग्र्यांवर त्यांनी विसंबून राहू नये."

गोवा, ५ मार्च १७२०. काऊंट दों. लुईज द मिनेझिश्.

(8) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 95.

गोव्याच्या व्हाइसरॉयने फोंडू सावंत भोसले ह्यांना मराठे फोंड्यावर चालून येत असल्याचा इशारा दिला, व ते ज्या घाटातून खाली उतरणार होते, त्या घाटात कडक बंदोबस्त ठेवण्याचा त्यांना सल्ला दिला.

"कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांस--

मला आताच बातमी कळली आहे की, गाजी बेग हा फोंड्यावर चाल करून येत आहे. तो घेला घाटा (?) तून खाली उतरणार आहे असेही मला कळले आहे, ही बातमी ताबडतोब आपणाला कळवावी असे मला वाटले. तरी आपण वरील खिडीत आणि आपल्या राज्यात बंदोबस्त ठेवावा. मी आपणाशी नेहमीच सहकार्य करीत आलो आहे.

पत्राच्या उत्तराची वाट पहात आहे".

गोवा, २३ मार्च १७२०. काऊंट दों. लुईज मिनेझिश.

(9) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 95-V.

गोव्याच्या मावळत्या व्हाइसरॉयने पोर्तुगीजांच्या उत्तरेकडील फौजांच्या दतीने आंग्न्यावर स्वारी करण्याची एक योजना आखली होती. पण ही योजना अव्यवहार्य होती असे गोव्याचा नवीन व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो :—

"महाराज—

मावळत्या व्हाइसरॉयनी आंग्न्यावर स्वारी करण्याची जी योजना आखली होती, ती त्यांनी पूर्ण विचार केल्याशिवाय आखली नसावी असे वाटते. परंतु उत्तरेकडील फौजांच्या सेनापतीने ग्रियेंच्या विजयाची बातमी कळताच आपल्या फौजेसह जे चौलला यायचे होते, ते कसे काय ते मात्र मला कळत नाही. त्याला ते कसे शक्य होणार होते? कारण कुलाबा हा तर किल्ला आहेच शिवाय आंग्न्यांचे आरमारही नदीत होते. ती नदी वसईपासून चाळीस कोसावर आहे. उत्तरेकडील सेनापती दमण आणि वसई येथील सैन्य, घोडदळ आणि इतर सामान घेऊन येणारा होता. हे घोडदळ एकूण सत्तर घोडे-स्वारांचे होते. ह्या सैन्याला चौलला पोहोचायचे झाल्यास अनेक मोठ्या नद्या आणि खाडी ओलांडाव्या लागणार होत्या. आणि ह्या सैन्याचा रस्ता जरीही सरळ असला तरीही त्याला शत्रू आंग्न्यांच्या प्रदेशातून जावे लागणार होते. कारण, कुलाब्याचा किल्ला चौलपासून उत्तरेस अवघा दोन कोसावर असून वसईपासून तो उत्तरेस जवळ जवळ दहा कोसावर आहे. ही गोष्ट मला केवळ अव्यवहार्यच वाटते असे नाही, तर अशक्यप्रायही वाटते. कारण, आंग्न्यांचे आरमार किल्यावर होते हे तर झालेच परंतु त्याचे सैन्य आणि सर्व सामर्थ्यही अलिबागला होते. हे ठाणे कुलाब्यापासून अवघ्या तोफेच्या एका गोळयाच्या अंतरावर होते, की जे ह्या किल्ल्याच्या रक्षणार्थ अगदी जयत तयार होते. आमचे सैन्य प्रथम चौलला जाणार होते, व तिथून ते अलिबागचे पाणी घेण्यासाठी तिकडे जाणार होते. परंतु ही सबंध योजना सदोष होती असे मात्र मी म्हणू शकत नाही. कारण, आमच्या आरमाराला त्याचे उद्दीष्ट साध्य करता येण्यासारखे होते. आमच्या युद्ध नौका ग्रिये येथील आंग्न्यांची पाले जाळण्यासाठी गेल्या होत्या. तिथून त्या गोव्याला परतल्या. आपणाला हा अहवाल मी खासगीरीत्या सादर करीत आहे. यापुढे कदाचित इंग्रज आणि पोर्तुगीज हे आंग्न्यांचा नाश करण्यासाठी एक संयुक्त मोहीम सुरू करणार नाहीत असे सांगता येत नाही. आणि मी आपणाला वचन देतो की, ज्याअर्थी, ह्या शत्रूचा नाश व्हावा ही आपली इच्छा आहे त्याअर्थी, त्याचा नाश करण्यासाठी मी सतत झटेन.

माझ्या श्रेष्ठ आणि बलाढ्य स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्याला सुखी ठेवो."

गोवा, १४ जानेवारी १७२१

(30) LIVRO DOS MONCOES No. 86(*a*), FLS 335.

गोव्याच्या नवीन गव्हर्नरने गोव्याला येऊन राज्यसूत्रे हाती घेतल्यावर पोर्तुगालला आपल्या राजास प्रचलीत घडामोडींचा जो अहवाल सादर केला, त्यांत त्याने आंग्र्यांचाही उल्लेख केला आहे. तो म्हणतो की, आंग्र्यांच्या चांचेगिरीमुळे व्यापार जवळ जवळ बंद पडला असून राज्याच्या महसुलावर त्याचा अनिष्ट परिणाम झाला आहे.

'महाराज—

एकशे-पंचेचाळीस दिवसांच्या प्रवासानंतर मी इकडे येऊन पोहोचलो. दिनांक १५ सप्टेंबरला काउंट द एरिसैरा ह्यांनी राज्याची सूत्रें माझ्या हवाली केली त्याच महिन्याच्या दिनांक २२ ला मी शहरात प्रवेश केला आणि दिनांक २३ पासून राज्य कारभार पाहाण्यास सुरूवात केली.

सामुद्रधुनीच्या (स्ट्रेट) आरमाराचे सेनापती दों. लोपु झुंजे द आल्मैद हे निधन पावले. त्यांच्या मृत्यूमुळे ह्या राज्याची मोठीच हानी झाली आहे. मावळते व्हाइसरॉय काउंट द एरिसैरा ह्यांनी त्यांचे जागी दों. ज्यु आंव द आल्मैद ह्यांची नेमणूक केली आहे. उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु ह्यांच्या कारकीर्दीची मुदत संपली असल्याने मावळते व्हाइसरॉय काउंद द एरिसैरा ह्यांनी त्याचे जागी साष्टीचे सेनापती दों. आंतोनियु कारकु द मेलु ह्यांची नेमणूक केली आहे. ही नेमणूक योग्य अशीच आहे. ह्यात तिळमात्रही संदेह नाही. लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु ह्यांची गोव्याच्या दरबारात मेश्त्र द कांपु (Mestre de campo) म्हणून नेमणूक झाली आहे. साष्टीचे सेनापती म्हणून मी लुईज द मेलु द सांपायु ह्यांची नेमणूक केली आहे. हे पूर्वी उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर होते व तेथे त्यांनी एक श्रेष्ठ दर्जाचा सेनाधिकारी म्हणून लौकिक संपादन केला होता.

उत्तरेकडील ठाण्यांच्या सेनापतींनी कळविले आहे, की, त्या ठाण्यांच्या डागडुजीची अत्यंत आवश्यकता आहे. त्या ठाण्यांच्या डागडुजीसाठी मी खर्च मंजूर केला आहे.

ह्या राज्याचा व्यापार जवळ जवळ नष्ट झाला आहे, व त्यामुळे महाराजांचा खजिना रिकामा पडला आहे. कारण व्यापार बंद पडल्याने जकातीचे उत्पन्न गेले आहे.

कान्होजी आंग्रे हा एक मोठा चांचा असून हिंदी सागरावर त्याचा दरारा आहे. महाराजांच्या आशिया खंडातील प्रजाजनांच्या नाशास हा चांचा

कारणीभूत आहे. त्यांच्या निर्दालनाचा निर्धार मी केला आहे. महाराजांनी मावळते व्हाइसरॉय काउंट द एरिसैरा ह्यांना पत्र घालून आंग्र्यांचा नाश करण्याची संधी दवडू नये असे त्यांना कळविले होते. ह्या चाच्यांचा परवाना असल्याशिवाय कुठल्याही व्यापाऱ्यास जहाजाला उत्तरेकडील समुद्रात संचार करता येत नाही. दर वर्षी आंग्र्याला ७ लक्ष रुपये कर मिळतो. कर भरला तरच जहाजे सुरक्षित राहातात. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून मी आंग्र्यांची राजधानी कुलाबा घेण्याची एक योजना आखली. ही मोहीम मी उत्तरेकडील आरमाराकडे सोपविली. हे आरमार तिकडे दर वर्षी जात असावे. ह्या आरमारात मी दोन नवीन फ्रिगेटची भर घातली. ह्या आरमारी तुकडीत आठशे युरोपियन आणि उत्तरेकडील पाचशे देशी सैनिक भाग घेणार होते. आरमारातील सर्व अधिकारी युरोपियन होते. व सर्व प्रकारची युद्ध सामुग्री ह्या आरमाराला पुरविण्यात आली होती. ह्या आरमारी तुकडीवर मी आंतोनियु कार्दिम फ्राइश ह्यांची सेनापती म्हणून नेमणूक केली. ही नेमणूक योग्य अशीच होती. कारण कार्दिम हे एक नाणावलेले शिपाईगडी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांची बरीच वर्षे उत्तरेकडे गेली असल्याने त्यांना त्या प्रदेशाची खडानखडा माहीती आहे. ह्या शत्रूशी ते अनेकदा लढले असल्याने त्यांच्या विषयी सगळ्यांना आदर वाटतो. त्यांच्या नेतृत्वाविषयी संशय घेतला जाऊ नये म्हणून त्यांची उत्तरेकडील आरमाराचे कापितांव मोर म्हणून नेमणूकही केली. ही आरमारी तुकडी इंग्रजांच्या मदतीला जाणार होती.

हल्ल्यात भाग घेणाऱ्या नौका एकूण पासष्ट होत्या. परंतु त्यातील तेरा कुलाब्यानजीक पोहोचल्या.

कुलाब्याच्या शिबंदीत फारच थोडे सैन्य होते. मला गुप्तहेरांकडून मिळालेल्या बातमीप्रमाणे तेथे अवघे दीडशे सैनिक होते. उत्तरेकडील आर-माराच्या सेनापतीनेही त्या बातमीला दुजोरा दिला. शिबंदीत सैन्य कमी असलेले पाहून आमच्या लोकांना आनंद झाला. त्यांनी ती रात्र मौज मजा करण्यात घालविली.

आरमार कुलाब्याच्या अगदी जवळ येऊन पोहोचले होते. दैव आमच्या बाजूला आहे अशी सेनापतींची समजूत झाली होती. परंतु पुढे जे काय घडले त्याविषयी पुष्कळ विचार करण्यासारखा आहे. स्वामीच्या शाही सैन्याला जे काय शक्य झाले नाही त्याला दोन पळपुटे कारणीभूत झाले. त्यातील एक इकडचा आणि दुसरा उत्तरेकडील आहे.

काल उत्तरेकडून इकडे एक फ्रिगेट आले आहे. आमचे उत्तरेकडील फौजांचे सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांनी कळविले आहे, की, आंग्र्यांने

कोणताच बदल केलेला नाही. तो काळजीपूर्वक वागत आहे. तो परवान्या-शिवाय कुठल्याच जहाजांना संचार करू देत नाही.

मराठे तूर्त शांत आहेत. त्यांनी कल्याण आणि भिवंडी ह्या दोन्ही प्रांतावर स्वामीत्व प्रस्थापित केले आहे. त्यांचे आणि मोगलांचे युद्ध आता संपलेले आहे. परंतु हे युद्ध शस्त्रबलाने संपलेले नसून त्याचे लाचलुचपतीने संपलेले आहे. मराठ्यांनी मोगल सरदारांना पैशाची लाच चारून त्यांच्या हालचाली बंद पाडल्या आहेत. आता ते मोगलांकडील कुरापत काढणार की काय अशी भीती वाटू लागली आहे. आणि म्हणून काळजी घेणे भाग पडले आहे. आणि हे युद्ध आंग्रेच उपस्थित करील अशी चिन्हे दिसत आहेत. ह्यासंबंधीच्या वार्ता माझ्या कानी आल्या आहेत. परंतु त्यांना अद्याप दुजोरा मिळालेला नाही. ह्या बाबतीत मी आपणाला पुढच्या पत्री लिहीन. दाभाडे दमण जिल्ह्यात शिरला. त्याने परेरीच्या किल्ल्यास वेढा घातला होता. थोड्याशा सामर्थ्याच्या बळावर मराठे आम्हास धावपळ करण्यास लावणार की काय अशी भीती वाटू लागली आहे. म्हणून महाराजांना माझी विनंती आहे, की, त्यांनी जास्तीत जास्त कुमक पाठवून ह्या राज्याला मदत करावी. मला भीती वाटते की, आंग्रे आणि मराठे ह्या दोघांची युती होऊन आमचे सामर्थ्य विभागले जाईल. कारण मराठ्यांना माहीत आहे की, आमचे उत्तरेकडील सामर्थ्य विभागले गेले नसल्यास आम्ही त्यांना भारी आहोत. म्हणून महाराजांना माझी प्रार्थना आहे, की, ह्या राज्याच्या रक्षणा-साठी त्यांनी ताबडतोब कुमक धाडावी.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्याला सुखी ठेवो."

गोवा, २२ जानेवारी १७२१.

(LIVRO DAS MOCEONS, No. 86, FLS 606).

गोव्याच्या व्हाइसरॉयचा असा दावा आहे की, आंग्र्यांनी त्यांच्याकडे एका पाद्रीमार्फत तहाचा प्रस्ताव पाठविला. आंग्र्यांच्या पत्राला त्याने पुढील उत्तर पाठविले :

"कान्होजी आंग्रे सरखेल ह्यांस—

चौलहून इकडे आलेल्या एका जहाजातून फ्रेइ ह्या नावाचा एका भिक्षू आला असून त्याने आमच्याकडे आपले एक पत्र आणले आहे. ह्या पत्रातील मजकर वाचल्यावर मला आनंद झाला.

हया पत्रातील माहिती मला इतकी नवीन आहे की, तिच्या कारणांचा शोध लावणे मला अशक्य आहे. हया धर्मोपदेशकाने आपणाला ती कारणे सांगितलीच असतील. त्यांने आपल्या राज्यासंबंधीच्या कर्तव्य बुद्धीने ही नसती उठाठेव केली असेल असे मला वाटत नाही. हया उठाठेवीबद्दल तो शिक्षेस पात्र आहे. त्याला मी त्याच्या वरिष्ठांच्या हवाली केले असते, परंतु पत्रात एक चांगली गोष्ट आहे म्हणून त्याची गय करावी लागत आहे. आपण पत्रात म्हणता की, आमच्याशी तह करण्याची आपली इच्छा आहे. आपण तहाची कलमेही पाठविली आहेत. आमच्याशी तह करण्याची जर आपली मनःपूर्वक इच्छा असेल तर मी जी पाच कलमे आपणाकडे पाठवित आहे त्यांना मान्यता द्यावी.

आपला निर्णय हया दरबारात दिनांक १५ पर्यंत पोहोचावा. हया मुदतीत तो आला नसल्यास मला माझ्या निर्णयाप्रमाणे वागणे भाग पडेल. आपणास ते आवडणार नाही. परंतु त्यात मुळीच बदल करण्याची माझी इच्छा नाही.

देव आपले भले करो."

गोवा, २३ एप्रिल १७२१. फान्सिश्कु झुजे द सांपायु इ कास्त्रु.

(39) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 8, FLS 106V.

काही पोर्तुगीज सैनिक वाडीकर भोसल्यांच्या राज्यात पळून गेले होते त्या पळपुट्या पोर्तुगीज सैनिकांना भोसले आणि पोर्तुगीज हयांच्यामधील तहाच्या कलमांप्रमाणे भोसल्यांनी परत करायचे होते. त्याप्रमाणे बार्देशच्या सेनापतीने त्यांची भोसल्यांकडे मागणी केली असता फोंडू सावंत भोसले हयांनी त्यास नकार दिला. तत्संबंधाने व्हाइसरॉयने पुढील पत्र धातले.

"कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले हयांस—

बार्देशच्या सेनापतीने मला कळविले आहे की, हया शहरातून फरारी झालेले काही पोर्तुगीज सैनिक आपल्या राज्यात जाऊन राहीले आहेत. त्यांनी त्या सैनिकांना परत करण्याची आपणाकडे मागणी केली असता, आपण त्यांना परत केले नाही. आणि वर सांगितले, की, ते पळपुटे पोर्तुगीज सैनिक आपल्या राज्यात नाहीत. हया सैनिकांचा तपास करण्यासाठी काही खात्रीचे लोक आम्ही तिकडे पाठविले होते. त्यांनी बातमी आणली आहे की, ते सैनिक वाडी येथे आहेत, मला सरदेसाई फोंडू सावंत हयांच्या निदर्शनास आणायचे आहे, की, हया सैनिकांना परत करण्यास त्यांनी नकार देऊन त्यांच्या वडिलांमध्ये

आणि ह्या राज्यांमध्ये झालेल्या कराराचा भंग केला आहे. खुद्द फोंडू सावंत ह्यांनीही ह्या कराराला मान्यता दिली आहे. ह्या कराराप्रमाणे फोंडू सावंत भोसले ह्यांनी फरारी पोर्तुगीज सैनिकांना आमच्या हवाली केले पाहिजे.

हा करार माझ्या पूर्वीच्या सर्व व्हाइसरॉयांनी काटेकोरपणे पाळला आहे, आणि मीही तो पाळीत आहे. फोंडू सावंत ह्यांचा मुलगा नागू सावंत ह्याने माझ्याकडे आपल्या बापाविरुद्ध युद्ध करण्यास मदत मागितली असता मी ती त्याला नाकारली होती. आणि त्याचे कारण म्हणजे आमच्यामधील करार होय. तरी फोंडू सावंत ह्यांना बजावण्यात येत आहे की, त्या करारप्रमाणे त्यांनी आमच्या सैनिकांना आमच्या हवाली करावे. न झाल्यास त्यांनी जो ह्या कराराचा भंग केला आहे, त्याबद्दल त्यांना योग्य ती अद्दल घडविली जाईल".

गोवा, २६ जून १७२१. फ्रान्सिस्कु झुजे द सांपायु इ कास्त्रु.

(40) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 8, FLS 107.

पोर्तुगीज आणि इंग्रज ह्या दोघांचा आंग्र्यांविरुद्ध जो मैत्रीचा करार झाला त्या करारातील काही कलमे पुढीलप्रमाणे आहेत :—

(१) इंग्लंड आणि पोर्तुगाल ह्या दोन्ही राष्ट्रांनी आशिया खंडातील मोगल, पर्शिया, अरेबिया आणि चीन ही राष्ट्रे वगळून आशिया खंडातील इतर सर्व राष्ट्रांविरुद्ध बचावात्मक आणि आक्रमक अशी एक जूट करायची. त्यांनी आंग्र्यांचा नाश होईपर्यंत त्यांच्याशी युद्ध करायचे. आंग्र्यांनी तहाची मागणी केली असताही त्यांच्याशी तो करायचा नाही.

(२) कुलाब्याचा किल्ला आणि त्याच्या कक्षेतील मुलुख पोर्तुगालला प्राप्त व्हावा. कुलाब्याला जर इंग्रज प्रजाजनांची राहाण्याची इच्छा असली तर त्यांच्यासाठी एक घर असावे. ग्रियेंचा किल्ला आणि त्याच्या कक्षेतील मुलुख इंग्लंडला प्राप्त व्हावा. तेथे राहाण्याची पोर्तुगिज प्रजाजनांची इच्छा असल्यास त्यांच्यासाठी एक घर असावे.

(३) इंग्रजांना जर ग्रियेंचा किल्ला पाडून जमीनदोस्त करायचा असेल, तर ते त्यांना दोन्हीही राष्ट्रांच्या संमतीने करता येईल. किल्ला पाडण्यात आला तर त्यातील दारूगोळा आणि तोफखाना उभयता राष्ट्रांनी आपसामध्ये विभागून घ्यावा.

(४) कुलाब्याचा किल्ला पाडण्यात आला तर त्यातील सामानाचा अर्धा हिस्सा आणि खांदेरी बेट इंग्रजांना मिळावे.

गोवा, २० ऑगस्ट १७२१. ज्युआंव रोईश माशादु.

(43) LIVRO DAS MONCOES, No. 88, FLS 74.

इंग्रज आणि पोर्तुगीज ह्या दोघांनी आंग्र्यांचा नाश करण्याचा जो करार केला. त्यातील काही कलमे वर देण्यात आलीच आहेत. त्या कराराप्रमाणे गोव्याचा व्हाइसरॉय आरमार आणि सैन्य घेऊन उत्तरेकडे गेला. तिथून त्याने हंगामी गव्हर्नर जनरल आर्चबिशप प्रिमश ह्यांना जे पत्र लिहिले ते पुढील प्रमाणे आहे :—

"आर्च बिशप प्रिमश ह्यांस—

माझा प्रवास एकंदरीत सुखकर झाला. सुमारे नऊ दिवसांनी मी इकडे येऊन पोहोचलो. आंग्र्यांवरील कारवाई संबंधाने आम्ही खल केला असता मी असे मत प्रतिपादीत केले की, ह्या ठिकाणी म्हणजे चौलला गोव्याचे उत्तरेकडील आणि मुंबईचे सागरी तसेच जमिनीवरील सैन्य गोळा व्हावे कारण हे सर्व सैन्य एकत्र गोळा झाल्याशिवाय संयुक्त हालचाली सुलभ होणार नाहीत.

आंग्र्याकडील जी बातमी आम्हाला कळली आहे तिच्यावरून असे कळून येते की, कुलाब्याच्या रक्षणाची तयारी त्यांनी कडेकोट केलेली आहे. त्या ठिकाणी एकूण एक हजार सैन्य असून त्यात सातशे घोडेस्वार आणि दोन अथवा तीन हत्ती आहेत. गेल्या बुधवारी नदीत थोडे घोडदळ आणि पायदळ आले.

काल उत्तरेकडील सेनापतीला आंग्र्यांचे एक पत्र आले. त्यात त्यांनी तहाची मागणी केली आहे. मी त्या पत्राचे उत्तर पाठविण्याचा हुकूम दिला. आंग्र्यांचे पत्र घेऊन आलेल्या दूताकडे अधिकार पत्र होते. उद्या मी इथल्या लष्करी व्यवस्थेची पहाणी करणार आहे.

इंग्रज आपल्या सागरावरील आणि जमिनीवरील सैन्यासह शनिवारी इकडे येऊन दाखल होणार आहेत. ह्या घटकेपर्यंत जे काय घडले आहे ते मी आपणाला ह्या पत्रातून सादर केले आहे. आपण इथल्या बातम्या जाणून घेण्यासाठी फार उत्सुक असाल म्हणून हे पत्र लिहित आहे".

चौल, ६ डिसेंबर १७२१.

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(46) LIVRO DAS CARTAS ORDENS E PORTARIAS. No. 13, FLS 7v.

आंग्र्यांवर स्वारी करण्यासाठी पोर्तुगीजांच्या चौल येथील बंदरात इंग्रजांचे जे सैन्य आले, त्या सैन्याचे स्वागत करून गोव्याच्या व्हाइसरॉयने इंग्रज

सेनापतीला पुढील पत्र पाठविले.

इंग्लंडच्या राणीच्या फौजांचे सेनापती रॉबर्ट............ ह्यांस—

आपण ह्या बंदरात सुखरूप येऊन पोहोचल्याचे कळून फार आनंद झाला. आरमाराच्या कमांडरनाही माझे अभिवादन कळवावे.

शत्रूच्या गोटातील बातमीप्रमाणे आमची एक बैठक भरवून तीत सैन्य उतरविण्यासंबंधीचा खल करण्याची आवश्यकता आहे. आपले सैन्य उद्या इथे उतरायचे की ते आमच्या इथल्या सैन्यासह एकदम कुलाब्याच्या उत्तरेस नेऊन तिथे उतरायचे, त्याचा विचार करण्याची फारच जरूरी आहे. तरी ह्या महत्त्वाच्या प्रश्नावर आपले मत प्रकट करण्यासाठी आपण इकडे उतराल अशी आशा आहे. आपल्या सेवेस मी माझ्या इच्छेने हजर आहे.

देव आपणाला उदंड आयुष्य देवो ".

चौल येथील छावणी, १० डिसेंबर १७२१.

आपला सेवक

फ्रान्सिस्कु झुजे सांपायु इ कास्त्रु

(47) LIVRO DAS CARTAS E ORDENS E PORTARIAS, No. 13, FLS 13.

गोव्याच्या व्हाइसरॉयच्या खालील पत्रावरून अँग्लो-पोर्तुगीज फौजा कुलाब्याच्या उत्तरेस उतरल्या असाव्या असे वाटते. परंतु त्या ठिकाणी व्हाइसरॉय आजारी पडल्याचा बहाणा करून म्हणा किंवा तिथे सुरक्षितता न वाटल्याने म्हणा आपल्या जहाजावर गेला. त्याने जहाजावर जाताना ब्रिटिश फौजांच्या सेनापतीस पुढील पत्र पाठविले :

इंग्लंडच्या राणीच्या फौजांचे सेनापती रॉबर्ट.............. ह्यांस—

ह्या पत्रानुसार मी आपणास कळवित आहे की, माझा ताप वाढल्याने मला आज रात्री रक्तस्त्राव करून घेण्यासाठी जहाजावर जावे लागत आहे. ईश कृपेने मी बरा झालो, तर लगेच छावणीत परतणार आहे. त्या दरम्यान माझ्या गैरहजेरीत आमच्यामध्ये ठरल्याप्रमाणे आमच्या आणि आपल्या फौजांवर आपण एक दिवस देखरेख ठेवावी. दुसऱ्या दिवशी ही देखरेख आमचे उत्तरेकडील फौजांचे सेनापती बघतील. अशा रीतीने मी बरा होईपर्यंत ही देखरेख

आपण दोघांनी आळीपाळीने करावी. आपणाविषयी मला फार आदर वाटत असल्याने आपणाला हा मान मिळावा अशी माझी इच्छा आहे.

देव आपणाला उदंड आयुष्य देवो".

अलिबागची छावणी, दि. २६ डिसेंबर १७२१.

आपला सेवक
फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(48) LIVRO DE CARTAS E OHDENS E PORTARIAS, No. 13, FLS 19.

गोव्याच्या व्हाइसरॉय अलिबागला पोर्तुगीज फौजांच्या छावणीत आजारी पडल्याचा उल्लेख त्याच्या वरील पत्रात आलाच आहे. त्याने आपल्या नौकेवरून आपल्या सेनाधिकाऱ्यांना मार्गदर्शन करण्यास सुरूवात केली.

"उत्तरेकडील फौजांचे सेनापती दों. आंतोनियु काश्त्रु इ मेलु ह्यांस—

आपले पत्र मिळाले. पत्रातील मजकुराप्रमाणे मला आपणास सांगायचे आहे की, एक गोष्ट सोडून बाकीचे सर्व आपल्या मर्जीप्रमाणे करावे.

काल रात्री मला कळलेल्या बातम्या मी छावणीत पाठविल्या. मी छावणीपासून जवळ होतो. म्हणून आज सकाळी नौकेला शिडे चढविण्यास लावून ती इथे आणून उभी करावयास लावली.

आमच्या तोफखान्याची सरबत्ती म्हणण्यासारखी नाही असे मला वाटते. तोफांचा जोर वाढला तर गोळे किल्ल्यावर आणि अलिबागवर पडले पाहिजेत. माझे गोवर आहेत तसेच आहेत. रक्तस्त्राव चार वेळा करण्यात आला. इतर उपायही चालू आहेत. बघूया मी छावणीत लवकर परततो की काय ते. ह्याशिवाय मला आणखी काही सांगायचे नाही. कारण आपण जे काय करता ते समाधानकारक असल्याने मला आपणाला आणखी काही सांगायचे नाही. मला आणखी काही सांगायचे असल्यास पुढच्या पत्रात सांगेन".

नोस्सा सिञ्योरा द पियेदार नौका, २८ डिसेंबर १७२१.

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु.

(49) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. B13, FLS 20.

पोर्तुगीज आणि इंग्रज ह्या दोघांची कुलाब्यावरील स्वारी यशस्वी झाली नसावी. गोव्याचा व्हाइसरॉय समुद्रात राहून अँग्लो-पोर्तुगिजांना मार्गदर्शन करीत होता. त्याने पोर्तुगिजांच्या सेनापतीला जे पुढील पत्र पाठविले त्यात त्याने त्याला कुलाब्याच्या छावणीतून तोफखाना आणि घोडदळ काढून घेण्याचा हुकूम केला आहे:

उत्तरेकडील फौजांचे सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस---

आपण जे काय मला लिहिले ते कळले. आपण निर्णय शक्य तितक्या लवकर घ्यावा. ब्रिटिश आरमाराच्या दर्यासारंगाना मी आजच कळविले आहे की, ते जो निर्णय घेतील तो मला मान्य आहे. मला वाटते सर्व धोका पत्करून छावणीची तटबंदी लवकर केली पाहिजे. सर्व सामान नौकांमध्ये भरावे आणि घोडदळ चौलला पाठवून द्यावे. ह्याच नौकांनी परत येऊन भारी तोफखाना आणि हलका तोफखाना घेऊन जावा. लाँची, गलबते आणि मचवे ह्यांच्यामध्ये पायदळ भरावे. आणि ह्याच पायदळाच्या सरबत्तीखाली परिस्थितीला अनुरूप असेल ते करावे, कारण, इथे राहून पुढे काय होणार आहे ते मी सांगू शकत नाही. शस्त्र वैद्याला पाठवीत आहे. कमांडर जमिनीवर आहे. त्याच्याशी सल्लामसलत करुन आपल्या मताप्रमाणे वागावे. माणसांच्या मुक्तीपलीकडे आम्हाला आणखी कशाकडेच बघायचे नाही. जे काय नेता येणार नाही ते जाळून टाकावे. फक्त पाण्याचा तेवढा नाश करू नये. गुरे आणि घोडे मारून टाकावे.

देव आपले रक्षण करो".

डिसेंबर, १७२१

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(50) LIVRO DAS CARTAS ORDENS E PORTARIAS. No. 13, FLS 40.

गोव्याच्या व्हाइसरॉयने खालील पत्रात उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापतीस कुलाब्याहून सैन्य काढून घेण्याबाबत सूचना केली आहे:

"उत्तरेकडील फौजांचे सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस---

मी ज्या परिस्थितीत आहे, त्या परिस्थितीत मला जे काय सांगणे शक्य आहे ते मी सांगत आहे. ज्याअर्थी, सैन्य काढून घेण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, त्याअर्थी, माझी आपणाला सूचना आहे की, आपण इंग्रज आरमाराच्या कमांडरच्या सूचनांप्रमाणे वागावे. माझी अशी समजूत आहे की, गोष्टी जर

सावकाश आणि चिकाटीने पार पडल्या, तर कार्य यशस्वी झाल्यावाचून राहाणार नाही. आणि जर अशा रीतीने कार्य केले नाही, तर ते फुकट जाईल अशी मला भीती वाटते. सैन्य पाण्यात बुडून मरेल किंवा शत्रूच्या हातात तरी पडेल.

सैन्य काढून घेण्याच्या कामास आज रात्री तोफांच्या सरबत्तीखाली सुरुवात करावी. त्याचप्रमाणे युद्ध नौकांनाही तोफा डागण्यास सांगावे. आणि ज्याअर्थी, कमांडर भूमिवर आहे त्याअर्थी, तो जे काय ठरवील त्याप्रमाणे वागावे.

देव आपले रक्षण करो ".

नोस्सा सिंज्योरा द पियेदाद नौका, ३० डिसेंबर १७२१.

**ता. क.** ब्रिटिश फौजांच्या सेनापतीचा आणि सल्लागार मंडळाचा निर्णय टिपून घेतलेला बरा. त्याच्या खाली सगळयांच्या सह्या घ्याव्या.

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(51) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 21ᵛ.

आंग्लो-पोर्तुगीज फौजांनी आंग्र्यावर जी स्वारी केली तीत बाजीराव पेशवे ह्यांनी आंग्र्यांच्या बाजूने हस्तक्षेप केल्यामुळे आंग्लो-पोर्तुगिजांना कुलाब्याहून माघार घ्यावी लागली. ह्या संबंधी गोव्याचा व्हाइसरॉय ब्रिटिश आरमाराच्या दर्यासारंगाला लिहितो :

" ब्रिटिश आरमाराचे दर्यासारंग थॉमस मथ्यु ह्यांस—

आपले कृपा पत्र मिळाले. मला असे वाटते की, युद्ध मंडळाच्या शेवटच्या बैठकीत जो निर्णय घेण्यात आला तो निर्णय अमलात आणण्यापूर्वी बाजीरावांनी कबूल केल्याप्रमाणे आज संध्याकळपर्यंत वाट पाहिलेली बरी. मी आमच्या उत्तरेकडील फौजांच्या सेनापतीस पत्र लिहून सैन्य काढून घेण्याचा हुकूम केला आहे.

देव आपणाला पुष्कळ वर्षे आयुरारोग्य देवो ".

नोस्सा सिंज्योरा पियेदाद नौका, ३१ डिसेंबर १७२१.

आपला सेवक,

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(52) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 22.

आंग्र्यांना बाजीरावाची कुमक येताच पोर्तुगीज व्हाइसरॉय आजारीपणाचे सोंग घेऊन समुद्रात आपल्या नौकेवर जाऊन राहिला. तिथून त्याने मुंबईच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहिले :

"मुंबईचे सेनापती ह्यांस—

मी छावणीमध्ये आजारी पडल्याने मला औषधपाण्यासाठी ह्या नौकेवर येऊन राहाणे भाग पडले. माझी शुश्रुषा छावणीत नीट होत नव्हती म्हणून मला इकडे येण्याचा निर्णय घ्यावा लागला.

इकडे आल्यावर मला लागोपाठ दोन पत्रें आली. त्यांतील एक पत्र छावणीतील होते. त्यात शत्रूला कुमक आल्याची बातमी होती. दुसरे पत्र दिवाणाचे होते की, जे आपण आपले सेनापती रॉबर्ट कोइव्हन ह्यांना लिहिले होते. ते पत्र मिळताक्षणी मी छावणीला पत्र लिहून दोन्ही लष्करांतील वरीष्ठ अधिकाऱ्यांची एक बैठक भरविण्याची सूचना केली. माझ्या सूचनेप्रमाणे ती बैठक भरविण्यात येऊन कुलाब्याचा किल्ला घेण्याच्या मार्गात ज्या अडचणी होत्या त्यांचा तीत उहापोह करण्यात आला. शत्रूला त्याच्या दोस्तांकडून मोठी कुमक आल्याने परिस्थितीत पुष्कळच बदल झाला आहे. प्रस्तुत बैठकीत असे ठरले की, शत्रू मोठा असल्याने त्याच्यासमोर आमच्या फौजांचा निभाव लागणे कठीण आहे, म्हणून फौजा काढून घेतलेल्या बऱ्या. कारण, पराभव होण्यापेक्षा मानाने सैन्य काढून घेणे केव्हाही बरे. माघार समुद्रातून घ्यावी, जे काय काढून घेणे शक्य आहे ते घ्यावे व जे काय मागे राहील ते जाळून टाकावे असे ठरले. हा निर्णय………… डिसेंबर, १७२१ रोजी घेण्यात आला. त्याच्यावर दोन्हीही फौजांच्या सेनापतींच्या व युद्ध मंडळावरील इतर अधिकाऱ्यांच्या सह्या आहेत.

अशाच परिस्थितीत मी आणखी एका मार्गाचा अवलंब करण्याचे ठरविले. मी दिवाणाला कळविले की, मी दुसऱ्या दिवशी बाजीरावाकडे सल्ला मसलत करण्यासाठी एक दूत पाठवित आहे. त्याच वेळी मी जनरल कोइव्हन ह्यांना सूचना केली की, त्या बाजूला काय घडत आहे, त्याचा कानोसा घेण्यासाठी त्यांनी आपला एक मनुष्य तिकडे पाठवावा. आणि मी आमच्या उत्तरेकडील सेनापतींना कळविले की, माझा दुसरा हुकूम येईपर्यंत युद्ध मंडळाचा निर्णय तहकूब ठेवावा. मला वाटते ब्रिटिश आरमाराच्या दर्यासारंगानाही मी असेच सांगितले.

अजून पर्यंत तरी दिवाणाकडून जबाब नाही. त्याच्या जबाबाची आम्ही वाट पहात आहोत.

शत्रूची तयारी जर मोठी असेल, तर काही हालचाल करणे अव्यवहार्य आहे. परंतु त्याची जबाबदारी माझ्यावर नाही. कारण, मी इथे वीस दिवसापूर्वीच येऊन राहिली आहे. आम्ही ज्या तयारीने बाहेर पडलो ती तयारी येथेही होती. दिरंगाईची कारणे आपणाला कळलीच असतील. त्यांचा मी निर्देश करण्याची आवश्यकता नाही. तथापि, आपण निश्चित असावे की, आपले जे काय ठरले आहे, त्याच्याविरुद्ध काही होणार नाही. तूर्त तरी मी आपणाला एवढे आश्वासन देऊ शकतो.

देव आपणाला पुष्कळ वर्षे आयुरारोग्य देवो".

नोस्सा सिंज्योरा द पियेदाद नौका, १ जानेवारी १७२२

आपला सेवक,

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(53) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 22v.

कुलाब्याचे आंग्लो-पोर्तुगीज सैन्य काढून घेण्याचे ठरले होते. परंतु सैन्य काढून घेण्याचा निर्णय घेतल्यावर गोव्याच्या व्हाइसरॉयच्या मनात असा विचार आला की, सैन्य काढून घ्यायचेच झाले तर ते बाजीरावाशी तह करून मानाने काढून घ्यावे. म्हणून त्याने आपल्या सेनापतीस कळविले की, बाजीरावाशी होणाऱ्या वाटाघाटी चालू असेपर्यंत सैन्य काढून घेऊ नये.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनिक काश्कु इ मेलु ह्यांस—

आज इंग्रज सेनापती मला इकडे भेटावयास आले होते. त्यांनी मला शत्रूच्या आणि आमच्या छावणीतील हालअहवाल कळविली. आपण तावडतोब छावणीत जाणार असे ते मला म्हणाले होते. ते तिकडे आपणाला भेटलेच असतील. आम्ही तिकडे आमचे सैन्य आणखी काही दिवस तरी भीती दूर सारून ठेवले पाहिजे. तसे करणे हे आमच्याच फायद्याचे आहे. त्या दरम्यान आम्हाला बाजीराव ह्यांच्याशी मानाचा तह करणे शक्य आहे की काय ते बघितले पाहिजे. आमच्या माघारीच्या दृष्टीनेही ते फायद्याचे आहे. कारण तह झाला तर आपण यशस्वी माघार घेऊ शकू. न झाल्यास माणसांची आणि सामानाची हानी अटळ आहे.

बाजीराव ह्यांचे सासरे आज आले नाहीत. मला वाटते आज हिंदूंचा एखादा सण असावा. ते रविवारी नक्कीच येतील असे वाटते. तोपर्यंत दोन्ही

छावण्यांमध्ये शांतता नांदायची आहे. कारण, चौलच्या दिवाणाने बाजीराव हयांच्यावतीने उभय पक्षांमध्ये युद्धबंदी असावी अशी मागणी केली आहे. आम्ही युद्धबंदी केली तर शत्रूही ती करील.

गोळीबार किंवा तटबंदी खरोखरच स्थगित करण्यात आली आहे की काय त्याची पहाणी करण्यासाठी बाजीरावांची पाच माणसे आमच्या छावणीत यायची आहेत. आमचीही पाच माणसे आम्ही त्यांच्या छावणीत पाठवायची आहेत. ही मागणी मी मान्य केली आहे. बाजीराव हयांच्याकडील पाच माणसे पांढरे निशान घेऊन येणार आहेत. त्यांच्या राहाण्याची व्यवस्था आमच्या छावणीतील हिंदु मंदिरात करावी. ती माणसे येऊन गेल्यावर आमची पाच माणसे पोर्तुगीज तीन आणि इंग्रज दोन–बाजीराव हयांच्या छावणीत पाठवून द्यावी. बाजीराव हयांच्या छावणीत काय चालले आहे, युद्धबंदी खरोखरच अमलात आहे की नाही, त्याची पाहाणी हया पाच माणसांनी करायची आहे. तोपर्यंत आमच्या लोकांचे नैतिक धैर्य खचू नये म्हणून त्यांना उत्साही ठेवण्याची खटपट करावी. त्यांना सांगावे की, युद्ध होणार आहे. असे सांगितल्याने त्यांचे युद्धाकडे दुर्लक्ष होणार नाही.

सर्जन मोरची इकडे आवश्यकता नाही. जखमी सैनिकांसाठी त्यांची जरूरी असण्याची शक्यता आहे, म्हणून त्यांना छावणीत पाठवून देत आहे.

देव आपले रक्षण करो".

नोस्सा सिंज्योरा द पियेदाद नौका, २ जानेवारी १७२२

फान्सिस्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(59) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 23V

दि. २ जानेवारी १७२२ रोजी भरलेल्या युद्ध मंडळाच्या बैठकीत मांडण्यात आलेला ठराव.

सर्व सेनाधिकाऱ्यांनी सैन्य काढून घेण्याचा ठराव एकमताने मंजूर केला. शत्रू सैन्य आमच्या सैन्याहून अधिक आणि बलाढ्य असल्याकारणाने हा ठराव मंजूर करणे भाग पडले. सैन्य शक्यतो समुद्रमार्गे काढून घ्यावे असे ठरले. सर्व काही दोन्ही सैन्यांच्या सेनापतींच्या संमतीने पार पडावे असा निर्णय घेण्यात आला.

अलिबागची छावणी, ३ जानेवारी १७२२

(55) LIVRO DAS MONCÕES, No. 87, FLS 123

आंग्लो-पोर्तुगीजांनी आंग्र्यावर स्वारी करण्यासाठी कुलाब्याला सैन्य उतरविले. ती वार्ता बाजीरावांना कळताच तो मोठ्या सैन्यानिशी आंग्र्यांच्या मदतीला कुलाब्याला जातीने आला. मराठ्यांचे प्रचंड सैन्य कुलाब्याला हजर होताच आंग्लो-पोर्तुगिजांचे भीतीने धाबेच दणाणले. व त्यांनी कुलाब्याहून काढता पाय घेण्याचे ठरविले. परंतु पळ काढल्याने आपली छी थू होईल ह्या भीतीने त्यांनी चौलच्या दिवाणामार्फत बाजीरावांशी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या. ह्या वाटाघाटी प्रत्यक्ष पोर्तुगीज व्हाइसरॉयशी करण्यासाठी बाजीरावांचा एक दूत व्हाइसरॉयच्या नौकेवर जायचा होता. परंतु तो न गेल्याने व त्या दरम्यान बाजीरावाने आंग्लो-पोर्तुगिजांशी आपण लढणार आहोत अशी घोषणा केल्याची वार्ता व्हाइसरॉयला कळल्याने त्याने त्या गोष्टीचा खरेखोटेपणा बघण्यासाठी बाजीरावाला पुढील पत्र पाठविले :—

"शाहू राजे ह्यांचे प्रधान व त्यांच्या फौजांचे सरसेनापती बाजीराव ह्यांस—

मी फान्सिस्कू झुजे सांपायु इ कास्त्रु, पोर्तुगालच्या सार्वभौम राजाच्या राज्याचा सल्लागार व त्यांच्या हिंदुस्थानच्या राज्याचा व्हाइसरॉय आणि कॅप्टन जनरल यांजकडून—

शाहू राजे ह्यांचे प्रधान आणि त्यांच्या फौजांचे सरसेनापती माननीय बाजीराव ह्यांस—

चौलचे दिवाण आणि फौजदार तरूद्दिन अलिखान ह्यांनी मला कळविले की, आपण त्यांच्याकडे आपला एक दूत पाठवून त्यांना विदीत केले की, पोर्तुगिजांची आणि मराठ्यांची फार जुनी मैत्री असल्याकारणाने त्याच्याशी लढण्याकरता आपण कुलाब्याला आलो नसून बंडखोर कान्होजी आंग्रे ह्यांना आपले स्वामी जे शाहू राजे ह्यांच्यासमोर नेऊन उभे करण्यासाठी आलो आहोत. म्हणून आम्ही लढाई बंद ठेवावी अशी आपली मागणी असल्याचे सदर्हू दिवाणाने आम्हाला कळविले. ही मागणी आपण आमच्याकडे प्रत्यक्ष आपला दूत पाठवून जरी केली नसली, तरी ज्याअर्थी आपण आमच्याकडे युद्ध बंद ठेवण्याची मागणी अप्रत्यक्षपणे केली त्याअर्थी, आपल्या विनंतीला मान द्यावा म्हणून आम्ही युद्ध बंदी केली. नंतर चौलच्या दिवाणानी आमच्याकडे आपल्यावतीने पुनः मागणी केली की, युद्ध आम्ही खरोखरच बंद ठेवले आहे की नाही त्याची पाहाणी करण्यासाठी आपल्या पाच माणसांना आम्ही आमच्या छावणीत येऊन द्यावे. त्याच्या बदली आमच्या पाच माणसाना आपण आपल्या छावणीत जाऊ देण्यास तयार होता. आपली ही मागणी

देखील आम्ही मान्य केली. दिवाणानी आम्हाला असेही कळविले की, आमच्याशी प्रत्यक्ष वाटाघाटी करण्याकरता आपण महादजी कृष्ण ह्यांना आमच्याकडे पाठविणार आहात. मी दिवाणाना कळविले की, महादजी कृष्ण ह्यांची मी वाट पहात आहे. पण आता दिवाण मला कळवितात की, आमच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्याचा आपला बेत आपण बदलला असून आमच्याशी आंग्र्यांच्या बाजूने लढण्याचा आपला विचार आहे.

दिवाणाच्या पत्रावर अर्थात माझा विश्वास बसला नाही म्हणून मी आपल्या विचारांचा शहानिशा करण्यासाठी आपणाला हे पत्र लिहित आहे. तरी दिवाणांनी मला जे काय लिहिले आहे ते खरे की खोटे त्याचा खुलासा करावा. कारण मला न्याय आणि नीती ह्यांविरुद्ध वागायचे नाही."

नाव कापितानिया सिंज्योरा द पियेदाद,

३ जानेवारी १७२२

फान्सिश्कु झुजे द सांपायु

(56) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 24V

व्हाइसरॉयच्या उपरिनिर्दिष्ट पत्राला बाजीरावाकडून उत्तर आल्याने त्याने बाजीरावाला पुढील पत्र पाठविले.

शाहू राजे ह्यांचे सरसेनापती आणि प्रधान बाजीराव ह्यांस—

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु, पोर्तुगालच्या राजाच्या राज्याचा सल्लागार आणि त्याचा व्हाइसरॉय आणि हिंदुस्थानचा कॅप्टन जनरल.

शाहू राजे ह्यांचे प्रधान आणि सेनापती बाजीराव ह्यांस—

मी आपणास आयुरारोग्य इच्छितो. मी आपणाला जे पत्र पाठविले होते, त्याचे आपण केलेले उत्तर मिळाले. त्या पत्राप्रमाणे मी सेनापती दों. आंतोनियु काश्कु व रॉबर्ट कोइव्हन ह्या दोघांना सूचना पाठवित आहे की, बैठक चालू असेपर्यंत आपले पाच लोक आमच्या छावणीत असतील व आमचे पाच लोक आपल्या छावणीत असतील. दोन्हीही बाजूंच्या प्रतिनिधींना मदत करण्यासाठी आणखी काही सल्लागारांची नेमणूक करण्यास हरकत नाही. माझ्यावतीने मी सेनापती आंतोनियु कार्दिम फॉईश ह्यांची माझा प्रतिनिधि म्हणून नेमणूक करीत आहे. दुसरा प्रतिनिधी आमच्या दोस्तांचा असेल. सदरहू सेनापतीला मी ह्या वाटाघाटी पार पाडण्याचा पूर्ण अधिकार देत आहे.

आपणाविषयी मला नेहमीच आदर वाटत आला आहे, आणि आपले स्वामी शाहूराजे ह्यांच्याशी तर आमच्या राज्याचे मैत्रीचे संबंध आहेतच. हा प्रश्न जर सलोख्याने मिटला नसता, तर तो शस्त्रबलाने मिटला असता".

नौका कापितानिया नोस्सा सिंज्योरा द पियेदाद

४ जानेवारी १७२२

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(57) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 24V

तहाच्या वाटाघाटीसाठी आपला प्रतिनिधी म्हणून व्हाइसरॉयने ज्या सेनापतीची नेमणूक केली होती त्याला त्याने पुढील पत्र लिहिले :—

"सार्जंट-मोर आंतोनियु कार्दिम ह्यांस—

आपण जे सांगता ते मला कळते. काही गोष्टी मिळून टाकल्या पाहिजेत अथवा विसरल्या पाहिजेत, हे मला मान्य आहे. म्हणून मला आपणास सांगायचे आहे की, ही परिस्थिती लक्षात घेऊन आपण आंग्ऱ्यांचे म्हणणे ऐकून घ्यावे. तरच आपणाला ही महत्वाची गोष्ट पार पाडता येईल. आपण आता यत्किंचितही वेळ गमाऊ नये. कारण परिस्थितीच मुळी तशी आहे. चौलला गुरे व गाड्या धाडता याव्यात म्हणून सर्व कामे परवान्याने करावी. आज सकाळी काळा (?) येणार आहे. जे काय घडत जाईल त्याप्रमाणे मी आपणास सूचना देत जाईन. आज इतकेच बस आहे".

नौका कापितानिया नोस्सा सिंज्योराद पियेदा द,

७ जानेवारी १७२२.

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(58) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 27

आंग्ऱ्यांशी होणाऱ्या तहाच्या वाटाघाटीसंबंधाने गोव्याच्या व्हाइसरॉयने उत्तरेकडील सेनापतीस पुढील पत्र घातले :—

उत्तरेकडील मुलूखाचे, किल्ल्यांचे, आणि सेनेचे कॅप्टन जनरल दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

कोइव्हनने आपणाला काल जे काय सांगितले त्यापलीकडे त्यांचे मला अद्याप पत्र नाही. मला आपणाशी कबूल करायचे आहे की, ह्या इंग्रजां-

विषयी मला फार भीती वाटते. परंतु इलाज नाही. सर्व गोष्टी मुकाटयाने सोसल्या पाहिजेत. आपण त्यांना ह्या विषयी काही बोलू नये. आंग्रे आपणाशी आणि आंतोनियु कार्दिम ह्यांच्याशी बोलतील. आपण त्यांच्याशी बोलणी करावी. परंतु शेवटचा निर्णय आपणाला इकडे घ्यायचा आहे हे लक्षात असू द्यावे. देव आपले रक्षण करो".

नौका नोस्सा सिंज्योरा द पियेदाद,

७ जानेवारी १७२२

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(59) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 27V

पोर्तुगिजांनी आपली छावणी कुलाब्याहून चौलला हलविण्याचा निर्णय घेतला. तत्संबंधाने व्हाइसरॉय बाजीरावास लिहितो :—

"शाहू राजे ह्यांचे प्रधान व त्यांच्या फौजांचे सरसेनापती बाजीराव ह्यांस—

पोर्तुगालच्या सार्वभौम राजाच्या राज्याचे सल्लागार, त्यांचा व्हाइसरॉय आणि हिंदुस्थानचा कॅप्टन जनरल फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु ह्यांजकडून—

शाहू राजे ह्यांचे प्रधान आणि सेनापती बाजीराव ह्यांस—

सेनापती दों. आंतोनियु काश्कू इ मेलु ह्यांच्याकडून छावणीतील जी बातमी मला कळली आहे, त्यावरून सेनापती आंतोनियु कार्दिम फाइश ह्यांच्याकडे मला माझे सैन्य हलविण्याचे काम सोपवावे लागत आहे. माझ्या सैन्यात सांप्रत रोगराईचा प्रादुर्भाव झाला असल्याने मला छावणी चौलला हलविणे भाग पडत आहे. मी आपणाला कळवू इच्छितो की, आमच्यामधील करारास अनुसरून माझे समुद्रावरील आणि जमिनीवरील सैन्य मी आपल्या दिमतीला देण्यास तयार आहे. मग ते चौलला असो वा अन्य कुठेही असो".

नौका नोस्सा सिंज्योरा द पियेदाद,

७ जानेवारी १७२२

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS28

व्हाइसरॉयने आंग्र्यावरील मोहिमेचा आढावा घेऊन गोव्याचे हंगामी गव्हर्नर आर्चबिशप प्रिमस् ह्यांना पुढील पत्र लिहिले :—

"आर्चबिशप प्रिमस ह्यांस—

आज पावेतो एकही जहाज तिकडे रवाना करणे शक्य झाले नाही. आता दोन पाले पाठवित आहे. ती तिकडील नौकात सामील होऊन दक्षिणे-कडील आरमाराबरोबर जातील.

इकडच्या बातम्या ऐकण्यासाठी सर्वांनाच उत्कंठा लागली असेल, तेव्हा आपणाला ती लागली असल्यास नवल नाही. परंतु इच्छा असून देखील त्या पाठविणे शक्य झाले नाही.

आम्ही चौलहून अलीबागच्या नदीपर्यंत गेलो. आमच्या आड ज्या नौका आल्या त्यांना आम्ही मागे पिटाळून लावले. परंतु नदीच्या मुखात प्रवेश करणे अशक्य होते. कारण पलीकडे शत्रूने तटबंदी उभारली होती. म्हणून आम्ही नदीच्या वरच्या बाजूने आमचा मोहरा वळविला. ओहोटीच्या वेळी पैल-तडीस गेलो व तेथे छावणी ठोकली. दुसरे दिवशी छावणी मोडून अलीबागच्या उत्तरेस असलेल्या एका माडांच्या बागेत जाऊन तळ ठोकला.

दुसरे दिवशी दुपारी चार वाजता पाचशे युरोपियन—इंग्रज आणि पोर्तुगीज सैनिकांनी अलीबागच्या किल्ल्यावर हल्ला चढविला. हा हल्ला दमदार होता. पण तो यशस्वी झाला नाही. कारण त्यांना किल्ल्याचे दार उघडता आले नाही. ते आतून चुन्याने आणि दगडांनी बंद करून टाकण्यात आले होते. हा हल्ला अयशस्वी झाल्याने आमच्या सैन्याला माघार घ्यावी लागली.

त्या रात्री अलीबागवर हल्ले सुरू झाले. परंतु त्या हल्ल्यासाठी जे मजूर वेठीस लावले होते ते भीतीने पळुन गेले. दुसऱ्या दिवशी मी आजारी पडलो व त्यामुळे मला ह्या जहाजावर येऊन रहावे लागले.

अशा रीतीने अलीबागवर आमचे हल्ले चालू असताच शाहू राजाचा प्रधान बाजीराव हा ७,००० घोडेस्वार घेऊन शत्रूच्या छावणीत येऊन दाखल झाला. सैन्यात उंट आणि हत्तीही होते. त्याने मला कळविले की, मी आपल्या राज्याचा मित्र असल्याने आपल्याशी लढण्याकरता मी आलेलो नाही. तर आंग्रे शाहू राजांना आपला राजा मानीत नव्हते म्हणून त्यांना पकडण्या-करता मी इकडे आलो आहे.

परंतु आंग्र्यांनी शाहू राजांचे मांडलिकत्व पत्करून बाजीरावाबरोबर राजाच्या भेटेस जाण्याची तयारी करताच बाजीरावाला आमच्याशी न लढण्याचा विचार बदलावा लागला. आंग्रे हा त्यांच्या राजाचा मांडलिक झाल्याने त्यांच्यावर चालून आलेल्या शत्रूशी लढण्यास तो बद्ध परिकर झाला होता पण आमच्याकडील मैत्रीही त्याला मोडता येत नव्हती. म्हणून त्याने तहाचा प्रस्ताव पुढे केला. त्याने प्रथम युद्धबंदीची सूचना आम्हाला केली. ती मान्य करणे आम्हाला भाग पडले. कारण आंग्र्यांचे सैन्य आता भलतेच वाढले होते. त्या सैन्याशी लढण्याचा जर आम्ही निर्णय घेतला असता तर आमचा पराभव नक्कीच ठरलेला होता. त्यातच मी आजारीही होतो त्यामुळे परिस्थितीचा एकूण विचार करून मी शस्त्रसंधि करण्याचा निर्णय घेतला, व तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या.

परिस्थिती सांप्रत अशी आहे. तहाची कल्पना मी आपणाला तूर्त देऊ शकत नाही. तहाच्या वाटाघाटी संपल्या की, मी इकडची आवराआवर करून चालू महिन्याच्या २२ ला तिकडे नौका हाकणार आहे. इकडे जे काय घडले आहे ते इतकेच आहे.

देव आपले भले करो".

नौका नोस्सा सिंज्योरा द पियेदाद,

८ जानेवारी १७२२

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

आंग्र्यांशी होऊ घातलेल्या तहाबाबत गोव्याच्या व्हाइसरॉयने त्याच्या एका सेनाधिकाऱ्यास पुढील पत्र लिहिले.

(61) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 28V

"आंतोनियु कादिम फ्रॉइश ह्यांस——

उत्तरेकडील सेनापतीच्या आगमनामुळे मी माझ्या विवंचनेतुन मुक्त झालो आहे. ह्या सेनापतींनी मला आपल्या हस्ताक्षराचा एक कागद दिला. तो कागद नजरेखालून घातल्यावर मला आशा वाटू लागली की, आपले कष्ट फलद्रूप झाल्यावाचून राहाणार नाहीत. तरी जे काय घडले आहे, त्याचा वृत्तांत आपण मला उद्यांपर्यंत सादर कराल अशी आशा आहे.

जनरल कोइव्हान ह्यांनी मला आताच सांगितले की, तहाच्या वाटाघाटीत भाग घेण्याचा आपला विचार नाही. ह्या वाटाघाटी आपल्या वतीने

आम्हीच पार पाडाव्या अशी त्यांची इच्छा आहे. ह्या वाटाघाटी समान दर्जाच्या पातळीवर झाल्या पाहिजेत हे आपण लक्षात घ्यावे. त्यासंबंधी मी आपणाला ज्या काय सूचना केल्या आहेत त्या आपण विसरू नयेत.

नौका नोस्सा सिज्योंरा द पियेदाद,

८ जानेवारी १७२२

फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(62) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 29V

कान्होजी आंग्रे ह्यांनी तहासंबंधी गोव्याच्या व्हाइसरॉयला एक पत्र घातले असता त्या पत्रास व्हाइसरायने पुढील उत्तर पाठविले :--

" कान्होजी आंग्रे ह्यांस--

कान्होजी आंग्रे ह्यांचे पत्र स्वीकारताना मला मोठा आनंद झाला. मला आशा आहे की, आपले आरोग्य उत्तम आहे. एकूण परिस्थितीचा विचार करता मला असे वाटते की, तहाशिवाय आपली मैत्री टिकणे कठीण आहे. आपणाकडून माझ्या पत्रांची उत्तरे पाठविण्यास निष्काळजीपणा झाला नसल्यास माझी पत्रे आपणाला नियमित जातील ".

नौका नोस्सा सिज्योंरा द पियेदाद,

९ जानेवारी १७२२

झुजे द सांपायु इ काश्त्रु

(63) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 31

बाजीरावांनी गोव्याच्या व्हाइसरॉयला जे पत्र घातले त्याला त्याने पुढील उत्तर पाठविले :--

शाहू राजे ह्यांचे प्रधान आणि सेनापती बाजीराव ह्यांस--

आपले पत्र मिळाले, मोठा आनंद झाला. करारपत्र तयार होऊन माझ्या शिक्क्यासह आपल्या शिक्क्यासाठी जात आहे. माझ्यावतीने जनरल आंतोनियु कार्दिम व आपल्या वतीने महादजी कृष्ण ह्या दोघांनी त्याच्यावर सह्या कराव्या. मी चौलला रात्री मुक्कामास जात आहे. तेथे आपल्या भेटीचा लाभ घडेल अशी आशा आहे ".

नौका नोस्सा सिज्योंरा द पियेदाद,

९ जानेवारी १७२२

(63) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 31

गोव्याच्या व्हाइसरॉयने मुंबईच्या गव्हर्नरला पत्र लिहून कळविले की आंग्लो-पोर्तुगिजांचा मराठ्यांशी जो तह व्हायचा आहे, त्या तहाच्या करारावर इंग्रज अधिकाऱ्यांची सही पाहिजे असा मराठा सरदारांचा आग्रह आहे.

"मुंबईचे सेनापती ह्यांस—

आम्ही जे कार्य योजिले होते त्याच्या मार्गात कोणकोणती विघ्ने आली त्याचा वृत्तांत आपणाला सादर करण्यात येणार आहे.

आमच्या उत्तरेकडील सेनापतीने जनरल कोइव्हान ह्यांना कळविले की, कराराच्या वाटाघाटीत आपल्या एका सेनाधिकाऱ्याने भाग घ्यावा अशी मराठ्यांची मागणी आहे. करारावर आज सकाळी सह्या व्हायच्या आहेत. माझी अशी समजूत आहे की, आम्हाला आजीबात जे काय मिळण्याची आशा नव्हती, त्यात काही तरी मिळणार आहे. कराराचा आराखडा मी स्वतःच तयार केला आहे. कलमे आम्हा दोघांनाही सारखीच आहेत. ह्या करारावर सह्या लवकर झाल्या पाहिजेत, कारण ते (मराठे) निघून जाण्याच्या घाईत आहेत. त्यांनी आपल्या प्रतिनिधीची सही करारावर लवकर झाली पाहिजे असे सांगितले आहे. त्यांनी मुदत एका आठवड्याची दिली आहे. तरी ह्या मुदतीत हे काम पूर्ण झाले पाहिजे अशी ताकीद आपण आपल्या सेनाधिकाऱ्यांना द्यावी".

नाव नोस्सा सिञ्योरा द पियेदाद,

१० जानेवारी १७२२ आपला नम्र सेवक
फ्रान्सिस्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु

(65) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 31V

पोर्तुगिजांचा मराठ्यांशी जो तह झाला, तो आपल्या मनासारखा झाला नाही, असे गोव्याचा व्हाइसरॉय गोव्यास आपल्या राज्य-सचिवाला लिहितो.

"राज्य-सचिव ज्युआंव रोड्रिग्ज माशादु ह्यांस—

मी बाजीरावांशी जुळवून आणलेल्या करारावर आज रात्री सह्या झाल्या. हा करार आमच्याशी करण्याकरता बाजीरावाने आपले स्वामी शाहू राजे ह्यांच्याकडून खास अधिकार आणले होते.

हचा कराराच्या शेवटच्या कलमाप्रमाणे मराठ्यांनी आमची जी जहाजे पकडली आहेत ती आम्हाला परत मिळणार आहेत. त्यातील काही जहाजे वसईसमोर पकडली गेली होती. हा करार माझ्या अपेक्षेप्रमाणे विशेष फायदेशीर झाला नाही. परंतु कालमान परिस्थितीचा विचार केला असता झालेला फायदा अगदीच क्षुल्लक नाही, असे म्हणावेसे वाटते. मला काही तातडीच्या कामामुळे इथे थांबावे लागत आहे. मी येत्या १५ तारखेस तिकडे निघणार आहे. शस्त्रवैद्याला घेऊन आलेली जहाजे इकडे येऊन पोहोचली त्यांना मी बंदरात पाठविले आहे. हा शस्त्रवैद्य इकडे येऊ नये म्हणून ज्या कारवाया झाल्या, त्याबद्दल मला आता बिलकूल आश्चर्य वाटत नाही. परंतु काही झाले तरी हचा गोष्टी हिंदुस्थानातील आहेत, हे लक्षात घेऊन काय ओळखायचे ते ओळखावे.

मी आता आमच्या देशाला पत्रे लिहिण्याच्या गडबडीत असल्याने, आपणाला मी जे काय लिहिले आहे, त्यापेक्षा अधिक काही लिहिता येत नाही.

सार्जंट-मोर आंतोनियु कार्दिम हचांच्या पायाला जी जखम झाली होती ती आता बरी आहे.

देव आपले रक्षण करो".

नोस्सा सिञ्योरा द पियेदाद, नौका,

११ जानेवारी १७२२ फ्रान्सिस्कु झुजे द सांपायु इ कास्त्रु

(66) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 13, FLS 32V

पोर्तुगीज आणि मराठे हचा दोघांमध्ये जो तह झाला तो पुढीलप्रमाणे आहे :—

नामदार व्हाइसराय सिञ्योरा फ्रान्सिस्कु झुजे द सांपायु इ कास्त्रु ह्यांचा व शाहू राजे प्रधान आणि सेनापती बाजीराव हचांचा त्यांना शाहू राजे ह्यांच्याकडून मिळालेल्या अधिकारान्वये जो करार झाला, त्याची कलमे पुढील-प्रमाणे आहेत :—

(१) मराठ्यांनी पोर्तुगालच्या राजाचा मुलूख व त्याच्या नौका हचांच्यावर खंडणी आकारू नये. हेच कलम मराठ्यांच्या बाबतीत पोर्तुगीजांनाही लागू आहे.

(२) जर मराठे किंवा इंग्रज ह्या दोघांना समुद्रावर अथवा जमिनीवर जर मदत हवी असेल तर ती एकमेकांना एकमेकांनी द्यावी. मात्र ह्या राज्याचा ज्या देशाशी शांततेचा करार असेल त्या राज्याच्या बाबतीत हे कलम अमलात येणार नाही. तीच गोष्ट मराठ्यांच्या बाबतीतही आहे. म्हणजे मराठ्यांच्या ज्या शत्रूशी पोर्तुगिजांचा तहाचा करार असेल त्या देशाशी पोर्तुगीज मराठ्यांच्या बाजूने लढणार नाहीत.

(३) पोर्तुगीज बंदरात सरकार जो महसूल वसूल करील त्याच्यावर पोर्तुगिजांनी प्रत्यक्ष कर आकारू नये. त्याचप्रमाणे महाराणा छत्रपती ह्यांच्या बंदरात पोर्तुगीज जो महसूल वसूल करतील त्याच्यावर छत्रपतीच्या सरकारने प्रत्यक्ष कर आकारू नये.

(४) मराठ्यांच्या शत्रूच्या जहाजांना पोर्तुगीज दर्यासारंग जे संरक्षण देतात ते संरक्षण मराठ्यांना हानीकारक असल्याने यापुढे नामदार व्हाइसरॉय ह्यांनी आपल्या दर्यासारंगांना मराठ्यांच्या शत्रूच्या जहाजांना संरक्षण न देण्याची ताकीद द्यावी.

(५) ज्याअर्थी, हा शांततेचा करार उभयपक्षी झालेला आहे, त्याअर्थी उभय पक्षांनी परस्परांशी व्यापार अनिर्बंधपणे करावा. दोन्हीही राज्यांच्या जहाजांना एकमकांच्या बंदरात जाऊन व्यापाराची देवाण घेवाण करता येईल. व्यापारामध्ये दारूगोळा, तोफा, औषधे, वगैरे गोष्टींचा अंतर्भाव होईल. ह्या वस्तूंची उभय पक्षांनी एकमेकांकडून योग्य तीच किंमत घ्यावी.

(६) ह्या राज्यातील व्यापाऱ्यांना आपल्या नौकांतून त्यांना हव्या असलेल्या बंदरात व्यापार पाठविण्याची मुभा असेल. परंतु ज्या बंदराशी ह्या राज्याचा संबंध नसेल त्या बंदरांशी त्यांना व्यापार करता येणार नाही.

(७) मराठ्यांनी पोर्तुगीजांची जहाजे पकडली तर ती सोडून द्यावी. त्याचप्रमाणे पोर्तुगिजांनी मराठ्यांची जहाजे पकडली तर ती सोडून द्यावी.

(८) ज्याअर्थी, कुलाब्याच्या युद्धनौका मोहिमेवर निघाल्या आहेत. त्याअर्थी, त्या पोर्तुगीज जहाजे पकडतील हे निश्चित असे जर झाले तर त्यांनी पकडलेली सर्व पोर्तुगीज जहाजे त्यांच्यातील मालासह मराठ्यांनी सोडून द्यावी, वगैरे.



व्ही ५५५८–१२

(९) ह्या तहाची कलमे पाळण्याचे बंधन नामदार व्हाइसरॉय व पंडीत प्रधान बाजीराव ह्यांच्यावर आहे. जी कलमे ज्या पक्षाला लागू आहेत त्या पक्षाने त्यांचे काटेकोरपणे पालन केले पाहिजे.

अलीबागची छावणी, ९ जानेवारी १७२२
मराठ्यांच्या राजचिन्हांचा शिक्का शाईचा
पोर्तुगालच्या राजचिन्हांचा शिक्का लाल लाखेचा

मराठ्यांच्या वतीने महादजी कृष्ण ह्यांची सही (मराठी)

पोर्तुगीज व्हाइसरॉय ह्यांच्यावतीने आंतोनियु कार्दिम फ्लाइश ह्यांची सही.

इंग्रजांनी पोर्तुगिजांचे दोस्त ह्या नात्याने ह्या कराराला मान्यता दिली. परंतु त्याच्यावर त्यांच्या प्रतिनिधीची सही नाही.

प्रधान मंत्री बाजीराव ह्यांचा शिक्का असलेली तहाची प्रत गोव्याच्या व्हाइसरॉय फान्सिस्कु झुजे द सांतपायु इ कास्त्रु ह्यांची ध्वजनौका नोस्सा सिंज्योरा द पियेदाद हिच्यावर ब्रिटिश सेनापती सर रॉबर्ट कोइव्हान ह्यांच्या-हवाली दिनांक १२ जानेवारी १७२२ रोजी करण्यात आली. तिच्यावर मुंबईच्या गव्हर्नरने आपल्या प्रतिनिधीला एका आठवड्याच्या आत सही करण्याची आज्ञा करायची होती.

प्रस्तुत कराराची मराठी प्रत असून शिवाय मूळ करारही आहे. त्यात म्हटले आहे की, हा करार चौल जिल्ह्यातील वार्सोळी ह्या गावी पार पडला. त्याच्यावर १२ जानेवारी १७२२ ही तारीख आहे. ह्या कराराची एक प्रत मुंबईच्या गव्हर्नरचे प्रतिनिधी सर कोइव्हान ह्यांच्या हवाली करण्यात आली.

करारावर पोर्तुगिज राज्याचे दुभाषी सुर्याजी आनंदराव ह्यांचा शेरा आहे.

(68) LIVRO DE PAZES, FLS 289.

आंग्रे आणि आंग्लो-पोर्तुगिज ह्यांच्यामध्ये झालेल्या युद्धानंतर बाजीराव आणि पोर्तुगिज ह्यांच्यामध्य जो तह झाला, त्या तहाप्रमाणे पोर्तुगीज आणि

मराठे ह्या दोघांमध्ये व्यापार खुला झाला. त्यासंबंधी गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील प्रकटन जाहीर केले:—

"फान्सिस्कु झुज सांपाये इ काश्त्रु पोर्तुकालच्या राजाचे सल्लागार त्यांचे व्हाइसरॉय आणि हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल :—

कान्होजी आंग्रे आणि हे राज्य ह्या दोघांमध्ये युद्ध सुरू झाल्यावर दोन्ही बाजूचे संबंध तुटले व व्यापार बंद पडला. मी कान्होजी आंग्रे ह्यांच्या विरुद्ध लष्करी मोहीम सुरू केली असता त्याला शाहूराजे ह्यांनी आपला मांडलिक ह्या नात्याने संरक्षण दिले. त्यांनी त्याच्या मदतीला आपले प्रधान आणि सेनापती बाजीराव ह्यांना मोठे सैन्य देऊन पाठविले. शाहूराजे ह्यांनी बाजीराव ह्यांना आमच्याशी तह करण्याचे अधिकार दिले होते. त्याचे कारण हे की, शाहूराजे ह्यांचे आजोबा शिवाजी राजे ह्यांची आमच्याशी मैत्री असल्याने ती मैत्री पुढे चालू रहावी अशी त्यांची इच्छा होती. दुसरी गोष्ट अशी की, कान्होजी आंग्रे ह्यांनी शाहूराजे ह्यांचे मांडलिकत्त्व स्वीकार-ल्यामुळे ह्या राज्यात आणि बाजीराव ह्यांच्यात जो तहाचा करार झाला त्यात आंग्रे ह्यांचाही अंतर्भाव झाला. तहाच्या वाटाघाटी यशस्वी होऊन मी आणि बाजीराव मिळून दोघांनी तो करार मंजूर केला. बाजीरावांना त्यांचे स्वामी शाहूराजे ह्यांनी हा तह करण्याचे अधिकार दिले होते.

ह्या कराराप्रमाणे मी ह्या राज्याच्या प्रजाजनांना शाहूराजे ह्यांच्या बंदरात व्यापार करण्याची परवानगी देत आहे. ह्या राज्याच्या प्रजाजनांना ज्याप्रमाणे प्रस्तुत व्यापारी सवलती देण्यात येत आहेत, त्याचप्रमाणे शाहूराजे आणि कान्होजी आंग्रे ह्या दोघांच्या प्रजाजनांनाही आमच्या बंदरात आणि आमच्या राज्याच्या प्रजाजनांशीं व्यापार करण्याची आता मूभा मिळेल. त्यांना व्यापारी करारही आता करता येईल.

ज्याअर्थी, युद्धापूर्वी उभय राज्यामध्ये सलोखा होता व उभय राज्याच्या प्रजाजनांना एकमेकांच्या राज्यात जाण्यायेण्याची सवलत होती, त्याअर्थी, मी ह्या राज्याच्या उत्तरेकडील ठाणेदारांना आज्ञा करीत आहे की, त्यांनी दोन्ही बाजूंच्या लोकांना एकमकांकडे येऊ जाऊ द्यावे. असाच हुकूम मी सेनापतीला आणि युद्धनौकांच्या कप्तानांनाही करीत आहे, ह्या अधिकाऱ्यांना मी अशी ताकीद देत आहे की, जर शाहूराजे आणि कान्होजी आंग्रे ह्यांच्या नौका व्यापारी अथवा युद्धनौका, आमच्या बंदरात आल्या तर त्यांना त्यांनी मैत्रीने वागवावे.

हा जाहीरनामा दवंडी पिटून सर्वत्र जाहीर करण्यात यावा. शहरांच्या नगरपालिकांमध्ये आणि उत्तरेकडील श्रवणगृहामध्ये (Auditorios) ह्या जाहीरनाम्याच्या नकला चिकटाव्या.

नौका नौस्सा सिंज्योरा द पियदाद, १४ जानेवारी १७२२.

फान्सिश्कु झुजे द सांपायु इ काश्त्रु.

(70) LIVRO DE CARTAS E ORDENS DORTARIAS, No. 13, FLS 37.

पोर्तुगीज आणि मराठे ह्या दोघांमध्ये जो तह झाला त्यावरून पोर्तुगिजांचा आणि इंग्रजांचा बेबनाव झाला असल्याचे गोव्याच्या व्हाइसरॉयने इंग्रज सेनापतीस पाठविलेल्या पुढील पत्रावरून दिसून येते.

"रावर्ट कोइव्हन ह्यांस—

आपणांस माहीत असेलच की, मी माझ्या राज्यात माझ्या लष्कराला, माझ्या सेनाधिकाऱ्यासह कुठेही पाठवू शकतो. ह्या गोष्टी आपणाला कळविण्याची जरूरी आहे असे मला वाटत नाही.

ज्या वेळी बाजीरावाने तहाचा प्रस्ताव पुढे मांडला, तेव्हा मी आपणाला ही गोष्ट कळविली व तहाच्या वाटाघाटीत भाग घेण्याकरता आपला मनुष्य पाठविला. वाटाघाटी संपेपर्यंत थांबणे हे आपले दोस्त ह्या नात्याने कर्तव्य होते. पण आपण न थांबता सैन्य घेऊन निघून गेलात. सैन्य जहाजावर चढविताना देखील आपण मला कळविले नाही. तहाच्या यशस्वीततेच्या दृष्टीने देखील आपली हालचाल हानीकारक होती.

आपण म्हणता इग्रजांचा असाच अनुभव आम्हाला यापूर्वी आलेला आहे. आमचे स्पेनशी युद्ध झाले, तेव्हा आपण आमच्या बरोबर आमचे दोस्त म्हणून स्पेनशी तह करून मोकळ झाला होता. पण मराठ्यांशी आमचा जो तह झाला तो मी आमच्या पुरता मर्यादित केला नाही. त्यात आपलाही अंतर्भाव झालेला होता. असे असून देखील आपण आपले सैन्य घेऊन निघून गेलात. तरीही मी बाजीरावांची शिक्का असलेली तहाची एक प्रत आपणाकडे पाठवून दिली. व तहाला मंजूरी देण्यासाठी तहाच्या करारावर सही करण्याकरता आपला प्रतिनिधी आठवड्याच्या आत पाठवून द्यावा असे आपणाला कळविले. तहाची कलमे मी आपणाकडे पाठवून देत आहे. कारण, आपणाला माहीत आहेच की, माझे स्वामी जे पोर्तुगालचे राजे ह्यांच्या एका व्हाइसरॉयने आणि कॅप्टन

जनरलने इंग्लंडच्या माननीय कंपनीच्या अधिकाऱ्यांशी ह्या बाबतीत तक्रार करता कामा नये. कारण, तक्रार स्वीकारण्याचे अधिकार आपणाला नसल्याने ज्याला ते अधिकार आहेत त्याच्यापाशी ती तक्रार केली पाहिजे.

माझी अशी समजूत आहे की, आमचे उत्तरेकडील सेनापती आपल्या भेटीला आले असतील. मी त्यांना आपणास भेटावयास सांगितले होते. कारण, बाजीरावांची मला तशी सूचना होती. आपणाला माहीत आहेच की, हा तहाचा करार आम्ही कान्होजी आंग्रे ह्यांच्यापाशी करीत नसून बाजीराव ह्यांच्यामार्फत शाहूराजे ह्यांच्याशी करीत आहोत. तेव्हा मला आपणास सांगायचे आहे की, हा तह होऊ नये म्हणून आपण जो डाव टाकला आहे तो तर्काच्या विरुद्ध आहे.

हे पत्र मी आपणाकडे मुंबईच्या गव्हर्नरकडे जावे म्हणून पाठवीत आहे. देव आपणाला पुष्कळ वर्षे आयुष्य देवो."

नौका नौस्सा सिंज्योरा द पियेदादे, जानेवारी १५, १७२२.

फान्सिस्कु झुजे द सांपायु इ कास्त्रु.

(71) LIVRO DE CARTAS E ORDNS—PORTA RIAS, No. 13, FLS 36.

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास आंग्र्यांच्या मोहिमेवरील अहवाल पुढील पत्रात सादर केला आहे. तो म्हणतो की, आंग्र्यांच्या मदतीला बाजीराव मोठे घोडदळ घेऊन आल्याने आपणाला त्याच्यामार्फत शाहूराजे ह्यांच्याशी तह करावा लागला.

"महाराज—

दिनांक २० नवंबरला मला मुंबईच्या गव्हर्नरने आणि आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीने कळविले की, मोहिमेची तयारी पूर्ण झाली आहे. ती बातमी कळताच मी गोवा बेटे, साष्टी आणि बार्देश ह्या तिन्ही जिल्ह्यांचा कारभार आर्चबिशप प्रिमज दों इग्नासियु द सांतातेरेझा ह्यांच्याकडे सोपवून व काही हुकूम लेखी ठेवून मी मोहिमेच्या प्रयाणाची तयारी केली. हुकूम लेखी ठेवण्याचे कारण, की, आर्चबिशप दों प्रिमज ह्यांचा व्यवसाय राजकारणाहून वेगळा आहे. इ. स. १७१७ साली गोव्याचा कारभार आर्चबिशप प्रिमज दों सेबास्तिआंव द आंद्राद पेसान्य ह्यांच्याकडे सोपविला असता साष्टी जिल्ह्यात जे काय घडले, तसे काही यावेळी घडू नये म्हणून मला यावेळी

प्रस्तुत काळजी घ्यावी लागली. वरील तिन्ही जिह्यांच्या महत्वाच्या खंडित मी पगारी पायदळाच्या पाच कंपन्या आणि किनाऱ्यांचे रक्षण करण्यासाठी घोडदळाच्या दोन कंपन्या ठेवल्या. त्याशिवाय सक्तीच्या लष्कर मदतीचे लोकही मी त्यांच्या हवाली केले. हेतु हा की, आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली, तर हालचाल झटपट करता यावी. मी ह्या सर्व सैन्यावर सेनापती म्हणून लुईज गोंसाल्विज द कामारा कौतिन्यु ह्यांची नेमणूक केली. त्यांना आंग्र्यावरील मोहिमवर पाठविण्यात येत नव्हते. कारण, त्यांचे वय झाले असल्याने त्यांना ही मोहीम झेपण्यासारखी नव्हती. त्यांना कदाचित मृत्यू येण्याची भीती होती म्हणून त्यांच्याकडे मी वरील कामगिरी सोपविली. मी महसूल खाते दों. क्रिस्तोव्हांव द मेलु ह्यांच्याकडे सोपविले. कारण, ते एक विश्वासू आणि कळकळीने राज्य सेवा करणारे अधिकारी आहेत. अशा रीतीने कोणत्याही परिस्थितीला तोंड देण्याची मी कडकोट तयारी करून ठेवली.

दिनांक २२ नवंबरला मी गलबत उत्तरकडे हाकारली. मी जी ह्या मोहिमची तयारी केली ती मी खानदानी, पुरोहित आणि प्रजा ह्या तिन्ही वर्गाच्या सभने दिलेल्या मंजुरीप्रमाणे केली होती. ह्या सभेचे संमत केलेल्या ठरावाची एक प्रत मी ह्या पत्रासमवेत आपणाकडे पाठवित आहे. त्याच रात्री मी चार फ्रिगेटस आणि सहा पाले ह्यांच्यासह निघालो. त्या युद्ध नौकांवर त्यांचा तोफखाना आणि त्यांची शिबंदी होती. ह्या पत्रासमवेत पाठविण्यात येत असलेल्या यादीवरून आपणाला ह्या तयारीची कल्पना येईलच.

दि. १ डिसेंबरला मी ह्या बंदरात प्रवेश केला व ह्या ठाण्यामध्ये सैन्य उतरविण्यास सुरूवात केली. दिनांक २ ला माझ्या नौकेवर उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती आणि इंग्रज फौजांचे नेतृत्व करणारे अधिकारी आले.

इंग्रज फौजांना मी गोव्याहून पाचारण केले होते. त्या दिवशी माझ्या नौकेवर सर्व सेनाधिकाऱ्यांची बैठक भरून हल्ल्याची सुरूवात कुठून करायची त्याचा खल झाला. ह्या बैठकीला आमच्या आरमाराचे दर्यासारंग माझ्या निमंत्रणावरून मुद्दाम हजर होते. कारण त्यांना ह्या प्रदेशाची खडानखडा माहिती आहे. बैठकीत असे ठरले की, हे ठाणे कुलाब्यापासून अवघे एका कोसावर असल्याने सर्व सैन्य ह्या ठाण्यात गोळा करण्यात यावे. त्या ठरावाप्रमाणे दोन्हीही फौजांचे सेनापती आपले सैन्य आणि दारूगोळा ह्या ठिकाणी आणण्यासाठी निघून गेले.

दिनांक ६ मी येथे उतरलो. दिनांक ९ ला माद्र द देशक (देव माता) ह्या नावाच्या छावणीत आलो. ह्या छावणीत माझ्याबरोबर गोव्याहून आलेली

माणसेही होती. शत्रू आमच्या छावणीवर दोनदा चालून आला. परंतु दोन्हीही वेळा त्याला जबरदस्त हानी पत्करून माघार घ्यावी लागली. आमच्या घोडदळाची आणि पायदळाची हानी शत्रूच्या हानीहून अल्प होती.

दिनांक ७ ते ८ आणि ९ ला आमचे उत्तरेकडील सैन्य आणि इंग्रज आपला तोफखाना आणि दारूगोळा घेऊन आले. ह्या पत्रात जात असलेल्या यादीत आमच्या सैन्याच्या संख्येबरोबरच इंग्रज फौजांची संख्या आणि तोफखाना ह्यांचा अंतर्भाव झालेला आहे.

ह्या मोहिमेत भाग घेणाऱ्या इंग्रज आरमारातील चार फ्रिगेटस युरोपहून इकडे सरळ आल्या आहेत. चांच्यांचे निर्दालन करण्यासाठी म्हणून त्या इकडे आल्या आहेत. ह्या युद्ध नौकांच्या तुकडीच्या कमांडंटने ह्या मोहिमेत हिरीरीने भाग घेण्याचा निर्णय घेतला. त्याने आपल्या शिबंद्यांची एक तुकडी बनवून आमच्या आरमाराच्या फळीत आम्हाला मदत करण्यासाठी ठेवली. शेवटी इंग्रज दर्यासारंग खाली उतरला व माझ्याकडे येऊन त्याने मला वचन दिले की, आम्हाला मदत करण्याची आपली इच्छा आहे. तो म्हणाला की, आणखीही सैन्य उतरविण्याची जरूरी असून माझ्या सूचनेप्रमाणे आपण ते करू. नंतर मला अभिवादन करून तो आपल्या नौकेवर निघून गेला. हा दर्यासारंग म्हणजेच सिसिलीच्या मोहिमेत भाग घेतलेला थॉमस मॅथ्यू हा होय.

दिनांक १६, मी सैन्य, तोफखाना आणि दारूगोळा उतरविण्यासाठी होड्यांचा पूल बनविण्याचा हुकूम केला. असा पूल गोव्यामध्ये आगशीच्या नदीत बनविण्यात आला होता.

दिनांक १७ ला आम्ही नदी ओलांडली व तिच्या पिछाडीला छावणी ठोकली. दिनांक १८ ला आम्ही चाल करण्यास सुरूवात केली. आमच्या बरोबर आम्ही २२ मांशुआ, लढाईची गलबते, आणि पन्नास इतर गलबते आणि तोफांसह बटॅलिअन्स घेतल्या. त्याशिवाय इतर काही वस्तु आणि सैन्याला लागणारी अन्नबेगमीही घेतली. पिण्याच्या पाण्याची तर आम्हाला अत्यंत आवश्यकता होती. म्हणून तेही आम्ही आमच्या बरोबर भरपूर घेतले. इकडे पिण्याचे पाणी नाही म्हणून हे साठे आम्ही आमच्या बरोबर घेतले नाहीत, तर शत्रू-कडून पाण्याच्या विहीरीत आणि झऱ्यात विष घातले जाण्याची शक्यता होती. पाण्यामध्ये विष घालण्याची चाल आशिया खंडात सगळीकडेच आहे.

दिनांक १९ आणि २० ला आम्ही त्याच छावणीत होतो. त्या दिवशी काही चकमकी झाल्या. दिनांक २० च्या रात्री शत्रूने ८ आणि १० इंची दोन तोफा आमच्या डाव्या बगलेवर आणल्या. दिनांक २१ ला आम्ही अलीबाग

नदीच्या छावणीकडे निघालो. शत्रूच्या घोडदळाने आमचा प्रतिकार केला. परंतु तोफा डागून आम्ही त्यांना पिटाळून लावले. आम्ही कुलाब्याच्या तोफांच्या कक्षेबाहेर छावणी ठोकली. कुलाब्याच्या बचावाची तयारी चांगलीच करण्यात आली होती. खंदक आणि तोफा त्याचे रक्षण करीत होत्या.

दिनांक २२ ला मी चाल केली. माझ्या बरोबर सर्व सैन्य होते. आम्ही अलीबाग नदीच्या पलीकडची टेकडी गाठून तेथे छावणी ठोकली. त्या रात्री उभय बाजूनी तोफांची आणि बंदुकीची सरबत्ती चांगलीच झाली. त्याच चकमकीत शत्रूची बरीच माणसे कामास आली. दिनांक २३ ला मी पुन: चाल करण्यास सुरूवात केली. आमच्या पिछाडीला शत्रूचे सर्व घोडदळ आणि पायदळ होते. परंतु आम्ही चाल करण्यास सुरूवात करताच शत्रू बेपत्ता झाला. आम्ही त्या दिवशी अलीबागच्या तोफांच्या कक्षेनजीक येऊन तळ ठोकला. आम्हाला तसे करणे भाग होते, कारण आम्ही दोन दिवसापासून आमच्या आरमारापासून अलग असल्याने आम्हाला अन्नाची बेगमी घ्यायची होती.

दिनांक २४ ला दुपारी मी ५०० युरोपियन सैनिकांना अलीबागच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी धाडले. ह्या सैन्याचे नेते रणक्षेत्राचे प्रमुख ज्युआंव बाफिस्त कोपिश द लाउर आणि ब्रिटिश नौदलाचे कर्नल ब्रेथनेल हे होते. शत्रूने किल्ल्यातून नुसती आग ओतली. परंतु त्या आगीला न जुमानता सैनिक आणि अधिकारी किल्ल्याचा दरवाजा फोडण्याकरता गेले. परंतु दरवाजा आतून चुना आणि दगड ह्यांनी बंद करण्यात आला होता. ते पाहून आमच्या आणि ब्रिटिश सैनिकांनी बरोबर नेलेले बॉम्बस किल्यामध्ये टाकून माघार घेतली. आमच्यावर शत्रूचे ६०० घोडेस्वार चालून आले परंतु आमच्या तोफांनी त्यांना पिटाळून लावले. बरेच सैनिक मागे टाकून त्यांनी पळ काढला.

दिनांक २५ ला मी १८ इची तीन तोफा किल्ल्यावर डागण्याचा हुकूम केला. दिनांक २६ ला आम्ही आमच्या छावणीला जाऊन मिळण्यासाठी नारळीच्या बागेतील अनेक झाड पाडून टाकले. किल्ल्यातून आमच्यावर तोफा डागण्यात आल्या नाहीत. दिनांक २७ ला लहान लहान स्वरूपाच्या चकमकी झाल्या. परंतु त्या अगदीच क्षुल्लक होत्या.

दिनांक २८ ला मी आजारी पडून उपचारासाठी नौस्सा सिज्योरा द पियेदाद ह्या नौकेवर आलो. मी सैन्याचा कारभार एक पोर्तुगीज आणि एक इंग्रज अशा दोन सेनाधिकाऱ्यांकडे सोपविला होता. प्रत्येकाने आपापले सैन्य त्या दिवशी हल्ल्यासाठी पाठवायचे होते.

दि. २९ ला अलीबागवर तोफा डागण्यास सुरूवात झाली. दि. ३० ला शत्रूचे सर्व घोडदळ आणि पायदळ अलीबागच्या बाजूने आले. त्याशिवाय शत्रूचे आरमार होते ते वेगळेच. आम्हाला बातमी कळली की, शत्रूला पाच ते सहा हजार घोडेस्वारांची कुमक येत आहे. त्याचरात्री ती कुमक येऊन दाखल झाली. दुसऱ्या दिवशी उभय पक्षांमध्ये तोफांची गोलंदाजी झाली तोफांचे गोळे दोन्हीही छावण्यांमध्ये पडले.

दुसऱ्या दिवशी सकाळी शत्रूच्या घोडदळाच्या सेनापतीकडून मला निरोप आला की, आंग्र्यांना मदत घेऊन येणारा तो सेनापती म्हणजे शाहू राजे ह्यांचा प्रधान आणि सरसेनापती बाजीराव हा होय. शाहू राजे हे पोर्तुगिजांचे मित्र होते. त्यांचा प्रधान आणि सेनापती बाजीराव हा आंग्र्यांना शाहू राजे ह्यांचे मांडलिकत्व पत्करण्यास भाग पाडण्यास आला होता. आंग्र्यांनी शाहू राजे ह्यांचे मांडलिकत्व पत्करले असल्याने व शाहूराजे ह्यांना भेटावयास त्यांच्या राजधानीला जाण्याची त्यांनी तयारी दर्शविल्याने त्यांच्या शत्रूपासून त्याचे रक्षण करणे आता बाजीरावास भाग पडले होते. कारण आंग्रे हे आता शाहू राजे ह्यांचे मांडलिक झाले होते. बाजीरावाने आंग्र्यांची बाजू घेतली तर आमच्याशी त्यांचा संघर्ष उडणे साहजीक होते. त्याची परिणती शाहूराजे व पोर्तुगीज ह्यांच्यामधील स्नेहाचे संबंध तुटण्यात होणार होती. तसे होऊ नये म्हणून तह करणे हा त्याच्यावर एकच उपाय होता. आमच्याशी तह करण्यास बाजीराव पंडीत तयार झाले.

परिस्थिती मोठी कठीण होती. आंग्र्यांचे बळ पुष्कळच वाढले होते. त्यांच्याशी आता लढाई चालू ठेवणे हे मोठेच धाडस होते. शाहू राजे ह्यांच्या सैन्याशी लढणे म्हणजे सबंध हिंदुस्थानला लढाईचे आव्हान देणे असे होते. कौंट द आल्व्होर ह्यांच्या राजवटीत ह्याच शाहू राजांच्या वडिलांनी एकाच दिवसात गोवा बेटे, साष्टी आणि बार्देश ह्या तिन्ही प्रांतावर प्रचंड घोडदळासह हल्ला चढविला होता.

शाहू राजे ह्यांचे प्रधान आणि सरसेनापती बाजीराव पंडीत ह्यांनी तहाचा प्रस्ताव पुढे करताच मला त्याविषयी विचार करणे भाग पडले. त्या दरम्यान दि. २ जानेवारीला एक मोठी चकमक होऊन तीत शत्रूचा एक अव्वल दर्जाचा सेनापती ठार झाला. आता परिस्थिती फारच चिघळली व मला तिच्यावर गंभीरपणे विचार करणे भाग पडले. दि. ३ ला बाजीरावांनी पुनः युद्धबंदीची मागणी केली, व आम्ही खरोखरच युद्धबंदी केलीय की नाही त्याची पहाणी करण्यासाठी आपले पाच निरीक्षक आमच्या छावणीत पाठविले. आम्हीही आमचे पाच निरीक्षक त्यांच्या छावणीत पाठविले.

दि. ४ ला सकाळी बाजीरावाने आपला एक दूत माझ्या नौकेवर पाठवून मला निरोप कळविला की, तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी खास अधिकार देऊन एक दूत आपणाकडे पाठवावा. तहाच्या वाटाघाटी चौलला व्हाव्या असे त्यांनी सूचविले. मी बाजीरावाच्या दूताला नजराणा देऊन त्याचे आगतस्वागत केले. ही चाल आशिया खंडात सगळीकडेच आहे. मी बाजीरावाला कळविले की, तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी मी आवश्यक ते अधिकार देऊन जनरल आंतोनियु कार्दिम फ्लॉइश ह्यांची नेमणूक करीत आहे. सदर्हू सेनापती हे दोन्ही फौजांच्या छावण्यांच्या मधोमध आपला तळ ठोकतील. बाजीरावांनीही मला कळविले की, आपणही आवश्यक ते अधिकार देऊन आपला दूत पाठवित आहोत. मी तहाच्या वाटाघाटी दोन्ही सैन्याच्यामध्ये व्हाव्या असे सूचविले, कारण ह्या काळच्या माणसांच्या शब्दावर माझा विश्वास नाही. इतकेच नव्हे तर त्यांच्याकडून काही दगा फटका होऊ नये म्हणून मी आमच्या छावणीभोवताली मातीचा तट उभारण्याचा हुकूम केला. शेवटी तह पार पडला. व त्याचा मसुदा महाराजांकडे पाठविलाच आहे. तो कोणत्या परिस्थितीत पार पडला त्याचे विवरण मी वर केलेच आहे. केवळ परिस्थिती प्रतिकूल असल्यामुळेच मला तो करावा लागला.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो ".

गोवा, २४ जानेवारी १७२२

(72) LIVRO DAS MONCOES, No. 87, FLS 56

गोव्याचा गव्हर्नर पुढील पत्रात आपल्या राजास कळवितो की, मराठे आणि पोर्तुगीज ह्या दोघांमधील तहाच्या करारात कोलदांडा घालण्याचा इंग्रजांनी पुष्कळच प्रयत्न केला.

" महाराज—

मराठ्यांशी मी तह करू नये म्हणून इंग्रजांनी माझ्या मार्गात पुष्कळ अडचणी आणल्या. तह झालाच तर तो आपणाला फायदेशीर व्हावा ही त्यांची इच्छा होती. कारण, आंग्र्यांनी आपली पुष्कळ हानी केली असून ती भरून निघाली पाहिजे. ही त्यांची मागणी होती. पण पांच किंवा सहा हजार माणसांसमोर आणि त्यात बहुसंख्य घोडेस्वार असताना आमच्या मागणीची दाद लागली असती का ?

इंग्रज मला म्हणाले की, त्यांच्याशी आमचा जो दोस्तीचा करार आहे त्या कराराच्या पहिल्या कलमाप्रमाणे मी मराठ्यांशी तह करायला नको होता.

मी त्यांना उत्तर दिले की, ज्या परिस्थितीत मी करार केला, त्या परिस्थितीत युद्ध चालू ठेवणे अशक्य होते. युद्ध मंडळाच्या दोन बैठकींच्या कामकाजाचा अहवाल मी आपणाला प्रस्तुत पत्रासमवेत पाठवित आहे. तो नजरेखालून घातल्यावर मी युद्धबंदी का केली त्याची कारणे आपल्या ध्यानी येतीलच. तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्यावर इंग्रजांनी आपले सैन्य जहाजांमध्ये भरून मुंबईचा रस्ता धरला, व मला माझ्या सैन्यासह मागे ठेवले. दुसरी एक गोष्ट ही की, हा तह मी आंग्र्यांशी केला नाही, तर तो शाहू राजे ह्यांचे प्रधान बाजीराव ह्यांच्याशी. त्यांनी शाहूराजे ह्यांच्याकडून हा तह करण्यासाठी खास अधिकार आणले होते. बाजीराव ह्यांच्याशी झालेल्या करारात असे एक कलम होते की सर्व गोष्टी माझ्याशी आणि इंग्रजांशी ठरल्या आहेत. परंतु त्यांनी आठवड्याच्या आत करारावर सही करण्यासाठी आपला दूत पाठविला पाहिजे. हे कलम मी इंग्रजांचे सेनापती रॉबर्ट कोइव्हन ह्यांच्या हवाली केले. ह्या वेळी मला गेल्या युद्धातील प्रसंगाची आठवण झाल्यावाचून राहिली नाही. स्पेनशी आमचे जे युद्ध झाले, त्यात इंग्रजांनी आमचा सल्ला न घेता स्पेनशी तह केला होता. अशा परिस्थितीत मी कसे वागावे ते आपण मला सूचवावे अशी विनंती आहे. मी राज्य सल्लागार मंडळाचा सल्ला घेतल्यावाचून कोणतीच हालचाल करायची नाही असे ठरविले आहे. मी बहुतकरून इंग्रजांची दोस्ती सोडण्याच्या विचारात आहे. कारण, त्यांच्या आढ्यतेखोर वागणूकीमुळे मैत्री टिकणे अशक्य आहे.

तहाचा निर्णय मी का घेतला त्याची कारणे मी आपणाकडे आंग्र्यांवरील मोहिमेच्या अहवालाबरोबर आपणाकडे पाठवीत आहे. इंग्रजांनी इंग्लंडकडे दीड हजार शिपायांची मागणी केली आहे. त्यांनी असे कारण पुढे केले आहे की, ह्या सैन्याशिवाय आपणाला आशियातील व्यापारी वखारींचे रक्षण करणे अशक्य आहे. यंदा त्यांच्या आरमारात आणखी चार लाकडी युद्ध नौकांची भर पडल्यामुळे त्यांचे सामर्थ्य पुष्कळच वाढले आहे. आमच्या सामर्थ्यात मात्र थोडीदेखील वाढ झालेली नाही. त्यामुळे मी फारच अस्वस्थ झालो आहे. इंग्रज सामर्थ्य जर आमच्या सामर्थ्याहून वाढले तर, आमचा जो थोडा फार व्यापार चालत आहे, त्यात व्यत्यय येईल. अशी मला भीती वाटते. तरी महाराजांनी ह्या सर्व गोष्टींचा विचार करून मला मार्गदर्शन करावे. अशी विनंती आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीचे देव रक्षण करून त्यांना अनेक वर्षे सुखात ठेवो".

गोवा, २४ जानेवारी १७२२

(73) LIVRO DAS MONCOES, No. 87, FLS 60

पोर्तुगिजांची आणि इंग्रजांची उत्तरेकडील मुलुखावरून कुरबूर सुरू झाली असता गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र लिहिले त्यात त्याने आंग्लो-पोर्तुगिजांनी आंग्र्यांवर केलेल्या संयुक्त स्वारीचा व त्या युद्धात सरदार पिलाजी जाधव आणि बाजीराव पेशवे ह्या दोघांनी केलेल्या हस्तक्षेपाचा उल्लेख केला आहे.

" महाराज--

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

अशा रीतीने दोन वर्षेपर्यंत इंग्रजांची आणि आमची तेढ शांत असता मुंबईचे गव्हर्नर सर चार्लस बून ह्यांच्यावतीने आमच्याशी आंग्र्याविरुद्ध युद्ध करण्याची शिष्ठाई करण्यासाठी रॉबर्ट कोइव्हन हे आले. मुंबईच्या इंग्रजांनी आम्हाला अशी सूचना केली की, आम्ही सर्व एशियाटिक राष्ट्रांविरुद्ध लढण्यासाठी एक अखंड युती करावी. ह्या युतीची कल्पना मलाही पसंत पडली, व म्हणून मी इंग्रजांशी दोस्तीचा करार केला. त्या कराराची एक प्रत मी आपणाकडे पाठवीत आहे. आंग्रे हा आमचा सामुदायीक शत्रू असल्याने त्याचाच पहिला काटा काढावा असे आम्ही ठरविले. विशेषेकरून इंग्रजांचा तर आंग्र्यावर मोठाच दांत होता, व त्यांना नेस्तनाबूद केल्याशिवाय स्वस्थ बसायचे नाही असा त्यांनी पण केला होता.

आंग्र्यांवर स्वारी करण्याचा दिवस मुक्रर झाल्यावर मी लष्कर घेऊन उत्तरेकडे निघालो. ह्या लष्कराशिवाय मी आमच्या उत्तरेकडील सेनापतीलाही त्याचे लष्कर घेऊन बोलविले होते. त्या सैन्यात दीवच्या किनाऱ्यावरील दोन हजार पठाण, स्थानिक लष्कर, दारुगोळा आणि तोफा होत्या. ते लष्कर चौलला येऊन दाखल झाले होते. आमच्या बरोबर इंग्रज सैन्यही चौलला येऊन पोहोचले. त्यांच्या सैन्यात दोन हजार लष्कर आणि पठाण व १६० इंग्रज सैनिक होते. त्यांचे घोडदळ ४० स्वारांचे होते. युद्ध नौका त्यांनी चार आणल्या होत्या.

आंग्र्यांना आमच्या स्वारीचा पुष्कळ दिवसांपासून सुगावा लागल्याने त्यांनी युद्धाची अगदी कडेकोट तयारी केली होती. त्यांनी आपल्या मित्रांना आणि नातेवाईकांनाही आपल्या मदतीस बोलाविले होते, इतकेच नव्हे तर शाहूराजे (आमच्या गोवा बेट, बार्देे आणि साष्टी ह्या तीन प्रांतावर एकेच-वेळी हल्ला करून आमच्याशी घनघोर संग्राम करणाऱ्या संभाजी राजाचा हा मुलगा होय) ह्यांच्याकडेही त्यांनी मदतीची याचना केली होती. मी चौलला

जाऊन पोहोचण्यापूर्वीच आंग्रे ह्यांचे दोस्त सरदार पिलाजी जाधव हे दोन हजार घोडेस्वार आणि पायदळ घेऊन कुलाब्याला येऊन पोहोचले होते. मी त्यांच्या विरोधाला न जुमानता छावणी ठोकली. चकमकींना सुरूवात झाली. दोन्ही बाजूंची हानी आणि जय-पराजय झाले. शेवटी विजयाचे पारडे आमच्या बाजूने झुकले. पण काही दिवसांनी शाहूराजे ह्यांचे सेनापती आणि प्रधान बाजीराव हे सात हजार घोडदळासह कुलाब्याला येऊन दाखल झाले. तदनंतर त्यांनी आणखीही कुमक आली. बाजीरावाचे एकूण सैन्य २५,००० घोडदळापर्यंत गेले. ह्या सैन्याच्या व आमच्या चकमकी उडाल्या नाहीत. चकमकी उडाल्या नाहीत त्याचे कारण म्हणजे माझा आजार होय. छावणीत माझा ताप वाढल्यामुळे मला माझ्या जहाजावर जाऊन राहाणे भाग पडले. दुसरे कारण म्हणजे शाहूराजे ह्यांचे सेनापती बाजीराव ह्यांनी मला सुचविलेला तहाचा प्रस्ताव. अशा विषम संख्या असलेल्या सैन्यामध्ये जर लढाई झाली असती, तर तिचा निकाल काय लागला असता त्याची कल्पना आपणच केलेली बरी. म्हणून मी तहाचा प्रस्ताव केवळ प्रतिकूल परिस्थितीमुळे मान्य केला. तहाच्या कलमांची एक प्रत मी आपणाकडे पाठवीत आहे. बाजीरावाने इंग्रजांशी तहाच्या वाटाघाटी करण्यास नकार दिला. बहुधा त्याला आंग्र्यांनी इंग्रजांविरुद्ध चिथावणी दिली असण्याची शक्यता आहे. दुसरी गोष्ट अशी की, मी हा जो तह केला तो बाजीराव किंवा आंग्रे ह्यांच्याशी नसून शाहूराजे ह्यांच्याशी. कारण बाजीरावांनी शाहू राजे ह्यांच्याकडून आमच्याशी तह करण्याचे खास अधिकार आणले होते. सारांश, हा तह शाहूराजे ह्यांच्याशी होणार होता. म्हणून मला तो करणे भाग पडले. ह्या करारामध्ये इंग्रजांचा अंतर्भाव व्हावा असे वाटून त्यांना तसे सुचविले. पण त्यांनी त्यात भाग घेण्यास नकार दिला. कारण हा करार शाहूराजे ह्यांनी माझ्याशी केला होता. इंग्रजांना त्यांच्या सेनापतींनी ह्या बाबतीत काहीच कळविले नव्हते अशा परिस्थितीत मी इंग्रजांशी असलेल्या दोस्तीच्या कराराचा भंग केला असे म्हणता येणार नाही. पण इंग्रजांचा तसा समज झाला व ते माझ्यावर रागावून मुंबईस निघून गेले, व मी गोव्याला आलो. पण इंग्रजांनी मुंबईला गेल्यावर बांदोडा नदीवरील ताब्यासंबंधीच्या जुन्या कटकटी उकरून काढून आमच्याशी तंटा सुरु केला.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव दीर्घायुरारोग्य देऊन सुखांत ठेवो".

गोवा, १४ सप्टेंबर १७२२

(78) LIVRO DAS MANCOES, No. 88, FLS 66

सरदार पिलाजी जाधव हे वसईवर स्वारी करण्यासाठी आले, तेव्हा पोर्तुगीजांचा आणि त्यांचा पत्रव्यवहार झाला होता. जाधवांच्या एका पत्रास वसईच्या गव्हर्नरने जे उत्तर पाठविले ते पुढीलप्रमाणे आहे :—

पिलाजी जाधव ह्यांच्या पत्राचे उत्तर आणि नजराणे—

"आपले वद्य चतुर्दशीला लिहिलेले पत्र माझ्या पाहाण्यात आले. आपण त्या पत्रात म्हणता की, आपण आपल्या स्वामीचा मुलुख जाळून बेचिराख करण्यासाठी म्हणून आला आहात. पण ज्याअर्थी, मी माझ्या पोर्तुगालच्या बलाढ्य आणि श्रेष्ठ राजाशिवाय दुसरा राजा मानीत नाही, त्याअर्थी, आपण ज्या मुलुखावर आपल्या स्वामीचा अधिकार सांगता तो मुलुख माझ्या राजाचा असल्याने त्याचे रक्षण करणे हे मी माझे कर्तव्य समजतो. मला एका गोष्टीचे राहून राहून आश्चर्य वाटते ते हे की, शाहू राजांशी आमची दोस्ती असता आपण आमच्या मुलुखावर स्वारी करण्यासाठी कसे येता? मला आपणास सूचना करायची आहे की, आपण कुणब्यांचे जीवन उध्वस्थ करू नये. माझी अशी समजूत आहे की, शाहूराजे ह्यांच्याकडून आपणाला अशा प्रकारचा हुकूम मिळालेला नाही. आपण जर ह्या गोष्टीला प्रवृत्त झालात तर मला माझा दूत पाठविणे शक्य होणार नाही".

वसई, २० नोव्हेंबर १७२३

(101) LIVRO DAS MONCOES

सरदार पिलाजी जाधव ह्यांनी पोर्तुगिजांना कळविले की, आपले स्वामी शाहू राजे ह्यांनी आपणाला जव्हार आणि वसई ह्यांच्यामधील प्रदेश उध्वस्त करण्यासाठी पाठविले आहे. जाधवांचे पत्र मराठीत होते, त्याचे पोर्तुगिजांनी आपल्या दुभाष्याकडून पोर्तुगिजमध्ये भाषांतर करून घेतले.

"आमचे आरोग्य उत्तम आहे. आपले क्षेम कुशल इच्छितो.

आपल्या बाजूला त्याचप्रमाणे जव्हाररामनगरला आणि इतर प्रदेशात मी हा मुलुख माझ्या स्वामीचा आहे म्हणून आलो आहे. महाराजांनी मला हा प्रदेश उध्वस्त करण्यासाठी पाठविले आहे, पण तरीही मला विचार करणे आवश्यक आहे. तरी आपण माझ्याकडे आपला एक जबाबदार मनुष्य पाठवावा. त्या मनुष्याला मी सर्व गोष्टी तपशीलवार विदीत करीन. हा मनुष्य आपणाला सर्व काही विदीत करील. पुढे काय करायचे ते आपण नंतर ठरवू. आणि इथून जासूद पाठवायचा असल्याने त्याला वाटेत उपद्रव होऊ नये म्हणून काळजी घेतली आणि ज्याअर्थी, आपला दूत आपण इकडे पाठविणार आहात त्याअर्थी, ह्या भागात पाच किंवा सहा महिनेपर्यंत त्याच्या राहाण्याची व्यवस्था

करण्याचा मी हुकूम दिला आहे. आमच्यामध्ये बोलणी झाली की, नंतर काय ते ठरविता येईल."

प्रस्तुत पत्र दि. २८ नोव्हेंबर १७२३ रोजी देण्यात आले.

(102) LIVRO DAS MONCOES, No. 89(*b*), FLS 4187

सरदार पिलाजी जाधव आणि कान्होजी आंग्रे हे दोघे वसईवर स्वारी करण्यासाठी सैन्याची जमवाजमव करीत असल्याची बातमी कुणी इमान ह्या नावाच्या गुप्त हेराने वसईच्या कॅप्टन जनरलला कळविली. इमानचे पत्र पुढीलप्रमाणे आहे :—

"कॅप्टन जनरल महाराज ह्यांस—

मी काल उंदरीहून ह्या ठाण्याच्या किल्ल्यात येऊन पोहोचलो. मागच्या बातम्या मी आपणाला सादर केल्याच आहेत. आता मी आपणाला चालू बातम्या कळवीत आहे. मी उंदेरीला गेलो, तेव्हा मला कळले की, कान्होजी आंग्रे हे पिलाजी जाधवांच्यासह वसईवर स्वारी करण्यासाठी सैन्याची जमवा-जमव करीत आहेत. त्यांनी आतापर्यंत माणिकगडखाली हजार माणसे गोळा केली आहेत. हा डोंगर अर्नाळ्यापासून अगदी जवळ आहे. ते आणखी माणसे जमवित आहेत. ही माणसे गलबतांतून मुंबा (तुर्भे ?) ह्या नावाच्या खेड्यात ते उतरविणार आहेत. ज्या दिवशी हे सैन्य उतरविण्यात येईल त्याच दिवशी हल्ला होणार आहे. तरी मी आपणाला इशारा देत आहे की, आपण ह्या ठाण्याची माशुआंनी तटबंदी करावी. त्याचप्रमाणे किनाऱ्यावरील सर्व खेड्यातही टेहेळणी ठेवावी. ज्याअर्थी, आपण अनुभवी आहात त्याअर्थी, आपणाला अधिक काही लिहिण्याची जरूरी नाही. कोलाबा येथील जहाजे जर आपण ठाण्याच्या किनाऱ्यावर पाठविलीत तर बरे होईल. मी आपणाला नऊ रूमाण पाठवित आहे.

देव आपणाला पुष्कळ वर्षे सुखात ठेवो".

ठाणे, २ डिसेंबर १७२३

आपला कृतज्ञ सेवक

इमान

(103) LIVRO DAS MONCOES, No. 89(*B*), FLS 419

वसईवर मराठ्यांचा हल्ला होणार असल्याचा सुगावा तिथल्या कॅप्टन जनरलला लागल्याने त्याने त्या प्रदेशाच्या संरक्षणाची योजना आखून ठाण्यांची

पहाणी सुरू केली. त्याचा अहवाल त्याने पुढील पत्रात दिला आहे. ह्या मूळ पत्रातील काही अक्षरे कसरीने खाल्ली असल्याने त्यांचा संदर्भ नीट लागत नाही.

चौलला पाठविलेल्या एका गलबतातून मी आपणाला त्या ठाण्याची ........... आणि ............ शक्य तितक्या लवकर वसईला जाण्याची .......... मी तिकडे दि. १६ ला पोहोचलो ............. ह्या शत्रू संबंधाने लोक बोलत असत .............. दि. १७ ला मी निघालो. लगेच इशारा ................... त्याच क्षणी त्या मूठभर लोकांसह .............. पालांनी तटबंदी केली .......... कॅप्टन ............... जनरल मला फक्त एक मांशुआ देऊ शकतात ............ शत्रूने निर्णय घेऊ नये म्हणून ............ आमच्या साष्टी बेटात .............. तटबंदी करण्याचा हुकूम केला आहे. शत्रू माझ्या आगमनानंतर दोन दिवस राहीला............ जुन्या साइबणला होता. मला आताच मिळालेल्या निरोपा-वरून कळून येते की, रविवारी सकाळी दहा वाजता ............ कल्याणच्या एका भागातून गेला. त्यांनी साइबाण येथील .............. जाळून टाकले मनोऱ्याच्या कॅप्टनने मला ज्या आता बातम्या सांगितल्या त्या.......... जुळल्या आहेत. शत्रू त्या किल्ल्यापासून एक मैलाच्या अंतरावर आहे येऊन पोहोचलो तेव्हा मला बाजीराव आणि पिलाजी जाधव ह्या दोघांची पत्रे मिळाली दोन्हीही वेगवेगळी आहेत. त्यांनी तहाची आणि मैत्रीची मागणी केली असून आम्ही पकडलेली .......... सोडून देण्याची विनंती केली आहे. मला आणखी पत्रे आली आहेत. त्यातील एक कल्याणच्या सुभेदाराचे आहे. त्यानेही माझ्याकडे तहाची मागणी केली आहे.

वसई, २ डिसेंबर १७२३

(104) LIVRO DAS MONCOES, No. 89(*b*), FLS 425

चौलचे आरमार दहा दिवसांनी आता इथे येऊन पोहोचले. ते अद्याप ............ मला बातम्या कळल्या आहेत की, शत्रू माहीम आणि मनोर ह्या दोन्ही जिल्ह्यात शिरला आहे. आत ३०० माणसांची तुकडी पाठविली आहे.

वसईचा गव्हर्नर गोव्याच्या व्हाइसरॉयला सरदार पिलाजी जाधव ह्यांच्या वसईवरील स्वारी संबंधाने लिहितो :—

शुक्रवार दि. २६ नवंबर रोजी सकाळी पिलाजी जाधव ह्यांनी सुमारे चार हजार घोडदळासह आमच्या प्रदेशावर आक्रमण केले. त्यांचा हा हल्ला इतका आकस्मिक होता की, आम्हाला त्यांचा प्रतिकार करणे शक्य झाले नाही.

सैबाण यत्किंचितही प्रतिकार न करता सोडून देण्यात आले. तिथुन मराठा सैन्याने गोकार्वेपर्यंत मजल मारली. ह्या शहरापासून ते ठाणे दोन मैलावर आहे. ते तिकडे दुपारी दोन वाजता पोहोचले. हे खेडे त्यांनी जाळले नाही. ते मग कसब्यापर्यंत गेले. मला ते कळले नाही. एका अधिकाऱ्याने मला ही बातमी कळविली. लगेच ४० घोडेस्वार तिकडे पिटाळण्यात आले. माझ्या-पाशी सैन्य नव्हते. तरीही मी आणखी ४८ माणसे पाठवून दिली. ह्या ठाण्यातील पाली आणि गलबते दमणला मोहिमेवर गेली होती.

मला दाभाडेची फार भीती वाटत होती, कारण तो ह्या भागात शिरण्याची शक्यता होती. मी रात्रीचा मुक्काम ................ येथे केला, व तिथून सगळीकडे हुकूम धाडले. दि. २७ ला सकाळी बातमी कळली की, शत्रू ह्या ठाण्यावर चाल करून येत आहे. शत्रूसैन्य मी पाठविलेल्या ४८ माणसांना भेटले होते. मी शत्रूचा प्रतिकार करण्यासाठी माणसे पाठविली व त्या खेड्यात गेलो.

दि. २८ ला बातमी आली की, बाबा ................ येथे १२ हजार शत्रू घोडेस्वार आले आहेत. हा प्रदेश शत्रूचा असून तो आमच्या प्रदेशाला भिडलेला आहे. साष्टी बेटावर हल्ला करण्यासाठी ते घोडदळ तिथे बसविण्यात आले असल्याचे कळले. मी कॅप्टन मोलार माझ्याजागी ठेवले. व वसईला ठाणे नदीत आणि इतर ठिकाणी नौका पाठविण्याची व्यवस्था करण्यासाठी गेलो. ती कामगिरी मी पार पाडली. मी ऑव्हिदोर जनरल आणि इतर अधिकाऱ्यांकडे नाईकांची शिबंदी असलेल्या सात मांशुआ मागितल्या. तिथेही माणसे कमी होती. मी लगेच सोपाऱ्याला परतलो. तिथे मला पिलाजी जाधव ह्यांनी लिहिलेले पत्र मिळाले. त्या पत्राची नक्कल मी आपणाकडे पाठवित आहे. त्या पत्राचे उत्तर मी साजेसेच धाडले.

दि. २९ ला सकाळी नऊ वाजता शत्रूच्या ५०० घोडस्वारांची एक तुकडी दिसली. एका टेकडीच्या मागे राहून त्यांनी सोऱ्याकडे जाणारा रस्ता रोखून धरला होता. हा रस्ता एका ओढ्यातून जात होता. आमच्या सैन्याशी तब्बल दोन तास लढल्यावर त्यांनी माघार घेतली. आमचा एकही सैनिक दगावला नाही. शत्रूची हानी झाली. दि. ३० लाही शत्रूचे घोडेस्वार दिसले. परंतु त्यांनी रस्ता लढविला नाही. ते सैबाणला आपल्या छावणीत परतले. मी त्यांचा पाठलाग केला नाही. कारण माझ्यापाशी अवघी साठ माणसे, नऊ घोडेस्वार आणि सात खासगी माणसें होती. त्या दिवशी मला ५० माणसांची कुमक मिळाली. ही माणसे मी ठिकठिकाणाहून मागविली

होती. नंतर मांशुआतील एक कंपनीही आली. सतत तीन दिवसपर्यंत शत्रूने हालचाल केली नाही. ह्या दिवसात मी काही सैनिकांना जंगलामध्ये लपून राहून रात्रीचा शत्रूवर हल्ला करण्यासाठी तुंगारला पाठविले.

दि. ३ डिसेंबरला मी कल्याणवर हल्ला करण्याची तयारी करण्यासाठी ह्या शहरी आलो. इथे आल्यावर मला इमानूच एक पत्र मिळाले. ते पत्र मी आपल्या अवलोकनार्थ पाठवित आहे. त्या रात्री दिवला गेलेली दोन पालें परतली. ती पाली आणि काही होडया मिळून मी आंग्र्यांच्या हल्ल्यापासून धोका असलेल्या फळीचे रक्षण करण्यासाठी उपयोगात आणण्याचे ठरविले आहे. कल्याणवर हल्ला करण्याचा विचार मी जरा लांबणीवर टाकला आहे.

तूर्त शत्रूपासून धोका असलेल्या ठाण्यांचा बचाव करण्याची तयारी मी केली आहे. आपणाला माझी विनंती आहे की, कुमक ताबडतोब पाठवून द्यावी. कारण, ज्याअर्थी, आरमार निघालेले नाही, त्याअर्थी, त्याचा काही उपयोग होईल असे वाटत नाही.

देव आपले रक्षण करो".

वसई, ५ डिसेंबर १७२३

(105) LIVRO DE MONCOES, No. 89 FLS 425

वसईचा गव्हर्नर गोव्याच्या व्हाइसरॉयला कळवितो की, शाहू राजे ह्यांच्या आज्ञेवरून आपण वसईवर हल्ला केला असे सरदार पिलाजी जाधव ह्यांनी आपणाला कळविले आहे.

"पिलाजी जाधव ह्याच्याकडून आलेल्या एका पत्रावरून कळते, की, त्यांनी वसईवर हल्ला केला तो त्यांचे स्वामी शाहूराजे ह्यांच्या आज्ञेवरून. हे पत्र दिनांक २८ नोव्हेंबरचे आहे. ह्या प्रदेशाची खंडणी त्यांना मिळाली नाही अशी त्यांची तक्रार आहे. व ती मिळाली नसल्यास हा प्रदेश जाळून बेचिराख करण्याची त्यानी धमकी दिली आहे.

आपल्या दिनांक ६ डिसेंबरच्या पत्रावरून कळून येते की, सरदार पिलाजी जाधव ह्यांनी वसईला स्वारी केली ती प्रागाण तलोज येथील पटेलांच्या बापांच्या विनंतीवरून. परंतु मी आपणाला कळवीत आहे, की, ह्या राज्यांतील पटेलांची मुक्तता झाल्यावर मी सर्व पटेलांना सोडून दिले. आणि रामचंद्र पंत ह्यांनी जर माझ्या अमलाखालच्या प्रदेशांतील पटेलांना पकडले नसते, तर मी त्यांच्या राज्यांतील पटेलांना पकडून आणले नसते. रामचंद्र पंत ह्यांचा

असा आरोप आहे, की, ही तेढ निर्माण होण्यास मी कारणीभूत आहे. परंतु हा आरोप मी मान्य करण्यास तयार नाही. कारण, आगळीक प्रथम रामचंद्र पंत ह्यांच्याकडून झाली आहे. त्यांनी जर प्रथम माझ्या अंमलाखालच्या टापूंतील पटेलांना पकडले नसते, तर मी त्यांच्या हद्दीतील पटेलांना पकडले नसते.

ह्या शिवाय मला आपणास आणखी कांही लिहायचे नाही. कारण उद्यां ज्या अर्थी माझ्याजागी दुसरा मनुष्य येत आहे त्या अर्थी आपण त्याला लिहू शकता. आणि आपणाला जो काय निर्णय घ्यायचा तो आपण स्वेच्छेने घेऊं शकता."

वसई, १८ डिसेंबर १७२३

(109) LIVRO DAS MONCOES, No. 89(*b*) FLS 438

वसईच्या गव्हर्नरने रामचंद्र पंत ह्यांना पुढील खलिता पाठविला :—

"मराठे आणि पोर्तुगिज ह्या दोघांमध्ये कुलाबा येथे जो करार झाला, त्या कराराला मान्यता देऊन त्याच्यावर सही करण्यास मला कोणताच संदेह वाटत नाही. प्रस्तुत कराराप्रमाणे एकमेकाच्या छावणीत असलेल्या कैद्यांची अदलाबदल चार दिवसाच्या आत झाली पाहिजे. माननीय रामचंद्र पंत ह्यांनी आपली छावणी माझ्या अंमलाखाली असलेल्या प्रदेशाबाहेर हलवावी. त्यांनी जर तसे केले नाही. तर ते पोर्तुगिज राष्ट्राचे शत्रू आहेत असे मानून त्यांना माझ्या अमलाखालील प्रदेशांतून हाकलून लावण्यासाठी मला बळाचा उपयोग करावा लागेल. मी माझ्या मुलुखाचा बचाव तर करीनच पण त्यांच्याही प्रदेशात शिरून अंदाधुंदी माजवीन.

हे पत्र मी माझ्या स्वतःच्या हस्तीक्षराने लिहिले असून त्याच्यावरील मुद्राही माझ्याच आहेत. तसेच मानचिन्हांचे सीलही माझेच आहे."

वसई, २७ डिसेंबर, १७२३

(111) LIVRO DAS MONCOES, No. 89(*B*) FLS 429

वसईचा गव्हर्नर गोव्याच्या व्हाइसरॉयला वसई प्रांतातील परिस्थितीचा आढावा घेऊन पुढील पत्र लिहितो.

"चालू महिन्याच्या दिनांक २२ ला मी इकडून देशाला जाणाऱ्या एका जहाजावर एक पत्र पाठविले होते. त्या पत्राची नक्कल मी ह्या पत्रासोबत पाठवित आहे.

आपण मला कळविले होते, की, मावळत्या गव्हर्नरांच्या दिमतीला दोन पाली द्यावी. त्यांनी मला आपले पत्र दाखविले. त्यांत हीच माहिती होती. आपल्या पत्राप्रमाणे मी त्यांच्या दिमतीला हे पाले दिले. इथे माणसांची कमतरता आहे. म्हणून मी १२ सैनिक वाढवून घेतले. मावळत्या गव्हर्नरांबरोबर त्यांचे कुटुंबही जात आहे. मला आशा आहे, की, हे जहाज इकडे लवकरच परतेल कारण त्याची इकडे फार आवश्यकता आहे.

मावळत्या गव्हर्नरांकडून आपणाला इथल्या परिस्थितीची माहिती मिळेल. सांप्रत हृया प्रांतात मनोरा, माहीम, आणि तारापूर हृया तीन ठिकाणी शत्रूचे आक्रमण चालू आहे. त्याच बरोबर कल्याणचे गव्हर्नर रामचंद्र पंत हे आमच्याशी असलेल्या मैत्रीची आठवण देऊन आमच्याकडे सहकार्याची मागणी करीत आहेत. व मध्यस्थी करण्याची इच्छा दर्शवीत आहेत. परंतु हे धोरण नुसते काळ काढू पणाचे आहे. व त्यांच्या लोकांना लुटालूट करण्यास अवसर देण्याचे आहे. मी रामचंद्र पंत हृयांना कळविले की, त्यांचे जे लोक आमच्या प्रदेशात बंडाळी माजवीत आहेत त्यांना त्यांनी प्रथम मागे घ्यावे. त्यांनी जर तसें केले नाही. तर त्यांचे हे कृत्य शत्रूत्वाचे समजून त्यांच्याविरूद्ध उपाययोजना केली जाईल. कारण युद्धबंदी झाल्याखेरीज शांतता नांदू शकत नाही. आणि माझा असा आरोप आहे की, हृया बंडाळीमागे रामचंद्र पंत हृयांचा हात आहे.

परंतु माझ्या इशाऱ्याकडे दुर्लक्ष करून शत्रूने जेव्हां आपली आक्रमक कृत्ये तशीच चालू ठेवली, तेव्हां मला त्यांच्या विरूद्ध उपाययोजना करणे भाग पडले. मी कल्याणवर समुद्रावरून आणि जमिनीवरून दोन्हीही बाजूनी हल्ला करण्याचे ठरविले. परंतु मी फार मोठा धोका पत्करण्यास तयार नव्हतो. म्हणून मी साष्टी बेटाचे रक्षण करण्यासाठी काही लोक मागे ठेवले. त्या दरम्यान मी गोव्याला पाठविलेल्या फिरगोटच्या आगमनाची वाट पाहात आहे. माझा हा निर्णय बरोबर आहे की नाही ते आपणाला ठरवितां यावे म्हणून व आपणाला परिस्थितिची कल्पना व्हावी म्हणून रामचंद्रपंत हृयांनी मावळत्या गव्हर्नरना जी पत्रे पाठविली ती पत्रे त्यांच्या भाषांतरासह मी आपणाकडे पाठवित आहे.

दिनांक २५ ला आरमाराचे आगमन झाले. त्याच्यावर हृया प्रांताच्या रक्षणासाठी ३६० सैनिक आले आहेत. सैनिकांची यादी तपासून पाहिली असता पाच सैनिक कमी भरले. मी आपणाला जो हा अहवाल सादर करीत आहे. त्या अहवालाहून कॅप्टन मोर हृयांच्याकडे वेगळी यादी आहे. तरी हृया गोंधळाची

आणि हरवलेल्या सैनिकांची आपण चौकशी करावी.

देव आपले रक्षण करो."

वसई, २८ डिसेंबर, १७२३

(112) LIVRO DAS MONCOES, No. 89(*B*) FLS 426

पोर्तूगिजांनी मराठ्यांच्या हद्दीत शिरून कांही लोकाना पकडून नेल्याने मराठे व पोर्तूगीज ह्यांच्यामध्ये तेढ निर्माण झाली होती. त्या संबंधी सरदार पिलाजी जाधव ह्यांनी वसईच्या गव्हर्नरला जे पत्र पाठविले ते पुढीलप्रमाणे आहे :—

मित्रवर्य रा. रा. वसईचे गव्हर्नर व वसईच्या किल्ल्यांचे कॅप्टन जनरल लुईज द मेलु द सांपायुन ह्यांस—

"मी आपला एकनिष्ठ मित्र पिलाजी जाधव आपल्या हाताचे चुंबन घेऊन माझ्या आरोग्याची आपणाला माहिती देत आहे व आपली ख्याली खुशाली मला कळावी अशी इच्छा व्यक्त करीत आहे.

काही दिवसामागे मी आपणाला पत्र लिहून कळविले होते की दोन्ही बाजूंच्या तक्रारींची चौकशी करून तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपणाकडचा एक दूत आपण आमच्याकडे पाठवावा. त्या पत्राला आपण उत्तर पाठविले, की, प्रजा नष्ट झाली असल्याने आता लायक मनुष्य पाठविण्यास जागा नाही. मी आपणाला कळवू इच्छितो, की आपला त्रागा अन्नाठायी आहे. कारण, आमच्या हातून कोणतीच आगळीच घडलेली नाही. उलट मी आपणाशी भावाप्रमाणे वागत आलो आहे. आपण आमच्या तळोजे यथील अधिकार कक्षेत शिरून तिथल्या सहा किंवा सात शेतकऱ्यांना अथवा रहिवाश्यांना पकडून नेले. मी जव्हाररामनगर, नवसार आणि इतर शहरांकडे जात असतां वाटेत तळोज्याच्या नागरिकांनी माझ्याकडे वरील तक्रार केली. त्या तक्रारीकडे लक्ष देणे मला भाग पडल्याने मला ह्या भागांत यावे लागले. आपणाला जर माझ्याकडे सलोखा साधायचा असेल तर आपण आपला एखादा दूत वाटाघाटीसाठी पाठवावा. मीही आपणाकडे वाटाघाटीसाठी आमचा एक दूत पाठविन. दुसरी गोष्ट अशी की, आमच्या हद्दीत शिरून आपण आमच्या सहा अथवा सात पटेलांना जें पकडून नेले आहे, त्यांची आपण त्वरीत मुक्तता केली पाहिजे. कारण सरदार चंद्रोजी-राव दाभाडे ह्यानी आपले जे लोक पकडून नेले होते, त्यांची मुक्तता केली

आहे, आणि मी आपणाला आश्वासन देतो, की आपले काही लोक आमच्याकडे कैद असल्यास त्यांची मुक्तता केली जाईल. माझी आपणाला आग्रहाची सूचना आहे, की आमच्यामध्ये शांतता नांदावी म्हणून हा तह झाला पाहिजे. आणि जर असे घडले नाही तर उपरिनिर्दिष्ट प्रदेश घेण्यासाठी मला इकडे आठ महिने थांबावे लागेल. जव्हार आणि इतर भागांतील लोकांनी आमच्याकडे तह केलाच आहे. तेव्हा आपणही जर हा तह केला, तर बरे होईल. आपण जर चार झोपडया जाळून आमच्याशी युद्ध करण्याचा प्रयत्न केला तर आपला हेतु सफल होणार नाही हे मी आपणाला आधीच सांगून ठेवतो. आपल्या पूर्वीचे गव्हर्नर माझ्याशी सलोख्याने वागत असत. त्यांचे आणि माझे संबंध भावां-भावांसारखे होते. माझी आपणाला विनंती आहे की, झाले गेले विसरून जावे व तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपला दूत आमच्याकडे पाठवावा. न झाल्यास मला पुढील तजवीज करावी लागेल.

पंडीत प्रधानही आपणाला लिहिणार आहेत. त्यांच्या पत्रावरून आपणाला परिस्थितिचे अधिक आकलन होईल. ह्या शिवाय मी आपणाला अधिक काही लिहित नाही."

प्रस्तुत पत्रावर १५ बिलावल असून ते १३ डिसेंबर १७२३ चे आहे.

धवलजी सोमवंशी रूस्तुमराय ह्यांनी वसईच्या गव्हर्नरला जे पत्र लिहिले ते पुढील प्रमाणे आहे :--

"धवलजी सोमवंशी रूस्तुमराय आपल्या हाताचे मोठया आदराने चुंबन घेऊन आपणाला आयुरारोग्य इच्छित आहे. आमच्यामध्ये आणि आपणामध्ये असलेल्या तहावर विसंबून राहून जव्हार-रामनगरकडे चाललेले सैन्य वाटेतच थांबले. आम्ही पुढे चाललो होतो. तोच आपण किल्ल्यामध्ये आक्रमण केल्याची तक्रार तिथल्या प्रजाजनांनी आमच्याकडे येऊन केली. सेनापती चंद्रोजीराव दाभाडे ह्यांनी पोर्तुगिज मूलुखांतील ज्या लोकांना पकडून आणले होते, त्यांची पंडीत प्रधानांनी पोर्तुगिजांची आणि मराठयांची दोस्ती असल्याच्या कारणावरून मुक्तता करण्याचा हुकूम केला. परंतु आपण तळोज्याच्या स्वारीत ज्या खेडयां-तील लोकांना पकडून नेले त्यांची मुक्तता करण्यास नकार दिला. त्यावरून आम्हाला वाटते, की, आपण पोर्तुगिज आणि मराठे ह्यांच्यामधील तहाचा भंग केला आहे. त्याचा परिणाम असा झाला, की, आपण ज्या लोकांना पकडून नेले, त्यांच्या मुक्ततेसाठी आम्हाला जव्हार-रामनगरला जाण्याचा विचार सोडून मागे परतावे लागले. आमचे सैन्य आता आपल्या मुलुखाच्या हद्दीजवळ येऊन ठेपले आहे. महान सरदार पिलाजी जाधव ह्यांनी आपणाला तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपला एक विश्वासू दूत आपणाकडे

पाठविण्याबद्दल पत्र घालून कळविले होते. परंतु त्या पत्राचे उत्तर आपण अद्याप धाडले नाही. आतां आम्ही ह्या पत्राचे द्वारा आपणाला विनंती करीत आहोत की आपण शांततेचे रक्षण करावे. आपण तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी एकाद्या लायक मनुष्याला आमच्याकडे पाठवून द्यावे. हा तह पोर्तुगिज प्रदेशाच्या आणि दक्षिणेकडील प्रदेशाच्या शांततेच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. आपण तळोद्यातील खेड्यांतून ज्या रहिवाश्यांना अथवा पटेलांना पकडून नेलेत त्यांची ताबडतोब मुक्तता करावी. आणि त्यांची मुक्तता करण्याचा आपला विचार नसल्यास आम्हाला त्वरीत तसे कळवावे. म्हणजे आम्हाला पुढील इलाज करणे बरे पडेल. आम्ही इकडे तळोद्याच्या घटनेची चौकशी करण्यासाठी आलो आहोत. आम्ही सैन्य पाठविलेले नाही. आम्हाला आपणाकडून आमच्या पत्राचे जसे उत्तर तसे पुढील धोरण आंखावे लागेल. तरी मी आपणाला पुनः एकदा सूचना करतो की आपणाला जर आमच्याशी तहाच्या वाटाघाटी करायच्या असतील तर आमच्याकडे लायक माणसे ताबडतोब पाठवावी. आमच्या वतीने मी आपणाशी वाटाघाटी करण्यास तयार आहे."

१५ रविलावल, १३ डिसेंबर, १७२३.

"महान मित्र, मैत्रीचे रक्षण करणारे लुईज द मेलु द सांपायु पोर्तुगिज प्रदेशाचे कॅप्टन जनरल, की, ज्यांची मैत्री चिरायु होवो.

मी महादजी कृष्ण भिवंडीचा हवालदार आपला हात पुनः पुनः चुंबून माझे क्षेम कुशल कळवून आपले क्षेम कुशल कळविण्याची आपणाला विनंति करीत आहे.

मी आपणाकडे पंडीत प्रधान श्री. बाजीराव, महान पिलाजी जाधव आणि महान धवलजी सोमवंशी ह्यांची पत्रें पाठवित आहे. त्या पत्रांत काय लिहिले आहे ते आपण वाचून बघावे. आपण त्या पत्रांची उत्तरे पाठवाल अशी आशा आहे. म्हणजे मी ती त्यांना पोहोचती करीन.

आपणाशी मैत्री असावी अशी इच्छा व्यक्त करून हे पत्र पूर्ण करतो.

ह्या पत्रांची भाषांतरे मी बांगण कामत राज्याचा दुभाषी ह्याने केली."

सचिवालय, ९ जानेवारी १७२४

(185) LIVRO DAS MONCOES, No. 89(*B*) FLS 421

बाजीराव पेशवे ह्यांनी वसईच्या गव्हर्नरला पत्र पाठवून मराठ्यांच्या प्रदेशांत आक्रमण करून पकडून नेलेल्या माणसांची मुक्तता करण्याची पुढील पत्रांत मागणी केली :—

"उदार आणि महान लुईज द सांपायु ह्यांची मैत्री चिरायु होवो.

आपणाविषयी मला वाटणारे प्रेम व्यक्त करून मी आपणाला माझी ख्याली खुशाली कळवित आहे व आपणालाही आयुरारोग्य इच्छित आहे. आपण भिवंडीच्या कक्षेतील तळोद्या नामक परगण्यांत शिरून तेथल्या काही रहिवाश्यांना अथवा पटेलांना पकडून नेल्याची वार्ता आम्हाला कळली आहे. आपण काही जणांना ठार केल्याचेही कळते. आमचे सैन्य जव्हारकडे जात अस्तां वाटेत तळोद्याच्या लोकांनी आमच्या सेनाधिकाऱ्यांकडे ही तक्रार केल्याने त्यांना सैन्य घेऊन मागे फिरावे लागले. आमचे सैन्य पोर्तुगिज प्रदेशांत जरी शिरले असले, तरी त्याने मोठ्या लष्करी हालचाली केल्या नसल्याने दक्षिणेकडील पोर्तुगिज प्रदेशांत शांतता आहे.

आमच्या प्रदेशांत शिरून आपण ज्या आमच्या प्रजाजनांना पकडून नेले, त्यांची सुटका करण्याबद्दल आपणाला श्री. रामचंद्र पंडीत ह्यांनी लिहिले होते. परंतु आपण त्या पाटलांची अद्याप मुक्तता केली नाही. महान उदार सेनापती चंद्रोजीराव दाभाडे ह्यांच्या घोडदळांतील काही लुटारू सैनिकांनी पोर्तुगिज प्रदेशात शिरून ज्या लोकांना पकडून नेले होते, त्यांची मुक्तता करण्यांत आली. परंतु आपण मात्र तळोद्यांतील ज्या पाटलांना अथवा रहिवाश्यांना पकडून नेले त्यांची अद्यांप मुक्तता केलेली नाही. आमच्यामधील तहाच्या कराराच्या दृष्टीने ही गोष्ट बरोबर नाही हे मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे.

आता जर आपणाला दोन्ही राज्यांमध्ये शांतता नांदावी असे वाटत असेल, तर आमच्या प्रजाजनांची ताबडतोब मुक्तता करावी. अथवा आमच्याशी आपणाला युद्ध करायचे असल्यास आम्हाला तसे स्पष्टपणे कळवावे. म्हणजे मला माझ्या सैन्याला हुकूम देतां येईल. किंवा आपणाला जर आमच्याशी मैत्री ठेवून तह करायचा असेल तर तत्संबंधीच्या वाटाघाटी करण्यासाटी एखाद्या लायक मनुष्याला आमच्याकडे पाठवून द्यावे. म्हणजे महान पिलाजी जाधव ह्यांच्या सैन्याला पुढे न जाण्याबद्दल मला कळवितां येईल. ह्या शिवाय मला आपणास आणखी काही लिहायचे नाही."

हे पत्र ७ रबिलावल अथवा ५ डिसेंबर रोजी लिहिण्यांत आले.

भाषांतरकार : सरकारी दुभाषी बोगण कामत

सचिवालय, ९ जानेवारी १७२४.

(LIVRO) DAS MONCOES, No. 89(*B*) FLS 432

भिवंडीचे हवालदार आणि फौजदार महादजी कृष्णाजी ह्यांनी वसईच्या गव्हर्नरला जे पत्र लिहिले ते पुढील प्रमाणे आहे.

(मराठे सरदारांची पोर्तुगिजांना लिहिलेली सर्व पत्रे मराठीत असून त्यांची पोर्तुगिज भाषांतरे पोर्तुगिजांच्या दरबारांतील मराठी जाणणाऱ्या दुभाषांनी केलेली आहेत.)

"मित्रवर्य रा. रा. श्री. लुईज द मेलु द सांपायु पोर्तुगिज प्रदेशाचे सेनापति ह्यांस—

मी आपला विश्वासू मित्र महादजी कृष्णाजी, भिवंडीचा सुभेदार आणि हवालदार, आपल्या हाताचे पुनः पुनः चुंबन घेऊन माझे क्षेम कुशल आपणाला कळवीत आहे व आपले क्षेम कुशल आपण आम्हाला कळवावे अशी आपणाला विनंति करीत आहे.

आपले पत्र वेळीच मिळाले व ते वाचून आनंद झाला. त्या पत्रांत आपण म्हटले आहे की, कल्याण-भिवंडी येथील व्यापाऱ्यांनी पोर्तुगिज प्रदेशांत व्यापारासाठी येण्याची इच्छा दर्शविली होती. त्याला मी नकार दिला नाही. त्यांना मी तिकडे वाटलेल्या जीवनोपयोगी वस्तू आणि कापड नेण्याची परवानगी दिली. आपल्या पत्रांतील भाषेप्रमाणे मी ह्या बंदरांतील व्यापाऱ्यांना सर्व प्रकारच्या जीवनोपयोगी वस्तू आणि कापड पोर्तुगीज प्रदेशांत नेण्याची आज्ञा केली आहे. ते कोणतीच भीती नसतांना हा व्यापार करतील अशी आशा आहे.

आपल्या पत्रांत आपण जी मैत्रीची भाषा वापरली आहे ती मी पत्रद्वारे श्री. रामचंद्र पंडीत ह्यांना कळविली आहे. आपण तळोद्याच्या हद्दीत शिरून ज्या लोकांना पकडून नेले ती तक्रार पंडीत प्रधान श्रीमंत बाजीराव ह्यांच्या कानी गेली आहे. त्यांनी ही तक्रार कळतांच रामचंद्र पंडीत ह्यांची चांगलीच हजेरी घेतली. कारण ही तक्रार सदर्हू रामचंद्र पंडीत ह्यांनी श्रीमंतांच्या कानावर स्वतः घालणे आवश्यक होते. त्यांनी ती तब्बल चार महिने दाबून ठेवली. श्रीमंत पंडीत प्रधान आणि श्री. रामचंद्र पंडीत ह्या दोघांनी आपणाला लिहिलेली पत्रे मी आपणाकडे पाठवित आहे. माझ्या बाबतीत बोलायचे झाल्यास मी पत्राची उत्तरे पाठविण्याच्या बाबतीत कधीच हलगर्जीपणा केलेला नाही. आमचे संबंध बंधू सारखे असल्याने त्यांत कधीच व्यत्यय येणार नाही. ह्याशिवाय मी अधिक काही लिहित नाही. फक्त मैत्रीची अपेक्षा करीत आहे."

उपरिनिर्दिष्ट पत्रांत जी चिठी होती तीत पुढील मजकूर होता.

ह्या मार्गाने जे जासूद गेले आहेत त्यांच्याबरोबर पंडीत प्रधान श्रीमंत बाजीराव ह्यांची सरदार पिलाजी जाधव, सरदार............... आणि इतर सरदारांना पत्रे गेली आहेत. त्या पत्रांतील मजकूर मला माहीत नाही. त्यांत काय लिहिले आहे ते मला कळले तर मी आपणाला लगेच कळविन, वगैरे.

हे पत्र पोर्तुगिज राज्याचे दुभाषी बोगण कामत ह्यांनी मराठीतून पोर्तुगिजमध्यें भाषांतरीत केले.

सचिवालय, ९ जानेवारी १७२४.

गोव्याच्या व्हाइसरॉयने पोर्तुगालला आपल्या राजास वसईतील घडामोडींचा आढावा घेऊन जें पत्र लिहिले त्यांत त्याने मराठे सरदार व बाजीराव ह्यांच्यावर भरपूर तोंडसुख घेतले आहे.

" महाराज---

..................................................................................

..................................................................................
कल्याणच्या गव्हर्नरनी आम्हाला कळविले होते कीं, त्या भागांत शांतता असून शत्रूचा उपद्रव होण्याची शक्यता नाही. ते पत्र मी महाराजांच्या अवलोकनासाठीं दिनांक २ नोव्हेंबर १७२३ रोजी तिकडे रवाना केले आहे. वसईच्या गव्हर्नरनी आम्हाला प्रांतात शांतता आहे असे कळविल्याने आम्ही तिकडे कुमक पाठविली नाही आणि त्या भरवंशावर आम्ही तिकडे पाठवायची नेहमीची कुमक आरमाराबरोबर पाठविली. ते आरमार इकडून दिनांक २७ नवंबरला रवाना झाले. आरमार निघून गेल्यावर दिनांक ५ डिसेंबरचे जे पत्र लुईज द मेलु ह्यांच्याकडून आम्हाला आले, की ज्याची नक्कल मी आपणाकडे पाठवित आहे, त्यांत त्यांनी आम्हाला कळविले की, शाहूराजे ह्यांचे एक सरदार पिलाजी जाधव ह्यांनी आपले सैन्य वसईमध्ये सैबाणच्या बाजूने घुसविले आहे. ते पत्र मिळतांक्षणी आरमारावर पाठविलेल्या कुमकेशिवाय आम्ही इकडे काही माणसे गोळा करून ती एका फिरगेटमध्ये भरून पाठवून दिली.

त्या प्रांतांत नवीन गव्हर्नर आला व त्याने आपल्या अधिकाराचा कबजा घेतला. आम्ही त्याला आगाऊ इशारा दिला होता, की शत्रू जवळ आहे, तरी सावध असावे. ह्या युद्धाची कारणे शाहू राजे ह्यांचे सेनापति बाजीराव व त्यांची इतर सेनाधिकारी ह्यांनी आम्हाला जी पत्रे लिहीली त्या पत्रांत आढळतात. त्या पत्रांच्या नकला आपणाकडे पाठविण्यांत येत आहेत. ह्या लोकांनी आम्हाला पत्रें पाठवून ज्या तक्रारी केल्या त्या विश्वासार्ह नाहीत,

कारण, ह्या तक्रारी करणारांपैकी एकजण कल्याणचा गव्हर्नर असून, आमच्या हद्दीत शिरून त्याने आमच्या काही प्रजाजनांना पळवून नेले होते.

हे सर्व लोक बदमाश आणि चोर आहेत. चोरी आणि दरोडेखोरी हाच त्यांचा मुळी धंदा आहे. आणि ते जगतातही मुळी ह्याचे धंद्यावर. कोणत्याही कारणावरून ते आक्रमणे करतात व त्यांचे समर्थन करतात. ते समर्थ आणि बलशाही असल्याने त्यांना कुणाचीच परवा वाटत नाही. प्रत्यक्ष मोगल सम्राटाची देखील ते कदर करीत नाहीत. त्यांचा उर्मटपणा मोगल सम्राटाला टाळतां येत नाही. गेल्या वर्षी ते कोणतेच कारण नसतांना दमणमध्ये शिरले. त्यांचा आणि आमचा मैत्रीचा आणि शांततेचा करार असतांनाहीं, त्यांनी दमण मध्ये आक्रमण केले. कुलाब्याच्या युद्धाचे वेळी मराठ्यांचा आणि आमचा शांततेचा करार झाला होता.

वसईचा मुलुख सोडल्यास आमच्या इतर प्रदेशांत शांतता नांदत आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखांत ठेवो."

गोवा, १२ जानेवारी १७२४.

LIVRO DAS MONCOES, No. 89 (B) FLS 412

कल्याणचे सुभेदार रामचंद्र पंत ह्यांनी सरदार पिलाजी जाधव व सरदार धवलजी सोमवंशी रूस्तुमराव समशेर बहाद्दूर ह्यांच्यासमक्ष सुभा अरबाअस्सरीनामया अरक साली म्हणजे इ. स. १७२४ साली पोर्तुगिजांना ज्या तहाच्या अटी सादर केल्या त्या पुढील प्रमाणे आहेत :—

(१) श्रीमंत पंडीत प्रधान बाजीराव ह्यांनी कुलाब्याला पोर्तुगिजांशी जो तह केला होता, त्या तहाप्रमाणे उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर लुईश द मेलु इ सांपायु हे वागत असतां त्यांनी कल्याणच्या तळोदा परगण्यांत शिरून तिथल्या काही मुकादमांना पळवून नेल्याने पोर्तुगिज आणि पंडीत प्रधान ह्यांच्यामधील कराराचा भंग झाला. उपरिनिर्दिष्ट प्रदेशाच्या सल्लागार मंडळाचे एक सदस्य दों. लुईज द कोश्त ह्यांनी कंबा ह्या नावाच्या खेड्यांत भेटण्याचे कबूल केले. तथे रामचंद्र पंत, पिलाजी जाधव आणि धवलजी सोमवंशी ह्यांची व त्यांची भेट झाली असतां, कुलाब्याला जो करार झाला त्या कराराच्या अनुरोधाने नवीन करार व्हावा असे ठरले. त्या कराराच्या काही अटी—

(२) आपल्या राज्यांत आगळीक झाली आहे म्हणून आपण मे महिन्यापर्यंत महाराजा छत्रपती व श्रीमंत बाजीराव पंडीत प्रधान ह्यांना भेटण्याकरिता आपला एक वजनदार दूत त्यांच्याकडे पाठवावा. आपला दूत छत्रपतींच्या दरबारांत जाऊन आल्यावर आम्ही आपल्या प्रदेशांत आक्रमण न होण्याची दक्षता घेऊ.

(३) सरकारचे जे सामान भिवंडी आणि कल्याणहून पोर्तुगिज प्रदेशांत जाईल आणि तिथें दारूगोळा, गंधक, तोफांचे भाग वगैरे वस्तू ज्या विकत घेतल्या जातील त्यांच्या वाहतुकीच्या मार्गांत कोणताच अडथळा येऊं नये. त्याचप्रमाणे त्या वस्तूंवर कोणताच हक्क शाबीद केला जाऊं नये.

(४) आपल्या प्रदेशांत आमच्या सैन्याने शिरून जी माणसे कैद केली आणि गुरे व चार तोफा ताब्यांत घेतल्या त्या आपणास परत केल्या जातील.

(५) कल्याण आणि भिवंडी ह्या दोन्ही बंदरांतील जी जहाजे वसई, मुंबई आणि आपल्या इतर प्रदेशांत व्यापारासाठीं जातील त्यांच्याकडून आपणाला नेहमीचा व्यापारी कर वसूल करता येईल. त्या जहाजांच्या जाण्यायेण्याला आपणाकडून कोणताच प्रतिबंध होता कामा नये. त्या जहाजांवर तंबाखू अथवा दोन शेर.........................असले तर त्यांना आपण अडथळा करूं नये.

(६) भिवंडी आणि कल्याण येथील जहाजे पोर्तुगीज प्रदेशांत गेली तर त्यांच्यावर वेठीची बळजबरी केली जाऊं नये.

(७) आपल्या प्रदेशांतील खाप्री (निग्रो) आणि गुलाम कैदी आणि निग्रो स्त्रिया जर आमच्या प्रदेशांत पळून आल्या तर आम्ही त्यांना आपल्या हवाली करूं आणि आमच्या प्रदेशांतील गुलाम सेवक अथवा निग्रो स्त्रिया आपल्या प्रदेशांत जर पळून गेल्या तर आपण त्यांना आमच्या हवाली करावे.

(८) सरकारचा जो व्यापार मुंबईला जाईल आणि तिथून इकडे येईल त्याला वाटेंत आपण अडथळा करू नये. तसेंच त्याच्यावर आपण करही आकारू नये.

वरील कलमे साबाजूचे कॅप्टन--मोर झुजे पेरैरा द व्हास्कों सेलुश ह्यांच्या सल्ल्याने तयार करण्यात आली आहेत. आपण मे महिन्यापर्यंत सातार्‍यास

आपला वकील पाठवून ह्या कलमांना छत्रपतीची मंजुरी घ्यावी. तोपर्यंत वरील कलमाप्रमाणे आपल्या प्रदेशाला कोणताच उपद्रव होणार नाही.

हा करार १२ रबिलावल म्हणजे १० जानेवारी रोजी तयार करण्यात आला वगैरे.

सरदार पिलाजी जाधव ह्यांनी पोर्तुगिजांचे उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्यांचे कॅप्टन-जनरल सिज्योर दों. लुईज द कोश्त ह्यांना एक चिठी पाठविली होती. ती पुढील प्रमाणे आहे :—

"आमचे आरोग्य उत्तम आहे. आपली ख्याली खुशाली कळवावी. रामचंद्रपंत आणि धवलजी सोमवंशी रूस्तुमराव समशेर बहादुर ह्यांच्या मताप्रमाणे कराराची कलमे तयार करण्यांत आली आहेत. ती कलमे मला मान्य आहेत. त्यांत काही दोष असेल असे मला वाटत नाही. ह्या शिवाय मी आणखी काही लिहीत नाही.

आपला कृपाकांक्षी आणि स्नेहांकित."

हे पत्र रबिलावल १४ म्हणजे १२ जानेवारी रोजी लिहिण्यांत आले.

धवलजी सोमवंशी रूस्तुमराव समशेर बहादुर ह्यांनी राज्यसल्लागार आणि उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्यांचे कॅप्टन जनरल दों. लुईज द कोश्त ह्यांना जे पत्र पाठविले ते पुढील प्रमाणे आहे :—

"आमचे आरोग्य उत्तम आहे. आपली ख्याली खुशाली कळवावी. कराराची कलमे कंबा खेड्यात माझ्या संमतीने पिलाजी जाधव आणि रामचंद्र पंत ह्यांनी तयार केली. त्या परिस्थितींत तो अमलांत येईल. त्यांत दोष रहाणार नाही. ह्याशिवाय मला अधिक काही लिहायचे नाही. सरदार पिलाजी जाधव ह्यांनी पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्यांचे जनरल दों. लुईज द कोश्त ह्यांना जे पत्र पाठविले त्या पत्राचा आशय पुढीलप्रमाणे आहे.

"माझे आरोग्य उत्तम आहे. आपली ख्याली खुशाली कळविल्यास आनंद होईल.

काल भिवंडी येथे मला साबाजचे कॅप्टन मोर झुजे पेरैरा द व्हाश्को-सेलुश हे येऊन भेटले. त्यांच्यापाशी मी जो तपशील व्यक्त केला तो त्यांनी आपणाला विदीत केलाच असेल. आपण त्यासंबंधीचा विचार करावा. इकडून जाणाऱ्या आपल्या दोन जहाजांवर मी सरखेल ह्यांना पत्र पाठविले आहे. ते आपले मत व्यक्त करतीलच.

मी आणि रामचंद्र पंत दोघे गुरुवारी येणार आहोत. तोफ आणि पकडलेले लोक मी सदर्हू पेरैरा द व्हाश्कोंसेलुश ह्यांच्या हवाली करीत आहे. हे पत्र ते आपणाकडे उद्या रवाना करतील. उद्या शुक्रवार आहे. मी इथून निघणार आहे. आपली पत्रे नेण्यासाठी नेहमीच आपण आपले जासूद पाठवावेत. म्हणजें त्यामुळे सलोख्याची आणि स्नेहाची वृद्धि होईल. वगैरे.

हे पत्र दि. १३ जानेवारी १७२४ रोजी रात्री लिहिण्यात आले.

हे पत्र कृष्ण शेणवी काबाडी राज्याचे दुभाषी ह्यांनी वसईच्या किल्ल्यात मराठीत भाषांतरीत केले. त्याच्यावर मी आज १५ जानेवारी १७२४ रोजी सही केली. वगैरे.

कृष्ण शेणवी—१७२४.

(121) LIVRO PRIMITIVO DE PAZES, FLS 294

गोव्याच्या व्हाइसरॉयने हिंदुस्थानातील आणि आशियातील राजकीय घडामोडींचा आढावा घेऊन दि. १६ जानेवारी १७२४ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास जे पत्र लिहिले त्या पत्रात तो म्हणतो की, सरदार पिलाजी जाधव हे मोठ्या सैन्यासह उत्तरेकडील प्रदेशात घुसले आहेत. त्यांच्या प्रतिकारासाठी आम्ही इथे होते नव्हते ते सर्व सैन्य उत्तरेकडे पाठवून दिले आहे.

ह्याच पत्रात त्याने मराठ्यांशी आणि पोर्तुगीजांच्या इतर शत्रूशी लढण्यासाठी आपल्या राजाकडे लष्कराची आणि युद्ध सामुग्रीची मागणी केली आहे.

(122) LIVRO DAS MONCOES, No. 89, FLS 450

गोव्याचा व्हाइसरॉय दि. २३ जानेवारी १७२४ रोजी पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या एका पत्रात मराठ्यांना शिव्या देऊन म्हणतो की, ते लबाड असून त्यांच्यावर विश्वास ठेवणे बरोबर नाही. ते पैसे उकळण्यासाठी कोणतीही कुरापत काढून आक्रमण करतात.

"महाराज—

चालू मोसमातील पत्रे लिहून झाल्यावर आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती दों. लुईज द कोश्त ह्यांनी शाहू राजे ह्यांच्याशी नव्यानेच केलेल्या तहाची कलमे पाठवून दिली. मी महाराजांना कळवू इच्छितो की, आमचा उत्तरेकडील प्रदेश शत्रूच्या आक्रमणांनी उध्वस्थ आणि उजाड झाला आहे.

हा शत्रू लबाड असून त्याच्या शब्दावर विश्वास ठेवता येत नाही. आम्ही त्यांच्याशी कुलाब्याला जो तह केला तो आपणाला आठवत असेलच. आता आम्ही त्यांच्याशी हा करार करीत आहोत. परंतु तरीही मला भीती वाटते की, पैशाच्या अडचणीत येताच हा शत्रू आमच्या मुलुखात ह्याच वर्षी आक्रमण केल्यावाचून राहाणार नाही. त्याला आक्रमण करण्यास सबळ कारण लागत नाही. कोणतेही कारण त्याला आक्रमण करण्यास पुरते. ह्या शत्रूने आमचे जे काय लुटून नेले होते, ते परत केले की काय ते अद्याप मला कळलेले नाही.

आमच्या उत्तरेकडील सेनापतीने मला कळविले आहे की, आम्ही ह्या बाबतीत निग्रही राहून तह अमलात आणला पाहिजे. तसेच शाहू राजे ह्यांच्या दरबारात आम्ही आमचा वकील पाठविला पाहिजे, असाही त्यांचा आग्रह आहे. आम्ही त्यांच्या सूचना अमलात आणण्याच्या कामी कसूर करणार नाही. अर्थात कोणतीही मोठी गैरसोय झाली नाही तरच, कारण त्याशिवाय त्या प्रांतातील शेतीची लागवड आणि मशागत करणे अशक्य आहे. कारण, तिकडील खेडूत आणि शेतकरी इतके भित्रे आहेत की, शत्रूच्या आक्रमणाची नुस्ती अफवाच उठली तरी देखील ते आपली गावे सोडून पळून जातात.

यापुढे ज्या घटना घडतील त्यांचा अहवाल आम्ही महाराजांना दुसऱ्या मोसमात सादर करू.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, २६ जानेवारी १७२४

(125) LIVRO DAS MONCOES, No. 89(B) FLS 480

पोर्तुगिजानी मराठा सरदारांनी जी तहाची कलमे सुचविली होती, ती गोव्याच्या व्हाइसरॉयने आपल्या सल्लागार मंडळाच्या सदस्यांकडे पाठवून त्यासंबंधीची त्यांची मते मागविली. आमचे शत्रू जे मराठे त्यांनी चार हजार घोडदळासह उत्तरेकडील प्रदेशावर स्वारी केल्यामुळे त्या प्रदेशाचे गव्हर्नर दों. लुईज द कोश्त ह्यांना सैन्याच्या कमतरतेमुळे मराठ्यांच्या आक्रमणाला प्रभावीपणे तोंड देता आले नाही. त्याचा परिणाम असा झाला की, त्यांना मराठ्यांनी सुचविलेली तहाची कलमे मान्य करणे भाग पडले. ह्या तहाच्या वाटाघाटीचे वेळी मराठ्यांचे सर्व मोठे सेनापती उपस्थित होते. त्यांच्याशिवाय कल्याणच्या सुभेदारानेही त्या वाटाघाटीत भाग घेतला होता. त्याने आमच्या उत्तरेकडील सेनापतीला पुढील सूचना केली. आम्ही मे महिन्यापर्यंत

साताऱ्याला एक वकील पाठविला पाहिज तोपर्यंत आमच्या प्रदेशात आपण आक्रमण करणार नाही असे त्यांनी वचन दिले. ह्या सुचनेप्रमाणे आम्ही जर वागलो तर आपले सर्व काही पूर्ण झाले, असे मानण्यास ते कबूल झाले.

ही सूचना आमच्या सेनापतींना मान्य झाली. आपल्या पत्रात त्यांनी म्हटले आहे की, ह्या कराराला शाहू राजांची मान्यता मिळवून घेण्यासाठी आम्ही साताऱ्याला एक वकील पाठविला पाहिजे. हा करार झाला तर आमच्या प्रदेशात होणारी शत्रूची आक्रमणे बंद पडतील, असे त्यांचे म्हणणे आहे. कारण करारावर एकदा राजाची सही होऊन त्याने त्याला मान्यता दिली की, त्याच्या सरदारांच्या महत्वाकांक्षेला आळा बसेल व मग ते आक्रमणांना प्रवृत्त होणार नाहीत. तेव्हा आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतींचा प्रस्तुत दृष्टिकोन बरोबर आहे की नाही, त्या संबंधीचे मत अजमावण्याकरता हा ठराव राज्य सल्लागार मंडळासमोर मांडणे मला अगत्याचे वाटले. शाहू राजे ह्यांच्याकडे वकील पाठवायचा झाल्यास त्याने आपणा-बरोबर काय काय नेले पाहिजे, शाहूराजे व त्यांचे सरदार ह्यांना नजराणे कोणकोणते न्यावे, शिष्ट मंडळाला कोणत्या सूचना आणि किती अधिकार दिले पाहिजेत याचे आपण विवरण केले पाहिजे. मराठ्यांना अशा रीतीने चुचकारले तर त्या प्रदेशाचा सारा वसूल करता येईल किंवा अन्य कोणताही कर लादता येईल".

पानेली, १७ मार्च १७२४

(131) LIVRO DAS MONCOES, No. 90 ELS 94

व्हाइसरॉयने राज्य सल्लागार मंडळाच्या सदस्यांसमोर वरील ठराव ठेवून त्यांच्यावर त्याने त्यांची मते मागविली. प्रत्येकाने आपापले मत पुढील-प्रमाणे मांडले :—

पहिली गोष्ट ही की, कल्याणच्या सुभेदाराच्या राज्यातील पटेलांना अथवा रहिवाश्यांना आमच्या सैनिकांनी पकडून नेले म्हणून त्याचा बदला घेण्यासाठी मराठ्यांनी हे आक्रमण केलेले नाही. त्या आक्रमणामागील हेतु वेगळाच आहे. शाहूराजे ह्यांचे सरदार पिलाजी जाधव ह्यांनी उत्तरेकडील सेनापतींना कळविले आहे की, शाहूराजे ह्यांनी आपणाला त्या प्रदेशात कर वसूल करण्यासाठी पाठविले आहे. मराठ्यांचा असा दावा आहे की, तो प्रदेश आपल्या राजाचा आहे.

ह्या मराठ्यांचा दुसरा एक हेतू हा की, आमचा वकील त्यांच्या राजाच्या दरबारात जावा. ह्या लोकांशी माझा जो अनेक वर्षांचा संबंध

आहे, त्यावरून मी असा निष्कर्ष काढला आहे की, मोगल बादशहाला त्याच्या सांप्रतच्या पडत्या काळात खिजविण्याकरता शाहूराजे ह्यांच्या मनात आम्ही त्यांच्या दरबारात शिष्टमंडळ पाठवावे हा हेतु आहे.

मला असे वाटते की, शिष्टमंडळ पाठवून काहीच निष्पन्न होणार नाही. चालू परिस्थितीवर विचार केला असता मला असे वाटते की, मराठ्यांच्या राजाकडे वकील पाठवून देखील काही उपयोग व्हायचा नाही. कारण ह्या जंगली (Barbaros) लोकांकडून कोणतीच अपेक्षा करण्यात अर्थ नाही. मला वाटते की हा जो वकील आम्ही शाहूराजे ह्यांच्याकडे पाठवायचा आहे तो आम्ही दिल्ली आग्र्याला मोगल बादशहाकडे का पाठवू नये? कारण, मोगल बादशहा हा सार्वभौम राजा असून शाहू राजा त्याचा मांडलिक आहे. आम्ही जर मोगल बादशहाकडे शिष्टमंडळ पाठविले तर आम्हाला जे काय हवे आहे ते कोणतीच अडचण न पडता मानाने साध्य करता येईल.

आपणाला माहीत आहेच की, ही सर्व आक्रमणे सांप्रतच्या काळात उत्तरेकडील प्रदेशात झाली आहेत. आमचा इतिहासही तेच सांगतो. त्या वेळी पोर्तुगिज हिंदुस्थानात आणखीही शक्ति होत्या. आणि ह्या गोष्टीकडे नेहमीच फारसे लक्ष दिले गेले नाही. त्याचे कारण हे की, हा शत्रू नेहमीच घोडदळ घेऊन येतो. आणि हे घोडदळ कोणत्या लोकांचे असते, तर चोर, दरोडेखोर आणि बदमाश लोकांचे आणि ह्या लोकांचा मुशाहिरा देखील डाके दरोडे ह्यांच्यातूनच दिला जातो. केवळ आमच्याच मुलुखात नव्हे तर, इतर मुलुखातदेखील हे असेच चालते. जर पहारा आणि बंदोबस्त चांगला ठेवला आणि खेड्यांना जागरूक राहाण्याची सूचना दिली तर ह्या दरोडेखोरांपासून आमच्या मुलुखाचे रक्षण करणे कठीण नाही.

आणि शेवटी माझे असे मत आहे की, हा पोर्तुगीज वकील एका मांडलिक राजाकडे जाता कामा नये. तसे जर झाले, तर पोर्तुगीज हिंदुस्थानला एका मांडलिक राजाचे मांडलिकत्व पत्करावे लागेल.

ही गोष्ट विलक्षण आहे, ह्यात शंका नाही. आणि मला आपणास सांगायचे आहे की, शाहूराजे आणि त्यांचे सरदार ह्यांचा हेतुदेखील आमच्या उत्तरेकडील प्रदेशाने आपले मांडलिकत्व पत्करावे हाच आहे. आम्ही जर हे मांडलिकत्व पत्करले तर मोगल बादशहाशी आम्ही बेइमान ठरू. ह्या ठरावावर मला आणखी काही सांगायचे नाही".

पणजी, १८ मार्च १७२४

(133) LIVRO DAS MONCOES, No. 90 ELS 95

ज्युआंव बोर्ज कोर्तेरेआल ह्या नावाच्या राज्य सल्लागार मंडळाच्या सदस्याने उपरिनिर्दिष्ट ठरावावर पुढील मत प्रकट केले :—

कराराचा मुख्य उद्देश हा उत्तरेकडील प्रदेशात शांतता प्रस्थापित करण्याचा आहे. त्या प्रदेशांतील लोकांना शांतता आणि स्वाथ्य कैक वर्षापासून लाभलेले नाही. त्यांच्या शेतीभातीची आणि गुराढोरांची हानी कैक वर्षापासून होत आली आहे. शेतीला मजुरांची आणि गुराढोरांची आवश्यकता असते. ह्या गोष्टी शेतकऱ्यांना बनविता येत नाहीत. आणि जर शेतकऱ्यांना शांतता आणि स्वाथ्य लाभले तर ते कोणताच कमीपणा न मानता सरकारला कर भरू शकतील. त्या कराचा उपयोग प्रस्तुत मुलुखाच्या रक्षणासाठी करता येईल. आणि ज्याअर्थी, तहाची कलमे फान्सिश्कु झुजे द सांपायु ह्यांनी मान्य केली आहेत, त्याअर्थी, रामचंद्र पंडित ह्यांनी सुचविल्याप्रमाणे वकील पाठविण्यास कोणतीच हरकत नसावी. मात्र हा वकील अशा रीतीने पाठविला जावा की, त्याच्यामुळे पोर्तुगालच्या राजाचा मान कमी होऊ नये. माझा दृष्टीकोन हा असा आहे. आपण माझ्याहून अधिक सुज्ञ आणि अनुभवी असल्याने हा प्रश्न आपण पूर्ण विचारांती सोडवाल अशी आशा आहे.

आपणा सगळयांचे देव भले करो".

रामबंदर, १८ मार्च १७२४ ज्युआंव बार्ज कोर्त रे आल

(134) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 99

व्हाइसरॉयच्या सल्लागार मंडळाच्या आणखी एका सदस्याने मराठे व पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये होऊ घातलेल्या करारावर पुढील मत प्रकट केले.

महाशय—

शत्रू मराठयांनी उत्तरेकडील प्रदेशावर मोठ्या सैन्यानिशी स्वारी केली असून त्यांना तोंड देणे कठीण झाल्याने त्या प्रदेशाचे सेनापती दों. लुईश द कोश्त ह्यांना शत्रूने पुढे केलेला तहाचा मसुदा मान्य करावा लागला. हा ठराव राज्य सल्लागार मंडळासमोर ठेवण्यात आला असून मला त्याच्यावर मत प्रकट करण्याची सूचना करण्यात आली आहे. कारण मी पोर्तुगालच्या राजाचा सेवक असल्याने की, ज्यांचे देव रक्षण करो—माझे मत व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे.

माझे असे मत आहे की, मराठयांनी आमच्या उत्तरेकडील प्रदेशावर आक्रमण करून मराठे व पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये कुलाबा येथे जो तह झाला

होता त्या तहाचा भंग केला आहे. त्यांनी आमच्या खेडयांची जाळपोळ आणि लुटालूट केली व गुरे ढोरे आणि माणसे पळवून नेली. त्यांनी धान्याची कोठारे आणि हत्यारे चोरून नेली आणि सैबाणची ............. जाळून टाकली. तरीही मराठा सरदाराची व त्यात विशेषेकरून रामचंद्रपंत ह्यांची आमच्याकडे मागणी आहे की, आम्ही तह पक्का करण्यासाठी त्यांच्या राजाच्या दरबारांत आमचा एक वकील पाठवावा.

प्रस्तुत तहाच्या कलमांचे परिशीलन केले असता ती आक्षेपार्ह आहेत असे मला वाटते. ती कलमे अमलात आली तर आमची पुष्कळच नुकसानी होणार आहे. हा तह आम्ही मान्य केला नाही तर पुढील परिणाम भोगण्याची तयारी आम्ही केली पाहिजे, अशी मराठ्यांनी आम्हाला गर्भित धमकी दिली आहे. परंतु त्या धमकीला भिऊन आम्ही आमचा स्वाभिमान आणि दर्जा कमी करता कामा नये. आम्ही मराठ्यांच्या धमकीला भीक घालू नये.

महाशय, प्रस्तुत तहाच्या कलमांचा अभ्यास केला असता माझे असे मत झाले आहे.

जुने गोवे, १८ मार्च १७२४

(135) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 104

आणखी एका सभासदाचे मत :—

आपण सही केलेला ठराव माझ्याकडे राजाच्या चिटणीसांनी पाठवून दिला आहे. त्यात दोन मुद्दे आहेत : पहिला मुद्दा हा म्हणजे आमच्या मुलुखाचे रक्षण करण्यासाठी भावी कालात कोणती उपाययोजना अमलात आणावी हा, दुसरा मुद्दा तह मान्य करायचा की काय हा. शत्रू मैत्रीच्या आवरणाखाली आपला दुष्ट हेतू लपवून ठेवीत आहे. त्याची तहामागील सदिच्छा संशयास्पद आहे. ह्यापूर्वी त्याने आमच्याशी तह केला आहे, व त्याचा भंगही केला आहे. आता मराठे सरदारांची, विशेषेकरून कल्याणचे गव्हर्नर रामचंद्र पंत ह्यांची मागणी आहे की, आमच्या उत्तरेकडील सेनापतीने त्यांच्याशी जो तात्पुरता तह केला आहे तो पक्का करण्यासाठी आम्ही त्यांचे राजे जे शाहूराजे ह्यांच्याकडे एक वकील पाठवावा.

माझ्या मते असा वकील आम्ही पाठविणे बरोबर नाही. कारण, तसे केल्याने आम्ही शाहूराजे ह्यांचे मांडलिक होऊ.

पानेली, १८ मार्च १७२४

(136) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 97

व्हाइसरॉय—सल्लागार मंडळाच्या आणखी एका सदस्याने शाहूराजे ह्यांच्याकडे शिष्टमंडळ पाठविले जाऊ नये असे मत व्यक्त करून मराठ्यांना शिव्याही दिल्या आहेत.

महाशय—

राज्य सेक्रेटरीमार्फत पाठविलेला ठराव मिळाला. तो ठराव आणि त्याच्याबरोबर पाठविण्यात आलेली तहाची कलमे मी लक्षपूर्वक वाचली. त्याचप्रमाणे कल्याणच्या आणि आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या गव्हर्नरांचे पत्रही वाचले. कल्याणच्या गव्हर्नरने आपल्या पत्रात जी सूचना केली आहे ती मान्य होण्यासारखी नाही. पोर्तुगीज राष्ट्राला आपल्या राजाचे मांडलिकत्व पत्करावयास लावणे हा कल्याणच्या गव्हर्नरचा हेतू आहे.

वकिलात पाठविण्यासाठी पुष्कळ पैसा खर्च करावा लागणार आहे. माझ्या मते हा खर्च अकारण तर आहेच परंतु आमच्या राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनेही ही वकिलात पाठविणे इष्ट नाही असे माझे मत आहे. ही वकिलात पाठविल्याने आमच्या देशाची प्रतिष्ठा कमी होणार आहे. तिसरी गोष्ट ही, की, ही वकिलात पाठविल्याने आम्हाला मराठ्यांचे मांडलिकत्व पत्करावे लागणार आहे. कारण ह्या युद्धात मराठे आक्रमक असून ते आम्हाला जित म्हणून वागवू पाहातात.

थोडक्यात सांगायचे म्हणजे ह्या मूर्ति पूजकांशी ( ) तह करून आमची पुष्कळच गैरसोय होणार आहे. त्यांना ह्या तहातून स्वतःचा फायदा आणि आमचा नाश करायचा आहे. म्हणून माझे असे मत आहे की, आम्ही कोणत्याहीप्रकारे त्यांच्याकडे आमचा वकील किंवा दूत पाठवू नये. त्याची कारणे मी खाली देत आहे :—

(१) आमच्या राज्यावर मराठ्यांचे आक्रमण झाले असल्याने, मराठ्यांनी आमच्यावर तह लादण्याऐवजी आम्ही त्यांच्याकडे तक्रार करणे आवश्यक होते. आम्ही शाहूराजे ह्यांच्याकडे तहाची मागणी करणे म्हणजे दया भाकणे व आमची आणखी नुकसानी करू नकोस अशी याचना करण्यासारखे आहे, आम्ही आमची दुःखे मुकाट्याने सोसावी परंतु त्यांचे प्रदर्शन करू नये.

(२) मराठे सरदारांच्या पत्रात त्यांनी ज्याअर्थी म्हटले आहे की, हा तह करण्यासाठी आम्ही शाहूराजे ह्यांच्याकडे लायक मनुष्य पाठवावा, त्याअर्थी आम्ही शाहूराजे व त्यांचे मंत्री ह्यांना नजराणे पाठविले

पाहिजेत. हे त्यातून ध्वनित होते. हे नजराणे विकत घेण्यासाठी पुष्कळ पैसे लागतील. कारण हे मंत्री आणि सरदार काही थोडे थोडके नाहीत. आधीच खजिना रिकामा असून दैनंदिन खर्च भागविणे कठीण झाले आहे. माझ्यामते ह्या लोकांची कधीच तृप्त न होणारी इच्छा तृप्त करण्यासाठी हा पैसा खर्च करणे बरोबर नाही.

(३) मला बातमी कळली आहे की, सचिवालयात आमच्या स्वामीचे एक पत्र आले असून ते त्यांनी सिंज्योर व्हाश्कु फेर्नादिश सेझर मेंदिश ह्यांना लिहिले आहे. त्या पत्रात त्यांनी असा हुकूम केला आहे कीं, मोगलांशी कामकाज करतेवेळी मोंगल बादशहाला नजराणा पाठवू नये. तसे केल्याने आम्ही त्यांचे मांडलिक ठरतो. जर महाराजांनी मोंगल बादशहासारख्या बलाढ्य आणि आमच्या मित्र असलेल्या राजांशी वागताना त्याला नजराणे पाठवू नये अशी सक्त ताकीद दिली आहे की, ज्याने आमच्याकडील मैत्रीचे संबंध प्रामाणिकपणाने पाळले. तर मग आम्ही एका कमी स्थैर्याच्या आणि लहरी स्वभावाच्या राजाकडे नजराणे देऊन शिष्टमंडळ पाठविले तर महाराजांना ते मुळीच आवडणार नाही.

(४) आम्ही ह्या तहामागील हेतूंचा विचार केला पाहिजे. मला असा संशय येतो की, आमच्या प्रदेशातून मानाची माघार घेण्यासाठी कल्याणच्या सुभेदाराने हा डाव रचला आहे. मराठे सैनिकांनी आमच्या मुलुखात फार दिवस रहाणे अशक्य आहे. ते जर तिकडे फार दिवस राहिले तर त्यांचे घोडे भुकेने मरतील. आमच्यावर तह लादून त्यांचे दोन हेतू साध्य होणार आहेत. आम्हाला शासन केल्यासारखे होणार आहे आणि विजय मिळविल्यासारखे होणार आहे. आणि वर ते आमच्या प्रदेशात पुनः आक्रमण करण्यास मोकळे आहेत ते आहेतच. हे सर्व आशियाई लोक असेच आहेत.

आंग्र्यांच्या युद्धाचे वेळी आमचा आणि मराठ्यांचा जो तह झाला, त्यात आम्ही त्यांच्याकडे एक वकील पाठवावा असे एक कलम होते, व ते आम्ही मान्य केले होते. परंतु त्या वेळची परिस्थिती वेगळी होती. त्या युद्धास सुरुवात आम्ही केली होती, यावेळी अन्याय आमच्यावर झालेला आहे, आणि आमची हानी झाली आहे. तेव्हा आम्ही जर तहाची कलमे मान्य करून शाहूराजे ह्यांच्याकडे आमचा वकील पाठविला तर आम्हाला त्यांच्या अटी मान्य कराव्या लागतील. आणि खंडणी भरावी लागेल.

माझ्या मते हे सर्व कारस्थान कल्याणच्या सुभेदारांचे आहे. त्यालाच खरे शासन झाले पाहिजे. कारण त्यानेच मराठ्यांना आक्रमणास चिथावणी दिली, व आमची हानी केली. म्हणून आक्रमणाच्या गुन्ह्याची शिक्षा टाळण्यासाठी त्याने तहाचा हा सर्व खटाटोप केला आहे.

आम्ही जर हा अपमानास्पद तह मान्य केला तर हिंदुस्थानात आमची प्रतिष्ठा कमी होईल, व आमचे आणखी कुणी शत्रू आमच्याविरुद्ध उठाव करून आमच्यावर असाच अपमानास्पद तह लादण्याचा प्रयत्न करतील. आम्ही ज्या ज्या शत्रूशी तह करू तो तो शत्रू आमच्याकडे वकील पाठविण्याची मागणी करील. तो आमच्याकडून खंडणी वसूल करील व त्याच्याकडे नजराणे पाठविणे आम्हाला भाग पडेल.

आम्हाला शांतता विकत घेण्यासाठी आमच्या शत्रूकडे वकिलाती, नजराणे आणि खंडणी पाठवावयची असेल तर त्याला माझा विरोध आहे. कारण हा पैशाचा अपव्यय आहे. पैसा वाया घालवून पुनः आमच्या पदरी अपमान आणि हानी ह्याशिवाय आणखी काही पडणार नाही. म्हणून, माझे असे मत आहे की, हा जो सर्व पैसा फुकट जाणार आहे, त्याचा उपयोग आमच्या मुलुखाचे रक्षण करण्यासाठी शस्त्रे, व दारूगोळा विकत घेण्यास व भाडोत्री सैनिक नोकरीला ठेवण्यास का करू नये, असा माझा सवाल आहे. आम्ही जर सुरुवातीपासून आमच्या प्रदेशाच्या संरक्षणाची काळजी घेऊन त्याच्याकडे दुर्लक्ष केले नसते तर आमच्यावर ही मानहानी पत्करण्याचा प्रसंग आला नसता, व शत्रूकडून आमच्या मुलुखाची एवढी हानी झाली नसती.

असे कळते, की, शत्रूने आमच्या प्रदेशात जे आक्रमण केले ते उघडपणे न करता गनिमी काव्याने केले. त्याने व्यापारासाठी म्हणून काही माणसे आमच्या प्रदेशात पाठविली. त्यावरून आम्ही हत्यारबंद असतो तर शत्रू आम्हाला भितो हे सिद्ध होते.

माझे विचार मी वर मांडले आहेत. ह्या विचारांप्रमाणे शत्रूकडे वकिलात पाठविण्याच्या कल्पनेला मी पाठिंबा देऊ शकत नाही. त्या योजनेला पाठिंबा देऊ शकत नाही. कारण, त्या योजनेला पाठिंबा देणे म्हणजे मानहानी पत्करण्यासारखे आहे. नजराण्याच्या भरमसाट खर्चालाही मी पाठिंबा देऊ शकत नाही. हा खर्च जर करायचाच असेल तर तो आमच्या संरक्षणासाठी करावा असे माझे मत आहे. देवाच्या आणि आमच्या राज्याच्या सेवेला योग्य असेच वर्तन आपणां सर्वांच्या हस्ते घडेल अशी मी आशा बाळगतो.

गोवा, २१ मार्च १७२४

(137) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 100

आणखी एका सदस्याने असा दृष्टिकोन व्यक्त केला की, वकील शाहू महाराजांकडे पाठविण्याऐवजी तो मोगल बादशहाकडे पाठवावा. कारण शाहू महाराज हे मोगल बादशहाचे मांडलिक असल्याने तेथेच हा प्रश्न धसास लागणे सोपे आहे.

" महाशय,

आपल्या सहीचा ठराव माझ्याकडे आला आहे व तो वाचून त्याच्यावरील माझे मत कळवावे असे त्यात म्हटले आहे.

माझ्या मते रामचंद्रपंत ह्यांनी आपल्या पत्रात आम्ही आपल्या राजाकडे एक वकील पाठवावा असे जे म्हटले आहे, तो वकील आम्ही शाहूराजे ह्यांच्याकडे पाठविण्याऐवजी मोगल बादशहाकडे का पाठवू नये? कारण शाहूराजे हे मोगल बादशहाचे मांडलिक आहेत. मला असे वाटते की, मोगल दरबारात हा प्रश्न आमच्या प्रतिष्ठेला धक्का न बसता सुरक्षितपणे सुटण्याची शक्यता आहे.

शाहूराजे ह्यांच्याकडे वकिलात पाठविण्यासाठी आपणांला खर्च करावा लागणारच आहे. मोगल बादशहाकडे पाठवावयाच्या वकिलातीला जरा खर्च अधिक येईल, एवढेच. इतर गोष्टींचाही मी विचार केला आहे. आम्ही शाहूराजे ह्यांच्याकडे तह करण्यासाठी आमचा वकील पाठविला नाही, तर मराठे सरदार आपले आक्रमण पुढे चालू करतील, अशी धमकी कल्याणचे सुभेदार रामचंद्र पंत ह्यांनी दिली आहे. पण हे आव्हान आपणांला दीव येथून माणसे आणून स्वीकारता येईल. त्या माणसांना जर सरहद्दीवर नेऊन ठेवले, तर मराठ्यांना आमच्या प्रदेशात शिरण्याचे धाडस होणार नाही. अशा रीतीने जर आम्ही कणखर राहिलो, तर ते आमच्या वाटेला जाण्याचे सोडून देतील.

गोवा, २४ मार्च १७२४.

(138) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 96

वाडीच्या सावंतावर शत्रूचे आक्रमण झाल्याचे कळताच गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलने गोवा नदीवरील सेनापतीला पुढील पत्र लिहिले :—

" नदीवरील सेनापतींस—

आपले पत्र मिळाले व मजकूर समजला. शत्रूने भोसल्यांच्या प्रदेशात प्रवेश केला आहे असे त्या पत्रात म्हटले आहे. हे पत्र मिळताक्षणी शत्रूचा हेतू काय आहे त्याची बातमी काढण्यासाठी काही हुशार माणसांना तिकडे रवाना करावे व ती माणसे तिकडून आल्यावर मला काय ते कळवावे.

वृद्ध, अपंग माणसे, गुरेढोरे आणि सामानसुमान आमच्याकडे पाठवून देण्याचा भोसले ह्यांचा विचार आहे, असे आपल्या पत्रावरून कळते. तसे असल्यास त्या लोकांना इकडे येऊ द्यावे. वेश्या आणि कलावंतिणी ह्यांना ह्या दोन्ही बेटांवर नेऊन ठेवावे व तिथून त्यांना अन्यत्र कुठे जाऊ देऊ नये. त्यांनी जर तिथून बाहेर जाण्याचा प्रयत्न केला, तर त्यांना शिक्षा केली जाईल असे बजवावे. आणि त्यांनी जर ह्या हुकुमाचा भंग केला तर त्यांना दारूच्या कोठारात नेऊन ठेवावे.

देव आपले रक्षण करो".
पानेली, १४ मे १७२४.

आर्चबिशप प्रिमज दों क्रिस्तोव्हांव
द मेलु, क्रिस्तोव्हांव लुईज द आंद्राद

गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलने बार्देशच्या सेनापतीस पत्र घालून सावंताच्या प्रदेशात शिरलेल्या शत्रूने बार्देशच्या बाजूने गोव्यात प्रवेश करू नये. म्हणून सरहद्दीवर बंदोबस्त ठेवण्याचा इशारा दिला :

बार्देशचे सेनापती ज्युआंव द मेलु द आताइद (Ataide) ह्यांस—

आपले चालू माहीच्या दिनांक २४ चे पत्र मिळाले, व त्यावरून शत्रूने सावंतांच्या राज्यात प्रवेश केला असल्याची बातमी कळली. शत्रू पुढे आक्रमण करणार असून, आपले काही सैन्य फोंड्यावर पाठविणार आहे असे आपण म्हणता. आम्हांला शत्रूच्या हालचालीच्या वार्ता वरचेवर कळवीत जाव्यात व त्यांच्यावर लक्ष ठेवावे.

बार्देश प्रांताच्या संरक्षणासंबंधाने आपणांला काही लिहिण्याची आवश्यकता आहे असे मला वाटत नाही. आपणावर आमचा पूर्ण भरवंसा आहे. कदाचित शत्रू बंदरे हस्तगत करण्याचा प्रयत्न करील. तरी, प्रांतातील काही कंपन्या तिकडे हलवाव्या. शस्त्र हाती धरण्यास योग्य असलेल्या सर्व माणसांना सैन्यात भरती करून घ्यावे.

कंपन्या पूर्ण आहेत की नाही, त्याची पहाणी करण्यासाठी ······· च्या सार्जन्ट मोरला बार्देशला पाठविण्यात आले आहे, ते आपल्याच हाताखाली काम करतील, कारण आपण त्या प्रांताचे सेनापती आहात."

पानेली, २४ मे १७२४.

आर्चबिशप प्रिमज दों. क्रिस्ताव्हांव द मेलु, क्रिस्तोव्हांव लुईज द आंद्रा द

(146) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 14

कुडाळचे सरदेसाई सावंत भोसले ह्यांनी पोर्तुगिजांचे संरक्षण घेतले होते. पोर्तुगीज त्यांना आपले मांडलिक समजत असत. सावंतांनी त्यांच्याशी संरक्षणाचा करार केला होता. त्या कराराप्रमाणे संभाजीराजे ह्यांचे सैन्य त्यांच्यावर चालून आले असता त्यांनी पोर्तुगिजांची मदत मागितली. गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलने आपल्या सेनापतींना भोसल्यांना मदत करण्याची आज्ञा केली. व सावंतांच्या राज्यांतून गुरेढोरे, अपंग माणसे, वेश्या आणि कलावंतिणी आल्या असल्यास त्यांना सरहद्दीच्या आत घेण्याची परवानगी दिली. मात्र वेश्या आणि कलावंतिणी ह्यांना कुंभारजुवे बेटावर नेऊन ठेवण्याची आज्ञा केली.

हा हुकूम गोव्याचे हंगामी गव्हर्नर जनरल आर्चबिशप प्रिमज द मेलु इ आंद्रार ह्यांनी पानेली येथून दिनांक २४ मे १७२४ रोजी काढला.

(147) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 14 FLS 177

दमणचा गव्हर्नर कळवितो, की सुरतेचा नबाब पिलाजी जाधव ह्यांच्यावर चालून आला.

दमणच्या कॅप्टनचे पत्र :

"सुरतेचा नबाब ह्या महिन्याच्या पहिल्या तारखेस अडीच हजार पायदळ आणि ५०० घोडदळ घेऊन पिलाजी जाधव ह्यांच्या एका बगलेवर चाल करून आला आहे. आमचे सुरतेचे प्रतिनिधी फेवु ह्यांनी कळविले आहे की, आमच्या युद्धनौकांची येजा आणि आमची लष्करी तयारी पाहून सुरतेमध्ये खळबळ उडाली आहे. माझी देवापाशी प्रार्थना आहे, की त्यांनी (मराठे आणि मोगल) एकमेकांची डोकी फोडावी. तसे झाले तर आम्हाला इथे स्वास्थ्य मिळेल."

LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 74

वसईचा गव्हर्नर गोव्याच्या गव्हर्नर जनरलला कळवितो, की सरदार दाभाडे ह्यांनी उत्तरेकडील प्रदेशावर स्वारी करण्याची तयारी चालविली असल्याचे तिकडून आलेल्या एका शिपायाकडून आपणांस कळले आहे :—

"शाहूराजे ह्यांच्या दरबारात जे शिष्टमंडळ गेले आहे, त्या शिष्टमंडळाला पत्रे घेऊन गेलेल्या शिपायांपैकी एक शिपाई दिनांक १० रोजी इकडे आला आहे. ह्या शिष्टमंडळासंबंधीची माहिती मी आपणांला यापूर्वीच

कळविली आहे. ह्या शिपायाला मी तिकडे जातेवेळी मराठे स्वारीची तयारी करताहेत की काय त्याची माहिती काढून ती मला कळविण्यास बजावले होते. त्याप्रमाणे ह्या शिपायाने तळेगावला थांबून ती माहिती काढली. तळेगाव हे सरदार दाभाडे ह्यांचे ठिकाण आहे. हा सैनिक म्हणतो की, आमच्याकडून खंडणी वसूल करण्यासाठी शत्रू दिनांक १५ ला इकडे सैन्य पाठविणार आहे. ही वार्ता मला पत्रातून कळली आहे. कारण सगळीकडून मला असेच कळविण्यात आले आहे. ही वार्ता कळताक्षणी मी महत्त्वाच्या ठाण्यावर लष्करी बंदोबस्त ठेवला आहे. मी तिकडे २०० शिपाई रवाना केले आहेत. व आपणांकडून कुमक येण्याची वाट पाहात आहे. ही कुमक आली तर शत्रूच्या ह्याच प्रांतावर स्वारी करणे शक्य आहे की, काय ते मी बघणार आहे. कारण, मानाशिवाय राहाणे आम्हांला इथे अशक्य होणार आहे. आम्हांला उपद्रव देण्यामागे कल्याणचे सुभेदार रामचंद्र पंत ह्यांचा हात आहे, ह्याबद्दल मला तिळमात्रही संदेह नाही. तरी माझ्या मित्रांना माझी विनंती आहे, की ह्या राज्याच्या बचावासाठी आणि त्याचबरोबर कल्याण प्रांताच्या स्वारीसाठी आपण मला ताबडतोब कुमक पाठवावी.

ह्या वखारीत बंदुकांची फारच कमतरता आहे. ज्या आहेत त्या जुन्या असून निरुपयोगी आहेत. दारूगोळा विपूल आहे. तरी थोडी दारू आणि तीन पौंडी गोळे पाठवून द्यावे.

हे पत्र लिहून झाल्यावर दमणची पाले इकडे आली ती गोव्याला जात आहेत. शत्रूच्या हालचालींकडे लक्ष असू द्यावे, असे सांगण्यापलीकडे मी आपणांला आणखी काही कळवू इच्छीत नाही.

आपणा सगळ्यांचे देव रक्षण करो."

वसई, १३ ऑक्टोबर १७२४.

(157) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 76प

बाजीराव पेशवे ह्यांनी गोव्याच्या हंगामी गव्हर्नरना पुढील पत्र पाठविले.

"परममित्र आणि मैत्रीचे रक्षणकर्ते, महाशय आर्चबिशप आणि प्रिमज् दों. क्रिस्तोव्हांव द मेलु क्रिस्तोव्हांव लुईज आंद्रा द ह्यांस—की ज्यांची मैत्री चिरायु होवो.

मी पंडित प्रधान बाजीराव आपल्या हाताचे चुंबन घेऊन माझी ख्याली-खुशाली आपणांला कळवीत आहे, व आपली ख्यालीखुशाली आम्हांला कळवावी अशी आपणांस विनंती करीत आहे.

साबाजी परबु व पीर महमद ह्या दोघांकडे पाठविलेले पत्र मिळाले, व ते वाचून आशय कळला. मला आनंद वाटण्यासारख्या बातम्या आपण मला कळवाल अशी आशा आहे. आपण पत्रात म्हणता की, आम्हांला ज्या शस्त्रवैद्याची आवश्यकता होती, त्याला पाठवून देण्याची व्यवस्था केली आहे, जखमा बऱ्या करण्यासारखा तज्ञ शस्त्रवैद्य पाठवून द्यावा. आणि हे आपणांस कळविण्यासाठीच प्रस्तुत पत्र लिहीत आहे.

उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीच्या पत्राचे उत्तर रवाना केले आहे. ते त्याला पोचते करून त्याचे उत्तर पाठविण्यास लावण्याची व्यवस्था करावी.

ह्याशिवाय आणखी काही लिहीत नाही."

हे पत्र सफर १२ म्हणजे ३० ऑक्टोबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

(152) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 174

"पंडित प्रधान बाजीराव ह्यांच्याकडून कॅप्टन जनरल ह्यांस पत्र :—

मी इकडे ईशकृपेने सुखरूप आहे. आपणाकडून सुवार्ता ऐकण्याची इच्छा करीत आहे. आपण साबाजी परबु व पीर महमद ह्यांच्याकडे पाठविलेले पत्र मिळाले व ते वाचून फार आनंद झाला. अशाच रीतीने पत्रे वारंवार पाठवीत जावीत. आपण पत्रांमध्ये तिकडील प्रदेशांत शांतता प्रस्थापित करणे व परस्परांमध्ये सलोखा साधणे ह्या दोन गोष्टींवर भर दिला आहे, मी आपणांला आश्वासन देऊ इच्छितो की, आपणांमध्ये आणि माझ्यामध्ये काही मतभेद नाहीत.

नबाब निजाम उल्मुल्क ह्यांच्या सहाय्याने आम्ही अमानतखान ह्यांच्याशी जी लढाई दिली ती लढाई आम्ही जिंकली व आम्ही औरंगाबादला आलो. तिथून आम्ही लवकरच महाराजांच्या दर्शनासाठी साताऱ्याला जाणार आहोत. तिकडे आपण आपला वकील नजराणा देऊन पाठवावा. मी दरबारात असताना जर, तिकडे आपला वकील आला तर धवलजी सोमवंशी रुस्तुमराव समशेर बहादुर सरदार पिलाजी जाधव आणि रामचंद्रपंत ह्यांच्याशी आपण जो तह केला आहे त्याला मान्यता देण्याबद्दल मी महाराजांना विनंती करीन. तिकडील प्रदेशांत शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून माझ्या हातून जे प्रयत्न होण्यासारखे असतील, ते मी शक्य तो करीन पण त्या दरम्यान आपण आपला वकील नजराणा देऊन साताऱ्याला ताबडतोब पाठवावा.

आपण बोगाजी नाईक (?) ह्याच्या बंडाळीसंबंधाने लिहिले आहे, मी आपणांला आश्वासन देतो की, मी साताऱ्याला जाताच त्याचा बंदोबस्त करीन व त्याने जी गुरेढोरे आणि इतर वस्तू लांबविल्या आहेत त्या आपणांला परत करावयास लावीन.

ह्या बाबतीत माझ्याकडून कोणतीच कुचराई होणार नाही. आपण ह्या बाबतीत मनात कोणतेच किल्मिष बाळगू नये."

हे पत्र ४ नोव्हेंबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 176

प्रस्तुत पत्रात जो ताजा कलम होता तो पुढीलप्रमाणे आहे :

आपण ज्या शस्त्रवैद्यासंबंधाने लिहिले होते, तो पावसाळ्यामुळे येऊ शकला नाही. त्याने परवाना पाठविण्याबद्दल कळविले होते. तो पाठवून देत आहे. शस्त्रवैद्याची अत्यंत जरुरी आहे. तरी तावडतोब साताऱ्याला एक शस्त्रवैद्य पाठवून द्यावा. तसेच त्याच्याबरोबर औषधेही पाठवून द्यावी. आपण पिलाजी जाधव आणि धवलजी सोमवंशी रुस्तुमराव ह्या दोघांना जी पत्रे पाठविली होती ती शाही सेवेकडे पाठविण्यात आली आहेत. माझी पत्रे मला मिळाली. पिलाजी जाधव ह्यांना आपण एक गुडगुडी आणि तंबाखूची बरणी पाठविली होती, ती त्यांना मिळाली. ते दरबारात आले की आपल्या पत्रांची उत्तरे पाठवितील.

हे पत्र त्याच दिवशी म्हणजे दिनांक ४ नोव्हेंबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 176v.

वसईचा गव्हर्नर गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलला कळवितो की त्या भागात शत्रूच्या हालचाली वाढल्या आहेत.

" महाशय,

हे पत्र लिहीत असताना मला आपणासमोर प्रांतांची परिस्थिती उभी करायची आहे. शत्रू ह्या प्रदेशात शिरला असल्याच्या वार्ता वारंवार येत आहेत. आमच्याकडून खंडणी वसूल करण्याच्या हेतूने तो आला आहे. कोलोआना (?) छोटिया, पेंटा, वगैरे ठिकाणांहून आलेल्या बातम्यांवरून कळते की, कल्याणचा गव्हर्नर २०० घोडेस्वार आणि ६०० शिपाई ह्यांच्यासह पुष्कळ

दिवसांपासून वारोळी ह्या नावाच्या खेड्यात तळ देऊन राहिला आहे. हे ठाणे कोलच्या हद्दीत आहे. त्याचा तिकडे ठाण देऊन राहण्याचा हेतू काय आहे कळत नाही. माझा असा अंदाज आहे की, तो तिथे वरील सरदारांची वाट पाहात असावा.

ज्या ठिकाणी कल्याणचा गव्हर्नर तळ ठोकून राहिला आहे ते ठिकाण सैबाणसमोर असून मी त्या भागात सगळीकडे आवश्यक तो बंदोबस्त ठेवला आहे. अशा परिस्थितीत आपण शक्य तितक्या लवकर उत्तरेकडील आरमाराची रवानगी केलेली बरी. त्या आरमाराचे जर लवकर आगमन झाले तर, त्यांना तेवढाच अडथळा होईल. मला मात्र त्याचा फारसा उपयोग होईल असे वाटत नाही.

मला कोल खजाकडून पत्र आले असून त्याने वरील बातमीला दुजोरा दिला आहे. त्याला ही बातमी त्याच्या प्रधानाकडून कळली. तो सांप्रत औरंगाबादला किलीचखान ह्याच्या फौजेत आहे. ह्या मोगल सरदाराने आपल्या बादशहाविरूद्ध बंड पुकारल्यास पुष्कळ दिवस झाले.

आपण माझ्या सैन्याच्या बाबतीत निश्‍चित असावे. मी प्रांताच्या रक्षणाच्या बाबतीत कोणताच हलगर्जीपणा करणार नाही.

हे पत्र सी. लौरे सु द नोरोन्य हे घेऊन जात आहेत.

देव आपले रक्षण करो."

वसई, १७ नोव्हेंबर १७२४.

(155) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 79

बार्देशचा सेनापती गोव्याच्या हंगामी गव्हर्नर जनरलला कळवितो की उदोजी चव्हाण ह्या नावाचा संभाजी राजे ह्यांचा सरदार सैन्य घेऊन शापुरानजीक आला असल्याची बातमी आपणांला आपल्या गुप्त हेरांनी कळविली आहे.

"गव्हर्नर महाशय ह्यांस—

मी नदीपलीकडे शत्रूच्या हालचालींची बातमी काढण्यासाठी माणसे पाठविली होती. त्यांनी बातमी आणली आहे की, शापूर येथील किल्ल्यापासून बऱ्याच अंतरावर, चार दिवस झाले, उदोजी चव्हाण ह्या नावाचा संभाजी राजे ह्यांचा एक सरदार दोन हजार घोडदळ आणि पाच हजार पायदळासह आला

आहे. हे सैन्य अर्थात विशेष मोठे नाही हे जरी खरे असले, तरी हा सरदार आणखी सैन्य गोळा करीत असल्याची बातमी आहे. पण तो कुणावर स्वारी करण्याच्या हेतूने आला आहे, ते मात्र कळलेले नाही. फोंडू सावंत ह्यांनी आपल्या राज्याच्या हद्दीवर कडेकोट बंदोबस्त ठेवला आहे.

आपले पत्र मी फोंडू सावंत ह्यांना पोचते केले. ज्या गुप्त हेराने वरील बातमी आणली त्याने वाडी येथे असे ऐकले आहे की, आपले पत्र फोंडू सावंत ह्यांच्या हाती पडले आहे. त्या पत्राचे फोंडू सावंत ह्यांच्याकडून उत्तर आल्यावर मी ते आपणाकडे रवाना करीन.

मी किल्ल्याच्या रक्षणासाठी ४५० माणसे मागे ठेवली आहेत. सांप्रत टेहेळणीसाठी हे सैन्य बस आहे. परंतु किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारी ह्या सैन्याला पार पाडता येईल की काय ह्याची शंका आहे.. गोऱ्या सैन्याशिवाय हे लोक शत्रूचा कितपत प्रतिकार करतील ह्याची शंका आहे. मी आपणांला तटांच्या रक्षणासाठी पन्नास ते साठ गोरे सैनिक पाठविण्याबद्दल मागेच कळविले आहे.

कोठार प्रमुखांना इकडे १० किंवा बारा पिंप दारू पाठविण्यास सांगावे. किल्ल्यामध्ये दारूचा भरपूर साठा करून ठेवायचा आहे. त्याचप्रमाणे बंदुकांच्या काडतुसांचीही येथे फार जरुरी आहे. तीही पाठवून देण्याची आज्ञा कोठार प्रमुखांना करावी. उद्या दिनांक २१ ला सकाळी तिवीच्या इगर्जीशेजारी नगरपालिकेची सभा भरणार आहे. ही सभा कामास सुरुवात करण्यासंबंधाने भरविण्यात येणार आहे. ह्या सभेची मी आपणांला यापूर्वीच कल्पना दिली आहे. यापुढेही मी आपणांला वरचेवर बातम्या कळवीत जाईन. आपणांला जर मला काही सूचना करायच्या असतील तर त्या अवश्य कराव्या.

देव आपले कल्याण करो व आपणांस पुष्कळ वर्षे आयुष्य देवो."

कामुल्ये २० नोव्हेंबर १७२४. दों. ज्युआंव द मेलु.

(156) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 92

पोर्तुगिजांच्या सुरत येथील प्रतिनिधीने तिथल्या राजकीय घडामोडींचा आढावा घेऊन दमणच्या गव्हर्नरला जे पत्र घातले त्या पत्रातील मराठ्यांसंबंधी परिच्छेद पुढीलप्रमाणे आहे :—

दमणचे गव्हर्नर आणि तिथल्या किल्ल्याचे कॅप्टन ज्यु आंव बाप्तिश लोपिश द लाउरे ह्यांना सुरतेहून आलेल्या पत्राची नक्कल.

महाशय :

आपणांला दिलेल्या आश्वासनाप्रमाणे मी आपणांला पुढील बातम्या पाठवीत आहे.

..........................................................................................

..........................................................................................

मोगल दरबारात सध्या अंदाधुंदी माजली आहे. बादशहा तरुण आणि अननुभवी आहे. तो दिवसभर सुरापानांत व विषय सेवनांत मग्न असतो. त्याचे राज्य-कारभाराकडे दुर्लक्ष झाल्याने अमीरउमरावांचे चांगलेच फावले आहे. त्याचा फक्त एकाच उमरावाने विश्वास संपादन केला आहे, आणि तो उमराव म्हणजे खानदुराण हा होय. बादशहा सांप्रत त्याच्या मुठीत आहे. असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. राज्यात सर्वत्र बेबंदशाही माजली असल्याने वजीर किंवा निजाम उल्मुलुक हा प्रचंड सैन्य घेऊन दख्खनच्या मोहिमेवर गेला आहे. त्याला किलिसखान असेही म्हणतात. दख्खनमध्ये अमानतखान ह्या नावाचा आणखी एक सुभेदार होता. मानुएल दे सौझ निनेझिस् ह्याच्या अमदानीत ह्या उमरावाने दमणवर स्वारी केली होती. ह्या उमरावाचे आणि किलिसखानाचे वाकडे आहे. त्याला वजीर व्हायचे होते. त्या दोघांची लढाई जुंपून त्यात अमानतखान ठार झाला. व त्याच्या बरोबर त्याचे दोन-मुलगेही कामास आले. असे सांगतात की ह्या लढाईत दोन्ही पक्षांचे ४० हजार सैन्य ठार झाले. काही लोकांच्या मते ही हानी त्याहून अधिक आहे. किलिचखान हा अत्यंत बलाढ्य असून शाहूराजे व संभाजीच्या राज्यांचे सरदार ह्यांच्यावर देखील त्याचा वचक आहे.

सुरतेचा सुभेदार सुजातखान ह्याने किलिचखानाच्या किंवा मराठ्यांच्या भयाने आपला जनानखाना इकडे पाठविला आहे. किलिचखान बारा हजार सैन्य घेऊन आला असल्याची बातमी आहे. काहींच्या मते हे सैन्य त्याहून अधिक आहे. नबाबाचे वास्तव्य शहराबाहेर दोन मैलांवर कंकर नदीच्या काठावर असून तो पिलाजी जाधवांच्या सैन्याची वाट पाहात आहे. मराठ्यांच्या सैन्याचा सांप्रत ह्या भागात संचार चालू आहे. बघूया ह्या दोघांची लढाई कशी काय होते ती. काही विशेष बातमी असल्यास आपणांला कळवीनच.

आपला आज्ञाधारक आणि आपणांस उदंड आयुष्य प्राप्त होऊन आपले देवाने भले करावे अशी त्याच्याकडे प्रार्थना करणारा.

सुरत २० नोव्हेंबर १७२४.

(157) LIVRO DAS MONCOES

सरदार पिलाजी जाधव ह्यांनी दमणच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहिले :—

पिलाजी जाधव ह्यांचे कॅप्टन जनरलना पत्र

"आम्ही इकडे सुखरूप आहोत. आपले क्षेमकुशल इच्छितो.

आपले पत्र पावले. ते फार दिवसांनी आल्याने फार आनंद झाला. जणू काही आपली भेट झाल्यासारखेच वाटले........................................ मी नबाब निजाम उल्मुलुक ह्यांच्याबरोबर होतो. त्यांनी शहामतखानाशी लढाई दिली. ही लढाई होऊन आठ दिवस झाले. त्याच वेळी आम्हांला कोंकणात उतरण्याचा हुकूम झाला. मी १७ नोव्हेंबरला जव्हार-रामनगर मार्गे कल्याणकडे निघालो. तीन किंवा चार दिवसांत तिकडे पोहोचणार आहे. तिथे आल्यावर आपल्या इच्छेप्रमाणे महाराजांना पत्र लिहू, व त्यांच्याकडून कराराची अनुमती आणू. महाराजांच्या स्वाऱ्या येत्या तीन-चार दिवसांत कोकणामध्ये उतरणार आहेत. गतसाली पोर्तुगीज हद्दीतील लोकांची बरीच हानी झाल्याने यावेळीही ते भीतीने पळून जातील. पण आपण त्यांना त्यांच्या खेडयांतच राहाण्याचा हुकूम करावा. कारण खेडी ओस असली तर टेहेळणी असणार नाही. तरी लोकांना धीर देऊन त्यांना खेडयांतच राहावयास सांगावे.

आपण पाठविलेले घडयाळ मिळाले. त्याचप्रमाणे मीठ, वाळलेले खोबरे आणि सुपाऱ्या आपण लिहिल्याप्रमाणे माझ्याकडे पोहोचत्या करण्यात आल्या. मी साताऱ्याला गेलो नाही. बाजीराव पंडीतही गेले नाहीत."

हे पत्र २४ नोव्हेंबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

(178) LIVRO DAS MONCOES, No. FLS 176

पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीने छत्रपती शाहूराजे ह्यांना पत्र लिहून पिलाजी जाधव, धवलजी सोमवंशी व रामचंद्र महादेव ह्यांच्याकडून आपणाला उपद्रव होतो अशी तक्रार केली होती. ह्या तक्रारीला शाहू महाराजांनी पुढील उत्तर पाठविले :—

"उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्यांचे कॅप्टन जनरल, पोर्तुगिज हिंदुस्थानच्या सल्लागार मंडळाचे सदस्य दों. लुईज द कोश्त, ह्यांस—

आपले पत्र मिळाले, पिलाजी जाधव, धवलजी सोमवंशी आणि रामचंद्र महादेव, ह्यांच्या कृत्यांची चौकशी चालू आहे की ज्यांच्याविषयी आपण ते आपणाला उपद्रव देतात अशी तक्रार केली आहे. आपण म्हणता की, तह

झाल्यानंतर रामचंद्र महादेव ह्यांनी आपल्या राज्यात बुगाजी नाईक ह्यांना चोरी करण्यासाठी पाठविले. ते आपली कामगिरी पार पाडून पळून गेले. त्यांचा यापुढे आपणांला उपद्रव होऊ नये म्हणून आपण मला लिहिले आहे. आपण म्हणता की आमच्या राज्याशी आपण नेहमीच मैत्रीने वागत आला आहांत. मी आपणांला आश्वासन देतो की, ह्याउपर आपणाला आमच्याकडून उपद्रव होणार नाही. उपरिनिर्दिष्ट सरदार विशेषेकरून रामचंद्र पंडित ह्यांच्यासंबधी जे काय करावयाचे आहे ते करण्याचा मी हुकुम केला आहे. त्यांच्याकडून आपणाला उपद्रव होणार नाही ह्याबद्दल खात्री बाळगावी. पत्रे वरचेवर पाठवावी. त्यांची उत्तरे पाठविण्याच्या बाबतीत हयगय होणार नाही."........................................................................................

हे पत्र २४ नोव्हेंबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

(159) LIVRO DAS MONCOES, No. 90 FCS 176

पोर्तुगिजांच्या उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर आणि किल्ल्यांचे कॅप्टन जनरल दों. लईज द कोश्त ह्यांनी सरदार धवलजी समशेर बहादूर ह्यांना एक पत्र धातले होते. त्या पत्रास त्यांनी पुढील उत्तर पाठविले :—

"आम्ही इकडे सुखरूप आहोत. आपले क्षेम कुशल इच्छितो.

आपले पत्र मिळाले व ते वाचून मजकूर समजला. आपले पत्र हातांत पडताच खूप आनंद झाला. अशीच पत्रे वरचेवर पाठवावीत. आपण लिहिता की, कंबा येथे तह झाला. त्या तहाला दरबारात मंजुरी मिळून तत्संबंधीचे फर्मान निघण्याबद्दल मी खटपट करावी अशी आपण माझ्याकडे मागणी केली आहे. आपण दूत पाठविणार असेही पत्रात म्हणता. आपणांस कळविण्यात येत आहे की, राव पंडीत प्रधान (बाजीराव) हे सांप्रत औरंगाबादला आहेत. ते तिथून लवकरच परतणार आहेत. त्यांची आणि माझी दोघांची भेट होणार असून आम्ही दोघे बरोबरच दरबाराला जाणार आहोत. तेथे तहाला मंजुरी देऊन फर्मान काढण्याची व्यवस्था केली जाईल. आपण मला लिहिलेच आहे की, पंडीत ह्यांना एक खंडी सुपारी, एक खंडी खोबरे आणि दोन होड्या मीठ पाठविले आहे. जर ह्या वस्तू रामचंद्र पंडित ह्यांच्याकडे आल्या तर त्या आम्हांला मिळाल्यावाचून राहणार नाहीत."

हे पत्र २४ नोव्हेंबर १७२४ रोजी लिहिण्यात आले.

(160) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 177

अंकोला (कारवार) येथून कुणी आंतोनियु रोलिम नायक नावाच्या व्यक्तीने गोव्याच्या गव्हर्नरला पत्र पाठवून कळविले की रामराव, तुकाजी जगताप आणि मुरारी शिंदे हे चौघे मराठे सरदार सोंदेच्या राजावर चालून येत आहेत. ह्याचे पत्रात किलिचखान व कुंदापूरचे नबाब ह्यांच्यामधील लढाईचाही निर्देश आहे.

" सेनापतीस

आपण सुखरूप असाल असे गृहीत धरतो, वगैरे.............................

.................................................................................................

.................................................................................................

सोंदेच्या राजाने आपले घाटात असलेले सर्व सैन्य अंकोल्याच्या किल्ल्यात गोळा केले आहे. अशी बातमी आहे की, मराठे सरदार रामराव, तुकाजी जगताप आणि मुरारी शिंदे हे सोंदेच्या राजावर चालून येत आहेत. त्यांच्याबरोबर शिदोजी ह्यांचाही मुलगा आहे. त्यांच्यापाशी दोन हजार घोडेस्वार असल्याची बातमी आहे. ह्याच लोकांनी मागे साष्टीमध्ये आक्रमण केले होते. सोंदेच्या राजावरील त्यांची ही तिसरी स्वारी आहे. असे कळते की ते संझाणे येथे येऊन दाखल झाले आहेत. मोगल सेनापती किलिचखान आणि कुंदापूरचे नबाब ह्यांच्यामध्ये लढाई झाल्याची बातमी आपणाला कळलीच असेल. ह्या लढाईत दोन्ही पक्षांची प्रचंड प्राणहानी झाली. लढाईत किलिचखान व नबाबाचा सेनापती अलीखान हे दोघे जखमी झाले. अशी बातमी आहे की अलीखान हा किलिचखानाच्या हातास लागला आहे. नबाबाचा एक मुलगाही ह्या लढाईत ठार झाला. असे कळते की, नबाबाने किलिचखानाशी दुसरी लढाई देण्याची तयारी केली आहे."

अंकोला २९ नोव्हेंबर, १७२४.

आपला आज्ञाधारक,

आंतोनियु रोलिम.

(161) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 89

साष्टीचा सेनापती दों. आंतोनियु कारवु इ मेलु हा राजधानीत कळवितो की, संभाजी राजे ह्यांनी साष्टी प्रांतावर स्वारी करण्याची तयारी केली आहे.

" महाशय,

काल घाटावरून एक गुप्त हेर आला आहे. त्याने बातमी आणली आहे की, संभाजीराजे ह्यांनी त्यांच्या अनेक सरदारांच्या सल्ल्यानुसार

दिनांक १२ ला साष्टीवर स्वारी करण्याचा बेत आखला होता, परंतु संभाजीराजे ह्यांच्या निर्णयाला पिलाजी जाधव, रामराव आणि आणखी एका सरदाराने विरोध केला. त्यांनी संभाजीराजे ह्यांना सांगितले की, त्यांनी जर ही मोहीम सुरू केली, तर तीत त्यांना यश येण्याची फारच थोडी शक्यता आहे.

संभाजीराजे आणि त्यांचे सरदार ह्यांच्यामध्ये जरी मतभेद झाला असला, आणि काही सरदार जरी त्यांची छावणी सोडून पुढे मागे राहिले असले, तरी ते एका दिवसाच्या आत एकत्र होऊ शकतील. ही बातमी चिंताजनक असल्याने ती ऐकून मी फारच अस्वस्थ झालो कारण त्यांचा मतभेद म्हणजे मला हा एक डावच वाटला. माझी मनोदेवता मला सांगू लागली की शत्रू कुठे हल्ला केल्यावाचून राहाणार नाही.

आज पहाटेस आणखी गुप्त हेर आले. त्यांनी माझ्या विचारांना दुजोरा दिला. त्यांनी बातमी आणली, की शत्रूने सोंदेच्या राजाच्या सांत्राणी ह्या नावाच्या किल्ल्यास वेढा घातला आहे, व ते राज्याच्या इतर खेडयांतही शिरले आहेत. हा हल्ला करण्याचे कारण म्हणजे सोंदेच्या राजाने मराठयांची खंडणी दिली नाही हे होय. असे सांगण्यात येते. त्याने आपल्या राज्यातील व्यापाऱ्यांना मराठयांना एकही जिन्नस विकू नका अशी ताकीद दिल्याचे कळते. म्हणूनच मराठयांना सोंदेवर स्वारी करावी लागली.

ह्या बातम्या जर खऱ्या ठरल्या, तर आमची मोठीच तारांबळ उडणार आहे. कारण शत्रू आमच्यापासून अवघ्या तीन दिवसांच्या अंतरावर आहे. त्याच्यापाशी मोठे घोडदळ आणि पायदळ असून शस्त्रसामुग्रीही विपुल आहे. आमच्याकडे मूठभरदेखील सैन्य नाही. अधिकाऱ्यांची आणि खलाश्यांची यादी मी आपणाकडे पाठवीत आहे. ह्या तुटपुंज्या सैन्यानिशी मी शत्रूला कसें तोंड देणार त्याचीच मला घोर चिंता लागून राहिली आहे. दारू गोळा आणि शस्त्रे ह्यांचीही स्थिती आशादायक नाही. ह्या बाबतीत मी आपणांकडून सल्ल्याची अपेक्षा करीत आहे. शत्रूने जर आमच्यावर हल्ला करण्याचे ठरविले, तर माझ्यापाशी जे सैन्य आहे त्या सैन्यासह मैदानात लढा द्यायचा की कुकडी आणि मडगाव येथील तटबंद्या बळकट करून ह्या दोन्ही ठाण्यांत राहून लढा द्यायचा ह्या दोन्हीपैकी एका पर्यायाची निवड करून आपण मला सूचना करावयाची आहे. ह्या दोन्ही पर्यायांपैकी कुठलाही पर्याय स्वीकारण्याची माझी तयारी आहे.

ह्याशिवाय मुलकी लोकांनी आपल्या मौल्यवान वस्तू किल्ल्यामध्ये आणून ठेवायच्या की काय, की शत्रू जवळ येईपर्यंत थांबायचे हेही आपण



व्हि ५५५८--१५-अ

ठरवायचे आहे. मुलकी लोकांना जर आपल्या वस्तू कोटामध्ये आणून ठेवायच्या असतील, तर मला तसा हुकूम काढावा लागेल. तसेच मला घोडेस्वार पाठवून सक्तीच्या लष्कर भरतीसाठी लोकांना गोळा करून आणावे लागेल. आणि ही आज्ञा आपणाकडून मला मिळाली पाहिजे. कारण, लोक सक्तीची लष्कर भरती टाळून पळून जात आहेत. त्यांची संख्या हल्ली पुष्कळच कमी झाली आहे. चालू परिस्थितीला अनुसरून सवलतदार वर्गातील पुरुषांचीदेखील लष्कर भरती करणे भाग आहे.

देव आपले रक्षण करो व आपणांस उदंड आयुष्य देवो."

नाव्हेली येथील छावणी, ९ डिसेंबर १७२४

(163) LIVRO DAS MONCOES, No. 90 FLS 87

हे पत्र लिहून झाल्यावर·····················हवालदार आणि अंकोल्याचा बिशप ह्या दोघांची पत्रे आली.

दों. आंतोनियु काश्कु इ मेलु,

गोव्याचा गव्हर्नर पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, मराठे सरदारांनी उत्तरेकडून वसईमध्ये आणि दक्षिणेकडून गोव्यात हल्ला करण्याची तयारी केली असून ह्या स्वारीला तोंड देण्याची पोर्तुगिजांची तयारी नाही. उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीने मराठ्यांशी तात्पुरता तह केला होता. तो तह पक्का करण्यासाठी पोर्तुगिजांनी शाहू महाराजांकडे आपला एक वकील पाठवावा. अशी मराठे सरदारांची मागणी होती. परंतु ही गोष्ट पोर्तुगिजांना लांच्छनास्पद आहे. असा काही लोकांनी सल्ला दिल्याने मराठ्यांच्या राजाकडे वकील पाठविण्यांत आला नाही, असे गोव्याचा व्हाइसरॉय उपरिनिर्दिष्ट पत्रात म्हणतो :—

महाराज,

चालू वर्षाच्या दिनांक २३ ला आम्ही महाराजांना जे पत्र पाठविले होते, त्यात आम्ही आपल्या निदर्शनास आणिले होते की, आमचे उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती दो. लुईज द कोश्त ह्यांनी शाहू उर्फ शिवाजीराजे ह्यांच्या सरदाराशी हंगामी तह केला आहे. ह्या पावसाळ्यांत मराठे आमच्या उत्तरेकडील प्रदेशावर स्वारी करण्याची तयारी करीत असल्याच्या बातम्या त्या प्रदेशाचे सेनापती आमच्याकडे वारंवार पाठवीत होते व आम्हांला कुमक पाठविण्याची विनंती करीत होते. त्या विनंतीप्रमाणे आम्ही उत्तरेकडे नोस्सा

सिज्ज्योरा द पाल्म ह्या नावाच्या फिरगेटवर काही मदत पाठवून दिली. ह्या फिरगेटला आम्ही सूचना केली की, त्याने मदत पोहोचल्यावर दमणला जाऊन सुरतेचे नवाब दमण घेण्याची तयारी करीत असल्याची जी हूल उठली आहे ती खरी की खोटी त्याचा तपास करावा. ही बातमी आम्हांला आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीने पाठविली होती. आमच्या सूचनेप्रमाणे उपरि-निर्दिष्ट फिरगेटने सुरतेला जाऊन त्या बातमीची चौकशी केली असतां ती खोटी असल्याचे आढळून आले. ही अफवा कल्याणचे सुभेदार रामचंद्रपंत ह्यांनी उठविली होती. हा सेनापती सैबाणपासून तीन मैलांच्या अंतरावर छावणी ठोकून राहिला आहे. सैबाण हा आमचा वसईचा प्रदेश आणि आमचा शत्रू ह्यांच्यामधील नैसर्गिक अडथळा आहे.

ह्याच शत्रूपासून आमच्या गोवा प्रांतातील साष्टी, आणि बार्देश ह्या दोन्ही जिल्ह्यांनाही धोका निर्माण झाला आहे. ह्या लखोट्यांत जी पत्रे जात आहेत त्यांच्यावरून आपणांला ह्या संभाव्य स्वारीची कल्पना येईलच. आम्हांला ह्या स्वारीची भंयकर चिंता लागून राहिली आहे. आमच्यापाशी सैन्य तर भरपूर नाहीच परंतु सैन्याची वाहतूक करण्यासाठी नावाही भरपूर नाहीत. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील आरमारांना मदत करण्यासाठी नावांची फारच मोठी आवश्यकता आहे.

कल्याणचे सुभेदार रामचंद्रपंत ह्यांनी आम्हांला सूचना केली होती की, आम्ही त्यांच्याशी जो हंगामी तह केला होता. तो पक्का करण्यासाठी शाहू राजे ह्यांच्याकडे एक वकील पाठवावा. ह्या प्रश्नावर आम्ही गंभीरपणे विचार केला असता शाहूराजे ह्यांच्या दरबारांत वकील पाठवायचा नाही असा निर्णय घेतला होता. ज्यांनी आम्हाला आपली मते पत्रे पाठवून कळविली त्यांच्या नकला आपणाकडे पाठवीत आहोत.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य सुखांत ठेऊन ठेवो."

गोवा, १३ डिसेंबर १७२४.

(LIVRO DAS REIS MONCOES No. 90, FLS 72.)

वसईचा सेनापती गोव्याला कळवितो की, मराठ्यांनी कोल राज्यात शिरून वसईला धोका निर्माण केला आहे. कल्याणचे सुभेदार रामचंद्रपंत ह्यांनी आपणांला बाजीरावांना १० हजार रुपये देण्यास सांगितले होते. परंतु ही गोष्ट अव्यवहार्य असल्याने आपण तसे केले नाही.

महाराज,

शत्रू ह्या प्रांताच्या जवळ येऊन ठेपला असल्याने हे गलबत पाठविण्यास विलंब केला. शत्रू कोल राज्यात शिरून आमच्या राज्याच्या सीमेवर येऊन ठाकला आहे. शत्रूने आमच्या राज्यात शिरून गुरे पकडून नेली, मी ती परत मागितली. आम्ही एका दुष्ट शत्रूच्या शेजारी आहोत ही खरोखर दुःखाची गोष्ट आहे.

कल्याणचे सुभेदार रामचंद्रपंत हे अद्याप मला साताऱ्यास वकील पाठविण्याची सूचना करीत आहेत. त्यांनी मला बाजीरावांना १० हजार रुपये द्यावयास सांगितले होते. परंतु ही गोष्ट मला अव्यवहार्य वाटते.

(ह्या पत्रात मध्येच अक्षरे बेपत्ता झाल्याने संदर्भ नीट लागत नाही.)

(LIVRO DAS MONCOES No. 90, FLS 173)

मराठ्यांच्या फौजा घाट उतरून खाली येत असल्याची वार्ता साष्टीच्या सेनापतीने गोव्याच्या हंगामी गव्हर्नरला कळविताच त्याने त्याला पुढील उत्तर पाठविले :—

साष्टीचे सेनापती दो. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस —

शत्रू घाट उतरत असल्याची बातमी देऊन आपण मला दिनांक १५ आणि १६ रोजी जी पत्रे पाठविली ती मिळाली. शत्रूशी लढण्यासाठी आपण सोंदेच्या राजाशी हातमिळवणी केली असल्याचेही कळले.

आपण कुकडी आणि मडगाव येथील बालेकिल्ले आणि रासईचा किल्ला लढविण्याचा जो निर्णय घेतला आहे, तो बरोबर आहे. आम्ही आपणांला ही सूचना केलीच होती. हा आपला निर्णय योग्य असाच आहे. दुसरी गोष्ट म्हणजे आपणापाशी असलेले सैन्यही अगदीच कमी आहे. म्हणून आपण उघड्या मैदानावर लढण्याचे टाळले पाहिजे.

आंतोनियु आव्रेव ह्यांच्या वयाकडे दुर्लक्ष करण्यास हरकत नाही. गोवा येथे जे अधिकारी आहेत (ते फार थोडे आहेत) त्यांना आम्ही साष्टीला निघण्याचा हुकूम केला आहे. ते तिकडे गेल्यावर आपण त्यांची आपल्या इच्छेप्रमाणे नेमणूक करावी.

आपण जे दोन सेनाविभाग मडगावला ठेवले आहेत त्यांना आपण ज्या ठिकाणी त्यांची आवश्यकता आहे त्या ठिकाणी पाठवू शकता.

महसूल कचेरीच्या व्हेदोर जनरलला.................. दारूची पिपें आणि गोळचांच्या ३० पेटचा खजीनदाराकडे देण्याचा हुकूम केला आहे. हे सामान तो आपल्या आज्ञप्रमाणे आपणाला लवरच पोहोचते करील. आपण सोंदेच्या राजाच्या सहाय्याने मराठचांच्या सैन्याला घाटामध्ये विरोध करण्याची जी योजना आखली आहे ती व्यवहार्य आहे असे मला वाटत नाही. कारण, आपणापाशी असलेले सैन्य अगदीच थोडे असून त्याचा दर्जाही चांगला नाही. आपण इगर्जीतील चांदी आणि मुलकी लोकांच्या मौल्यवान वस्तू गोळा करून त्या सुरक्षित ठिकाणी ठेवल्या असतील असे गृहीत धरतो. सरहद्दीवरील खेडचांत एकही ढोर असता कामा नये.

देव आपले रक्षण करो."

पानेली, १७ डिसेंबर १७२४

आर्चबिशप प्रिमज दों क्रिस्तोव्हांव

दमेलु क्रिस्तोव्हांव लूईज द आंद्रद

## (167) LIVRODE CARTAS E ORDENS FORTRIAS No. 15 FLS 34V

कल्याणचे सुभेदार रामचंद्र पंत ह्यांनी गोव्याच्या हंगामी गव्हर्नरला पत्र घालून साताऱ्याला तीन महिन्यांच्या आत वकिलात पाठविण्याची मागणी केली.

"गव्हर्नर महाशय,

मी पोर्तुगिजांचा मित्र होऊं इच्छितो व ही मैत्री कायमची टिकावी अशी इच्छा बाळगतो. परंतु असे जरी असले, तरी, मला माझे कर्तव्य पार पाडल्या वाचन राहाता येत नाही. आमचे स्वामी छत्रपती शाहू राजे ह्यांचे सरदार पिलाजी जाधव व धवलजी सोमवंशी समशेर बहादुर ह्यांच्याशीं पोर्तुगिजांचा तह माझ्यामार्फत झाला होता. हा तह माझ्या प्रयत्नांनी संबाजचे कॅप्टन मोर झुजे पेरैरा द. व्हास्कों सेलुझ ह्यांच्या मध्यस्थीने वसईचे सेनापती दों. लुईजद कोश्त ह्यांनी छत्रपतींच्या वरील सरदारांशी केला होता. ह्या कराराची कलमे कुलाबा येथे झालेल्या कलमांसारखीच होती. ह्या कराराप्रमाणे मी साताऱ्याहून आल्यावर उपरिनिर्दिष्ट सेनापतींना त्यांनी पकडून नेलेली गुरे आणि माणसे आपणाला परत करावयास लावली. युद्धांत हस्तगत केलेले शत्रूचे सामान परत करण्याचा शिरस्ता जगांत कुठेच नाही. परंतु आम्ही आपल्या सर्व वस्तू आमच्या इच्छेने परत केल्या. हे सर्व आम्ही कॅप्टन मोर ह्यांच्या विषयीं वाटणाऱ्या आदरामुळे केले.

हा करार करतांना आम्ही अशी एक अट घातली होती, की कराराला छत्रपती शाहूराजे ह्यांची मान्यता मिळविण्यासाठी आपण सातान्याला तावड-तोब आपला एक वकील रवाना करावा. परंतु हा वकील आपण अद्याप सातान्याला पाठवीत नाही. आणि मी वारंवार आठवण करून देखील जनरल सिंज्योर आंतोनियु कारकु इ मेलु आणि सिंज्योर लुईज दमलुसांपायु ह्या दोघांनी माझ्या विनंतीकडे लक्ष दिलेले नाही. मी वकील पाठविण्याबद्दल वरील सेना-पतींना वारंवार आठवण करून देत होतो. कारण, आमच्या गोटात आपला वकील न आल्याने संताप निर्माण झाला होता.

ते मागचे सर्व मागे संपले आणि उपरिनिर्दिष्ट कराराच्या कलमांना फिरून मान्यता देण्यात आली. मी माझ्या राज्यांतील सर्वात जुना सेवक असल्याने दोन्ही राज्यांमध्ये शांतता प्रस्थापित व्हावी ही माझी तळमळीची इच्छा आहे. म्हणून माझी आपणाकडे विनंती आहे, की, आपण यापुढें सातान्याला वकील पाठविण्याच्या बाबतीत चालढकल करू नये. तहाला छत्रपतींची मान्यता मिळावी म्हणून आपण सातान्याला तावडतोब वकील पाठवावा. असे जर झाले, तर दोन्ही राज्यांत सलोखा आणि मैत्री जुळण्यास विलंब लागणार नाही. दुसरी गोष्ट मराठ्यांचा कल नेहमीच तहाकडे आणि मैत्री संपादन करण्याकडे असतो हे आपण लक्षांत घ्यावे. माझ्या मते वकील म्हणून आपण साबाजचे कॅप्टन मोर ह्यांनाच पाठवावे. कारण, सर्व मराठे सरदारांचा आणि त्यांचा परिचय आहे, हे तर झालेच परंतु ते ह्या कामगिरीसाठी लायकही आहेत. नजराण्या-विषयी मी आपणाला कळवू इच्छितो, की, नजराणे हे एका राजाकडून दुसऱ्या राजाकडे जाणार आहेत. त्या शिवाय दरबारांत काही मोठेही आहेत, की ज्यांना नजराणे स्वीकारण्याची सवलत आहे. माझी आपणाला विनंती आहे, की ही वकिलात आपण येत्या तीन महिन्याच्या आंत पाठवावी. कारण नंतर पावसाळा सुरू होणार असल्याने आपणाला ती पाठविणे शक्य होणार नाही.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो."

कल्याण, २५ रबीलावल..........१७२४.

आपला मित्र आणि सेवक

रामचंद्र पंत

(168) LIVROSDAS CARTAS E ORDENS PORCARIES
No. 14 FLS 166 V

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो, की, मराठ्यांचे लष्करी सामर्थ्य सगळीकडे वाढले असून गोव्याच्या जवळपासही एक मराठा सेना संचार करीत आहे.

" महाराज.

ही डाक बंद करण्याच्या तयारीत असतांनाच आमचे उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती दों. लुईज द कोश्त ह्यांचे त्या प्रांतांच्या परिस्थिती संबंधीचे पत्र आले, त्यांनी त्या पत्रांत जे विचार मांडले आहेत ते आपणाला कळावेत म्हणून आम्ही सेनापती दों. लुईज द कोश्त ह्यांचे पत्र आपणाकडे पाठवीत आहोत त्या पत्रावरून मराठ्यांची सत्ता आज केवढी प्रबल झाली आहे याची आपणाला कल्पना येईल. मराठ्यांचे सैन्य आज सगळीकडे पसरले आहे. आमच्या ह्या गोवा प्रांताशेजारी ही त्यांची एक सेना आहे.

आमच्या श्रेष्ठ आणि बलाढ्य स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो"

गोवा, २७ डिसेंबर १७२४.

(169) (LIVRO DAS MONCOES NOGO FLS 172)

गोव्याच्या गव्हर्नरने साष्टीच्या सेनापतीस मराठ्यांच्या संभाव्य स्वारी संबंधाने काही सूचना केल्या.

" साष्टीचे सेनापती दों आंतोनियु कारकु इ मेलु ह्यांस—

आपले दिनांक २८ ला लिहिलेले पत्र आम्हास सादर करण्यांत आले. त्या पत्रांत आपण म्हणतां की, मराठ्यांनी आपल्या सैन्याची विभागणी केली आहे, व त्यांतील दोन तुकड्या आमच्या फोंड्याच्या सरहद्दीवर आणल्या आहेत. आपल्या पत्रावरून कळते की, सक्तीच्या लष्कर भरतीची माणसे दिवसेदिवस बेपत्ता होत आहेत. जवळजवळ सर्व रिक्रुट फरारी झाले आहेत, असे आपल्या पत्रावरून वाटते. हे पत्र मिळतांक्षणी सर्व रिक्रुटांना परत आणण्याचा प्रयत्न करावा. त्या लोकांवर कुकडींच्या रक्षणाची कामगिरी सोंपवावी. परंतु मोठे सैन्य मडगांवला ठेवावे. शत्रू साष्टीत शिरला तर मडगांवहून मोठ्या लष्करी हालचाली करणे सुलभ होईल.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

पानेलीअ २९ डिसेंबर १७२४

आर्चबिशप प्रिमश, दों क्रिस्तांव्वांस द मेलु, क्रिस्तोव्हांव लुईज द आंद्रा द

(174) LIVRO DA CARTAS ORDENS E PORCARIAS No. 15 FLS 307)

वाडीच्या सावंतांनी फोंड्याचा किल्ला घेण्यासाठी दोन हजार सैन्य गोळा केल्याची वार्ता गोव्याच्या गव्हर्नरला कळताच त्याने साष्टीच्या सेनापतीस पुढील पत्र पाठविले.

"साष्टीचे सेनापती दों. आंतोनियु काशकु द मेलु ह्यांस--

आपले दिनांक ९ चे पत्र आमच्या पहाण्यांत आले. आपण म्हणतां, की वाडीकर सावंतांनी फोंड्याचा किल्ला घेण्यासाठी दोन हजार माणसे गोळा केली आहेत असे मला रुद्राजी नाईक ह्यांनी कळविले आहे. हा इशारा आम्ही फोंड्याच्या गव्हर्नरला पंधरा दिवसांमागेच दिला होता. त्याने आम्हाला कळविले की, त्याच्या गुप्त हेरांनी ही बातमी आणली होती. फोंड्याच्या रक्षणासाठी आपण जांबावली व सांगे येथून सैन्य आणले असल्याचेही त्याने आम्हास कळविले आहे. फोंड्याच्या सुभेदाराने जर किल्ल्यांत दारूचा साठा करण्यासाठी दारूची मागणी केली, तर, त्याला चार पिपें दारू पुरवावी व त्या दारूची किमत त्याच्याकडून घ्यावी.

बार्देशच्या सेनापतीने आम्हास कळविले आहे की, वाडीकरांनी आपले सैन्य मागे घेतले आहे. त्यांनी (भोसल्यांनी) ते सैन्य वेढ्यासाठी म्हणून गोळा केले होते. परंतु आता त्यानी तो विचार सोडून दिला असावा असे वाटते. तथापि असे जरी असले, तरी आपण फोंड्याच्या सुभेदारास जागरूक राहाण्याचा इशारा द्यावा. कारण कोणत्यावेळी काय होईल त्याचा नेम नाही.

देव आपले रक्षण करो"

पानेली, १२ जुलै १७२५

आर्चबिशप प्रिमज् दों. क्रिस्ताव्हांव दमेलु, क्रिस्ताव्हांव लुईज द आंद्राद

(178) (LIVRO DAS CARTASE ORDEUS POSTARIUS No. 15, FLS 73.)

गोव्याच्या नवीन व्हाइसरॉयने गोव्याला आल्यावर पोर्तुगालला तिथल्या राज्य-चिटणीसाला जें पहिले पत्र लिहिले त्यांत त्याने प्रचलित राजकीय परिस्थितीचा आढावा घेतला आहे.

"राज्य चिटणीस् दियोग-कोर्तेरेआल ह्यांस--

सहा महिने नऊ दिवसांच्या प्रवासानंतर दिनांक २५ ऑक्टोबरला मी ह्या शहराच्या बंदरांत पाय ठेवला. मी मोसांबिकला दोन सप्टेंबरला पोहोचलों होतो. तिथून इकडे येण्यास १० सप्टेंबरला निघालो.

.................................................................................................

.................................................................................................

ह्या राज्यांत माणसांची मोठीच कमतरता आहे. नौकाही कमी आहेत. एकही चांगली नौका नाही. आशिया खंडातील सर्व शत्रूकडून ह्या राज्याला धोका आहे. शाहूराजे उर्फ शिवाजी ह्यांनी बलाढ्य आंग्रे ह्यांच्याशीं एकजूट केली आहे. पोर्तुगीज राज्य शाहू राजे उर्फ शिवाजी राजे ह्यांच्या अमलाखाली आणणे हें त्यांचे उद्दिष्ट आहे. हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठी जरूर पडल्यास पोर्तुगीज राज्यावर स्वारी करण्याचाही त्यांचा विचार आहे. स्वारी फत्ते झाली तर फायदा ते आपसामध्ये विभागून घेणार आहेत. असे सांगतात, की उत्तरेकडील साष्टी बेटे खंडणी आकारून इंग्रजांना देऊन टाकण्याचा त्यांचा विचार आहे. पण ही कारवाई हाणून पाडण्यासाठी मी उत्तरेकडे लवकरच सैन्य पाठविण्याची व्यवस्था करीत आहे. त्यांतच आनंदाची बातमी ही, की, मोगल सम्राटाने दोना ज्युलियाना हिच्या विनंतीवरून आपले सैन्य खाली पाठविले असल्याचे मला कळले आहे. ही बातमी जर खरी असेल, तर देवानेच आमची संकटांपासून मुक्तता केली आहे असे म्हणावे लागेल. असे कळते की, मोगलांचे सैन्य अहमदाबाद आणि सुरत ह्या दोन ठिकाणी आले आहे. ह्या सैन्याचे जर खरोखर आगमन झाले, तर आम्ही निश्चित झालो असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. कारण, आमच्या शत्रूचें आमच्यावर स्वारी करण्याचे कारस्थान आता यशस्वी होण्याची मुळीच शक्यता नाही. पहिली गोष्ट ही की, पावसाळा वाढल्यामुळे त्यांना रस्त्यांच्या सोयी मिळणार नाहीत. दुसरी गोष्ट, ही की वसईला एक मोगल राजपुत्र आला आहे. असे सांगतात की, तो पर्शिया आणि दिल्ली ह्या दोन्हीही सम्राटांचा वारसदार आहे. सांप्रत ज्यांनी पर्शियाचा छळ आरंभिला आहे, त्यांच्याविरूद्ध ह्या राजपुत्राने बंड पुकारल्याने त्यांनी त्याला पकडून तुरुंगांत टाकले होते. तिकडून तो इकडे पळून आला. ही बातमी त्या राजपुत्राच्या शत्रूंना आणि मित्रांना कळतांच दोघांनीही मला आणि माझ्या सेनाधिकाऱ्यांना पत्रें लिहून त्या राजपुत्राला आपल्या ताब्यात देण्याची माझ्याकडे मागणी केली. ह्या लोकांमध्ये मोगल सम्राटाविरूद्ध बंड करणारा किलिचखान हाही आहे. हा राजपुत्र जर किलिचखानाच्या ताब्यांत आला, तर त्याच्या पक्षाचे बळ वाढणार आहे. दुसऱ्या कांही जणांनी त्याला मोगल सम्राटाच्या हवाली करण्याची मला सूचना केली आहे. आणखी काही जणांची अशी सूचना आहे की, जो पक्ष विजयी होईल त्या पक्षाच्या हवाली त्या राजपुत्रास करावे. ह्या सगळ्यांना मी मोघम भाषेंत उत्तरे पाठविली आहेत. ह्या बाबतींत शेवटचा निर्णय मीच घेणार आहे. माझ्या मतें संकटात सापडलेल्या मनुष्यास त्याच्या शत्रूच्या हवाली करणे बरोबर नाही. पोर्तुगीज राष्ट्राच्या आतिथ्याला

आणि औदार्याला काळिमा फासणारें असे कोणतेंच कृत्य मी माझ्या हातून होऊ देणार नाही. ती दुर्बुद्धि मला सूचू नये म्हणून मी देवाकडे नेहमीच प्रार्थना करीन.

वर उल्लेखिलेल्या वजिराने (किलिचखान ह्याने) खंबायतमध्ये जबरदस्त कर बसविल्यामुळे सबंध आशियाच्या व्यापाराची हानी झाली आहे. त्या राज्यातील सर्व नौकायन आणि कारखाने बंद पडले आहेत. त्याचा फायदा आमच्या राज्याला होत आहे. कारण, मोगल राज्यांतील बंदरांमध्यें जे कारखानदार होते, ते आमच्या दमण, ठाणे, चौल, आणि दीव ह्या बंदरांत आले आहेत. आमच्या बंदरात जकात कमी असल्याने त्यांना ह्या बंदरांतून व्यापार करणे फायद्याचे होते. आणि हा व्यापार वाढल्यामुळे आमचे जकातीचे उत्पन्नही पुष्कळच वाढणार आहे. ...................................................................................................

देव आपणाला पुष्कळ वर्षे आयुष्य देवो."

गोवा, १९ जानेवारी १७२६

(185) LIVRO DAS MONCOES 92 336)

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, मोगल आणि मराठे ह्यांच्यामध्ये लढाई होऊन त्यांत मराठ्यांचे बरेच मोठे सेनाधिकारी ठार होऊन त्याचे चार हजार घोडेस्वार मोगलांनी कैद केले. मोगलांचा हा विजय पोर्तुगिजाच्या फायद्याचा आहे असे व्हाइसरॉयचे म्हणणे आहे.

"महाराज :

ही डाक बंद करीत असतांनाच आमच्या उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीचे पत्र आले. त्यांत त्याने अशी बातमी दिली आहे, की मोगल आणि मराठे ह्या दोघांमध्ये लढाई होऊन त्यांत मोगलांचा विजय झाला. मोगलांनी मराठ्यांचे ४ हजार घोडेस्वार कैद केले. ह्या लढाईत मराठ्यांचे काही अव्वल दर्जाचे सेनाधिकारी ठार झाल्याचेही त्याने कळविले आहे.

माझ्या मते मोगलांचा हा विजय आमच्या फायद्याचा आहे. कारण मोगलांच्या विजयामुळे आमच्या राज्याला स्थैर्य प्राप्त होणार आहे.

आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती आपल्या पत्रांत पुढें म्हणतात की, मोगल सैन्य कल्याण आणि भिवंडी ह्या दोन्ही ठाण्यांवर चाल करून गेले, तेव्हां ही लढाई झाली. आमच्या राज्याच्या सीमेवर असलेली ही ठाणी मराठ्यांच्या हातात होती.

ही संधी आमच्या फायद्याची असल्याने ती हातची सोडू नये म्हणून मी आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापतीस मला सुचतील ते विचार वारंवार कळवीत आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो."

गोवा, २३ जानेवारी १७२६.

(186) LIVRO DOS MONCOES. No. 92, FLS 305.

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांचे पुत्र नागोबा सावंत सरदेसाई ह्यांनी आपल्या वकिलाशी भांडण करून पोर्तुगिजांचा आश्रय घेतला. ह्या प्रसंगी पोर्तुगिज व्हाइसरॉय ज्यु आंव द साल्दान्य द गाम ह्यांने नागोबा सावंत सरदेसाई ह्यांच्यावर ज्या तहाच्या अटी लादल्या त्या खालील प्रमाणे आहेत. ह्या तहाप्रमाणे पोर्तुगिजांनी नागोबा सरदेसाई ह्यांची डिचोलीच्या किल्ल्यावरील व खोरजुवे आणि पोनोलें समोरील शेत वगळून बाकीच्या प्रदेशावरील सत्ता मान्य केली :

(१) सरदेसाई नागोबा सावंत ह्यांनी त्यांच्या वडिलांनी मान्य केल्याप्रमाणे त्यांच्यावरील पोर्तुगिजांचे मांडलिकत्व मान्य करावे.

(२) ज्या प्रदेशावर त्यांच्या वडिलांची सत्ता होती त्या प्रदेशावर त्यांची सत्ता राहील. ज्या प्रमाणे त्यांचे वडील जी खंडणी भरीत होते ती खंडणी नियमितपणे भरण्याचे बंधन त्यांच्यावर राहील. जर त्यांनी खंडणी भरली नाही, तर पहिल्या करारांत नमूद केलेल्या शेतांची व्यवस्था हे राज्य शाही खंडणी आणि वेतन फिटेपर्यंत पाहील.

(३) ज्या वेळी त्यांच्या राज्यांतील समुद्रावरील सर्व बंदरें त्यांच्या मालकीची होतील तेव्हां ह्या राज्याच्या बंदरांत येणाऱ्या जहाजांची त्यानी लूटालूट करू नये. त्याचप्रमाणे ह्या राज्याच्या बंदरांतून जाणाऱ्या जहाजांवरही त्यानी हल्ले करू नयेत. तसेंच ज्या जहाजांपाशीं. पोर्तुगीज परवाने असतील त्या जहाजांच्या वाटेलाही त्यांनी जाऊं नये ज्यावेळी त्यांची जहाजे सफरीवर जातील, तेव्हा त्यांनी त्याची वर्दी ह्या राज्याला द्यावी.

(४) त्यांच्या प्रजाजनांचा आणि ह्या राज्याच्या नागरिकांचा परस्पर संबंध असावा. त्यांनी जर एकमेकांची कुरापत काढली तर त्याचा निवाडा पोर्तुगीज कायद्यानुसार व्हावा.

(५) ह्या राज्यांतील एकादा गोरा किंवा निग्रो (आफ्रिकन) सावंतांच्या राज्यांत पळून गेला, तर त्यांनी त्याला ह्या राज्याच्या ताब्यांत द्यावे.

(६) त्यांनी एकही कलावंतीण अथवा वेश्या पिळगावला किंवा गोव्याच्या भागांत डिचोलीमध्ये राहू देऊ नये. जर यदाकदाचित अशा वेश्या किंवा कलावंतीण उपरिनिर्दिष्ट ठिकाणी राहिल्या तर कोणत्याही पोर्तुगीज सैनिकाला त्यांना लुटण्याची अथवा त्यांची घरें जाळण्याची परवानगी असावी.

(७) पोर्तुगीज प्रजाजनांना सावंतांची शेते पेरावयची असल्यास, त्यांनी तीं त्यांना द्यावी, व त्यांच्याकडून त्यांनी योग्य ती पट्टी वसूल करावी. आणि त्यांनी जर प्रसंगोपात पट्टी भरली नाही, तर हे राज्य त्यांना ती भरावयास लावील. अशा शेतकऱ्यांना सावंताच्या राज्यांत चांगली वागणूक मिळावी. तसेच त्यांच्याशी व्हायचा व्यवहार लेखी व्हावा. यदाकदाचित पुढे मागे वांदे निर्माण झाल्यास त्या लेखी कागदपत्रांचा पुरावा म्हणून उपयोग होईल.

(८) जर एकमेकांच्या हद्दीत चोरी झाली तर चोरीस गेलेल्या वस्तू एकमेकांनी एकमेकांना परत कराव्या व गुन्हेगारांना कडक शिक्षा करावी.

(९) अधिकाऱ्यांना किल्ला पुनः बांधण्यास परवानगी देण्यांत यावी.

(१०) जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक शांततेचा भंग होण्यासारखे कोणतेच कृत्य होऊं देऊ नये. जातीजातींमध्ये बिघाड आणू नये आणि ह्या राज्यांतील हिंदू प्रजाजनांच्या व्यापारांत व्यत्यय आणू नये.

(११) जर सावंतांनी ही सर्व कलमे आपणास मान्य असल्याचे जाहीर केले, तर नामदार व्हाइसरॉय हे आमचे स्वामी जे पोर्तुगालचे राजे यांच्या वतीने सावंतांना सर्व प्रकारचे संरक्षण देतील, व त्यांच्या राज्यांत शांतता प्रस्थापित होण्यासाठी त्यांना सर्व प्रकारची मदत करतील पण ते जर ह्या कलमाप्रमाणे वागले नाहीत (ते तसे करणार नाहीत अशी आशा आहे) तर त्यांना युद्धजन्य परिस्थितीप्रमाणे कडक शिक्षा केली जाईल. ही सर्व कलमे आपणास मान्य आहेत, हे त्यांना शपथ घेऊन जाहीर करावे लागेल, व त्या प्रमाणे त्याना करारावर सही करावी लागेल.

(१२) जर नागोबा सरदेसाई ह्यांना ह्या राज्यांत कुठेही रहायचे असेल तर त्यांना कुठेही विनधोकपणे राहता येईल. त्यांच्या सुरक्षिततेसाठी काळजी घेतली जाईल."

डिचोली, हल्ल्याचे मैदान.

२७ मे १७२६

(सरदेसाई ह्यांचा शिक्का)

(188) (LIVRO DE PAZES)

नागोबा सावंत भोसले हा कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचा मुलगा, तो आपल्या वडिलांशी भांडून पोर्तुगीजांना सामील झाला होता, व पोर्तुगीजांचे मदतीने आपल्या बापाचे राज्य घेऊ पाहात होता, पोर्तुगीजांना ह्या दोघा पिता-पुत्रांमध्ये कलह लावून आपला स्वार्थ साधायचा होता. व म्हणून त्यांनी नागोबा सावंत ह्याला जवळ केले होते. ते जेव्हां फोंडू सावंत भोसले ह्यांना कळले, तेव्हा ते पोर्तुगीजांशी नवीन करार करण्यास तयार झाले. पोर्तुगीजांनाही तेच हवे होते. त्यांनी फोंडू सावंत ह्यांना थोडयाफार फरकाने मागील करार मान्य करावयास लावून शिवाय त्यांच्यावर आणखीही काही अटी लादल्या.

नामदार व्हाइसरॉय ज्युआंव द साल्दान्यद गाम कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांच्यामधील तह, हा करार फोंडू सावंत भोसले ह्यांच्या विनंतीवरून करण्यांत येत असून तो अभंग राखण्याचे वचन देण्यांत येत आहे. ह्या कराराचे पहिले कलम व्हाइसरॉय दों. रूद्रिगु द कोश्त ह्यांच्याशी फोंड सावंत ह्यांच्यात जो करार झाला त्या करारासारखेच आहे. दुसरे कलम त्याच करारातील दुसऱ्या कलमाप्रमाणे.

तिसरे—तिसऱ्या कलमाप्रमाणे.

चौथे—चौथ्या कलमाप्रमाणे. ह्या कलमांत पुढील भर घालण्यांत येत आहे. ह्या राज्याच्या कुठल्याही शत्रुशी सरदेसाई फोंडू सावंत ह्यांनी संबंध ठेवू नये.

पाचवे कलम तेच. ह्या कलमांत जी भर घालण्यात येत आहे ती ही की, जे लोक पळून गेलेल्या सैनिकांना पकडून देतील त्यांना १० आसुर्प्या बक्षीस देण्यांत येईल.

सहावे कलम—तसेच. ज्या व्यक्तींची नुकसानी झाली आहे, त्यांनी अर्ज केला असतां त्या कलमांत जी यादी देण्यांत आली आहे, त्या यादीप्रमाणे नुकसानभरपाई करावी लागेल.

कलम सातवे—त्या करारांतील कलमाप्रमाणेच ह्या कलमांत आणखी भर घालण्यांत येत आहे ती ही की, ज्या इसमाचा गुलाम अथवा निग्रो पळून जाईल त्याला पकडून आणून देणाराला त्या इसमाकडून पांच असुर्प्यांचे बक्षीस मिळेल.

कलम आठवे—मूळ करारातील कलमाप्रमाणे.

कलम नववे—हे कलम मूळ करारातील कलमाप्रमाणे कडकपणे पाळावे लागेल.

कलम दहावे—सतत चौदा वर्षेपर्यंत दरवर्षी एक हजार असुर्प्या भराव्या लागतील.

वरील कलमात पुढील नवीन कलमांची भर घालण्यात आली :—

(१). फोंडू सावंत भोसले ह्यांनी त्यांचा मुलगा नागोबा सावंत भोसले ह्यांना दरमहा ८०० असुर्प्यांचे वेतन सुरू करण्याचे जे वचन दिले आहे, त्या वेतनाची हमी म्हणून त्यांनी काही सधन व्यक्तींची जामिनकी घ्यावी.

(२) त्यांनी जर वरील कलम मान्य केले नाही, तर त्यांच्या मुलास डिचोलीस किंवा त्याला जिकडे जायचे असेल तिकडे जाता येईल पण तोपर्यंत त्याच्यावर निर्बंध असतील.

(३) नागोबा सावंताचे जर त्याच्या बापाशी युद्ध झाले, तर त्या युद्धाचा निर्णय लागेपर्यंत डिचोली जिल्हा ह्या राज्याकडे रहावा. ह्या राज्याचे दोघांशीही सलोख्याचे संबंध राहतील. दोघा बापलेकांना जर नामदार व्हाइसरॉय ह्यांची मध्यस्थी म्हणून नेमणूक करायची असेल, तर ही जबाबदारी नामदार व्हाइसरॉय आनंदानें पत्करतील.

(४) ह्या राज्याची अशी समजूत आहे की, कलावंतीणी अथवा वेश्या हे दोन्ही राज्यांमध्ये तेढ निर्माण होण्याचे एक कारण आहे. ह्या कलावंतीणी गोव्याच्या राज्यापासून जवळ असतात. तरी फोंडू सावंत भोसले ह्यांनी त्यांना गोव्याच्या हद्दीपासून दोन तासांच्या अंतरावर आत मागे घ्यावे.

(५) फोंडू सावंत भोसले ह्यांना जर त्यांच्या किंवा त्यांच्या-प्रजाजनांच्या नौका समुद्रावर पाठवायच्या असतील, तर मोगल बादशहा, कर्नाटकाचा राजा, झामोरीन, सोंदेचा राजा वगैरे आशिया खंडातील राजांप्रमाणे फोंडू सावंत ह्यांच्या किंवा त्यांच्या प्रजाजनांच्या जहाजांना बरोबर पोर्तुगीज परवाने बाळगावे लागतील.

(६) फोंडू सावंत भोसले ह्यांच्या जहाजांनी ह्या राज्याच्या समुद्रात कोणत्याच प्रकारची चांचेगिरी करू नये.

(७) जर सरदेसायांच्या राज्यातील माणसे ह्या राज्यात पळून आली, तर त्यांच्यावर ह्या राज्यातील न्यायालयात खटला भरण्याचा अधिकार सावंतांच्या राज्यातील नागरिकांना असेल. त्याचप्रमाणे दोन्ही राज्यातील प्रजाजनांमध्ये काही तंटे निर्माण झाले तर ते ह्या राज्यातील न्यायालयांमध्ये सोडविता येतील. अशीच सवलत ह्या राज्यातील नागरिकांना सावंतांच्या राज्यातही असेल.

(८) ह्या करारातील कलमांचा सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांच्याकडून अथवा त्यांच्या प्रजाजनांकडून भंग झाला तर, हे राज्य त्यांना त्याबाबत एकदाच ताकीद देईल. नंतर आपणास सोईस्कर वाटेल त्याप्रमाणे योग्य तो इलाज स्वतः करील.

गोवा, १३ ऑगस्ट १७२६

(189) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS No. 16. FLS 7V

सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचा आणि पोर्तुगीजांचा जो आर्थिक व्यवहार होता, त्या संबंधाने गोवा राज्य—सेक्रेटरीने सावंतांच्या दुतास पुढील पत्र लिहिले :—

" फोंडू सावंत भोसले ह्यांचे वकील शंभू शेणवी, ह्यांस—

आपले पत्र आणि त्या पत्रात असलेले कागद मी नामदार व्हाईसरॉय ह्यांना सादर केले असता त्यांनी मला उत्तर पाठविण्याचा हुकूम केला की, रेवोडा येथील इगर्जीच्या दुरूस्तीसाठी सरदेसाई ह्यांनी ज्या १० हजार असुर्या पाठविल्या त्याबद्दल त्यांना फार आनंद झाला आहे. सरदेसाई फोंडू सावंत ह्यांनी आणखी एक हजार असुर्या एका वर्षाच्या तंटचाबद्दल फेडल्या आहेत. परंतु ह्याच तंटचाबद्दल जी तेरा हजार असुर्याची बाकी होती, ती त्यांनी ताबडतोब फेडली पाहिजे. निग्रोविषयी सरदेसाई फोंडू सावंत ह्यांना सूचना करायची आहे की, त्यांनी त्यांच्या राज्यात इकडून पळून गेलेल्या निग्रोंचा



मराठी अ व्हि ५५५८—१६

आकडा ताबडतोब आम्हास कळवावा, असे कळते की, त्यांच्या राज्यात पळून गेलेल्या निग्रोंची संख्या सहाशेच्यावर आहे. सरदेसाई ह्यांनी हा आकडा कमी केला आहे. किंवा त्यांनी काही निग्रो विकून टाकले आहेत. अशी कुणकूण आहे. अशा रीतीने त्यांनी तहाच्या करारातील गुलामासंबंधीच्या कलमांचा भंग केला आहे. बालाघाटला जाणाऱ्या भोयासंबंधाने सरदेसाई ह्यांनी काही काळजी करू नये. ह्या भोयांना कोणताच अडथळा येणार नाही. नागोबा सावंत ह्यांच्याकडूनही त्यांना काही उपसर्ग पोहोचणार नाही.

सदर्हू नागोबा सावंत ह्यांनी तहाचा करार करावयास सांगितला होता. मी तत्संबंधीचे उत्तर आपणास सोमवारी धाडीन. त्याच दिवशी आपण मला जामीनदारांची नावे कळविली पाहिजेत.

देव आपले भले करो".

सचिवालय, १७ ऑगस्ट १७२६ थॉमे गोमिश मोरैरा

(190) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS No. 16, FLS 10V.

गोवा राज्य चिटणीसाचे फोंडू सावंत भोसले ह्यांच्या वकीलास गेलेले आणखी एक पत्र :—

फोंडू सावंत भोसले ह्यांचे दूत शंभू शेणवी, ह्यांस—

आपले पत्र नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या निदर्शनास आणले असता, त्यांनी मला आपणास कळविण्यास सांगितले आहे की, सरदेसाई नागोबा सावंत भोसले ह्यांच्याकडून त्यांना त्यांच्या वडिलांनी देऊ केलेल्या ८०० असुर्प्यांच्या तनख्यासंबंधीचे उत्तर आले आहे. त्यांनी हा तनखा स्वीकारायचा आहे, अथवा डिचोलीच्या किल्ल्यात जाऊन रहायचे आहे. ह्याच पत्रासोबत सदर्हू नागोबा सरदेसाई ह्यांनी आपल्या वडिलांना लिहिलेल्या मागच्या तारखेचे एक पत्र जात आहे. ते देशी लिपीत आहे. त्यांचे असे म्हणणे आहे की, हे प्रकरण आता संपलेले आहे. त्याप्रमाणे हुकूम निघणार असून त्याचा मसुदा ह्या पत्रासमवेत जात आहे".

सचिवायल, १९ ऑगस्ट १७२६ थोमे गोमिश मोरैरा

(191) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS No. 16, FLS

फोंडू सावंत भोसले ह्यांचा मुलगा नागोबा भोसले ह्यांनी डिचोलीचा किल्ला पाडण्यास सुरूवात केल्याची तक्रार फोंडू सावंत ह्यांचे दूताने

पोर्तुगिजांकडे केल्याने गोवा राज्य चिटणीसाने नार्वे येथील किल्ल्याच्या कॅप्टनला पुढील पत्र लिहिले :—

"नार्वेच्या किल्ल्याचे आणि राजवाड्याचे कॅप्टन सेबास्तिआंव नूनिश द ओलिव्हैरा ह्यांस—

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांच्या वकिलाने आज नामदार व्हाइसरॉय ह्यांच्याकडे अशी तक्रार केली की, नागोबा सावंत भोसले ह्यांनी डिचोलीचा कोट पाडून टाकण्याचा हुकूम केला आहे. ही बातमी कळताच नामदार व्हाइसरॉय ह्यांनी आपणाला ह्या बाबतीत इशारा देण्याची सूचना केली. सदहू नागोबा भोसले ह्यांच्याकडून आपणाला काही उपसर्ग पोहोचण्याची शक्यता आहे. तरी आपण सावध असावे.

देव आपले रक्षण करो".

सचिवालय, २० ऑगस्ट १७२६

थॉमे गॉमिश मोरैरा

नागोबा भोसले ह्यांनी डिचोलीच्या कोटातील घरे पाडण्याचा जो उपद्व्याप सुरू केला त्याबद्दल राग भरून गोवा राज्य चिटणीसांनी त्यांना पुढील पत्र पाठविले :—

"नागू सावंत भोसले ह्यांस—

फोंडू सावंत भोसले ह्यांच्या वकिलानी आज नामदार व्हाइसरॉय ह्यांच्याकडे तक्रार केली आहे की, आपण काल दि. १९ ला डिचोली येथील कोटातील घरे पाडण्याचा सपाटा सुरू केला आहे, व त्या किल्ल्याच्या भागात आणखीही मोडतोड करण्याचा आपला विचार आहे. आपले हे कृत्य निंदास्पद आहे असे नामदार व्हाइसरॉय ह्यांचे मत आहे. म्हणून त्यांनी आपणाला आज्ञा केली आहे की, आपण जोपर्यंत आपल्या राज्यात आहात तोपर्यंत आपण सरदेसाई फोंडू सावंत ह्यांची कोणत्याच प्रकारची कुरापत काढू नये. इतकेच नव्हे, तर आपण डिचोलीच्या कोटातील घरे पाडण्याचे कामही थांबवावे असा त्यांचा आपणाला हुकूम आहे. आपण जर असे केले, तर आपणाकडून वचन भंग होत आहे असे आम्हास म्हणावे लागेल.

देव आपले रक्षण करो".

सचिवालय, २० ऑगस्ट १७२६ थॉमे गोमिश मोरैरा

(192) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS NO 16 FLS IIA

गोवा राज्याचा मुख्य सचीव फोंडू सावंत सरदेसाई ह्यांना उत्तर करतो की, त्यांच्यामध्ये आणि पोर्तुगीजांमध्ये जो करार झाला तो लवकरच अमलात आणण्याचा विचार नामदार व्हाइसरॉय हे करीत असून नागोबा सावंत ह्यांनाही त्यांनी त्यांच्या अविचारी कृत्यांपासून परावृत्त केले आहे.

"फोंडू सावंत ह्यांचे वकील शंभू शेणवी ह्यांस--

आपले पत्र नामदार व्हाइसरॉय ह्यांच्या निदर्शनास आणल्यावर त्यांनी मला आपणास कळविण्याचा हुकूम केला की, तहाची कलमे सुवाच्य अक्षरात लिहिण्याचा हुकम सरकारी दुभाष्याला करण्यात येणार असून ती उभय पक्षां-कडे सहीसाठी पाठविली जाणार आहेत. तसेच महसूल खात्याच्या प्रमुखालाही निग्रोंना ताब्यात घेण्याचा हुकूम केला जाणार आहे, व हे काम त्याचवेळी होणार आहे. हे सर्व झाल्यावर नामदार व्हाइसरॉय हे नागोबा सावंतांना आमच्या राज्यातून निघून जाण्यास सांगणार आहेत. तोपर्यंत त्यांनी नागोबांना असा हुकूम केला आहे की, जोपर्यंत ते ह्या राज्यात आहेत तोपर्यंत त्यांनी सरदेसाई फोंडू सावंत ह्यांची कुरापत काढू नये. व डिचोली शहरातील वस्ती पाडू नये".

सचिवालय, २० ऑगस्ट १७२६

## (192) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS NO 16 FLS 12

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांच्या विनंतीवरून पोर्तुगालच्या राजाचे राज्य सल्लागार व हिंदुस्थानचे कॅप्टन जनरल आणि व्हाइसरॉय नामदार ज्युआंव द साल्दान्य द गामा ह्यांनी सदर्हू सरदेसाई फोंडू सावंत ह्यांच्याशी जो करार केला त्या करारातील कलमे.

१७२६

पहिली अट

हा करार पाळण्याबाबत सरदेसाई फोंडू सावंत हे जी शपथ घेतील ती शपथ १७१२ साली व्हाइसरॉय नामदार दों. रूद्रिगु द कोश्त ह्यांच्या अमदानीत भोसल्यांचा आणि पोर्तुगिजांचा जो करार झाला त्या करारालाही बंधनकारक असेल. त्या कराराचा मसुदा पुढीलप्रमाणे होता.--

कुडाळचे सरदेसाई बाबू सावंत भोसले ह्यांना आणि त्यांच्या वडिलांना नेहमीच ह्या राज्याचा आश्रय मिळत आला आहे, पण ती गोष्ट विसरून जाऊन सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी ह्या राज्याविरुद्ध हत्यार उपसले.

त्याबद्दल त्यांना पश्चाताप झाला, व त्यांनी नामदार व्हाइसरॉय ह्यांच्याकडे तहाची याचना केली. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी ह्या राज्याची आणि भोसल्यांची जी मैत्री होती तिला उजाळा देऊन बाबू सावंत भोसले ह्यांच्याशी तह करण्याचा निर्णय घेतला. ह्या कराराप्रमाणे सरदेसाई बाबू सावंत ह्यांना ह्या राज्याचे संरक्षण पूर्ववत मिळणार आहे. पण त्याबद्दल ह्या करारातील सर्व कलमे पाळण्याचे त्यांच्यावर बंधन असून आमच्या खोरजुवे, पानेली आणि नार्वे येथील किल्ल्यांच्या तोफखान्याच्या कक्षेत येणारी शेते सोडून द्यायची आहेत. ह्या करारातील कलमे पुढीलप्रमाणे आहेत :—

(१) त्यांनी फोंड्याबाबत भांडण उपस्थित करू नये, कारण ह्या राज्याने फोंड्याचा किल्ला आणि त्याच्या लगतचा प्रदेश सोंदेच्या राजास देऊन टाकला आहे.

(२) जे देसाई ह्या राज्याचे प्रजाजन असतील, त्यांच्या वाटेला सरदेसाई ह्यांनी जाऊ नये. त्यांच्याकडे ज्या जमिनी आहेत त्या त्यांच्याच मालकीच्या आहेत असे त्यांनी धरून चालावे. कारण, मोगल अथवा शिवाजी ह्यांच्या राजवटीपासून ह्या देसायांकडे ज्या जमिनी आहेत, त्या त्यांच्याच आहेत. असे ह्या राज्याने मान्य केले आहे.

(३) ह्या राज्यातील जे व्यापारी सरदेसायांच्या राज्यात व्यापारासाठी जातील, त्यांच्याशी त्यांनी भांडण करू नये, किंवा त्यांच्याकडून जादा कर वसूल करू नये. त्याचप्रमाणे ह्या राज्याच्या मालकीची किंवा ह्या राज्यातील प्रजाजनांची जी जहाजे भोसल्यांच्या बंदरात जातील त्यांच्याशीही त्यांनी भांडण करू नये अथवा त्यांच्यावर जादा कर आकारू नये. ह्या जहाजात त्यांनी कोणत्याच प्रकारचा अडथळा करू नये.

(४) अरब लोक पोर्तुगिजांचे शत्रू आहेत म्हणून सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी त्यांना आपल्या राज्यात व्यापार करू देऊ नये. यदाकदाचित अरब जहाजे जर सरदेसायांच्या बंदरात लागली, तर ती बेकायदा ताब्यात घेण्याचा अथवा जाळून टाकण्याचा हक्क पोर्तुगीज जहाजांना असावा. पण त्यामुळे शांततेच्या कराराचा भंग होऊ नये.

(५) जे पोर्तुगीज लोक नामदार व्हाइसरॉय ह्यांची परवानगी न घेता सरदेसायांच्या प्रदेशात प्रवेश करतील त्यांना त्यांनी विरोध करावा, किंवा त्यांना अटक करावी व बार्देशच्या सेनापतीला तसे

कळवावे. म्हणजे नामदार व्हाइसरॉय हे त्यांना त्या लोकांस बार्देशच्या सेनापतीच्या ताब्यात देण्याचा हुकूम करतील.

(६) बाबू देसाई ह्यांच्या लोकांनी ह्या राज्याच्या प्रजाजनांना चोरीमारीसारखा उपद्रव देऊ नये. त्यानी तसे केले तर त्याची नुकसानभरपाई त्यांना करावी लागेल. जर ह्या राज्यातील माणसे बाबू देसाई ह्यांच्या लोकांकडून ठार किंवा जखमी झाली, तर त्यांना शासन करण्यासाठी बाबू देसाई ह्यांनी त्यांना ह्या राज्याच्या हवाली करावे.

(७) ह्या राज्यातील जे निग्रो किंवा निग्रो स्त्रिया सरदेसायांच्या राज्यात पळून जातील त्यांना त्यांनी तावडतोब ह्या राज्याच्या हवाली करावे. त्यांना त्यांनी तावडतोब अटक करावी व बार्देशच्या सेनापतीच्या ताब्यात द्यावे. म्हणजे ते त्यांच्या धन्यांना त्यांना परत करतील.

(८) पानेली आणि खोर्जुवे ही बेटे व त्यांना संलग्न असलेल्या टापूवर ह्या राज्याची सत्ता असल्याने, त्यांच्यासाठी सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी भांडण करू नये. ही बेटे आणि त्यांच्या लगतचा प्रदेश पोर्तुगिजांनी खेम सावंत भोसले ह्यांचा पराभव झाला तेव्हा घेतला होता, हे तर झालेच, पण मोगल बादशहानेही त्यांना हा प्रदेश बहाल केला होता.

(९) सरदेसाई बाबू सावंत ह्यांना नामदार व्हाइसरॉय ह्यांनी ह्या राज्याच्या संरक्षणाखाली घेतले, व त्यांचे वाडवडील आणि खेम सावंत ह्यांना देखील पोर्तुगिजांनी संरक्षण दिले होते. त्याबद्दल कृतज्ञता म्हणून सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी नामदार व्हाइसरॉय ह्यांना दोन अरबी घोडे किंवा त्यांच्या बदली प्रत्येकी पाचशे असुर्प्या द्याव्या. (कंसामध्ये आणि दुसऱ्या अक्षरात खालील मजकूर आहे).

(१०) बाबू सावंत भोसले हे सारी प्रांतातून जे तीन हजार रुपये वसूल करतात, ते तीन हजार रुपये यापुढे ह्या प्रातास प्राप्त व्हावे.

(११) सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी रेवोडा येथील इगर्जीच्या (चर्च) आणि इगर्जीच्या पुजाऱ्याच्या घराच्या दुरूस्तीसाठी १० हजार असुर्प्या द्याव्या. ह्या कराराला सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी पुढील-प्रमाणे मंजूरी दिली.

वरील अकराही कलमे मला मान्य असून मी पोर्तुगिजांचे संरक्षण घेत आहे.

मला ज्या ज्या वेळी गरज लागेल त्या त्या वेळी मी पोर्तुगिजांची मदत आणि सहकार्य घेईन.

१ दबिलावल शक: इनुहुरस्सन इस्साने आस्सर मिया आलफ, म्हणजे ७ एप्रिल १७२६.

सरदेसाई ह्यांचे दोन शिक्के.

वरील करार मान्य करण्याचे सरदेसाई हे वचन देतात. तत्संबंधीचे त्यांचे निवेदन :—

नामदार दों. रूद्रिगु द कोश्त ह्यांच्याशी जो करार झाला त्या करारातील पहिले कलम जशाचे तसे मान्य केले जाईल.

दुसऱ्या कलमातही बदल केला जाणार नाही. तिसरे कलमही पाळले जाईल.

चौथे कलम ह्या राज्याच्या कोणत्याही शत्रूला लागू होईल. सरदेसाई बाबू सावंत ह्यांनी ह्या राज्याच्या बंदरात येणाऱ्या जाणाऱ्या जहाजांवर हल्ले करू नयेत. त्यांनी जर तसे केले आणि तो आळ दुसऱ्यावर घातला तर त्यांची ही सबब मान्य केली जाणार नाही.

पाचव्या कलमासंबंधी हे राज्य जाहीर करते की, जे लोक पळून गेलेल्या शिपायांना पकडून आणतील, त्यांना प्रत्येक शिपायामागे दहा असुर्प्या बक्षीस मिळेल. त्यांनी ही कामगिरी स्वखुषीने बजावली म्हणून त्यांना हे बक्षीस देण्यात येईल. पळून जाणाऱ्या सैनिकांना कडक शिक्षा केली जाणार नाही. सहाव्या कलमासंबंधी सरदेसाई ह्यांनी त्यांच्या प्रजाजनांनी केलेल्या ह्या राज्यातील चोरीमारीची नुकसान भरपाई केलीच पाहिजे. त्यांनी जर ती केली नाही तर व्यक्तींना राज्याच्या मदतीने योग्य त्या मार्गे ती वसूल करून घेता येईल.

सातवे कलम सरदेसाई ह्यांनी बारा गुलाम, दोन गुलाम स्त्रिया आणि एक निग्रो मुलगा परत केला आहे. ही सर्व माणसे त्यांना त्यांच्या राज्यात आढळली. त्यांनी अशी सवलत दिली आहे की, जे गुलाम त्यांच्या राज्यांत पळून गेले असल्याचा संशय त्यांच्या मालकांना आला असेल, त्यांनी सरदेसायांच्या राज्यात येऊन त्यांचा स्वतः किंवा दुसऱ्या कुणाला पाठवून तपास करावा. हे गुलाम जर त्यांना तिकडे आढळले तर त्यांना लगेच त्यांच्या मालकांना परत केले जाईल.

सरदेसायांच्या राज्यात पळून गेलेल्या गुलामाला जो कुणी ह्या राज्याच्या हद्दीत आणील त्याला त्या गुलामाच्या मालकाकडून पाच असुर्प्या बक्षीस मिळेल.

आठवे कलम जशाचे तसे पाळले जाईल. नवव्या कलमाबाबत सरदेससाई ह्यांनी दहा हजार असुर्प्या भरल्या आहेत. असे ह्या शहराचे महसुलाधिकारी आमारू द सिल्व्ह आणि मानुएल रिबैस ह्या दोघांनी सादर केलेल्या हिशेबावरून दिसून येते.

दहावे कलमही पाळण्यात आले आहे. महाराजांचे महसुलाधिकारी झुजे आंतुनिज ब्रांकु ह्यांनी जाहीर केल्याप्रमाणे बांध्यात पडलेल्या घोडचा-संबंधी १३ हजार असुर्प्या भरण्यात आल्या आहेत.

सांप्रतचा तहाचा करार चालू.

दुसरी अट

सरदेसायांच्या नौकांना एकट्याने किंवा दुसऱ्यांच्या नौकाबरोबर ह्या राज्याच्या समुद्रात चांचेगिरी करता येणार नाही.

तिसरी अट

सरदेसाई बाबू सावंत ह्यांना त्यांचा मुलगा नागू सावंत ह्यांना दरमहा आठशे असुर्प्यांचा तनखा पोटगीच्या खर्चासाठी म्हणून सुरू करावा लागेल. त्याची हमी म्हणून त्यांनी ह्या राज्यातील काही माणसे जामीन घ्यावी. जर नागू सावंत ह्यांना हा तनखा मान्य असला, तर त्यांनी त्यांच्याकडे असलेला डिचोलीचा किल्ला आपल्या बापास परत करावा.

चौथी अट

जर सरदेसायांच्या मुलास आठशे असुर्प्यांचा तनखा स्वीकारणे नको असेल आणि डिचोलीचा किल्ला स्वतःकडे ठेवायचा असेल, तर त्याला आणखी कुणाकडे जायचे असल्यास जाता येईल त्या दरम्यान त्याला कोणताच उपद्रव होऊ नये.

पाचवी अट

सरदेसायांचा मुलगा नागोबा सावंत ह्यांनी आमच्या राज्यातून बाहेर पडून जर त्यांच्याशी युद्ध सुरू केले, तर हे राज्य त्यांच्यापैकी कुणालाही मदत न करता तटस्थता स्वीकारील. व दोघांशीही राजकीय मैत्री ठेवील.

सहावी अट

सरदेसायांच्या आणि आमच्या राज्यामधून जाणाऱ्या नदीकाठावर कलावंतीणींना आणि वेश्यांना घरे बांधण्यास हे राज्य परवानगी देणार नाही.

सातवी अट

मोगल, कर्नाटकाचा राजा, सोंदेचा राजा, वगैरे राजांची जहाजे ज्याप्रमाणे परवाने बाळगतात त्याप्रमाणे सरदेसायांच्या जहाजांना पोर्तुगिज परवाने बाळगावे लागतील. परवाना न बाळगणारी जहाजे पकडून सरकारजमा केली जातील.

आठवी अट

सरदेसायांच्या राज्यातील एकादा कर्जबाजारी अथवा गुन्हेगार नागरिक जर ह्या राज्यात पळून आला, तर सरदेसायांच्या विनंतीवरून हे राज्य त्या इसमाच्या गुन्ह्याचा न्याय निवाडा करील. असाच न्याय निवाडा ह्या राज्यातून सरदेसायांच्या राज्यात पळून गेलेल्या गुन्हेगाराचा त्या राज्यास करावा लागेल. किंवा ह्या राज्यातील एकाद्या नागरिकाने जर सरदेसायांच्या राज्यात गुन्हा केला अथवा तो त्यांना देणे असला तर त्याच्यावर खटला भरण्याचा अधिकार त्यांना असेल.

नववी अट

वरील कलमांपैकी कुठल्याही कलमाचा भंग सरदेसाई ह्यांनी किंवा त्यांच्या कुणाही प्रजाजनाने जर केला, तर त्याबद्दल त्यांना एकदाच इशारा देण्यात येईल. आणि त्यांनी जर ते मान्य केले नाही तर हे सरकार आपल्या सोयीप्रमाणे त्यांच्यावर इलाज करील.

गोवा, २२ ऑगस्ट १७२६ ज्यु आंव द साल्दान्य गामा.

तांबड्या लाखेवरील शिक्का पोर्तुगिज राज चिन्हांचा मराठी भाषेतील मान्यता आणि काळ्या शाईचे दोन शिक्के.

मराठी भाषेतील मान्यता :—

हा करार मी अभंगपणे पाळण्याचे कबूल करीत आहे, व असाच दुसरा करार मराठीत लिहून देत आहे.

नार्वे, २२ जिल्हेर, वर्ष सबम् असेरिम्

मेअम् अलाफी पोर्तुगीज २४ ऑगस्ट १७२६

कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचे दोन शिक्के.

दुभाषी—बोगण कामत

(195) LIVRO 10 DC PAZES, No. 318

गोव्याचा व्हाइसरॉय गोव्याच्या महसूल खात्याच्या प्रमुखाला कळवितो की, सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचा मुलगा नागोबा सावंत हा त्यांच्या बापाने देऊ केलेला ८०० असुर्प्यांचा मासिक तनखा स्वीकारण्यास तयार नाही. त्याला डिचोलीचा जिल्हा व तिथला किल्ला हवा असून त्यासाठी आपल्या बापाशीही लढण्याची त्याची तयारी आहे. तरी हे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांचे वकील शंभू शेणवी ह्यांना कळवावे.

प्रस्तुत पत्र गोव्याचे व्हाइसरॉय ज्युआंव द साल्दान्य द गामा ह्यांनी दि. २९ ऑगस्ट १७२६ रोजी पानेली येथून लिहिले.

मराठे साष्टीवर चालून येत असल्याची बातमी साष्टीच्या सेनापतीने गोव्याच्या व्हाइसरॉयला कळविली असता त्याने त्याला पत्र पाठवून प्रांतात सगळीकडे कडक बंदोबस्त ठेवण्याचा हुकूम केला.

"साष्टीचे सेनापती दों. आंतोनियु काश्कु द मेलु ह्यांस—

आपल्या निरोपाप्रमाणे माझी काळजी थोडी कमी झाली कारण, इतरांकडून मला ज्या बातम्या कळल्या होत्या त्यांत शत्रू दोन दिवसांच्या वाटेवर आहे असे म्हटले होते. तथापि, असे जरी असले, तरी शत्रूने अचानकपणे हल्ला करू नये म्हणून आपण काळजी घ्यावी.

शाबास खान व जांबावलीचे सुभेदार ह्या दोघांनी मला दुसऱ्या एका प्रश्नाबाबत लिहिले होते. मी त्यांना जे उत्तर पाठविले, त्यात त्यांना इशारा दिला आहे की, शत्रू त्यांच्या प्रदेशात शिरल्यावाचून राहाणार नाही. कारण, ह्यापूर्वी प्रत्येक वेळी शत्रूकडून ह्या जिल्ह्यावर हल्ला झालेला आहे. मी त्या दोघांना कळविले आहे की, आम्ही त्या दोघांच्या मदतीला जाण्यास व खिंड रोखून धरण्यास तयार आहोत. तरी हे पत्र मिळताच आपण त्या दोघांशी ह्या बाबतीत पत्रव्यवहार करावा, व त्यांना वेळीच जागे करावे. क्रिश्तोव्हाव द कुन्य ह्यांच्या तुकडीला आपणास त्यांच्या तळावर मागे बोलविता येईल. आणि कैद्यांवरील पहारा व सुरक्षितता ह्या बाबतीत लष्करातील काही सैनिकांना गस्त घालावयास पाठविता येईल. मी लवकरच त्या किल्ल्याच्या कॅप्टनवरील ताण कमी करण्याचा प्रयत्न करीत आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

पानेली, २ डिसेंबर १७२६ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(202) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 49V.

गोव्याचा व्हाइसरॉय बाजीरावांच्या संभाव्य स्वारी संबंधाने साष्टीच्या सेनापतीस लिहितो :—

"साष्टीचे सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

आपले चालू माहीच्या दि. ३ चे पत्र शाबासखान ह्यांच्या पत्राच्या नकलेसह मिळाले. काल मी आपणाला जे पत्र लिहिले त्यांतील बातम्या आपण वाचल्याच असतील. असे कळते की, बाजीरावाच्या सैन्यात १० हजार घोडेस्वार असून त्याला आणखी एक सरदार त्याच्या ४ हजार घोडदळासह येऊन मिळणार आहे. दाभाडे बाजीरावाबरोबर होता, पण तो आपल्या १० हजार घोडदळासह सुरतेच्या बाजूने निघून गेल्याची बातमी आहे. असे कळते की, त्या दोघांचे बिनसते आहे. बाजीरावाच्या पायदळात पेंढाऱ्यांचा भरणा अधिक असल्याची बातमी आहे. आमची जर तयारी नसली, तर ह्या पेंढाऱ्यांकडून आम्हाला उपद्रव होण्याची शक्यता आहे. बाजीराव कर्नाटकाकडे निघाला आहे अशी बातमी आहे.

इगर्जीतील चांदी आणि मौल्यवान वस्तू सुरक्षित ठिकाणी ठेवाव्या व लोकांना हुशार रहावयास सांगावे. त्या दरम्यान जर आपणाला ......... माझ्या हुकुमाची वाट पाहू नये. माझ्यापाशी ३०० पोर्तुगीज सैनिक जयत तयार आहेत. आपला पहिला निरोप मिळताच मी त्यांना पाठवून देईन. तिकडे घोडे नसल्यास मला तावडतोब कळवावे. म्हणजे मी ते तिकडे पाठवून देईन.

आपला पहिला निरोप मिळताच मी तिकडे निघेन. मी आपल्यापाशी असलेला बरा असे मला वाटते. पण बार्देशवर जर हल्ला झाला नाही तरच मला तिकडे जाणे शक्य होईल. तशी भीती असल्यास मी दोन्हीच्या मध्ये राहीन.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, ४ डिसेंबर १७२६ ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(199) LIVRO DAS CARTAS E ORDENS, PORTARIAS, No. 16 FLS 47

गोव्याचा व्हाइसरॉय साष्टीच्या सेनापतीस मराठ्यांच्या स्वारीसंबंधाने पुनः लिहितो :—

"साष्टीचे सेनापती आंतोनियु द काश्कु इ मेलुह्यांस—

इगर्जीतील चांदी, मौल्यवान वस्तू आणि गुरे सुरक्षित ठिकाणी गोळा करण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे, त्याला माझी मंजुरी आहे. बारा

तंत्रू, गोलंदाज, घोडे व आपण पाठविलेल्या यादीतील इतर वस्तू पाठविल्या आहेत. त्याचप्रमाणे तिकडच्या खजीनदाराला हमालांची, मजुरी देण्यासाठी महसुलाधिकाऱ्याचा हुकूम पाठविला आहे. एकूण गोऱ्या लोकांनी मोहिमेचे काम पुष्कळ केले असे म्हटले पाहिजे. मी आपणाकडे दोनशे माणसे आणि अठरा घोडे पाठवित आहे. मला वाटते की, मडगाव आणि कुकळ्ळी ह्यांच्या रक्षणासाठी देशी लोकांचाच उपयोग आपणाला होऊ शकेल. त्याचप्रमाणे ते ज्या बाजूने येण्याची शक्यता आहे त्या बाजूची एकादी खिंडही आपणाला लढविता येईल. रासईच्या रक्षणाकडे दुर्लक्ष होता कामा नये. छावणीच्या रक्षणासाठी गोरे लोक पुरतील असे वाटते. आपण जेव्हा रासईला जाल तेव्हा आपल्या जागी आपण रोआ सोअरिश ह्यांची नेमणूक करावी व सर्व अधिकाऱ्यांना त्यांचे हुकूम पाळण्याची आज्ञा करावी. कारण, रोआ सोआरिश ह्यांचा दर्जा घोडदळाच्या कॅप्टनच्या दर्जाहून मोठा आहे. मी रासईला गेलो असतो, परंतु बार्देशला धोका असल्याने जाता येत नाही. दोन्ही ठिकाणी मदत पाठविता यावी म्हणून मी गोव्यालाच राहाणार आहे. शत्रू चालून येत असल्याची बातमी असल्यास समुद्रावरील माणसांना तावडतोब गोळा होण्याचा हुकूम करावा. तसेच माझ्या दुसऱ्या हुकुमाची वाट न बघता देशी सैनिकांना त्यांच्या ठाण्यावर पाठवून द्यावे.

देव आपले रक्षण करो".

पानेली, ९ डिसेंबर १७२६ ज्युआंव द साल्दान्य गामा

(200) LIVRO DAS CARTAS E ORDENS, PORTARINS, No. 16, FLS 48

व्हाइसरॉयने बार्देशच्या सेनापतीस मराठ्यांच्या गोव्यावरील संभाव्य स्वारीसंबंधाने पुढील पत्र पाठविले.

"बार्देशचे सेनापती ज्युआंव द मेलु द आताईदि ह्यांस---

मराठ्यांच्या सैन्याची माहिती देऊन पाठविलेले आपले दि. ८ चे पत्र पावले. त्या पत्रातील बातम्या मला मिळालेल्या बातम्याहून पुष्कळच वेगळ्या आहेत.

आपल्या प्रांतातील तैनाती तुकड्या जरी काढून घेण्यात आल्या असल्या तरी त्यांच्या जागी पाठविण्यात आलेल्या तुकड्यांनी एव्हांना त्यांची जागा घेतलीच असेल.

देव आपले रक्षण करो".

पानेली, ९ डिसेंबर १७२६

ता. क.––आताच बातमी आली आहे की, शत्रू साष्टीनजीक येऊन ठेपला आहे. तो ज्याअर्थी, आपल्या प्रांतात घुसण्याची शक्यता आहे, त्याअर्थी तटांच्या रक्षणासाठी इकडून तिकडे शंभर सैनिकांची एक तुकडी पाठवीत आहे वाडयाच्या रक्षणासाठी तिकडे पाठविण्यात आलेली युद्धनौका ते काम पार. पाडील असे वाटते. रंगरूटांना हुकूम द्यावा की, त्यांना खुणा दिसताच त्यांनी, जी ठिकाणे त्यांना सोईस्कर वाटतील तेथे ताबडतोब हजर व्हावे.

शत्रू प्रांतामध्ये घुसला की, तोफांचे दोन आवाज काढण्याचा हुकूम करावा, म्हणजे शत्रू आल्याचे मला कळेल. आणि शत्रूने माघार घेतल्यास तोफांचे तीन आवाज काढावे. त्या आवाजावरून शत्रूने माघार घेतली आहे, असे मी ताडीन.

वाडयाची रक्षणाची जबाबदारी नौकेवर सोपविली की, तिथली तुकडी आपणाला तटांच्या रक्षणासाठी हलविता येईल. शिवाय मी इथून आणखी सैन्य पाठवीत आहेच, पुन: रंगरूट फौजाही आहेत".

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(201) LIVRO DAS CARTAS E ORTARNS-PORTARIAS, No. 16, FLS 49

व्हाइसरॉय साष्टीच्या सेनापतीस लिहितो की, जांबावलीच्या सुभेदाराकडून त्याला मराठयांच्या सैन्याच्या हालचालीसंबंधाने पत्र आले आहे. साष्टीला गोऱ्या सैन्याची कुमक पाठविण्याचेही त्याने पत्रात कबूल केले आहे.

"साष्टीचे सेनापती आंतोनियुकाश्कु इ मेलु ह्यांस––

जांबावलीच्या सुभेदाराकडून जे पत्र आले आहे, त्या पत्राच्या भाषांतरावरून शत्रू कुठे चालला आहे त्याचा अंदाज आला. तो साष्टीवर चाल करून येत आहे. ह्याबद्दल शंका नाही. आपल्या प्रांताची संरक्षक फळी भरभक्कम आणि सुरक्षित व्हावी म्हणून मी आपणाकडे २०० गोऱ्या सैनिकांची एक तुकडी पाठवित आहे. शिवाय सहायक लेफ्टनंट आंतोनियु दुश सांतुश ह्यांनाही त्या सैन्याबरोबर पाठवीत आहे. ह्या हुषार अधिकाऱ्याकडे रासईच्या किल्ल्याच्या रक्षणाची कामगिरी सोपविण्यास हरकत नाही. शत्रू त्या प्रांतात शिरला की, तोफांचे दोन आवाज काढण्याचा हुकूम करावा.

मी सां लौरेंसु आणि सांतीयागु येथे हा आवाज ऐकण्यासाठी माणसे ठेवीत आहे. त्यांना तोफांचे हे दोन आवाज ऐकू आले की, ते मला ताबडतोब कळवितील. त्या आवाजांवरून मी शत्रू प्रांतात प्रवेश केला असल्याचा तर्क करीन. शत्रूने माघार घेतली तर तीन आवाज काढावे.

गोलंदाज तिकडे गेलेच आहेत, असे झुजे क्रिस्तोव्हांव हा म्हणतो ह्या सूचनांशिवाय मला आपणाला आणखी सूचना करायच्या नाहीत. तंबू, घोडे, तोफा वगैरे लढाईचे सामान वाहून नेणाऱ्या हमालांची मजूरी महाराजांच्या खात्यात जमा होईल.

देव आपले रक्षण करो".

पानेली, ९ डिसेंबर, १७२६ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(202) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16 FLS 49V

व्हाइसरॉय बार्देशच्या सेनापतीस पुनः लिहितो :—

"बार्देशचे सेनापती ज्युआंव द मेलु इ आताइदि, ह्यांस—

आपले दि. ११ चे पत्र मिळाले. त्या पत्रात आपण ज्या बातम्या पाठविल्या आहेत त्या साष्टीहून आलेल्या बातम्यांहून विसंगत आहेत. ह्या दोन्हीकडच्या बातम्यासंबंधी मला शंका येते. बाजीरावाच्या सैन्याचा वाटाड्या हा हिरबा नाईक असो वा नसो, पण एक मात्र खरे की, हे सैन्य कर्नाटकाकडे जात आहे. हे सैन्य सोंदेच्या राजाच्या व आमच्या प्रदेशापासून अगदी जवळ आहे. ह्या बाजूला सुमारे दोन हजार घोडेस्वार आणि काही पायदळ आहे. नागोबाची सासू आणि मेहुणा ह्या दोघांना हिरबा नाईक ह्यांची कोणतीच बातमी नाही. त्यावरून मला असे वाटते की, हिरबा नाईक हा अद्याप फोंडू सावंत भोसले ह्यांच्या छावणीतून बाहेर पडला नसावा. तरी आपण त्याचा तपास करावा.

उत्तरेकडील आरमार लवकरच निघत आहे. त्या आरमारावरील लष्करी तुकड्या काढून घेण्याचा मी हुकूम करीत आहे.

धोक्याचा संशय असला तर मी आपल्या मताप्रमाणे कोरड्या बंदरात आणखी नौका पाठवीन. फोंडू सावंत ह्यांच्या टोळीची बातमी काढणे आवश्यक आहे. विशेष बातम्यांची वाट पहात आहे.

देव आपले रक्षण करो".

पानेली, १२ डिसेंबर, १७२६

(203) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 51V

व्हाइसरॉय बार्देशच्या सेनापतीस वाडीकर भोसल्यासंबंधाने लिहितो.:—

"बार्देशचे सेनापती ज्युआंव द मेलु इ काश्त्रु, ह्यांस—

फोंडू सावंत ह्यांनी अनेक ठिकाणी धावपळ केली पाहिजे. आपण त्यांना इशारा दिला हे चांगले झाले. माझ्या मते आपली कुरापत काढण्याचा त्याचा विचार नाही.

आपण ज्या तीन हजार घोडेस्वारासंबंधाने लिहिता ते बाजीरावाच्या सैन्याच्या रोखाने जात आहेत. ते आमच्या हद्दीपासून चार दिवसांच्या अंतरावर आहेत.

नागोबाची बातमी मला काल कळली. तो तूर्त खाली उतरेल असे वाटत नाही. त्याच्या सासूपाशी ४०० घोडेस्वार आहेत. त्यांनी माघार घेतली की काय याचा तपास करण्याचा मी हुकूम करीत आहे.

आपण सैन्याची जमवाजमव करण्याच्या भानगडीत पडू नये. कारण नसताना माणसांची उगीचच दमछाट करणे बरे नव्हे. तथापि, तयारी असलेली बरी.

देव आपले रक्षण करो".

पानेली, १४ डिसेंबर, १७२६ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(204) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 52

व्हाइसरॉयच्या खालील पत्रावरून मराठ्यांच्या गोव्यावरील स्वारीचा धोका टळला असावा असे वाटते.

"साष्टीचे सेनापती आंतोनियु कारकु इ मेलु, ह्यांस—

जासुदाने आणलेली बातमी कळून आनंद झाला. जोपर्यंत अस्वस्थता निर्माण करणारी बातमी नाही तोपर्यंत आम्हाला निश्चित असण्यास हरकत नाही.

देव आपले रक्षण करो".

पानेली, २० डिसेंबर, १७२६ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(205) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 52

गोव्याचा व्हाइसरॉय हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थितीचा आढावा घेऊन पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो :—

महाराज :

मी राज्यसचिवांना दिनांक १६ जुलै आणि २३ ऑगस्ट रोजी ज्या नकला पाठविल्या त्या आपल्या पहाण्यांत आल्यावर मी डिचोलीच्या युद्धास का प्रवृत्त झालो ते आपल्या ध्यानी येईलच. आणि आमच्या देशाला आज जो इकडे मान आहे त्यावरून ह्या मोहिमेला आपण मान्यता द्याल अशी आशा आहे.

ह्या मोहिमेचा एक विशेष हा की, तिच्या खर्चासाठी जसा प्रजेवर कर लादण्यांत आलेला नाही तसाच खजिन्यावरही बोजा पडलेला नाही. फक्त दारुगोळा तेवढा खजिन्याने पुरविला एवढेच. ह्या मोहिमेसंबंधीची जी निवेदने आतापर्यंत बाहेर पडली आहेत. त्यांमध्ये मी आपणाला जें निवेदन पाठवीत आहे ते खरे आहे, अशी माझी समजूत आहे.

उत्तरेकडील प्रांतातही बंदोबस्त ठेवण्यात आला आहे. महाराजांच्या प्रदेशांत ज्या बाजूने शत्रू शिरत असे त्या बाजूने आमचे सैन्य शत्रू प्रदेशात शिरले. शाहू राजे हा त्या भागातील बलाढय राजा आहे. त्याने आपले सैन्य मागे घेण्याचा हुकूम केला, एक नजराणा पाठविला व युद्ध कैद्यांची अदलाबदल करण्याचा आपल्या सेनाधिकाऱ्यांना हुकूम केला. त्यांच्याकडून नजराणा येण्याची ही पहिली खेप आहे. शाहू राजांनी आमची कुरापत न काढण्याचा आपल्या सेनाधिकाऱ्यांना हुकूम दिला आहे. अशा रीतीने तो प्रांत आता शांत असून आमच्या धोरणाची चांगली फळें तो उपभोगीत आहे.

शाहूराजे ह्यांनी आपले दोन सेना विभाग कर्नाटकाचा राजा व सोंदेचा राजा ह्या दोघांवर पाठविण्याचा आपल्या सेनाधिकाऱ्यांना हुकूम केला आहे. त्यांचे असेंच आणखी सैन्य दक्षिणेकडील काही राजांवरही चालून जाणार आहे. ह्या सैन्याची हालचाल आमच्या हद्दीच्या जवळपास होत होती, म्हणून मी थोडी खबरदारी घेतली. पण ही खबरदारी मी उगीचच घेतली असे मला नंतर वाटू लागले. कारण, आमची तयारी पाहून मराठा सरदरांनी मला पत्रें पाठवून निषेध व्यक्त केला व आपण आमचे मित्र असल्याचें आम्हाला कळविले. ते आमच्या प्रदेशाला कोणताच उपद्रव न देता निघून गेले.

ते सोंदेच्या राजाच्या दरबारांत शिरले व त्यांनी त्याच्याकडून जबरदस्त खंडणी वसूल केली. ते कर्नाटकांत गेले नाहीत.

तीन मराठे राजांशी संबंध असलेल्या आंग्र्यांनी फोंडू सावंत ह्यांच्यावर आक्रमण करून त्यांचे दोन किल्ले घेतले. आंग्र्यांचा शेजार हा तापदायक असा विचार करून मी सावंतांना मदत करण्याचा निर्णय घेतला. आमच्या मदतीचा परिणाम दिसू लागला आहे.

फोंडू सावंत भोसले व त्यांचा मुलगा ह्या दोघांचा अद्याप समझौता झालेला नाही. त्या दोघांनीही माझ्याकडे मागणी केली आहे की डिचोलीचा किल्ला मी माझ्याकडे ठेवावा. त्या किल्ल्यांत मी पोर्तुगिज सैन्यही ठेवावे अशी त्यांची इच्छा आहे. त्या दोघांमध्ये सांप्रत जो तंटा चालू आहे तो मिटेपर्यंत मी किल्ला माझ्या हाती ठेवावा अशी त्यांची मागणी आहे. मी त्या दोघांमध्ये मध्यस्थी करावी अशीही त्यांची इच्छा आहे. परंतु ही जबाबदारी पत्करण्याची माझी इच्छा नाही. कारण, ते दोघे नंतर माझ्याकडे किल्ला खाली करण्याची मागणी करतील, आणि मी किल्ला खाली करण्यास नकार दिल्यास माझ्याशी युद्ध करण्यास कमी करणार नाहीत.

एक गोष्ट मात्र खरी की, हा किल्ला जर आमच्या हाती आला तर अजिंक्य होईल. पण त्याच बरोबर ही गोष्ट खरी की, किल्ल्याला जर त्यांनी वेढा घातला तर त्याला रसद पुरविणे अशक्य होईल. अशा परिस्थितींत मी काय करावे, तत्संबंधी महाराजांनी मला सल्ला द्यावा.

फोंडू सावंताचा ह्या राज्याशीं जो शांततेचा करार झाला आहे, त्या करारातील कलमें मी महाराजांकडे ह्या पत्रासमावेत पाठवीत आहे. तसेंच डिचोलीच्या मोहिमेत ज्या अधिकाऱ्यांनी भाग घेतला त्यांचीही यादी जात आहे. महाराजांना माझी विनंती आहे की, त्यांनी त्या अधिकाऱ्यांचे आभार मानून त्याना एक पत्र लिहावे. महाराजांनी जर हे पत्र पाठविले तर इतरांना प्रोत्साहन मिळेल. आज आशिया खंडांत पोर्तुगालचा दरारा निर्माण झाला आहे. बहुतेक सर्व राजांनी आमच्याकडे आपले दूत पाठविले आहेत.

महाराणींसाठी चार नजराणे पाठवित आहे. कित्येक वर्षांपासून त्यांना एकही नजराणा पाठविला नव्हता. माझ्या बलाढ्य आणि सर्वश्रेष्ठ स्वामींना देव उदंड आयुष्य देऊन त्यांना सुखी करो."

गोवा, १४ जानेवारी, १७२७.

(2) LIVRO DAS MONCOES, No. 93, FLS 55



व्ही ५५५८–१७अ

व्हाइसरॉय कर्नाटकातील पोर्तुगीज-कॅप्टन-मोरला लिहितो की, कर्नाटकाच्या राजाने मराठ्यांशीं लढण्यासाठी दारूगोळ्याची मागणी केल्यास तो त्याला योग्य त्या किंमतीला विकावा.

"कर्नाटकांतील आणि दक्षिण किनाऱ्यावरील कॅप्टन मोर गोंसालु-द "सिल्व्ह फेररांव ह्यांस :—

कापितांव मोर गोंसालु द सिल्व्ह फेररांव ह्यांचे दिनांक २० फेब्रुवारीचे पत्र आज दिनांक ८ मार्चला मिळाले. त्यांनी पुष्कळ दिवसांपासून इकडे येणाऱ्या जहाजांवर पाठविले नसल्याचे माझ्या ध्यानी आल्यावाचून राहिले नाही. त्याचप्रमाणे ज्यांच्या जागी त्यांचो नेमणूक झाली आहे, त्या जखारदारालाही त्यांनी मी त्यांना लिहिलेली पत्रे पोचती केली नाहीत असे कळले. म्हणून मी त्यांना पाठवीत असलेली पत्रे आता उघडी पाठवित आहे. म्हणजे ती त्यांना नजरेखालून घालून वखारीच्या चिटणीसाला पोहोचती करता येतील. कापितांव-मोर ह्यांनी आपल्या पत्रातून मला जो तांदुळाचा भाव कळविला आहे, तो तांदुळ माझ्या प्रजेला आवडत नाही.

कर्नाटकाच्या राजाने अथवा राजाच्या प्रतिनिधीने मराठ्यांशीं लढण्यासाठी जर दारुगोळ्याची मागणी केली, तर त्याला त्या किंमतीला विकावा."

गोवा ९ मार्च १७२७. ज्यूआंव द साल्दान्य द गामा.

(6) LIVRO REIS VIZINHOS, No. 7, FLS 44

व्हॉइसरॉय पोर्तुगालला राज्यसचिवास लिहितो की, फोंडू सावंत भोसले हे शिरजोर झाले असून पोर्तुगिजांशीं त्यांनी जो मांडलिकत्वाचा करार केला होता तो धाब्यावर बसविण्यापर्यंत त्यांची मजल गेली आहे.

"राज्यसचिव ह्यांस :—

..........................................................................................

..........................................................................................
आमचे शेजारी फोंडू सावंत ह्यांनी आमच्याशीं युद्ध जाहीर केले आहे. परंतु अद्याप तरी मी ह्या राज्यांत शांत जीवन जगत आहे. माझ्या पूर्वीच्या व्हॉइसरॉयचा मृत्यू, आदल्या सरकारातील मतभेद आणि थकलेल्या खंडणीची आमच्याकडून न झालेली मागणी, ह्यामुळे फोंडू सावंत भोसले हे शिरजोर झाले व त्यांनी आपले आरमार वाढवून चीनच्या नौकेवर व दमणच्या एका पालावर हल्ला करण्याचे धाडस केले.

आमच्या राज्यातून जे निग्रो त्यांच्या राज्यात पळून गेले होते त्यांना त्यांनी इंग्रजांना विकले. त्यांनी तसे करायला नको होते. कारण त्यांच्याशी आमचा जो शांततेचा करार झाला आहे, त्या कराराप्रमाणे त्यांनी त्यांच्या राज्यांत इकडून पळून गेलेल्या गुलामाना आमच्या हवाली करणे आवश्यक होते.

शांततेच्या कराराशिवाय फोंडू सावंत भोसले ह्यांनी आमच्याशीं मांडलिकत्वाचाही करार केला आहे. पण हे दोन्ही करार धाब्यावर बसवून त्यांनी आमच्या गुलामांना इंग्रजांना विकले. काही किरिस्तावांना त्यांनी कैद केल्याचेही कळते. तसेच आमच्या राज्याचा प्रजाजन असलेल्या एका मुसलमानाची नौका त्यांनी घेतली असल्याचीही बातमी आहे. अशा रीतीने अलीकडे त्यांनी ह्या राज्याशी उघड उघड शत्रुत्वच आरंभिले आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. परंतु त्यांचे सामर्थ आमच्या सामर्थ्याहून कमी असल्याने आमच्या सामर्थ्याची त्यांना जाणीव होते. त्यांच्याशी युद्ध चालू ठेवण्याचा माझा विचार आहे. कारण हा शत्रू आंग्रयाइतका धोकेबाज नसल्याने त्याचा पाडाव करणे ही कठीण गोष्ट नाही. ह्या बाबतींत फोंडू सावंत भोसले ह्यांच्या मुलाचीही आम्हाला मदत होणार आहे. त्या दोघां बापलेकांचे बऱ्याच दिवसांपासून बिनसले असून, त्याचा उपयोग आम्हाला फोंडू सावंत भोसले ह्यांना वठणीवर आणण्यासाठी होणार आहे "

गोवा, ३० एप्रिल १७२७ ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(8) LIVRO DAS MONCOES, No. 93, FLS 1400

व्हॉयसरॉय पुढील पत्रांत साष्टीच्या सेनापतीस काही सूचना करतो :—

साष्टीचे सेनापती मिगेल द मेल द गामा, ह्यांस,—

आपण कापितांव मानुएल रोड्रिग्ज ह्यांना काही माणसे घेऊन वेरडेच्या कमानीकडे जाण्याचा जो हुकूम केलात तो मला मान्य आहे. त्याप्रमाणे कापितांव मानुएल रोड्रिग्ज ह्यांना जांबावलीच्या सुभेदारांशी सल्लामसलत करण्यास जातां येईल. ह्या कामासंबंधाने आपण त्यांना ह्यापूर्वीच लिहिले आहे. कुकळीच्या कापितांवला आपण जे पत्र लिहिलेत त्याचा उपयोग मी करीत आहे. कारा-मूजला माझ्या हुकूमावरून अटक करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे त्यांनी तुकू नाईक ह्यालाही अटक करण्याचा हुकूम केला आहे. आपण त्यांना सूचना करावी की, प्रांताच्या दक्षिणेकडील कामकाज आपणाशी झाले पाहिजे.

कॅ. मानुएल रोड्रिग्ज ह्यांना निरोप धाडावा की, इंक्विझिझनच्या हुकमाशिवाय तुरूंगांत असलेल्या ब्राह्मणाला बेड्या घालू नयेत, परंतु धार्मिक न्यायालयाकडून आवश्यक ते हुकूम येईपर्यंत प्रस्तुत ब्राह्मणाला तुरूंगात ठेवावे.

कॅ. दों. फ्रान्सिश्कु द नोरोन्य हे वेरडेच्या कमानीत आले की, कॅ. मानुएल रोइझ ह्यांनी तिथे काही माणसे ठेवून निघून जावे. त्याचप्रमाणे त्यांनी कॅ. दों. फ्रान्सिश्कु शाव्हिएर ह्यांना मुक्त करून त्यांच्या ठाण्यावर न्यावे.

कैद्यांची मुक्तता आणि हिंदु मंदिरांचा विध्वंस ह्या बाबतीत आपण सुभेदाराशी काहीच बोलू नये. कारण धर्म समीक्षण संस्थेचा निर्णय त्याच्याविरुद्ध निघण्याची शक्यता आहे, व आपण त्यांना विनाकारण आश्वासन देऊन बसाल. आपण त्यांना एवढेच सांगावे की, ती गोष्ट माझ्या कानी घालण्यात आली आहे, व मी ती न्यायालयाकडे सोपविणार आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, ३० जुलै, १७२७ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(24) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 100

व्हाइसरॉय साष्टीच्या सेनापतीस पुढील पत्र लिहितो—

"साष्टीचे सेनापती मिगेल द मेलु द सांपायु ह्यास—

आपले चालू माहीचे दि. २९ चे पत्र मिळाले, व तालुआदला ४०० माणसे आल्याची बातमी त्या पत्रावरून कळली. माणसांच्या ह्या संख्येवर माझा विश्वास बसत नाही. पण आपण ज्याअर्थी कळविता, त्याअर्थी, ती मी खरी मानतो. आज रात्री सार्जंटमोर हे काही कंपन्यांसह निघत आहेत. ते तिकडे जाऊन पोहोचले की, आपण त्यांच्याकडे मोहिमेचे काम सोपवावे.

मला वाटते सुभेदाराला ज्या ठिकाणी सैन्य आहे ते सैन्य न काढून घेण्याबद्दल सांगितलेले बरे. त्याने तसे करण्यास नकार दिला, तर सार्जंट मोर जे हुकम घेऊन जात आहेत ते त्यांनी त्याला कळवावे.

ब्राह्मणाची मुक्तता झाली आहे. जरूर पडली तर आपण मडगावच्या मोहिमेवर गेलेल्या माणसांची आठवण करावी. कारण, त्यांना घाईघाईने माघार घ्यावयास लावण्यास एक मनुष्य बस् आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, ३० जुलै, १७२७. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(25) LIVRO DAS CARTAS E ORDENS, PORTARIAS, No. 16, FLS 101

व्हाइसरॉय साष्टीच्या सेनापतीस पुढील पत्रात आणखी काही सूचना करतो--

"साष्टीचे सेनापती मिगेल द मेलु द सांपायु ह्यांस--

आपल्या एक ऑगस्टच्या पत्रावरून माझ असे मत झालेले आहे की, सुभेदाराला जे काम देण्याचे कबूल केले होते, ते मागण्याचा त्याला अधिकार आहे. तरी त्याला जे देण्याचे कबूल करण्यात आलेले होते ते देऊन टाकलेले बरे असे माझे मत आहे. मात्र त्याने आणखी काही मागितले तर त्याला दाद देऊ नये.

ह्या राज्यासंबंधीची सुभेदाराची जी कर्तव्ये आहेत त्याची त्याला आपण आठवण करून दिली असल्याचे आपण मला जे कळविलेत त्याकडे माझे लक्ष वेधले आहे. आपण त्याला प्रांतामध्ये सार्जंट मोरचे आगमन झाल्याचे कळविले होते. त्यावेळी जर त्याला आपण निघून जा किंवा युद्धास तयार हो असा आणीबाणीचा खलिता सादर केला असता, तर तो निघून गेला असता असे मला वाटते.

माझ्या पहिल्या पत्रात मी आपणाला शत्रू ज्या ठिकाणी आहे तेथे चार कंपन्या आपण तिकडे हलविल्या की काय ते कळवावे. सुभेदाराने जर सैन्य मागे घेतले नाही, तर सार्जंट मोरकडे मी जो हुकूम पाठविला आहे तो आपण अमलात आणावा. आणि जर सुभेदार आपल्या सैन्यासह निघून गेला तर आपण सार्जंट मोरला त्याने नेलेल्या कंपन्यांसह माघार घेण्याचा हुकूम करावा.

सुभेदाराला आपण एक खरमरीत पत्र लिहावे, पण पत्राची आवश्यकता असली, तरच लिहावे. कारण ह्या जातीचे लोक धमकी दिल्याशिवाय किंवा शासन केल्याशिवाय वठणीवर येत नाहीत.

देव आपले रक्षण करो."

पानेली, २ ऑगष्ट, १७२७

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(26) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 16, FLS 101V

व्हाइसरॉय पाद्री आगोस्तिन्यु माशादु ह्या नावाच्या कर्नाटकाच्या राजाच्या दरबारातील पोर्तुगीज वकिलास लिहितो की, शाहू राजे हे मोगलांशी गुंतले असल्याने त्यांच्यापासून सांप्रत आपण मोकळे आहोत.

"पाद्री आगोस्तिन्यु माशादु ह्यांस––

आपले दि. ५ ऑगस्टचे पत्र मिळाले. सैनिकांनी हिंदु मंदिरामध्ये शिरून जो धुमाकूळ घातला त्याबद्दल खेद होतो. पण ज्याअर्थी, त्या गोष्टीला आता इलाज नाही, त्याअर्थी, गुन्हेगारांना शिक्षा करूनच मी कर्नाटकाच्या राजाला त्या संबंधीचा जाब देईन. आपण कर्नाटकाच्या राजाला माझ्यावतीने आश्वासन द्यावे की, अटक झालेला सैनिक पळून गेला असून तो वखारीमध्ये दडून आहे. मी वखारदाराला त्या सैनिकास अटक करण्याचा हुकूम केला आहे. आपण मंगलोरच्या गव्हर्नरला विनंती करावी की, त्या सैनिकाला शिक्षा करण्याचा हुकूम होईपर्यंत त्याने त्याला एकाद्या किल्ल्यामध्ये नेऊन ठेवावे. हाच निरोप आपण वखारदारालाही करावा म्हणजे तो ही गोष्ट न चुकता करील.

आपण राजाचे नजराणे स्वीकारल्याशिवाय राहाणार नाही ह्याची मला खात्री आहे. कारण, त्या दरबारातील आपले अस्तित्व अत्यंत आवश्यक आहे असे माझे मत आहे.

ज्यावेळी म्हैसूरचा राजा कर्नाटकाच्या राजावर चाल करून येईल, तेव्हा आपण कर्नाटकाच्या राजाला माझ्यावतीने गोलंदाज पुरवावे. आणि त्याची मागणी येताच मी त्याला आणखीही तज्ञ पुरवीन. तसे जर झाल तर त्याला त्याच्या ठाण्यांचे रक्षण करणे शक्य होईल. त्याच्या सर्व शत्रूंवर त्याला विजय मिळावा अशी मी मनात इच्छा बाळगीत आहे असे त्याला कळवावे.

शाहूराजे ह्यांच्यापासून मला तूर्त तरी धोका नाही असे वाटते. कारण ते सांप्रत मोगलांशी लढण्यात गुंतले आहेत. आपणाला मला तूर्त एवढेच सांगायचे आहे आपण आपले वजन खर्च कराल अशी आशा बाळगतो.

एक फ्रिगेट तिकडे निघण्यासाठी बंदरात उभी आहे. आपल्या सल्ल्याप्रमाणे ती तिकडे निघेल.

देव आपले रक्षण करो."

गोवा, ९ सप्टेंबर १७२७. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(27) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 7, FLS 53

व्हाइसरॉय वसईच्या सेनापतीस लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, शाहूराजे ह्यांनी आपणाकडे एक दूत आणि नजराणा पाठविला आहे.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

गलबतावर पाठविलेली आपली १४ तारखेपर्यंतची सर्व पत्रे मिळाली. त्या पत्रात आपण किलिचखान त्याच्या सैन्यासह खाली उतरत असल्याची जी बातमी दिली आहे, ती निःसंशय आनंदाची आहे.

आपल्या राज्यकारभारावर मी फार खूष आहे. आपण कळकळीने आणि तळमळीने राज्य कारभार हाकता आहात.

इकडे शाहूराजे ह्यांचा एक दूत आला असून त्याने माझ्यासाठी एक नजराणा आणला आहे. त्याने रामचंद्रपंत आणि शाहूराजे ह्यांचे सर्व सरदार ह्यांच्यासाठी दोन फर्माने आणली आहेत. शाहूराजे ह्यांनी रामचंद्रपंत व आपले इतर सरदार ह्यांना अशी ताकीद दिली आहे की, त्यांनी पोर्तुगिजांशी मैत्री ठेवावी व त्यांना त्यांच्या शत्रूना शासन करण्यास मदत करावी".

पणजी, २४ फेब्रुवारी १७२८. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(35) BACAIM, No. 5, FLS 16(V)

पोर्तुगालचा राजा गोव्याच्या व्हाइसरॉयला शाबासकी देतो की, त्याने कुडाळचे सरदेसाई फोंडू सावंत ह्यांच्याशी युद्ध सुरू केले ते चांगले केले. परंतु डिचोलीचा किल्ला फोंडू सावंत ह्यांच्या मुलाच्या ताब्यात न देता तो पाडून टाकावा व युद्ध दीर्घकाल चालू न ठेवता त्याचा निकाल शक्य तितक्या लवकर लावावा अशी सूचना त्याने त्या पत्रात केली आहे.

"ईश कृपेने पोर्तुगाल आणि आल्गार्व्हचा राजा, सागरोत्तर आणि आफ्रिकेतील प्रदेशाचा आणि गिनीचा स्वामी दों. ज्युआंव मी हिंदुस्थानच्या राज्याचे कॅप्टन जनरल ज्युआंव द सल्दान्य द गामा ह्यांना कळवित आहे की, त्यांचे दि. १४ जानेवारी १७२७ रोजी लिहिलेले पत्र मिळाले, व त्या पत्रात त्यांनी मला जो अहवाल सादर केला आहे, तो माझ्या अवलोकनात आला. आपण त्या पत्रात डिचोलीच्या युद्धाचा आणि यशाचा वृत्तांत दिला असून राज्यसचिवांना दि. १७ जुलै आणि १३ ऑगस्ट रोजी लिहिलेल्या पत्रांच्या नकलाही पाठविल्या आहेत. चालू माहीच्या दि. ७ ला माझ्या सागरोत्तर सल्लागार मंडळाशी सल्ला मसलत करून मी जो निर्णय घेतला तो आपणाला कळवावा असे मला वाटल्याने मी तो आपणाला प्रस्तुत पत्राचे द्वारा कळवीत आहे.

आपण फोंडू सावंत ह्यांच्याशी युद्ध केलेत ते चांगले केलेत, पण डिचोलीचा किल्ला फोंडू सावंत ह्यांच्या मुलाचे ताब्यात देण्याऐवजी तो जर पाडून

टाकण्यात आला असता तर सोयीचे झाले असते. कारण, फोंडू सावंत ह्यांचा मुलगा पुढे मागे आपल्या बापाप्रमाणे ह्या राज्याचा शत्रू होणार आहे ह्यांत शंका नाही. आपण एक गोष्ट नेहमी ध्यानात ठेवली पाहिजे ती ही की, अशा बंडवाल्यांशी युद्ध करताना पहिल्या प्रथम त्याचे नाविक सामर्थ्य आणि चढाईचे सामर्थ्य नष्ट केले पाहिजे. त्यांच्या ठाण्यांना दीर्घकाल वेढा देऊन बसण्याच्या भानगडीत कधीच पडू नये. कारण आमच्या सैन्याला हे युद्ध परवडण्यासारखे नाही, एकादे वेळी जर अपयश आले तर त्याची दुरुस्ती करणे फार कठीण असते. आता कराराविषयी बोलायचे झाल्यास मी आपणाला आज्ञा करतो की, त्याने जर कराराच्या कलमांचे पालन केले तर आपण त्या कलमांचे पालन करावे. कारण, कराराचे आणि वचनांचे पालन न करणे हे आमच्या धर्माच्या विरुद्ध आहे. जर वस्तुस्थिती ह्या गोष्टीच्या विरुद्ध असेल, तर किल्ला घेऊन टीकेस पात्र होऊ नये.

प्रस्तुत पत्र महाराजांच्या सागरोत्तर सल्लागार मंडळाचे सदस्य आंतोनियु रोइझ द कोश्त व झुजे द काव्हाल्यु इ आब्रेव ह्या दोघांनी लिहिण्याची आज्ञा केल्यावरुन बेर्नार्द फेलिक्स द सिल्व्ह ह्याने ते दिनांक ८ एप्रिल १७२८ रोजी पश्चिम लिस्बन येथे लिहिले."

आंतोनियु रोइझ द कोश्त          झुजे द काव्हाल्यु आब्रेव.

## (39) LIVRO DAS MONGOES, No. 95, FLS 116

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो की, मोगल बादशहा व शाहूराजे ह्या दोघांमध्ये संघर्ष होऊन मराठ्यांच्या राज्याची त्या दोघांमध्ये विभागणी व्हावी असे ठरले आहे.

"महाराज—

..........................................................................................................

मोगल फौजांनी मराठ्यांवर अनेक मोहिमा केल्यावर शेवटी त्या दोन्ही राजांनी तहाला मान्यता दिली असून त्या तहान्वये मराठ्यांच्या राज्याची मोगल बादशहा व शाहूराजे ह्या दोघांमध्ये विभागणी व्हायची आहे. परंतु माझ्यामते हा तह समाधानकारक नाही.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव दीर्घयुरारोग्य देऊन त्याचे रक्षण करो."

गोवा, ३० एप्रिल १७२८.

## (40) LIVRO DAS MONCOES, No. 95, FLS 569

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला कळवितो की, मराठे यापुढे पोर्तुगीज प्रदेशात आक्रमण करणार नाहीत, असे आपणाला शाहूराजे ह्यांच्या वकिलाकडून आश्वासन मिळाले आहे."

"उत्तरेकडील सेनापती दों आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

आपले दिनांक ३० एप्रिलचे पत्र मिळाले. आपण लष्करी ठाण्यांना भेट देऊन निश्चित झाला असाल व आपले आरोग्य उत्तम असेल असे गृहीत धरतो. माझी अशी समजूत आहे की, मराठे आपणाला यंदा उपद्रव देणार नाहीत. कारण, शाहूराजे ह्यांच्याकडून मला तसे आश्वासन मिळाले असून, आमच्या दरबारात असलेल्या त्यांच्या वकिलाने मला छातीठोकपणे सांगितले आहे की, तसे काही घडले तर आम्ही त्याचे डोके उडवावे.

त्यांनी कोल राजाकडे ज्या खंडीभर चण्यांची मागणी केली आहे, त्या मागणीला आपण उत्तर पाठवावे, की, त्या दाण्याचे पैसे त्या राजाला चुकते करण्यात यावे. ते जर करण्याला आले तर आपण आणि आपले सेनाधिकारी ज्याअर्थी म्हणता की त्या ठाण्याला भीती नाही, त्याअर्थी हे ठाणे सुरक्षित आहे असे मला वाटते. तीच गोष्ट साष्टी बेटाचीही आहे.

असेरी हा एक नैसर्गिक किल्ला आहे. परंतु ह्या किल्ल्याच्या किल्लेदाराने तिकडे जाणे हे बरे. त्याच्याविषयी माझा जो ग्रह झाला आहे त्यावरून मी निश्चिंत आहे.

मराठ्यांनी जर आमच्या प्रदेशांत आक्रमण केले, तर आपण कल्याणच्या प्रदेशात शिरून नासधूस करावी. कारण, त्यांना जशास तसे ह्या न्यायाने उत्तर दिले तरच ते शुद्धीवर येतात. हे काळे लोक धाकधपटशाशिवाय वठणीवर येत नाहीत, असा माझा अनुभव आहे.

सिद्दीशी तडजोड करू नये. त्याची जितकी हानी करता येईल तितकी करावी. कारण आम्हाला जितका अधिक त्रास सोसावा लागेल तितकी त्याची मग्रुरी अधिक वाढेल. आपण त्याला धमकी द्यावी, की, तो मोगल बादशहाचा मांडलिक आणि सरदार असल्याने त्याने जर युद्धास सुरुवात केली तर त्याच्या अमलाखालील सुरत, खंबायत, गोवा वगैरे प्रदेशांतील बंदरांत असलेली जहाजे पकडली जातील. मग त्या जहाजांपाशी पोर्तुगीज परवाने असोत वा नसोत कारण, एकदा युद्ध सुरू झाले की, त्या परवान्यांचा काही उपयोग नसतो.

रुस्तुमच्या मुलाला माझ्यावतीने सर्व प्रकारचे संरक्षण देऊन त्याची चांगली बडदास्त ठेवावी. त्याने जे पत्र लिहिले आहे ते आपणाला उद्देशून आहे.

त्याचे भाषांतर होणार आहे. आपण त्याला आश्वासन द्यावे, की, त्याने जो अर्ज केला आहे त्याचे उत्तर मी त्याला देणार आहे.

इकडून तोफा घेऊन गेलेली पाली तिकडे पोहोचलीच असतील. आपण इतके दिवस ज्या काळजीत होता त्या काळजीतून आपली मुक्तता झाली की नाही ते मला कळवावे.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, १० मे १७२८. ज्युआंव द साल्दान्य गामा

(41) BASAIN, No. 5. FLS 51

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, दमणमध्ये मराठे शिरले आहेत--

" उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस--

आपली चालू माहीच्या ७ पर्यंतची चारही पत्रें मिळाली. त्या पत्रांची उत्तरें पाठवितांना मराठ्यांनी दमणमध्यें केलेले आक्रमण आणि त्या आक्रमणामुळे त्या प्रांतामध्ये पसरलेले चिंतेचे वातावरण ह्याची मला वारंवार आठवण होत आहे. पण तरीही काळजी करू नये. कारण हे आक्रमण सरदार पिलाजी जाधव ह्यांनी बाजीराव व शाहूराजे ह्या दोघांच्या हुकूमाविरूद्ध केले आहे. मी ह्या बाबतीत शाहूराजे व बाजीराव ह्या दोघांना पत्रें पाठवून माझा निर्णय त्यांना कळविला आहे. ही पत्रें शेवटच्या गलबताने रवाना झाली आहेत. महसूल खात्याने चार गलबतें बांधण्याचा जो ठराव केला आहे त्या ठरावाची एक प्रत मी आपणाकडे ह्या पत्रासमवेत पाठवीत आहे. दुसरी गोष्ट अशी की ज्या मांशुआ (होडया) दुरुस्त करण्यासारख्या आहेत त्या दुरुस्त केल्या जाणार आहेत.

आंग्र्यांनी युद्धास सुरूवात केली की, तशी भीति आहे. माझ्या पत्राप्रमाणे ........................................... बंदरांत ह्या दरबाराचें लष्कर आणि आपले लष्कर ................................ वर्षाप्रमाणे असेल.

प्रांताच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने पाद्री कारभाऱ्याने आपले हुकूम मानले पाहिजेत. कारण, सेनापती लुईज द मेलु द सांपायु ह्यांना जे अधिकार होते, तेच अधिकार आपणालाहि आहेत. ह्या संबंधी पाद्री कारभारी ह्यांना मी स्वत:च पत्र लिहून आपले हुकूम पाळण्यास त्यांना कळवीत आहे.

कल्याणविषयी आपण जो निर्णय घेतला आहे तो मला मान्य आहे. आपण जी उपाययोजना करणार आहात ती चांगली करावी.

मराठे पावसाळ्यांत खाली तळ देऊन राहाणार असल्याची जी हूल उठली आहे तिच्यावर माझा विश्वास बसत नाही. आणि असे जर घडले, तर मराठ्यांची जी योजना आहे ती नष्ट करण्याचे बुद्धिसामर्थ्य आणि अनुभव आपल्या अंगी आहेच.

किलिचखान आणि शाहू राजे ह्या दोघांचा तह झाल्याची बातमी येथें आली आहे. आपण ठाण्यावरील अधिकाऱ्यांच्या नेमणूकी संबंधाने खास आज्ञापत्रक काढण्याची माझ्याकडे मागणी केली आहे. परंतु माझ्यामते असे आज्ञापत्रक काढण्याची आवश्यकता नाही. ह्या नेमणुका आपणालाही करता येतील. भिवंडी आणि कोजे येथील सेनाधिकाऱ्यांनी आपणाला जी पत्रें पाठविली त्यांच्या नकला माझ्या वाचण्यात आल्या. आपण त्यांना जी उत्तरे पाठविली ती साधार असल्याकारणे, मला ती मान्य आहेत.

आपण म्हणता की, चौल आणि दीव येथें उन्हाळ्याच्या सुरूवातीला माणसें नव्हती. मी तिकडे माणसें धाडण्याची व्यवस्था करीत आहे. परंतु इकडून तिकडे पलटणी पाठविणे हे एक कठीण काम आहे. कारण तिकडे फारच थोड पोर्तुगिज सैनिक आहेत, आणि देशी सैनिकांना तिकडे मोकळे सोडणे उपयोगाचे नाही.

पिलाजी जाधव ह्यांना दमणमध्ये प्रतिकार करण्यासाठी ३०० सैनिक उभारण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे तो मला मान्य आहे. असेरीच्या कॅप्टनच्या घराची आणि इगर्जीची दुरूस्ती वगैरे गोष्टींना मंजुरी मिळाली आहे.

देव आपले रक्षण करो."

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(42) BASAIN, No. 5, FLS 22

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस सल्ला देतो की, किलिचखानाने मराठ्यांवर हल्ला करीपर्यंत त्याने मराठ्यांशी गोडीगुलाबीने वागावे.

" उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनीयु कारकु इ मेलु ह्यांस—

किलिचखानाने मराठ्यांविरूद्ध आपली मोहीम सुरू करीपर्यंत आपण आपल्या राज्याच्या शेजारी असलेल्या मराठ्यांशी गोडीगुलाबीने आणि खोट्या मैत्रीने वागावे. आणि ज्या वेळी किलिचखान त्यांच्यावर हल्ला करील

तेव्हा आपल्या ७ जूनच्या पत्रांत आपण मला आपली जी योजना कळविली आहे ती अंमलांत आणण्यास हरकत नाही. ती योजना अमलांत आली, तर किलिच-खानालाही वाटेल की, आम्ही त्याच्या मदतीला गेलो आहोत. ह्या बाबतीत मला आपणास जी मदत करता येईल ती मी करीनच. तथापि, माझा आपणाला असा सल्ला आहे की, आपल्या ह्या मोहिमेचे नेतृत्व आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्याकडे देऊन त्यांच्या दिमतीला आंद्रे रिबैस आणि त्यांनी निवडलेल्या अधिकाऱ्यांना द्यावे. ह्या अधिकाऱ्यांशिवाय इतराना नेमू नये. कारण, इतर अधिकाऱ्यांची नेमणूक केली तर गोंधळ माजण्याची आणि वैयक्तिक तेढ निर्माण होण्याची शक्यता आहे.

कल्याणच्या सुभेदाराने आपणाला वरून फर्माने आणण्याचें जे आश्वासन दिले आहे, ते आश्वासन पूर्ण करण्याचा लकडा त्याच्यामागे लावावा. त्याच-प्रमाणे गोद्रेतस ( ?) गडावर त्याने जी शिबंदी ठेवली आहे तीही मागे घेण्यास त्याला प्रवृत करावे.

दमणच्या प्रश्नावर बलसाडवर स्वारी करण्यासंबंधी आपण जे दुसरें भाषण केलेत, त्यांत आपण आपली वैयक्तिक मतें व्यक्त केली आहेत ह्यांत शंका नाही. परंतु आपले हे भाषण मला पसंत आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, १९ जून १७२८. ज्युआंव द साल्दान्य द गामा

(44) BASAIN, No. 5, GLS 25V

वसईच्या गव्हर्नरने कल्याणची लूटालुट केल्याबद्दल व्हॉइसरॉयने त्याचे अभिनंदन केले--

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस--

सांकेतिक भाषेत लिहिलेले पत्र देऊन चौलला पाठविलेली फत्तेमारी तिकडे पोचून ईशकृपेने तें पत्र आपल्या हाती पडलेच असेल. ते पत्र रवाना करण्यास आणि कल्याणच्या लुटालूटीची आनंदाची बातमी देणारे आपले पत्र घेऊन येणारी फत्तेमारी इकडे पोहोचण्यास एकच गाठ पडली. कल्याणच्या लुटालूटीची बातमी वाचून मला जो आनंद झाला तो खरोखर अवर्णनीय आहे. ह्या यशाबद्दल मी आपले हार्दिक अभिनंदन करतो. ह्या घटनेची मी ह्या राज्यांत आल्यापासून वाट पाहात होतो. ह्या विजयावर त्या प्रांताचें स्वास्थ्य अवलंबून आहे. आमची दुसरी हालचाल होईस्तोंवार किलिचखानला आता मोठी विश्रांती मिळणार आहे. ह्या मोहिमेत भाग घेणाऱ्या अधिकाऱ्यांचें माझ्या वतीने नुसतेच

अभिनंदन करू नये, तर त्यांना दृढलिंगनेही द्यावी. त्यांना आश्वासन द्यावे की, इथून जे पहिले जहाज तिकडे जाणार आहे त्याच्यावर माझ्या आनंदाचा विस्तृत खुलासा एका वेगळ्या वैशिष्ट्यासह पाठवीत आहे.

सिद्दीशी तह करावा, परंतु ह्या तहाच्या कलमांना अद्याप माझी मंजुरी मिळालेली नाही असे सांगून झुलवावे. माझ्या मान्यतेची त्याला वाट बघावयास सांगावे.

आपण फरान्सिश्कु पेरैर पिंतु ह्यांच्या मुलाला कॅप्टन लेप्टनंटची जी बढती दिली, त्या बढतीस माझी संमती आहे. त्याचप्रमाणे ज्युआंव द कोश्त ह्याला कंपनीचा कॅप्टन आणि ज्युआव थोमे ह्याला ज्युआंव द कोश्तचे कंपनीत घेण्याचे जे आपण ठरविले आहे त्यालाही माझी मंजुरी आहे. परंतु ह्या बाबतीत मला आपणाला सल्ला द्यायचा आहे तो हा की, ह्या लोकांना बढती देण्यात येत असता, त्यांच्याहून हुषार असलेल्या लोकांना अन्याय होता कामा नये.

ह्या पत्रासमवेत जे पत्र जात आहे ते आपण आंतोनियु दुश सांतुश ह्यांना पोहोचते करावे. त्यांनी मला जे पत्र पाठविले होते. त्या पत्राचे ते उत्तर आहे. मराठे तहाची भाषा बोलतात हे आपण आपल्या पत्रात नमूद केलेच आहे. ह्या विषयी मला आपणास कळवायचे आहे की, मराठ्यांचे सेनाधिकारी त्यांच्या वरिष्ठांचे हुकूम पाळीत नाहीत असे आपण त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना कळवावे. हे अधिकारी वारंवार तहाचा भंग करतात हे आपण त्यांच्या निदर्शनास आणावे. आपण त्यांना अशी अट घालावी. की, त्यांनी यापुढे आमच्या प्रदेशांत आक्रमण करू नये, आणि आम्ही त्यांच्या प्रदेशांत आक्रमण करणार नाही. हा माझा आपणाला हुकूम आहे.

यापुढे ज्या ज्या वेळी ते तहाची मागणी करतील त्या त्या वेळी आपण त्यांची मागणी मान्य करावी. परंतु काळजी घेण्यास विसरू नये.

सिद्दीशी तह होणे आवश्यक आहे. परंतु तो मी सांगतो त्याप्रमाणे झाला पाहिजे. पण त्याच बरोबर जुन्या करारांत बदल होता कामा नये. हे लक्षांत घ्यावे.

सिद्दीशी तह करतांना त्यांत एक नवीन कलम घातले पाहिजे. त्याने मस्ताफवल येथे जो नवीन किल्ला बांधला आहे तो त्यानें पाडून टाकला पाहिजे.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, १७ ऑगस्ट, १७२८ ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(46) BASAIN, No. 5, FLS 26

व्हाइसरॉय वसई नगरपालिकेला कळवितो की, मराठ्यांपासून वसईला धोका निर्माण झाला असल्याने वसई नगरपालिकेने त्या प्रांताच्या रक्षणासाठी काहीतरी आर्थिक मदत केली पाहिजे.

"वसई नगरपालिकेच्या सिनेटला—

वसई प्रांताच्या सेनापतीनी मला कळविले आहे की, त्यांनी वसई नगरपालिकेच्या सिनेटला कळविले आहे की, त्या प्रांताला मराठ्यांच्या स्वारीपासून धोका निर्माण झाला असल्याने प्रांताच्या रक्षणासाठी सिनेटने काहीतरी आर्थिक मदत केली पाहिजे. मला आशा आहे की, ह्या नगरपालिकेचे सदस्य आणि सधन नागरिक वरील हेतु सिद्धीस जावा म्हणून आर्थिक हातभार लावतील त्यांनी जर मदत केली, तर ते आमचे स्वामी जे पोर्तुगालचे राजे ह्यांच्या कौतुकास पात्र होणार आहेत, इतकेच नव्हे तर उत्तरेकडील प्रांतांतील जनतेच्या स्वास्थ्याच्या रक्षणालाही मदत करणार आहेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, ७ सप्टेंबर १७२८. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(48) BA

व्हॉइसरॉय वसईच्या गव्हर्नरला खालील पत्रांत सूचना करतो की, कल्याणच्या सुभेदाराशी तह करावा व त्याच्याकडून टकमकगड खाली करून घ्यावा.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु कारकु इ मेलु ह्यांस:—

चालू माहीच्या पहिल्या तारखेला आपण मला जे पत्र लिहिलेत त्या पत्रांत आपण तिकडील परिस्थितीचा अहवाल लिहिलेला आहे. मला आपणास सांगायचे आहे की कल्याणच्या लोकांनी जर तहाच्या प्रस्ताव पुढें केला तर, तो आपण अवश्य स्वीकारावा, पण शत्रूला टकमकगड सोडून जाण्यास प्रवृत्त करावे. सिद्दीला कल्याणमध्ये घुसू देणे इष्ट नाही. त्याच्याशी कोणत्याच प्रकारची बोलणी करू नयेत. त्याला सांगावे की, मला अहवाल सादर केल्याशिवाय आणि माझा निर्णय कळल्याशिवाय आपणाला काहीच करता येत नाही. सिद्दीला कल्याणमध्ये प्रवेश करू दिला तर मराठ्यांशी आमचे वितुष्ट येईल व त्यांचा उपद्रव आम्हाला पूर्वीसारखा होईल. जर किलिचखान कल्याणवर चालून आला, तर मात्र आपण सिद्दीला मदत करावी. पण गड मुक्त करून घेण्यास विसरू नये. आणि शेवटी, ह्या राज्याला जे काय हितकारक होईल. ते करण्याची आपणाला पूर्ण मुभा आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे." गोवा, १५ सप्टेंबर, १७२८.

(49) BASAIN, No. 5, FLS 28V.

वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांच्या खेड्यांत शिरून लुटालूट केल्याबद्दल व्हॉइसरॉय त्याची पाठ थोपटतो.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस :—

मराठे आमच्या प्रदेशात वारंवार आक्रमणे करतात, परंतु आपण मात्र तसें करीत नाही. कल्याणच्या आक्रमणानंतर आपण मराठ्यांच्या आणखी एका खेड्यांत आक्रमण करण्याचा जो हुकूम आपल्या सैन्याला दिला त्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. गेल्या महिन्याच्या २९ ला आपण जे पत्र लिहिलेत त्यांत ह्या घटनेचा आपण निर्देश केला आहे. आपण कल्याणशी पत्र व्यवहार चालू ठेवावा. पण त्यांना कळवावे की, तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी तिकडे पोर्तुगीज मनुष्य पाठविला जाणार नाही. तर तिकडचा मनुष्य यावा. वसई प्रांतांतील लोकांच्या चंचल वृतीचें मला आश्चर्य वाटत नाही. त्याचा अनुभव मला पुष्कळ दिवसांपासून आहे. तरीही मी नगरपालिकेला ह्या बाबतीत पुनः लिहीत आहे पण एक मात्र खरे की, वसईच्या लोकांनी जर त्यांच्या भूमीच्या रक्षणार्थ मदत केली नाही तर त्यांची मोठीच हानि होणार आहे. आणि ते जे जाहीर करीत आहेत त्यावरून आपणाला योग्य त्या सरकारी नोकऱ्यासाठी योग्य त्या माणसांची निवड करतां येईल. संघाच्या पादऱ्याची नेहमीच काळजी घेतली पाहिजे. सिनेटमध्ये जो ठराव आला आहे त्याबद्दल मला आश्चर्य वाटत नाही. मी त्यांच्या धर्म गुरूचे आभार मानण्यास सांगितले होते. आणि त्या प्रांताच्या लोकांचेही मी आभार मानीत आहे.

किलिचखानाची बातमी खरी आहे असे मला वाटते. परंतु नेहमी काळजी घेतलेली बरी. देशाहून येणारी नौका आली की, तिकडे शक्य तेवढी मदत पाठविली जाईल. पण एक गोष्ट मात्र खरी की, इकडे सगळीकडेच साधनांची वाण आहे. आपण मला कळविले आहे की, शाहूराजे ह्यांना आपण लिहिले आहे. पण आपण ज्या रीतीने त्यांना लिहिले आहे, त्या रीतीने लिहायला नको होते. त्या पत्रावरून त्यांच्याकडून असा निष्कर्ष काढला जाण्याचा संभव आहे, की, आम्हाला त्यांची भीति वाटते. ज्यावेळी आपणाला त्यांना पुनः लिहिण्याचा योग येईल त्यावेळी आपण त्यांना कळवावे, की, ज्या ज्या वेळी त्यांचे सरदार आमच्या प्रदेशांत आक्रमणे करतील, त्या त्या वेळी आमच्या सैन्याला त्यांच्या प्रदेशांत घुसण्याचा हुकूम मी देऊन ठेवला आहे. त्यांनी जर आमच्या मुलुखांत शिरण्याचे सोडून दिले तर त्यांच्याशी आम्हाला सलोख्याचे संबंध ठेवता येतील असे त्यांना कळवावे.

त्यांनी मला पत्र लिहुन आमचे सैन्य कल्याणच्या प्रदेशांत का घुसले याचा जाब मागितला आहे. मी त्यांना उलट पत्री कळविले आहे की, त्यांनी



व्ही ५५५८–१८

जर त्यांच्या सेनाधिकाऱ्यांना आमच्या प्रदेशांत आक्रमणे न करण्याबद्दल बजावले आणि ही आक्रमणे जर बंद पडली, तर त्यांचा आणि आमचा सलोखा टिकू शकेल. आणि तसे जर घडले, तर त्यांच्या प्रदेशांत आक्रमणे न करण्याचा हुकूम मी आपणाला बजावीन. त्यांच्या दरबारांत वकील पाठविण्याच्या बाबतीत मी त्यांना कळवीले आहे की, त्यांचेच सेनापती जर त्यांच्या आज्ञेत नाहीत तर मग वकील पाठवून काय उपयोग? तुमच्या दरबारांत वकील पाठविण्या-ऐंवजी मी तो मोगलांच्या दरबारांत पाठवीन.

देव आपले रक्षण करो."

गोवा, १५ सप्टेंबर १७२८. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(50) BASAIN, No. 5, FLS 28V.

शिपायांची एक तुकडी आली असून उत्तरेकडील प्रदेशाला आरमारी मदत पाठविण्याची आपण तयारी सुरू केली आहे.

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

हे पत्र घेऊन जाणारे गलबत मी आजपर्यंत ठेवून घेतले होते, कारण, मी मायदेशाकडून येणाऱ्या टपालाची वाट पहात होतो. ते टपाल आज घेऊन येणारे जहाज इकडे आले असून आपले अभिनंदन करण्यासाठी एक आनंदाची बातमी त्याच्यावर आली आहे. ह्या जहाजावर दोनशे सैनिकांहुन अधिक सैनिक आले नसल्याने त्या प्रांताला माणसांची कुमक पाठविणे मला कठीण जात आहे. तरीही मी, दोन पालों, एक गलबत, आणि एक फ्रिगेट तिकडे पाठविण्यासाठी तयार केले आहे. ह्या चारही युद्धनौका त्यांच्यावरील खलाशी आणि, आपण माझ्याकडे ज्या लढाईच्या सामानाची मागणी केली होती, ते सामान घेऊन जात आहेत. ह्या आरमाराबरोबर जाण्यासारखी आणखी जहाजे तूर्त इकडे माझ्यापाशी नाहीत हे मला आपणास कळवायचे आहे. सिद्दीशी तह झाला, तर मला आनंद वाटेल. त्याचप्रमाणे मराठ्यांशी चालू असलेले युद्धही समाप्त व्हावे असे मला वाटते. हे युद्ध तह किंवा किलिचखानाचे भय ह्यामुळे समाप्त होईल. असे जर घडले तर मला ताबड-तोब कळवावे. कारण, माझ्यापाशी फारच थोडी माणसे असल्याने मला भीती वाटते.

कर्नाटकाशी नवीन व खेडे निर्माण होत आहेत. ह्या प्रांताला अन्नाच्या बेगमीची वाढती मदत होण्याकडे होईल असे वाटते.

कल्याणच्या मोहिमेत जे शिपाई ठार, जखमी, अथवा, पंगू झाले आहेत, त्यांच्या नावाची एक वेगळी यादी मला हवी आहे. कारण, जे विवाहित कटुंबवत्सल आहेत, त्यांची काळजी घेतली पाहिजे. तिकडे एक निष्णात शस्त्रवैद्य पाठविण्याची मी तयारी करीत आहे. हा शस्त्रवैद्य तिकडे जाऊन पोहोचला की, सैनिकांची चिंता दूर होईल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २० सप्टेंबर १७२८.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(51) BASAIN, No. 5, FLS 27.

उत्तरेकडील सेनापतीने सिद्दी व मराठे ह्या दोघांशी तह जुळवून आणला ह्याबद्दल गोव्याच्या व्हाइसरॉयला मोठा आनंद झाला व त्याने त्याला अभिनंदनपर पत्र लिहिल.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस--

आपली चालू माहीच्या दिनांक १, २ आणि ३ रोजी लिहिलेली पत्रे मला सादर करण्यात आली. मराठे व सिद्दी ह्या दोघांशी आपण तह जुळवून आणल्याची वार्ता त्या पत्रात असल्याने ती वाचून मला फार आनंद झाला. त्या पत्रात आपण मोंबासाच्या यशाबद्दलही माझे अभिनंदन केले आहे, व आनंद व्यक्त केला आहे. मलाही आपले अभिनंदन केले पाहिजे. कारण आपली चिकाटी आणि कष्टाळूपणा स्पृहणीय आहे ह्यात शंका नाही.

सिद्दीशी आता तह झाला असल्याने मद्रास्तफाउआल पाडून टाकण्याची अट दूर करण्याच्या आपल्या कल्पनेला माझी संमती आहे. दुसरी गोष्ट अशी की, ती योजना अमलात आणावयास आपणास सवडही झाली नाही आपण ............ जे विचार व्यक्त केले आहेत ते मला कळले. सल्लागार मंडळाचे बैठकीत घेण्यात येणारे निर्णय आणि कामकाजाची माहिती मी आपणाला कळवीत जाईन. माझा मुलगा ज्युआंव द साल्दान्य ह्याचे आगमन झाल्याबद्दल आपण जो आनंद व्यक्त केलात त्याबद्दल मी आपला आभारी आहे. मला आशा आहे की, त्याच्याकडे लोकांचे जे लक्ष गेले आहे, त्याची त्याला जाणीव होईल. देवाने आमच्या पदरी मोंबासाचा विजय ज्याअर्थी टाकला आहे त्याअर्थी तो विजय साजरा करण्यासाठी मी वसई शहरात तीन रात्रीपर्यंत रोषणाई करण्याचा हुकूम काढणार आहे.

त्या प्रांतात मंत्री पाठविण्यासंबंधीचा निर्णय मी अद्याप घेतलेला नाही. आपण जो मनुष्य सुचविला आहे त्याच्या संबंधीचा ठराव मी घेऊ शकत नाही. लुईश द मेलु पेरैरा ह्यांना लिहिण्यात येत आहे व युरोपलाही पत्र जात आहे. मला आपणास सांगावेसे वाटते की, तहाची मूळ कलमे ह्या सचिवालयात आली पाहिजेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, १२ ऑक्टोबर १७२८.

(t52) BACAIM, No. 5, FLS 31.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांच्या गर्विष्ट आणि अहमन्य राजाचे कल्याण हे शहर जाळल्याने हा राजा वठणीवर आला आहे व त्याने पोर्तुगीजांशी तह केला आहे.

"महाशय--

आरमाराच्या सेनापतीने जो अहवाल पाठविला आहे त्यावरून मोंबासा, पाते आणि झांजिबार व देलगादच्या भूशिरापर्यंतचा किनारा आमच्या हाती आल्याची बातमी खरी ठरली आहे. मी आपणाला ह्या संबंधीचा सविस्तर अहवाल लवकरच पाठवीत आहे. मराठ्यांनी तहाचा भंग करून आमच्या उत्तरेकडील प्रदेशात आक्रमणे सुरू केली होती. त्यामुळे त्यांच्या विरुद्ध मला उपाययोजना करणे भाग पडले. त्यांचे कल्याण ह्या नावाचे शहर आणि किल्ला आमच्या हद्दीला लागूनच आहे. हे ठाणे म्हणजे एक व्यापाराचे आणि जिल्ह्याचे केंद्र असल्याने ते आम्हांला घेणे अशक्य होते. म्हणून मी ते जाळून टाकण्याचा बेत केला. तो बेत यशस्वी होताच मराठ्यांकडून आमच्याकडे तहाची मागणी आली. आणि महाराजांना कळविण्यात मला आनंद वाटतो की, हा तह वसई येथे महाराजांच्या तिथल्या सेनापतीसमोर पार पडला. तहाची कलमे आमच्या दृष्टीने मानाची आहेत ही विशेष गोष्ट आहे. पहिल्या प्रथमच हा बलाढ्य राजा खाली येऊन आमच्याशी तह करण्यास तयार झाला.

मराठ्यांप्रमाणेच सिद्दी याकुतखान ह्यानेही आमच्याशी तह केला आहे. हा तहदेखील महाराजांना फायदेशीर आहे. त्याने आम्हांला काही खंडणी देण्याचे कबूल केले आहे. दोन वर्षांमागे तो आम्हांला एक कपर्दिकदेखील देण्यास तयार नव्हता. अशा रीतीने ह्या राज्यात सांप्रत शांतता नांदत आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव सुखी करून त्याचे रक्षण करो."

गोवा, १४ ऑक्टोबर १७२८.

(58) LIVRO DAS MONCDES, No. 95, B FLS 250.

गोव्याचा गव्हर्नर आंग्र्यासंबंधाने उत्तरेकडील सेनापतीस लिहितो--

उत्तरेकडील सेनापती आंतोनियु काश्कु इमेलु ह्यांस--

आपले दि. २३ ऑक्टोबरचे पत्र मिळाले. मी आपणाला कळवीत आहे की, दीवला काही देशी शिपाई रवाना केले आहेत. आंग्र्यांनीही काही गडबड सुरू केल्याचे मला कळले आहे. म्हणून चौलला काही शिपाई व अधिकारी पाठविण्याचे ठरविले आहे.

माद्राफावलसंबंधी मी मला शक्य होईल तेव्हा आवश्यक ते निर्णय घेईन. आपणाला उपयोग करता येईल अशी योग्य ती संधी दिली जाईल. आंग्र्यांचे पत्र आणि चौलच्या कॅप्टनला आपण त्यांना पाठविण्यास सांगितलेले उत्तर माझ्या पाहाण्यात आले. ते पत्र मला पसंत आहे. आंग्र्यांनी जर पुनः गडबड करण्याचा प्रयत्न केला तर माझ्या पूर्वीच्या व्हाइसरॉयने जसा गाजावाजा केला होता, तसा कोणताच गाजावाजा न करता मी त्यांना पश्चाताप होण्यासारखा धडा शिकवीन.

देव आपले रक्षण करो."

गोवा, १० नोव्हेंबर १७२८. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(55) BACAIM, No. 5, FLS 35.

व्हाइसरॉय डिचोलीच्या लष्करी मोहिमेचा वृत्तांत पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो :--

"महाराज--

महाराजांनी मला आपल्या वतीने डिचोलीच्या लढाईत भाग घेतलल्या सैनिकांचे व अधिकाऱ्यांचे आभार मानण्याचा हुकूम केला आहे. मला महाराजांना कळवायचे आहे की, ह्या मोहिमेत कुठल्या अधिकाऱ्याने जर जास्त मेहनत घेतली असेल तर ती सार्जंट मोर आंद्रे रिबैस कौतिन्यु ह्यांनी. त्यांनी केवळ हल्ल्याचीच रचना केली असे नव्हे, तर त्यांनी रस्त्यात अडथळे उभारून शत्रूला खंदकातूनही हुसकून लावले. हा अधिकारी हुषार तर आहेच, परंतु युद्ध कलेतील शिस्तही त्याच्या अंगी पुरती बाणलेली आहे ..........वगैरे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो."

(63) LIVRO DASMONCOES, No. 15 (b) FLS 283.

गोव्याचा व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला सरदार पिलाजी जाधव व बाजीराव ह्यांच्यासंबंधाने पुढील पत्रात काही सूचना करतो :—

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

आपली पत्रे मिळाली. त्या पत्रांतील उत्तरे मी ह्या पत्रात देत आहे.

पिलाजी जाधव आणि बाजीराव ह्या दोघांसंबंधाने मला आपणास अशी सचना करायची आहे की, त्यांना आपण सांगावे की, युद्धकैद्यांची मुक्तता करण्यात आली आहे. त्यांना इशारा द्यावा की, जे कैदी सुटायचे असतील त्यांची मुक्तता माझी परवानगी आल्यावर केली जाईल. त्या दरम्यान जर त्यांनी कोणत्याही भागात आक्रमणे केली, तर त्याचा सूड म्हणून त्या युद्धकैद्यांची डोकी उडविण्यात येतील. तसेच ते आमच्या प्रदेशात जे काय करतील तेच आम्ही त्यांच्याही प्रदेशात करू असे त्यांना कळवावे.

कल्याणच्या सुभेदाराशी मैत्रीचा बहाणा करावा, कारण तोही आमच्याशी त्याचप्रमाणे वागत आहे. माझ्या मते त्याचे हे वर्तन दुटप्पी आहे. आम्हीही त्यांच्याशी त्याच धोरणाने वागले पाहिजे. त्याला सांगावे की, कल्याणमध्ये त्याच्या अधिकाराच्या कक्षेत ............ उपसर्ग होणार आहे. हे आपण पावसाळ्यापर्यंत चालू ठेवावे. मी आपणाला निग्रोचा नजराणा देण्याची परवानगी देत आहे ........... म्हणजे त्याच्या आक्रमणाचा आम्हांला निदान ह्या वर्षापर्यंत तरी उपद्रव होणार नाही.

आंग्र्यांचा प्रश्न हा माझ्या दृष्टीने जरा कठीण प्रश्न आहे. हा काळा धपाटा घातल्याशिवाय गप्प बसायचा नाही. परंतु तत्पूर्वी मराठ्यांशी समझोता झाला पाहिजे. पण कोणत्याही परिस्थतीत गप्प बसूट मुकाट्याने सोसणे उपयोगाचे नाही. आमची सांप्रत त्यांच्याशी युद्ध करण्याची तयारी नाही. आपण त्याला पत्र लिहून त्याच्याकडे दमणच्या पालाची आणि मच्छीमारी गलबताची मागणी करावी. त्याला सांगावे की, ह्या अटी शांततेच्या नसून युद्धाच्या आहेत. त्याच्याकडून उत्तर आल्यावर पुढची उपाययोजना करता येईल. पण ह्या सर्व घडामोडींचा वृत्तांत मला वरचेवर कळवीत जावा. आणि त्याने जर कुरापती काढण्यास सुरुवात केली, तर येत्या उन्हाळ्यापर्यंत त्याच्या हालचालींवर पाळत ठेवावी. त्यावेळी त्याचा समाचार घेणे मला शक्य होईल असे वाटते.

ह्या शत्रूचा निःपात करण्यासाठी सर्व प्रकारच्या मार्गांचा अवलंब केला पाहिजे. आणि आपण जाहीर केले पाहिजे की, जो कुणी त्याचे मुंडके उडवील त्याला २० हजार असुर्प्या बक्षीस देऊन त्याचा मानसन्मान केला जाईल. मला आठवते की, फ्रान्सिश्कु झुजे द सांपायु ह्यांच्या अमदानीत चौल येथील भंडारी लोक ह्या संबंधी बोलत होते.

पकडलेल्या जहाजाविषयी मला सुचवायचे आहे की, त्यात असलेला माल जरी महत्त्वाचा नसला तरी तो पुष्कळ होता ह्यात शंका नाही. मला त्या धाडसाचे खूप कौतुक वाटले.

झुजे तिकडे पोहोचला असेलच. व आपले हुकूम त्याला मिळाले असतीलच.

देव आपले रक्षण करो."

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(65) BASAIM, No. 5, FLS 40.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस आंग्र्यांसंबंधाने लिहितो :—

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इमेलु ह्यांस—

आपले चालू माहीच्या पहिल्या तारखेचे पत्र मिळाले. त्या पत्राचे उत्तर मी गलबतावर न पाठविता वेगळ्या मार्गाने पाठवीत आहे. आंग्र्यांसंबंधी ज्या बातम्या आपण दिल्या आहेत त्या अस्वस्थ करणाऱ्या आहेत. त्याच्या धोरणाचा थांगपत्ता लागत नाही. तो आमच्या गलबतांवर हल्ला करीत आहे आणि आमच्या डोलकाठ्या तोडीत आहे. आणि त्याच बरोबर आमच्या माशुआ (छोट्या युद्धनौका) नाही अभिवादन करीत आहे. मला पुष्कळ वेळा असे वाटते की, ह्या इसमाने इंग्रजांची दिशाभूल करण्यासाठी आमच्याशी युद्ध करण्याचा बहाणा केला आहे. आणि आता गालिया घेतल्यावर तो आमच्याशी आम्ही सुचविलेला तह करणार आहे. मला संशय येतो की, त्याने मराठ्यांशी आतून संधान साधले असून आमच्याशी तो लपंडाव खेळत आहे. माझी अशी समजूत आहे की, तो आमच्याशी इंग्रजांहून खेळलेल्या डावाहून वेगळा डाव खेळणार आहे. मला वाटते अशा अनिश्चित परिस्थितीत थोडी काळजी घेतलेली बरी.

आपण त्याला कडक भाषेत लिहिले पाहिजे व त्याच्याकडे गलबते आणि दमणचे पाले मागितले पाहिजे. त्याच्या कानावर परभारे घालावयास लावले पाहिजे की, आम्ही इंग्रजांशी संधान साधणार आहोत. तसे जर झाले तर

त्याचे जमिनीवरील आणि समुद्रावरील नौकायनाचे उत्पन्न बुडणार आहे. अशा रीतीने त्याच्या विरुद्ध माझी उपाययोजना सुरू होईपर्यंत आपण त्यांना गुंतवून ठेवावे.

झुजे कुररैय हा आपल्या कुटुंबातील माणसांसह आपल्या खेड्यात जात आहे. त्याने हा निर्णय आकस्मिकपणे घेतला हे त्याच्या प्रयाणावरून सिद्ध होते.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ८ फेब्रुवारी १७२९ ज्युआंव द साल्दान्य द गामा

BACAIM, No. 5, FLS 40v.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस आंग्र्यांसंबंधी काळजी घेण्यास लिहितो–

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु काश्कुइ मेलु ह्यांस––

आपणाला पत्रे लिहिल्यावर तीन गलबते एकदम बरोबर आली. त्यांच्यावर आपली अनेक पत्रे होती. त्या पत्रांची सविस्तर उत्तरे मी आता देऊ शकत नाही, कारण, माझ्या समोर माकावच्या मोहिमेवर जाणाऱ्या जहाजांच्या जुळवाजुळवीचे प्रचंड आणि कंटाळवाणे काम पडले आहे. तरीही मी त्या पत्रातील महत्त्वाच्या तेवढ्या मुद्यांची उत्तरे देत आहे.

पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपण आंग्र्यांसंबंधी काळजी घ्यावी. आंग्रे मोठी कृती करण्याच्या प्रयत्नात आहेत असे मला वाटते. आपणाला जर त्याच्या मार्गात अडथळे आणण्याची संधी मिळाली, तर ती दवडू नये. ह्या हिवाळ्यात आपण कंपन्यांची पुनर्घटना करावी अशी माझी इच्छा आहे.

आंग्र्याने चौलवरून जाण्याचा कर भरलेला पाहून मला आश्चर्य वाटले. ह्या बाबतीत आपणाला नवीन काही माहिती असल्यास मला कळवावी. ज्युआंव द सौझ ह्यांना मी हिवाळ्यात दिवला राहाण्याचा हुकूम केला आहे. १५ ऑक्टोबरपर्यंत आपण मला इकडे भेटावयास यावे. ह्याचा अर्थ मी आपणाला जी रजा मंजूर केली आहे त्या रजेचा उपयोग करण्याचा आपला विचार असेल तेव्हाच इकडे यावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १ मे १७२९ ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(68) BACAIN, No. 5, FLS 49v.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, आंग्र्यांशी शांततेने वागणे, पण त्याच्याशी तह करू नये.

"उत्तरेकडील सेनापतीस--

आपली दि. २०, २१ आणि २६ एप्रिलपर्यंतची पत्रे मिळाली.

आंग्र्याविषयी आपण जे काय लिहिले आहे त्याविषयी मला आपणास सांगायचे आहे की, त्याच्या धोरणात बदल झाला आहे असे मला वाटत नाही. तरीही त्याच्याशी शांततेने वागावे. पण तह करू नये. ह्याच पत्राबरोबर त्यालाही एक पत्र पाठवीत आहे. त्या पत्राची आणि त्याने मला लिहिलेल्या पत्राची नक्कलही जात आहे. ही दोन्ही पत्रे आपल्या पाहाण्यासाठी मी पाठवीत आहे. ती आपण वाचून बघावी व त्यावरून त्याच्या धैर्याची कल्पना करावी. आपण त्याच्याशी नेहमीच काळजीने वागले पाहिजे. माझे पत्र त्याच्याकडे पावसाळा सुरू होण्यापूर्वी रवाना करू नये, व त्याच्याकडे त्या पत्राच्या उत्तराचीही मागणी करू नये.

मी दीवच्या किल्लेदाराला आपणाविषयी त्याची जी कर्तव्ये आहेत, त्याची जाणीव देऊन पत्र लिहिले आहे. मी त्याला कळविले आहे की, त्या किल्ल्याच्या यशाचा अहवाल त्याने आपणाला सादर केला पाहिजे आपल्या प्रांतामध्ये सांप्रत शांतता नांदत असल्याचे वाचून आनंद झाला. पण त्याचबरोबर आपणाला मी पुनः इशारा देत आहे की, आंग्र्याविषयी नेहमीच जागरूक असावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ११ मे १७२९ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(69) BACAIM, No. 5, FLS 50.

मराठ्यांनी दमणमध्ये शिरून लुटालूट केल्याची वार्ता गोव्याच्या व्हाइसरॉयला कळल्याने तो तत्संबंधी उत्तरेकडील सेनापतीस लिहीतो--

"उत्तरेकडील सेनापतीस--

मला आलेल्या अनेक पत्रावरून कळते की, शत्रूने दमणमधील दोन खेड्यात शिरून काही लोकांना पकडून नेले आहे. पण ज्याअर्थी, ही बातमी मला अद्याप आपणाकडून कळलेली नाही, त्याअर्थी, तिच्यावर संपूर्ण विश्वास ठेवण्यास मी तयार नाही. तरी मला आपणास सूचना करायचो आहे की

माझ्या हुकुमाप्रमाणे ज्या खेड्यात हे आक्रमण झाले आहे, त्या खेड्यात माणसे पाठवून तिथे खरोखरच आक्रमण झाले की काय त्याची चौकशी करावी. शत्रूशी आपण युद्धास सुरूवात करू नये. जोपर्यंत शत्रू आपणाशी उघडपणे युद्ध करणार नाही तोपर्यंत आपण गप्प बसावे. साष्टी बेटात बंदोबस्त ठेवावा. व देशावरून नौका येईपर्यंत इंग्रजांच्या हालचालीकडे लक्ष असू द्यावे. आंग्र्यांचे जर निधन झाले तर ठाण्याच्या सर्व अधिकाऱ्यांना उठाव करण्यास प्रवृत्त करावे, आणि आंग्र्यांचे निधन झाले [नसल्यास मला ताबडतोब कळवावे. वखारदारास दारूगोळ्याची खरेदी करण्यास सांगावे.

देव आपले रक्षण करो वगैरे".

गोवा, १४ जुलै १७२९ ज्युआंव द साल्दाय द गामा.

(71) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 52v.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस कळवितो की, त्याने सिद्दी व आंग्रे ह्यांच्याशी संबंध तोडू नयेत. मात्र पोर्तुगिजांच्या ज्या नौका त्या दोघांनी पकडल्या आहेत त्या त्यांच्याकडे परत मागाव्या.

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस--

आपले चालू माहीचे दि. १६ चे पत्र मिळाले. त्या पत्राचे उत्तर करताना मला आपणास सल्ला द्यावयाचा आहे की, जोपर्यंत आंग्रे आणि सिद्दी हे दोघे आमच्याकडील संबंध तोडणार नाहीत, तोपर्यंत त्यांच्याकडील संबंध आपण तोडू नये. आमचे हे धोरण फसवे आहे, अथवा आमच्यापाशी मनुष्य-बळाचा अभाव आहे, अथवा आम्ही युद्ध करण्यास भितो, अशी त्यांची समजूत होण्याचा संभव आहे. परंतु माझी आपणाला आज्ञा आहे की, त्या दोघांनी आमच्या ज्या युद्ध नौका पकडून नेल्या आहेत, त्या परत करण्यासंबंधी आपण त्यांच्याशी मुळीच पत्रव्यवहार करू नये. पण त्यांनी जर स्वतः होऊनच ह्या बाबतीत आपणाला लिहिले तर मात्र त्यांना समजेल अशा भाषेत उत्तरे पाठवावीत. त्याबद्दल त्या दोघांना आनंद होईल आणि मलाही समाधान वाटेल. इतर प्रश्नाबाबत त्यांना कळवावे की, नौका परत केल्याशिवाय कोणत्याही प्रश्नावर त्यांच्याशी बोलण्याचा आपणाला माझा हुकूम नाही.

प्रांतामध्ये शांतता प्रस्थापित होईल असे मला वाटत नाही. कारण माझा पूर्वानुभव असा आहे की, मराठ्यांना धमकी दिल्याशिवाय अथवा त्यांची डोकी फोडल्याशिवाय ते वठणीवर येत नाहीत, आणि तह करण्यास तयार होत नाहीत. कदाचित राजाचे आगमन झाल्यावर ते तहाला तयार होतील

पण तोपर्यंत तरी मला तहाची आशा वाटत नाही. मला आपणास सांगायचे आहे की, प्रांताची तसुभर देखील जमीन मराठ्यांच्या हाती राहाता कामा नये. तसे जर झाले, तर मी सगळ्यांतूर्वी उत्तरेकडील प्रांतात जाऊन माझे बलिदान करीन. ज्यांना आमच्या स्वामीच्या हुकुमांची आणि पोर्तुगिजांची विस्मृती झाली आहे, त्यांच्यापैकी मी नाही. कारण आम्ही पोर्तुगीज म्हणजे नेहमीच पोर्तुगीज आहोत. आशिया खंडात क्रुसाचे रक्षण करणारे आम्ही एकमेव कॅथॉलिक आहोत. आणि यापुढे देखील आम्हाला कुसाचे रक्षण करण्याचे हे पवित्र कार्य सदैव करायचे आहे.

आपण कल्याणच्या सुभेदाराशेजारी आहात ह्याची मला जाणीव आहे, व त्याप्रमाणे काळजी घेत आहे. परंतु मला खात्री आहे की, कल्याणचा सुभेदार दगलबाजी करणार नाही.

मराठ्यांनी जर काही कुरापत काढली, तर त्यांना टोला हाणण्याच्या बाबतीत आपण गैरसावध राहू नये. मला बातमी कळली आहे की मराठ्यांनी लुईज आफोंस ह्यांच्या खेड्यासमोरील एक टेकडी आपल्या ताब्यात घेतली आहे. तसेच जोगिणीच्या बेटावरील काही कुणब्यांची नाके मराठ्यांनी तोडली आहेत असेही मला कळले आहे. पण जोपर्यंत ह्या वार्ता मला आपणाकडून अधिकृतपणे कळविण्यात आलेल्या नाहीत तोपर्यंत त्यांच्यावर मी विश्वास ठेवू शकत नाही.

हे गलबत निघण्याच्या घाईत असल्याने मला आपणाला अधिक काही लिहिण्यास सूचत नाही. परंतु आपणास मला पुनः एकदा आठवण करून द्यायची आहे की, मी तह परिषदेची वार्ता ऐकण्यास उत्सुक आहे. ह्या परिषदेत फायदा आमच्या स्वामीचाच होईल अशी माझी खात्री आहे. आणि मला कळले आहे की, किलिचखानाची शाहूराजे ह्यांच्यावरील मोहीम सुरू झाली आहे.

देव आपले रक्षण करो वगैरे ".

गोवा, २८ फेब्रुवारी १७३०




ज्युआंव द साल्दान्य द गाम

(79) BASAIM, No. 5, FLS 92.

मराठे दमणमध्ये शिरल्याची वार्ता कळताच गोव्याचा व्हाइसरॉय वसईच्या कॅप्टनला लिहितो :--

"फ्रान्सिश्कु गेररा द मेश्कित ह्यांस--

आपले चालू माहीच्या दि. ७ चे पत्र मिळाले. त्या पत्रावरून मराठ्यांनी दमणच्या हद्दीत आक्रमण केल्याचे कळले. मला आपणास सूचवायचे आहे की, आपण मराठ्यांच्या प्रदेशात, उदाहरणार्थ कल्याणवर छापा घालून लगेच माघार घ्यावी. मग त्यांनी तहाची मागणी केली की, आपण तहाचे पालन करण्यास तयार आहोत असे त्यांना कळवावे. माझा आपणाला हुकूम आहे की, ते जितक्यांदा आमच्या प्रदेशात आक्रमण करतील तितक्यांदा त्यांच्या प्रदेशात आक्रमण करावे. दों. मान्युएल लेऑनिश द काश्त्रु हे तिकडे एका पालासह जात आहेत. दुसरे पाले दक्षिणेकडून अद्याप आलेले नाही. ते आले की, लगेच तिकडे पाठवून देतो. चाळीस सैनिक त्यांच्या हत्यारासह जात आहेत. आपण ज्या गोळ्यांची मागणी केली आहे, ते शस्त्रागारात नाहीत. ते बनविण्यात आले किंवा मुंबईहून विकत आणले की पाठवून देईल.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २४ एप्रिल १७३०.

(80) BACAIM, No. 5, FLS 70V.

व्हाइसरॉय वसईच्या कॅप्टनला लिहितो--

"वसई शहराचे कॅप्टन फ्रान्सिश्कु गेरर द मेश्कित ह्यांस--

आपले चालू माहीच्या दि. १५ चे पत्र मिळाले. दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांना आपल्या जागी पाठविल्याबद्दल आपण तक्रार केली आहे. परंतु आपणाला अशी तक्रार करण्यास जागा नाही. कारण त्या प्रांताचे भवितव्य धोक्यात आल्याने हा निर्णय घ्यावा लागला. आपण म्हणता की, हा प्रांत दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांनी आपल्या ताब्यात दिला तेव्हा येथे माणसे नव्हती की शस्त्रेही नव्हती. पण त्यामुळे आपले अपयश झाकू शकत नाही.

आपण म्हणता की, ह्या प्रांतामध्ये मराठ्यांनी संभाजीनंतर कधी एवढे मोठे आक्रमण केले नव्हते. असे जर असेल तर ते आपले दुर्दैवच म्हणावे लागेल. कारण, त्या काळी मराठे सैन्यासह येऊन लुटालूट करत असत, आता त्यांनी सैन्याविना येऊन मुलुख काबीज केला.

आपल्या पत्रात आपण कुमकेचा उल्लेख केला आहे. कुमक आली तर यश मिळण्याची आपणाला खात्री वाटते. अपयशाची वार्ता येताच मी कुमक पाठविण्याचे तहकूब केले. दुसरी गोष्ट मोठे सैन्य पाठविण्यास जहाजेही मिळाली नाहीत. दोन गाले आंग्र्यांनी कैद केली आहेत आणि एक सिद्दीच्या कैदेत आहे. मे महिन्यातही जहाजांची पुष्कळच हानी झाली. त्यामुळे कुमक पाठविण्याची इच्छा असूनदेखील ती पाठविता येत नाही. पण ह्या सर्व अडचणी असूनदेखील आपल्या अधिकारपदाची कर्तव्ये आपण बजावलीत हे मी मान्य करतो. आपल्या पत्रामध्ये आपण रात्रीच्या जमवाजमवीसंबंधाने जो उल्लेख केला आहे त्याविषयी माझा आपणाला सल्ला आहे की, आपण त्या भानगडीत पडू नये.

दों. आंतोनियु ह्यांना मी मला हव्या त्या शिफारशी करीत आहे. आपण जरी फिर्यादी असला तरी एक चांगला पोर्तुगीज ह्या नात्याने आपणास शक्य होईल ते आपण कराल व दों. आंतोनियु ह्यांना मदत कराल अशी आशा आहे.

आपण जो खर्च केलात त्याबद्दल वाईट वाटते. संधी येताच त्याची भरपाई केली जाईल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २९ ऑक्टोबर १७३०

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(82) BACAIM, No. 5, FLS 84.

गोव्याचे व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, शाहूराजे ह्यांच्या सैन्यात पुष्कळच वाढ झाली असून पोर्तुगिजांना जर मोगलांनी मदत केली नाही तर, मराठ्यांसमोर त्यांचा निभाव लागणे कठीण आहे.

उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस—

पाद्री मान्युएल द फिगेरेदु ह मोगल बादशहा आणि आंतरेचा राजा ह्या दोघांना आमच्या स्वामीची पत्रे घेऊन आल्याचे कळताच फार आनंद झाला. पाद्री महाशयांना इकडे येण्यास पुष्कळच वेळ झाला. ते तिकडे जवळजवळ एक वर्ष राहिले.

मी पाद्री मानुएल फिगेरेदु ह्यांना प्रमाणपत्र देऊन लगेच मोगल बादशहाकडे पाठवीत आहे. कारण, आमच्या वतीने तेथे त्यांची फारच मोठी

आवश्यकता आहे. शाहूराजे ह्यांचे लष्करी सामर्थ्य पुष्कळ वाढले असून मोंगल बादशहाने जर आम्हाला मदत केली नाही तर, मराठ्यांना जमिनीवर टक्कर देणे आम्हाला फारच कठीण जाणार आहे. सदर्हू पाद्री मान्युएल फिगेरेदु ह्यांची खर्चाची बचत व्हावी म्हणून मोगलांचे दरबारात आमचे वकील म्हणून नेमण्याचा माझा विचार आहे. वकील होण्यास त्यांच्याशिवाय दुसरा लायक मनुष्य मला दुसरा कुणी दिसत नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ४ नोव्हेंबर १७३०.

(83) LIVRO DACMONCOES, No. 97V, FLS 550V.

व्हाइसरॉय वसईच्या सेनापतीस मराठ्यांशी व्हायच्या तहासंबंधी लिहितो--

"उत्तरेकडील सेनापती दो. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस--

हे गलबत आपले पत्र घेऊन जात आहे. आग्वादला दोन फ्रिगेट्स आणि दोन गालियोत असल्याकारणे ती आपल्या इतर पत्रांची उत्तरे घेऊन जातील. आपण होऊ घातलेल्या तहासंबंधाने मुंबईच्या गव्हर्नरकडे शंका व्यक्त केली आहे. आपणाला ह्या बाबतीत सूचना करायची आहे की, आपण मुंबईच्या गव्हर्नरला कळवावे की, नवीन करार केला नाही त्याचे कारण हे की, त्या करारात त्यांना काय हवे होते ते कळले नव्हते. तोपर्यंत त्यांच्याकडे कुलाब्या-शिवाय नवीन तक्रार करणे बरोबर होणार नाही. आणि ह्या हेतुनुसार त्यांना आपण आगाऊ कळविले पाहिजे की, आपणाला मराठ्यांशी नवीन करार करण्याचा माझा हुकूम नाही. त्यांना अशीही ताकीद द्यावी की, सिद्दी अथवा आंग्रे ह्या दोघांनी आमची पकडून नेलेली जहाजे परत केली नसल्यास त्यांच्याशी युद्ध अटळ आहे. कल्याणच्या नवीन सुभेदारने आपला दूत पाठवून तह केला तर बरे होईल. हा तह त्यांनाही सोयीचा होईल. आपण ह्या अडचणींवर मात कराल अशी आशा आहे.

मला खंबायतहून जी बातमी कळली आहे तिच्यावरून मला असे वाटते की, किलिचखान आणि महाराजा सवाई जयसिंग हे दोघे मराठ्यांशी युद्ध केल्या-शिवाय राहाणार नाहीत. किंवा ते त्यांच्याशी तह तरी करतील. आपणाला मी सूचना देऊन ठेवतो की, आंग्रे आणि सिद्दी ह्या दोघांनी जर आमची पकडून नेलेली जहाजे परत केली नाहीत, तर इकडून जाणाऱ्या युद्धनौकांना वेगळे हुकूम द्यावे लागतील. किलिचखान आणि महाराजा सवाई जयसिंग हे दोघे

मराठ्यांशी युद्ध केल्याशिवाय राहाणार नाहीत, ह्याची मी आपणाला फिरून एकदा आठवण करून देत आहे. त्यांच्या हेतूवर काळच प्रकाश पाडू शकेल. त्या दरम्यान आम्हाला जे काय करता येण्यासारखे आहे ते करू या. दोन्ही फ्रिगेटवर आणि गलबतांवर चारशे पोर्तुगीज असून, त्यातील काही सैनिक आणि काही नाविक आहेत. मागाहून निघणाऱ्या उरलेल्या दोन्ही युद्धनौकांवर उरलेले सैनिक जातील. आंग्रे किंवा सिद्दी ह्या दोघांनी आमच्या जहाजांची मुक्तता केली नसल्यास त्यांच्याशी युद्ध हे केलेच पाहिजे. मागाहून जाणाऱ्या फ्रिगेटवर इतर हुकूम धाडले जातील.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ६ नोव्हेंबर १७३०                ज्युआंव द साल्दान्य द गामा

(84) BACAIM, No. 5, FLS 87.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहिलेल्या पत्रात कल्याणच्या सुभेदारावर ढोंगीपणाचा आरोप करतो.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इमेलु ह्यांस––

आपण पाठविलेल्या गलबतांपैकी चौथे गलबत इकडे येऊन पोहोचले. त्या गलबतावर पाठविलेल्या पत्राचे उत्तर मी इकडून कुमक घेऊन जाणाऱ्या दोन फ्रिगेट्स आणि दोन गालियोट्स ह्यांच्यावर पाठवीत आहे. दोन मोठी फ्रिगेट्स सिद्दीवर चाल करून जाण्याची तयारी करीत आहेत. ह्या दोन्ही मोठ्या युद्धनौकांनी सिद्दीच्या बंदरात शिरून तिथल्या छोट्या जहाजांवर हल्ले करायचे आहेत. हे हल्ले झाले तर मला फार आनंद होईल.

कल्याणच्या भामट्याने (सुभेदार) आपणाला पाठविलेली जी पत्रे आपण माझ्याकडे पाठवून दिली आहेत, ती ढोंगी असून माहिती काढण्यासाठी व आपले लष्करी सामर्थ्य पुनरस्थापित करण्यासाठी पाठविली आहेत. मला त्याने फसविल्याबद्दल त्याचे कौतुक केले पाहिजे. पण कुमक आल्यावर आपण त्याच्या मित्रांना पुढीलरीतीने फसवावे.

कंपन्यांनी वसईमध्ये प्रवेश केला की, त्यांना दिवसा बाहेर पाठवावे व दुसऱ्या दिवशी परत आणावे. रात्रीची काळजी घ्यावी. कारण माणसे नवीन आहेत. इश्त्रेला (नक्षत्र) ह्या युद्धनौकेवर एकूण दिडशे पोर्तुगीज सैनिक जात आहेत, चाळीस गालियोटवर आणि कोंसेइसांव ह्या फ्रिगेटवर शंभर. ही नौका लगेच सुरतला जाणार आहे. तिथून ती दीवला जाऊन तिथे बंदुका,

दारू गोळे, वगैरे युद्धोपयोगी सामान उपशील. तिथून मग ती आवश्यक असेल तर वर्सोवाला जाईल.

आपण जेव्हा प्रांताचा राज्य कारभार आपल्या मेहुण्याच्या हवाली कराल तेव्हा त्यांच्याकडे रेजिमेंट, आकडे आणि मी आपणाला जे हुकूम केले होते तेही त्यांना विदीत करावे. त्यांना सांगावे की, त्यांच्या कर्तबगारीवर मी विसंबून राहात आहे. त्यांनी मोठी काळजी घ्यावी अशी माझी त्यांना सूचना आहे. उदाहरणार्थ पोर्तुगीज सैनिकांनी पळून जाऊ नये म्हणून त्यांनी काळजी घेतली पाहिजे. ह्या बाबतीत आपण मुंबईच्या गव्हर्नरनाही लिहावे. कारण त्यांच्या पत्रात शिबंद्या काढून घेण्याचा विचार आहे असे कळते. मुंबईच्या गव्हर्नरांचे आरमारही जरी नुसते बाहेर असले तरी देखील आंग्र्यांना मुंबई बंदरातून साष्टी व तुर्भे ह्या बेटांमध्ये प्रवेश करता येणार नाही. आपणालाही त्यांचा बचाव. करणे कठीण जाणार नाही.

मला अशी बातमी कळली आहे की, आमचे काही लोक गट करून एक-मेकांशी पक्षपातीपणाने वागत आहेत. त्यांनी अशा रीतीने न वागता काफ्री (निग्रो) व कुणबी ह्यांना लष्करी शिक्षण देऊन व त्यांना हत्यारे पुरवून स्वामीच्या सेवेस लावायला हवे होते. मी ह्या प्रश्नात लक्ष घालण्यापूर्वी ही बेबंदशाही मोडून काढण्यासाठी आपल्य चातुर्याचा उपयोग आपण कराल अशी आशा आहे.

आपणाला कुमक आल्यावर आपण कल्याणच्या सुभेदारामागे तहाचा लकडा लावावा. आपण त्यांना स्पष्टपणे लिहावे की, त्यांनी तह तरी करावा किंवा युद्धास तरी तयार व्हावे. कारण, त्यांनी आपल्या खेड्यांबरोबरच आमच्याही खेड्यांचे उत्पन्न वसूल करावे हे आम्हाला खपण्या सारखे नाही. मराठ्यांच्या सैन्याने खाली उतरून आमच्या खेड्यांचे उपन्न गोळा करण्या-ऐवजी आम्ही ती जाळून टाकलेली बरी. मात्र ज्या कुणब्यांनी मुख्य भूमीवर खेडी वसविली असतील त्यांना त्या खेड्यातील भाताचे पीक काढून ते आमच्या खेड्यात आणण्याची परवानगी द्यावी.

आमचे सैन्य नेहमीच एकत्र असावे. त्याची विभागणी करू नये.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ८ नोव्हेंबर १७३०. ज्युआंव द सल्दान्य द गामा.

(85) BASAIM, No. 5, FLS 89V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला कळवितो की, मराठ्यांनी वसई-नजिकच्या ज्या टेकड्या व्यापिल्या आहेत त्या त्यांनी खाली कराव्या म्हणून त्यांच्यावर लष्करी दडपण आणावे.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इमेलु ह्यांस—

माझी खात्री झाली आहे की, आमच्या सैन्याची भीति वाटल्याशिवाय तो टेकड्या खाली करणार नाही. म्हणून माझा आपणाला असा सल्ला आहे की, ह्या नौकांवर जाणारे सैन्य तिकडे जाऊन पोहोचले की, त्यांना त्यांची हत्यारे घ्यावयास लावून व पडघम जितके गोळा करता येतील तितके करून त्यांच्या आवाजात ह्या सैन्याला जहाजांवरून खाली उतरण्यास सांगावे. आंद्रे रिबैरा ह्यांना सांगावे की, ह्या सैन्याच्या संचालनाची त्यांनी अशा रीतीने रचना करावी की, ते दुरून आहे त्याहून अधिक वाटावे. ह्या सैन्याचा त्यांनी आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्या सैन्यामध्ये अंतर्भाव करावा. नंतर ह्या सैन्याने दहशत घालून अथवा टेकडीवर प्रत्यक्ष हल्ला करून शत्रूला तिथून हुसकून लावावे. आणि ज्याअर्थी, युद्ध नौकांवरील शिबंदी पोर्तुगीज आहे, त्याअर्थी ही शिबंदी खलाशांची भर घालून वाढविता येईल. ह्या नौकांवर शस्त्रास्त्रे आणि दारूगोळा आहेच. पण ह्या बाबतीत एक सूचना करायची आहे ती ही की, ह्या माणसांची शिस्त कमी असल्या कारणे त्यांचा सैनिकांमध्ये समावेश करताना जरा काळजी घेतली पाहिजे.

तह झाला तर फ्रिगेट त्याच्या शिबंदीसह परत पाठवून द्यावे. त्याचप्रमाणे झुजे आंतुनिश ब्रासु ह्यांचेही पाले आले पाहिजे. त्यांना मग इथून जाणाऱ्या आरमाराबरोबर परतता येईल. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील दोन्हीही आरमारांच्या शिबंद्यासाठी तिकडून साठ किंवा सत्तर देशी शिपाई पाठवून द्यावे. कारण गोरे सैन्य इकडे शिल्लक नाही.

आंग्र्याला आता भावाची सबब सांगण्यास जागा नाही. कारण तो भुशिरामध्ये आहे. सिद्दीलाही समर्थन करता येणार नाही. त्या दोघांशीही मी युद्ध पुकारले आहे. आपणाला माझी आज्ञा आहे की, आपण त्यांना त्यांच्या आश्वासनाची आठवण करून देऊन पत्रे लिहू नयेत आणि त्यांनी जर आपणाला लिहिले तर आपण त्यांना कळवावे की, जहाजे परत केल्याशिवाय वाटाघाटी करायच्या नाहीत असा माझा आपणाला हुकूम आहे. सिद्दीने जर तहाची बोलणी काढली, तर त्याला मी वर दिलेला जबाब द्यावा आणि तो जी जहाज परत करण्याची मागणी करीत आहे ती त्याला कोणत्याही परि-

स्थितीत परत करू नयेत. त्या जहाजांमध्ये इथे असलेल्या जहाजांची भर घालण्याचा माझा विचार आहे".

गोवा, ११ नोव्हेंबर १७३०. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(86) BASAIM, No. 5, FLS 91V.

व्हाइसरॉय मोगल दरबारातील पोर्तुगीज वकिलाला लिहितो की, मोगल बादशहाने जर मराठ्यांशी युद्ध करण्याचे ठरविले, तर पोर्तुगीज त्याला मदत करण्यास तयार आहेत, असे त्याला सांगावे. मोगल दरबारात जाणारे झेजुस संघाचे पाद्री मान्युएल द फिगेरेदु ह्यांना व्हाइसरॉयने केलेल्या काही सूचना :—

(१) मी आपणाकडे एक महत्वाची कामगिरी सोपवित आहे. आपण मोगल बादशहाला विदीत करावे की, त्याने जर मराठ्यांशी युद्ध जाहीर करण्याचे ठरविले तर पोर्तुगीज त्याला मदत करण्यास तयार आहेत. त्याने जर तीन किंवा चार हजार सैन्य खाली पाठविले तर त्याच्या सैन्याच्या बळावर मी भिवंडी आणि कल्याण ही मराठ्यांची दोन ठाणी घेऊन ती बादशहाला देईन. बादशहाला जर मराठ्यांवर सैन्य धाडणे शक्य झाले नाही, तर त्याने मराठ्यांना आज्ञा करावी की, त्यांनी पोर्तुगिजांच्या प्रदेशात आक्रमणे करू नयेत.

(२) आपण बादशहांच्या कानावर घालावे की, सिद्दीने अलीकडे व्यापारी नौकांना परवाने देण्याचा सपाटा सुरू केला आहे. त्याला मिळालेला हा अधिकार नबाबाच्या आधिकाराहून मोठा आहे. हा अधिकार फक्त पोर्तुगिजांनाच तेवढा असून सर्व जहाजे पोर्तुगिजांचे परवाने घेतात. फक्त सरकारी महसूल खात्याच्या नौकांना तेवढा हा परवाना माफ असतो.

सिद्दीने अरबांशी संधान साधले असून पोर्तुगिजांशी युद्ध करण्याचा त्याचा विचार आहे. तसे जर झाले तर बादशहाच्या खजिन्याचा मोठाच तोटा होणार आहे, हे बादशहाला पटवून द्यावे. आणखी एक गोष्ट आपण बादशहाला विदीत करावी की, सिद्दी आणि शाहूराज ह्या दोघांची दोस्ती जमली असून लूट आणि खंडणी ते दोघे आपसामध्ये विभागून घेतात.

(३) सिद्दी बादशहाची फर्माने धाब्यावर बसवून मन मानेल तसा वागत आहे. त्याने दगलबाजीने आमच्या एका युद्धनौकेवरील अधि-

काऱ्यांना कैद केले. ही युद्ध नौका मित्र ह्या नात्याने सिद्दीच्या बंदराला लागली होती. सिद्दीने त्या नौकेवरील अधिकाऱ्यांना खान्यास बोलावून त्यांना दगलबाजीने गिरफदार केले व मग युद्ध नौका आपल्या ताब्यात घेतली. त्या कारणावरून पोर्तुगिजांनी त्याच्याशी युद्ध पुकारले आहे.

(४) सिद्दीच्या ह्या अतिरेकी वर्तनामुळे आणि अंदाधुंदीमुळे सुरतेच्या बंदराची फार हानी झाली आहे. कारण, सिद्दी स्वतःला बादशहाचा सरदार म्हणवून घेतो. वास्तविक त्याचा दर्जा सरदाराहून कमी आहे. परंतु तो सरदार म्हणवून घेऊन खंडणी वसूल करतो व सुरत जिल्ह्याशी आणि त्या शहराशी शत्रूत्वाने वागतो.

(५) पाद्री महाशयांनी बादशहाला अशीही विनंती करावी की, त्याने सिद्दीला आंग्र्याशी युद्ध करण्याचा हुकूम करावा. सिद्दी बादशहाच्या प्रजाजनांच्या आणि इतर राष्ट्रांच्या नौकांशी बेदरकारपणे वागत आहे.

(६) शाहूराजे इतके बलाढ्य झाले आहेत की, त्यांच्यापासून बादशहाच्या साम्राज्यालाही धोका निर्माण झाला आहे. फक्त पोर्तुगिजांनीच तेवढा त्यांच्याशी तह केलेला नाही. कारण शाहूराजे हे बादशहाच शत्रू आहेत. हे पोर्तुगिजांना माहित असल्याने त्यांनी त्याच्याशी झटापटी चालू ठेवल्या आहेत. मराठे दर वर्षी पोर्तुगिजांच्या प्रदेशात आक्रमणे करतात. ते जर असेच शिरजोर झाले तर अजिंक्य झाल्यावाचून राहाणार नाहीत. कारण त्यांच्यापाशी बरेच गड आणि किल्ले आहेत. परंतु त्यांच्यावर स्वारी करणे ही कठीण गोष्ट नाही. आपण बादशहाच्या मनावर बिंबवावे की, त्याचे पणजोबा औरंगजेब बादशहा ह्यांनी मराठ्यांना कोकणातून हुसकून लावण्यासाठी तिकडे सैन्य घुसविले होते. मराठ्यांनी पोर्तुगिजांचे बहुतेक सर्व परगाणे घेतले होते, फक्त लष्करी ठाणी तेवढी त्यांच्यापाशी होती. परंतु मोगलांच्या मदतीमुळे त्यांना मराठ्यांनी जिंकलेला प्रदेश परत घेता आला, व त्या स्वारीमुळे त्यांना शांतता आणि स्वास्थ्यही साध्य करणे शक्य झाले".

गोवा, १४ नोव्हेंबर १७३०.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(87) LIVRO DEREGIMENTOS E INSTRUSOES, No. 12, FLS 70V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, मराठे पराभव खाल्ल्या-खेरीज तहाला तयार होणार नाहीत.

"उत्तरेकडील सेनापती दों. आंतोनियु काश्कु इ मेलु ह्यांस--

आपण चालू माहीच्या १० ला तिकडून इकडे येण्यास निघणार असल्याचे मला कळविले आहे. पण तरीही मी आपणाला हे पत्र लिहीत आहे. कारण, मला आशा आहे की, आपल्या जबाबदाऱ्या पुष्कळ असल्याकारणे आपली अधिकारसूत्रे आपण घाईने खाली ठेवणार नाही.

मराठे तह करतील ह्यावर माझा कधीच विश्वास नव्हता, आणि नाहीही. तथापि आम्ही जर त्यांच्यावर एक मोठा विजय संपादन केला, तर मात्र ते तहाला तयार होतील. किंवा महाराजांच्या (सवाई जयसिंग) आगमनाची वार्ता कळताच ते कदाचित तह करण्याची शक्यता आहे. माझी देवापाशी प्रार्थना आहे की, ह्या गोष्टीला कळवांचा विजय बस व्हावा. कारण, ह्या जातीच्या लोकांना तसा एकादा विजय बस होतो. त्याचे कारण हे की, त्यांचा राज्यकारभार हा लोकभ्रमावर चालत असतो.

शनिवारी एक मोठी फ्रिगेट, दोन गालियोता आणि एक गालिया सुसज्ज होऊन तिकडे निघत आहेत. आंद्रे रिबैस ह्यांच्याशी सल्ला मसलत करून आपण जो निर्णय घेतला आहे, तो मला मान्य आहे. त्याचप्रमाणे झुजे द मिरांद ह्यांच्याही नेमणुकीला माझी संमती आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १३ डिसेंबर, १७३०. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(88) BASAIM, No. 5, FLS 93.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, मराठ्यांनी जर तहाचा प्रस्ताव पुढे केला तर, माझ्या परवानगीशिवाय आपणाला तहाच्या वाटाघाटी करण्याचा हुकूम नाही, असे त्यांना सांगावे. सिद्दी व आंग्रे ह्या दोघांसंबंधीही मी आपणाला असाच हुकूम करीत आहे.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्वहैर द मिनेझिश ह्यांस--

आपली अधिकारसूत्रे आपण धारण केली असतीलच असे धरून चालतो. आपले बुद्धिवैभव, निश्चय आणि चिकाटी ह्यांच्या बळावर आपण त्या दूरच्या आणि दुर्दैवी प्रांतात पोर्तुगिजांचा दरारा पुन: प्रस्थापित कराल अशी आशा बाळगतो.

आपण आणि मावळते गव्हर्नर दोघांनी मिळून त्या प्रांताच्या यशाचा जो अहवाल मला सादर केला आहे, त्यावरून माझे वरील मत झाले आहे. मराठ्यांच्या बाबतीत आपण दोघांनी जो अनुभव व्यक्त केला आहे तो आमच्या प्रतिष्ठेला निरूपयोगी आहे. म्हणून माझा आपणाला हुकूम आहे की, आपण जर तहाच्या वाटाघाटीत भाग घेतला तर त्यांना सांगावे की, त्यांनी आमचा जो मुलुख गिळंकृत केला आहे तो मुक्त केल्याशिवाय तहाच्या वाटाघाटी करण्यास माझी परवानगी नाही. हा मुलुख मुक्त करण्यासाठी माझे प्रयत्न चालले आहेत. माझ्या हातात जी साधने आहेत ती उत्तरेकडे पाठविण्याचा सपाटा मी सुरू केला आहे. शिपाई, रंगरूट आणि पाद्री ह्या सगळ्यांसह लढण्याचा मी निर्धार केला आहे.

आंग्रे आणि सिद्दी ह्यांच्या बाबतीतही माझी आपणाला आज्ञा आहे की त्यांनी आमच्या ज्या नौका पकडल्या आहेत त्या परत केल्याशिवाय त्यांच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्याचा माझा आपणाला हुकूम नाही, असे त्यांना कळवावे. त्याचप्रमाणे आमच्या युद्धनौकांना त्या दोघांच्या कुठल्याही बंदरात असलेल्या नौका पकडण्याचा आपण हुकूम करावा.

इंग्रजांनी जर आंग्र्यांवर हल्ला केला, तर इंग्रजांना मदत करावी. इंग्रज सेनापतीला कळवावे की, आंग्र्यांनी जर इंग्रज जहाजांचा शोध केला तर इंग्रज जहाजांच्या मदतीला युद्धनौका पाठविण्याचा माझा आपणास हुकूम आहे.

मराठ्यांवर टोला हाणल्याशिवाय ते प्रांतातून निघून जाणार नाहीत. तरी आपल्या सैन्याला आपण त्यांची कुरापत काढण्याचा हुकूम करावा, अथवा त्यांच्या खेड्यांची जाळपोळ करण्यासाठी व काही लोकांना पकडण्यासाठी नागरी वेषातील लोकांना पाठवावे.

मला असेही वाटते की, कल्याणवर हल्ला करण्याचाही जर बहाणा केला तरी देखील काम फत्ते होईल. त्यामुळे कदाचित त्यांच्यामध्ये लवकर घबराट माजण्याचीही शक्यता आहे.

जी जागा मोक्याची आहे असे आपणाला वाटते तेथे गोरे सैन्य केंद्रीत करावे. कारण, ठाणी मांडुआ, वगैरे ठिकाणी त्यांची विभागणी केली असता त्यांचे बळ विभागून जाईल व उत्तरेकडील प्रदेशाचा बचाव करणे त्यांना कठीण जाईल. काही लोकांचा असा दृष्टिकोण असण्याची शक्यता आहे की, सर्व पोर्तुगीज सैन्य जर एकीकडेच केंद्रीत केलेले मराठ्यांना आढळले, तर ते त्याला तेथे गुंतवून ठेवून दुसरीकडून हल्ले करतील. त्याला माझे असे उत्तर आहे की, तसे जर झाले तर आपणाला कल्याण आणि भिवंडी येथे आघाड्या

उघडता येतील. पण ह्या बाबतीत आपणाला जे काय वाटते त्याप्रमाणे इतर अनुभवी अधिकाऱ्यांचा सल्ला घेऊन वागावे.

इथून शनिवारपर्यंत दोन गालियोतासह एक फ्रिगेट पाठवित आहे. ह्या तिन्ही नौकांवरील सर्व सैन्य पोर्तुगीज आहे. ह्या सैन्याचा आपणाला आवश्यक असल्यास उपयोग करता येईल, न झाल्यास हे सैन्य मुंबईला किंवा वर्सोवाला पाठविता येईल. फक्त पंचवीस गोरे सैनिक तेवढे असू द्यावेत. त्यांच्याऐवजी देशी सैन्याला तोफखान्यावर काम करण्यासाठी पाठविता येईल. मुंबईच्या गव्हर्नरने मला हे सैनिक देऊ केले आहेत. ध्वजनौका आणि बाकीची दोन जहाजे आठ दिवसांनी निघतील. कारण, ह्या नौकांची अद्याप दुरुस्ती व्हावयाची आहे ती लवकरच होईल. अशी आशा आहे.

इंग्रज सेनापतीने माहीम येथीन युद्धनौका काढून घेतल्याबद्दल आपण त्यांच्याकडे जो खुलासा मागितलात ते चांगले केलेत. इंग्रज सेनापतीने काय जबाब दिला ते मला कळवावे. आपण महाराजांची सेवा कळकळीने आणि उत्साहाने कराल अशी आशा बाळगतो.

पाद्री कारभाऱ्याला पैशांची मदत कर म्हणून पत्र पाठवीत आहे. कारण, गोव्याच्या वखारीची स्थिती वसईच्या वखारीसारखीच आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १३ डिसेंबर, १७३०. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(89) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 94.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला पुनः आठवण करून देतो की, मराठ्यांनी पोर्तुगिजांचा जो प्रदेश बळकावला आहे, तो त्यांनी खाली केल्याशिवाय त्यांच्याशी तहाच्या वाटाघाटी करू नयेत की, व्यापार करू नये.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश, ह्यांस---

आपले पत्र पावले. त्या पत्रात आपण खबर दिली आहे की, आपला चुलतबंधू निघून गेल्यावर दोन दिवसांनी कल्याणचा रहिवाशी आला. आपण पुढे म्हणता की, असेरीच्या कॅप्टनच्या पत्रावरून कोल राजा मध्यस्थी करण्यास तयार असल्याचे कळते. तसेच कल्याणच्या युद्धकैद्यांनी आपणाला पत्रेही लिहीली असल्याचे आपण म्हणता. दमणच्या कॅप्टनने आपणाला सादर केलेला अहवाल आणि आपल्या हुकूमान्वये कॅप्टन मोर आंतोनियु द सांतुश ह्यांनी पाठविलेली पत्रांची उत्तरे ह्यांचाही त्या पत्रात उल्लेख असून बाजीरावाच्या

सैन्यासंबंधानेही आपण लिहिले आहे. ह्या पत्राचे उत्तर करताना मला आपणास सांगायचे आहे की, कल्याणच्या कैद्यांची पत्रे आणि तिथल्या व्यापाऱ्यांचा प्रस्ताव ह्यावरून खंडणी देण्याच्या अटीवर आपण तहाला तयार होऊ नये. तसेच मराठ्यांनी आमच्या स्वामीचा जो मुलुख बळकावला आहे तोही त्यांना सोडून देण्यास तयार होऊ नये.

कोल राजाच्या मध्यस्थीला आपण मान्यता दिलीत ते चांगले केलेत. पण त्यांचा प्रस्ताव जर वरच्या प्रकरणासारखा असेल तर मात्र कधीच मान्यता देऊ नये. असेरीच्या कॅप्टनच्या पत्रात जो तहाचा प्रस्ताव मांडण्यात आला आहे तो बनावट आणि सदोष आहे असे मला वाटते. माझी अशी ठाम समजूत आहे की, ह्या लोकांना तहाच्या वाटाघाटी करण्याचा बहाणा करून आमच्याकडून मीठ आणि इतर खाद्योपयोगी वस्तू उपटायच्या आहेत. ह्या वस्तूंची त्यांच्याकडे मोठीच टंचाई आहे. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, आपण त्यांचा तहाचा प्रस्ताव कोणत्याच कारणावरून अथवा तत्वा-वरून मान्य करू नये. मात्र त्यांनी जर आमचा मुलख आम्हाला परत केला आणि शांतता प्रस्थापित केली, तर मात्र व्यापारावरील निर्बंध उठविण्यास हरकत नाही.

मला असाही संशय येतो की, बाजीरावाचे आगमन होईपर्यंत आम्हाला तहाच्या वाटाघाटीमध्ये गुंतवून ठेवण्याचा त्यांचा हा बनाव असावा.

कोल राजाही पक्षपाती असावा असे मला वाटते. त्याच्या वकिलाला छेडले असता त्याचे धोरण काय आहे ते त्याच्याकडून कळेल. आपण कल्याणच्या युद्धकैद्यांना ज्या प्रकारचे पत्र घातले आहे, त्याच प्रकारचे पत्र आपण कोल राजालाही घालावे.

कापितांव--मोर सांतुश ह्यांचे पत्र मिळताच मनोरा नदीतील होडग्यांवर हल्ले चढवावे. तसेच मुलकी पोषाखातील लोकांना शत्रूच्या प्रदेशात छापे घालण्यासाठीही पाठवावे.

आमच्या मुलुखाच्या भोगवटयाबाबत शत्रू ज्या पैशाची मागणी उत्पन्न म्हणून करीत आहे, तो पैसा त्यांना देऊ नये. परंतु देणगी अथवा भेट म्हणून काही देण्यास हरकत नाही. पण ती देताना असा आव आणावा की, ती त्या त्या सरकारच्या हुकूमामुळे देण्यात येत नसून केवळ स्वेच्छेने दिली जात आहे.

त्या प्रांताला मी जी कुमक पाठवित आहे ती पोर्तुगीज सैनिक आणि खलाशी ह्यांची मिळून बनलेली आहे. आणखी दीडशे देशी शिपाईही पाठवित

आहे. त्यांचा उपयोग सर्व शिबंद्यांसाठी करण्यास हरकत नाही. माझ्या हुकुमाप्रमाणे सर्व जहाजे मुंबईला पाठविण्यास हरकत नाही.

ज्यावेळी तह होईल किंवा शत्रू माघार घेईल, किंवा त्यांनी आमचा मुलुख सोडून जाण्याची आमची अट मान्य केली, तर युद्ध नौकांवरील शिबंद्यांना ताबडतोब त्यांच्या नौकांवर पाठवून त्यांना माझ्या रेजिमेंटकडे रवाना करावे. मीठ काढणाऱ्या आगऱ्यांनी जरी केवढीही हाकाटी केली तरी थोडेदेखील मीठ आपण कुठेच पाठवू नये.

आपल्या प्रांताला आर्थिक मदत करण्याच्या बाबतीत मार्ग शोधून काढल्यावर मी आवश्यक ते हुकूम काढीत आहे. मला वाटते की पैसा कमी पडणार नाही. घोडे, बाँब आणि तो पाठवीत आहे.

कैद्यांच्या छळाच्या बाबतीत आपण मराठ्यांचा मुलाहिजा बाळगू नये. आणि जर कल्याणच्या सुभेदाराने धमकी दिली आणि कुरापत काढली तर टोला लावण्याची संधी दवडू नये.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ११ जानेवारी १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(92) BASAIM, No. 5, FLS 100.

व्हाइसरॉय वसईला कुमक पाठवून त्या प्रांताच्या सेनापतीला कळवितो की, मराठ्यांनी जो प्रदेश व्यापिला आहे, तो त्यांनी खाली केल्याशिवाय त्यांच्याशी तहाची बोलणी करू नयेत.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा दा मिनेझिश ह्यांस—

आपण ज्या कुमकेची वाट पहात होता ती शेवटची कुमक तिकडे जात आहे. कुमकेची आणखी आवश्यकता असल्यास ध्वजनौकेवरील पायदळही मी तिकडे पाठवू शकेन. आपण सेनापतीला पत्र घालून कळवावे की, ते सैन्य आपल्या हवाली करण्याचा आपणाला हुकूम देण्यात आला आहे.

माझी अशी समजूत आहे की, त्यांच्यावर कुठे तरी एके ठिकाणी प्रहार केल्याशिवाय ते प्रांत खाली करणार नाहीत. म्हणून आपण ह्या प्रश्नाला चालना देण्याची संधी दवडू नये. आणि ज्यावेळी त्यांच्याकडील माणसे थोडा मुलुख आपणाकडे देऊन अथवा खंडणी लादून तहाच्या वाटाघाटी करण्यास तयार होतील तेव्हा त्यांना आपण निक्षून सांगावे की, त्यांनी टेकड्या आणि

प्रांत खाली केल्याशिवाय त्यांच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्याचा आपणास माझा हुकूम नाही. आणि त्यांनी जर आपली मागणी मान्य केली नाही, तर मग त्यांच्याशी नेटाने युद्ध चालू ठेवावे.

प्रांतात शांतता प्रस्थापित झाली की, फ्रिगेटच्या शिबंद्या ज्यांच्या त्यांना परत कराव्या. मात्र कॅ. झुजे द आझेवेदु ह्यांचे गालियोत तेवढे ठेवून घ्यावे व नवीन पाले तयार करून त्याच्यावर कॅ. आंतोनियु आंद्राद ह्यांना पाठवून द्यावे. म्हणजे त्यांना आरमाराबरोबर जाण्याची सिद्धता करता येईल.

जे देशी लष्कर तिकडे गेले आहे आणि जात आहे त्याला आपणास पावसाळा संपेपर्यंत ठेवून घेता येईल. त्याचा उपयोग आपणाला साष्टी बेटाच्या किंवा आपणास वाटेल त्या भागाच्या संरक्षणासाठी उपयोग करता येईल.

नवीन पाले दुसऱ्या पालाबरोबर परत येईल. त्या दोन्हींच्यावरील दिडशे पोर्तुगीज सैनिकांना आपणास पावसाळ्यापर्यंत ठेवून घेता येईल. शिपायांनी पळून जाऊ नये म्हणून आपण फार काळजी घेणे आवश्यक आहे. कारण त्यांची आम्हाला फार जरुरी आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २० जानेवारी १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(93) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 101V.

व्हाइसरॉय वसई येथील पोर्तुगीज फौजांचे कॅप्टन मोरला लिहितो की, त्याने गडावर हल्ला केला नाही ते चांगले केले. त्याच्यामते मराठे पोर्तुगिजांना भिऊन पळून गेले तर बरे--

"उत्तरेकडील प्रांतातील कंपन्याचे कॅप्टन--मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांस--

कॅप्टन आंतोनियु दुश सांतुश ह्यांचे मला जे पत्र आले आहे त्या पत्राचे उत्तर करताना मला त्यांना सांगावयाचे आहे की, त्यांनी गडावर हल्ला केला नाही ते चांगले केले. गडावर हल्ला करण्याचा आपणाला सेनापतीचा हुकूम होता हे आपल्या पत्रावरून कळले. तथापि माझा आपणाला सल्ला आहे की, शत्रूची कुरापत काढण्याची आपण एकही संधी दवडू नये. त्यामागील हेतु हा की, शत्रूने टेकड्या आमच्या भीतीने खाली कराव्या अथवा शत्रूला आमची भीति वाटावी. म्हणून कॅप्टन मोरना माझी सूचना आहे की, त्यांनी शत्रूची कुरापत काढण्याची एकही संधी दवडू नये. मला कळले आहे की,

शत्रूला आमची भीती वाटल्याशिवाय तो आमच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी येणार नाही. आणि जर मराठ्यांना कळले की, हिंदुस्थानात जे पोर्तुगीज सैन्य आहे, ते वसई व ठाणे ह्या दोन्हींचाच तेवढा बचाव करण्यास बस आहे, तर मग पोर्तुगीज सैन्याचा वचक कमी होईल. गोष्ट अशी आहे की, ह्या युद्धात एका किंवा दुसऱ्या भागावर तीन किंवा चार वेळा हल्ला झाला तो त्याचा बचाव पोर्तुगिजांवाचून करता येईल. शत्रू सैन्य कमी आहे, माझी अशी समजूत आहे की, पोर्तुगीज सैन्याला येण्यास दोन किंवा एक दिवस उशीर झाला, तरी देखील शत्रूला कसब्यावर हल्ला करण्याचे धाडस होणार नाही. आणि ज्याअर्थी आम्हाला कल्याण घेता येत नाही, दहशत घालता येत नाही, त्यांची खेडी जाळता येत नाहीत, आणि ख्रिश्चन धर्माची दीक्षा देण्यासाठी मुले पकडता येत नाहीत, आणि तहही करता येत नाही, त्याअर्थी, कापितांव--मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी हे सर्व सेनापतीसमोर मांडण्याची संधी दवडू नये. कारण शिपायांची एक फिरती तुकडी बनवून ती शत्रू प्रदेशात पाठविता येईल.

मी जे पोर्तुगीज सैन्य तिकडे पाठविले आहे, त्यातील इकडे परत आलेले पोर्तुगीज सैनिक सोडल्यास उरलेले सैनिक चारशे अठ्याण्णव आहेत. शिवाय अधिकारी आहेत ते वेगळेच. शिपाई अडीचशे आहेत. आणि मी जर ध्वजनौका तिच्या शिबंदीसह तिकडे पाठविली आणि गालियोत सांताक्रुझ मागे घेतले, तर गोरे सैनिक शिपाई ३८ व स्थानिक शिपाई मिळून ह्या सगळ्यांची अशी एक चांगली तुकडी बनेल की, ती शत्रूची दमछाट करण्यास बस होईल. सैन्यासंबंधी मी सेनापती आणि कापितांव मोर ह्या दोघांना लिहीत आहे. शत्रू सैन्यामध्ये अस्वस्थता निर्माण झालेली मला हवी आहे. त्यांना जर लूट मिळाली नाही, आणि धोक्याची भीती वाटली तर ते तहाला ताबडतोब तयार होतील असे वाटते. आणि असे जर झाले तर कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी माझ्याकडे ज्या गोष्टींची मागणी केली आहे ती गोष्ट त्यांना ताबडतोब पाठवून दिली जाईल.

उत्तरेकडील प्रांतात पोर्तुगीज सैनिक आणि खलाशी ह्यांचा जो आकडा आहे, तेवढा आकडा तिकडे यापूर्वी कधीच नव्हता. त्या सैन्याच्या बळावर कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश हे त्यांना हवे ते साध्य करू शकतील. कारण त्यांचा अनुभव आणि त्यांचे शौर्य मोठे आहे".

गोवा, ५ मार्च १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(94) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 103V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस कळवितो की, त्याने शत्रूच्या खेड्यांची जाळपोळ करण्याचा जो निर्णय घेतला आहे त्याला आपला पाठिंबा आहे. ह्याच पत्रात त्याने उत्तरेकडील सेनापतीला आणखीही काही सूचना केल्या आहेत.

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यास--

शत्रूची खेडी जाळण्याचा व त्याच्या ताब्यात असलेल्या आमच्या कुणब्यांची मुक्तता करण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे, तो मला मान्य आहे. मला आलेल्या अनेक पत्रावरून कळते की, हा हुकूम अमलात आणणाऱ्या माणसांकडून लोकांवर जुलूम जबरदस्ती झाली आहे, व अनेक कुणबी मारले गेले आहेत. ह्या बाबतीत दों. मानुएल लेत्रोनिश द कास्त्रु ह्यांच्याकडून पुष्कळच अतिरेक झाला आहे. ह्या आरोपावर माझा विश्वास बसत नाही पण आपण काळजी घ्यावी अशी माझी आपणाला सूचना आहे. माझा आपणाला हुकूम आहे की, शत्रूवर टेकड्या, नद्या किंवा जंगले येथे हल्ला करण्याची आपण एकही संधी दवडू नये. तसेच मुलकी माणसे आणि लष्करी शिपाई ह्यांना खेड्यामध्ये पाठवून त्यांच्याकडून आपण शत्रूचा पाठलाग करावा आणि जर कोल राजाच्या दूतांनी तह घडवून आणण्याचा प्रयत्न केला व खंडणीची अथवा शत्रूच्या हातात जो मुलुख आहे तो त्याच्या पाशीच ठेवण्याची त्यांनी मागणी केली तर त्या दूतांना रजा द्यावी.

कसब्यातील शिबंदी काढून घेतली तर त्याला धोका निर्माण होईल असे जे सांगण्यात येते ते मला पटत नाही. कारण ह्याच कसब्यावर ह्या पूर्वी दोन किंवा तीनदा हल्ला झालेला आहे. त्यावेळी तेथे पोर्तुगीज सैनिक नसतानादेखील मुलकी माणसांनी त्याचे रक्षण केले होते.

आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी फार दूर जाऊ नये. शत्रूने हल्ला केला तर आपल्या सैन्याला मदत मिळणे कठीण होईल इतके दूर त्यांनी जाऊ नये. शत्रूला कळता कामा नये की, सर्व पोर्तुगीज सैन्य कसब्यामध्ये त्याच्या रक्षणासाठी गोळा झाले आहे. तसे जर झाले, तर शत्रूला पोर्तुगीजांविषयी जो वचक वाटतो तो कमी होईल. शत्रूची हानी कितपत करता येईल तत्संबंधी आपण झुजे द मिरांद व आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्याशी विचारविनिमय करावा. त्यांनाच ही योजना अमलात आणण्याचा हुकूम करावा. परंतु त्याबाबतीत गुप्तता राखावी. कारण, त्याचा शत्रूला सुगावा लागता कामा नये. ही योजना जर यशस्वी झाली, तर शत्रूच्या मनात आमच्या विषयी

आदर आणि भीती निर्माण झाल्यावाचून राहाणार नाही. ह्या कामाचे महत्त्व आपण लक्षात घ्यावे.

मुंबईहून इकडे कळविण्यात आले आहे की, कल्याणहून जहाजे वसईला व्यापारासाठी येत असतात. मराठ्यांशी युद्ध केल्याशिवाय ते उत्तरेकडील मुलुख सोडणार नाहीत. मराठ्यांचे जे उत्तरेकडे सैन्य आहे ते पाचशे लष्करी शिपाई आणि चारशे घोडेस्वार ह्याच्याहून अधिक नाही. त्यांची विभागणी शिबंद्यामध्ये झालेली आहे. माझ्या कानावर जे काय आले आहे, त्यावरून मी आपणाला इशारा देत आहे की, आपण ह्या गोष्टीवर इलाज करावा. असेही सांगण्यात येत असे की, जोपर्यंत कैदी कल्याण येथे आहेत तोपर्यंत मराठे त्यांना जे काय हवे आहे ते करणार आहेत.

इंग्रजांनी आंगऱ्यांशी तह केलेला मला नको आहे. कारण, मला माहीत आहे की, त्यांनी तह करू नये असा त्यांना विलायतेचा हुकूम आहे. तह करण्यात त्यांचा काही फायदा आहे असे मला वाटत नाही. त्यांचा हा सगळा खटाटोप युद्ध कैद्यांची अदलाबदल करण्यासाठी आहे. तरी ह्यासंबंधीची चौकशी करून मला काय ते त्वरीत कळवावे. म्हणजे मला पुढचे पाऊल टाकणे सुलभ होईल.

कोणत्याही परिस्थितीत युद्धनौका आणि त्यांच्यावरील शिबंदी पावसाळ्यामध्ये ह्या किनाऱ्यावर असता कामा नये. म्हणून माझी आपणाला आज्ञा आहे की, नाव वोलांदेझा आणि नाव फिस्काल, आरमार तयार झाल्यावर त्यांच्या खलाशांसह इकडे पाठवून द्याव्या. त्याचप्रमाणे प्रत्येक नौकेवर गेलेली ग्रॅनेडियर्सची कंपनीही इकडे पाठवून द्यावी. फ्रान्सिस्कु झुजे हे गलबतही पाठवून द्यावे.

छोटी गलबते त्यांच्या शिबंद्यासह पावसाळ्यामध्ये तिकडे राहिली तर हरकत नाही. बेर्नार्द आंतोनियु ह्यांचे गलबत त्याच्या शिबंदीसह ताबडतोब परत करून ते सेनापतीच्या हवाली करावे. सेनापतीवर मी जी कामगिरी सोपविली आहे ती त्यांना ताबडतोब पार पाडता यावी म्हणून ध्वजनौका तिच्या शिबंदीसह त्यांच्या हवाली करावी. ह्या बाबतीत हलगर्जीपणा करू नये. कारण, ते काम प्रांताच्या हिताचे आहे. जे जादा सैनिक असतील ते पावसाळ्यामध्ये तिकडे राहतील. पण तेही तह झाला नाही तरच. आणि जर तह झाला तर वोलांदेझा आणि फिस्काल ह्या दोन्ही नौका त्यांच्या शिबंद्यांसह ताबडतोब इकडे पाठवून द्याव्या. आपणाला जितक्या शिपायांची आवश्यकता असेल तितक्यांची उभारणी करावी किंवा हे शिपाई दीव किंवा मुंबईहून

आणावे. मला वाटते ठाणे येथील शिबंदीला कुमक पाठविलेली बरी. आपण तिथल्या तटबंदीला भेट दिल्याचे पत्रात लिहिलेच आहे. माझी अशी समजूत आहे की, सोपाराला लष्कर उपयोगी पडेल. शत्रूच्या खेड्यात गडबड उडवून देण्यासाठी शिपायांच्या एका फिरत्या तुकडीचा उपयोग होईल. ह्या तुकडीचे वेगवेगळे गट पाडावे. हे काम लेफ्टनंट गिनाल चांगले पार पाडू शकतील. कारण, अशा युद्धात ते चांगले तरबेज आहेत. आपण त्यांना ही कामगिरी स्वीकारण्याबाबत कळवावे व त्यांनी ती स्वीकारावी म्हणून त्यांना प्रवृत्त करावे.

तह जर लांबणीवर पडला, तर मराठ्यांना धमकी द्यावी की, आमच्या हातात जी त्यांच्या मुलुखातील बायकामुले पडलेली आहेत, त्यांना आम्ही बाटविणार आहोत. आणि ही धमकी त्यांना खरी वाटावी म्हणून सदहू बायकामुलांना पाद्री पायदुश किस्तांवुश (ख्रिश्चनांचा पिता) ह्यांच्या हवाली करावे. परंतु त्यांना आतून सांगावे की माझा हुकूम आल्यावाचून त्यांना बाटवू नये. खाद्य वस्तू बाहेर न पाठविण्यास माझी मान्यता आहे. त्याच-प्रमाणे मुंबईच्या गव्हर्नरला त्याच्या व्यापारासंबंधी जे उत्तर आपण पाठविले आहे, तेही मला पसंत आहे. आपण कोणत्याही परिस्थितीत व्यापार कल्याणला जाऊ देता कामा नये.

मराठे मीठ नेत असलेले पाहून वाईट वाटते. पण त्यावर इलाज नसल्याने गप्प राहिले पाहिजे. सां लुईज ह्या छोट्या फ्रिगेटवर दारूगोळा आणि दिडशे बंदुका पाठविण्यात येत आहेत.

जी हत्यारे तिकडे दुरुस्त करता येत नाहीत ती इकडे पाठवून द्यावी, म्हणजे ती पावसाळ्यामध्ये दुरुस्त करता येतील.

आंग्रे आणि मराठे ह्या दोघांची युती होते की काय ह्यावर माझे लक्ष आहे. आपणाला जर ह्या संबंधी काही बातमी कळली तर ती मला ताबडतोब कळवावी. आंग्र्याने त्याच्या ग्रिये येथील बंधूमार्फत माझ्याकडे तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या आहेत. पण त्यावर माझा विश्वास बसत नाही. कारण, माझ्याशी किंवा इंग्रजांशी युद्ध करण्याचा त्याचा विचार आहे. सुरते-हून बातमी आली आहे की, किलिचखान सत्तर हजार घोडदळासह चालून येत असून तो पंचवीस मैलावर आहे. तो तिकडे महाराजा जयसिंग ह्यांच्या पंचवीस हजार घोडेस्वारांची वाट पहात आहे. हे सर्व सैन्य शाहूराजे ह्यांच्या विरुद्ध आहे असे सांगण्यात येते पण माझा त्यावर विश्वास बसत नाही.

आपल्या पत्रात जे काय अधिक आहे त्याचे उत्तर मी सावकाशीने देईल. आपण त्या प्रांताचा कारभार कुशलतेने हाकता आहात असे मला सान थोरांकडून कळले आहे. त्याबद्दल मला आनंद होत आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ७ मार्च १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(95) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 107.

एका लष्करी अधिकाऱ्याने मराठ्यांवर मनोरा येथे विजय मिळविल्या बद्दल व्हाइसरॉय त्याचे पुढील पत्रात अभिनंदन करतो.

आंतोनियु दुश सांतुश ह्यांस—

कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी मनोरा येथे जो विजय मिळविला त्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो, व त्यांचे आभारही मानतो. ह्या विजयाने पोर्तुगिजांच्या नावाचे पुनरुत्थान झाले आहे, ह्यात शंका नाही. ह्या विजयाची अपेक्षा करीत नव्हतो.

कॅ. आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्याबरोबर ह्या मोहिमेत ज्या अधिकाऱ्यांनी भाग घेतला, त्यांचेही मी आभार मानीत आहे. त्या सगळ्यांना आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी बोलवून घेऊन त्यांना माझा ठराव कळवावा. त्या सगळ्यांना मी बढती देण्याचे ठरविले आहे. ह्या अनुभवावरून एक गोष्ट सिद्ध झाली आहे ती ही की, पोर्तुगिज थोडे असूनदेखील ते पुष्कळ आशियाटिक लोकांचा पराभव करू शकतात. माझी अशी समजूत आहे की, असेच विजय मिळाल्याशिवाय मराठे हा प्रदेश सोडणार नाहीत. मला आशा आहे की आपणाला यापुढे असेच विजय मिळत राहतील. कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी असेच विजय मिळवून मराठ्यांचा पिच्छा पुरवावा, व त्यांना हैराण करून सोडावे. त्यांना आमच्या प्रदेशातून हुसकून लावण्यासाठी म्हणून नव्हे, तर आमच्या प्रदेशाचा त्यांनी उपयोग करू नये व त्याचा फायदा त्यांना मिळू नये, आणि त्यांना स्वास्थ्य लाभू नये म्हणून.

कॅप्टन मोर आंतोनियु दुश ह्यांनी माझ्याकडे जो हुद्दा मागितला आहे तो त्यांना देण्यास कोणतीच हरकत नाही. परंतु तो त्यांना तह झाल्यावर मिळेल. त्याचे कारण हे की, एका ठाण्यामध्ये शौर्याने लढून त्याचे रक्षण करणाऱ्या अधिकाऱ्याला तिथून काढणे बरोबर नाही. आणि त्यातल्या त्यात माझ्या सैन्यामध्ये आघाडीवर लढणाऱ्या आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्यासारख्या

वीराला तर तिथून काढण्याचा माझा मुळीच विचार नाही. अशा पराक्रमाबाबत बक्षिसे देण्यात येतात. आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी त्यांना मिळणाऱ्या बक्षिसाचा स्वीकार करण्यासाठी एकाद्या व्यक्तीची नेमणूक करावी.

गलबत निघण्याच्या घाईत असल्याने मला ह्याशिवाय अधिक काही लिहिता येत नाही. अशाच विजयाची वाट पाहात आहे.

गोवा, १७ मार्च १७३१ ज्युआंव द सल्दान्य द गामा

(97) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 108.

व्हाइसरॉय बसईतील परिस्थितीचा आढावा घेऊन पोर्तुगालला राज्य सचिवास पुढील पत्र लिहितो---

"राज्य सचिव दियोग द मेंदोंस कोर्ते रेआल ह्यास---

हे पत्र मी आपणाला बसरामार्गे पाठवित आहे. सां तेरेझा ह्या नौकेवर पाठविलेल्या पत्रापेक्षा हे पत्र आपणाला लवकर मिळेल अशी आशा आहे. ही नौका इथून पाच जानेवारीला निघाली आहे. आपण महाराजांना पुढील बातम्या सादर कराव्या.

मराठ्यांनी अद्याप उत्तरेकडील प्रांतातील आक्रमण मागे घेतलेले नाही. पण मी इथून तिकडे सैन्य पाठविल्यावर मराठ्यांनी चकमकी बंद केल्या आहेत. तथापि आम्ही त्यांच्या खेड्यामध्ये कुरापती काढण्याचे सत्र चालू ठेवले आहे. त्याचा परिणाम इष्ट तोच होऊन अनेक खेडी ओस पडली आहेत. ह्याशिवाय मराठ्यांनी आमची जी खेडी घेतली आहेत, त्या खेड्यातही दंगली माजविण्याचा निर्णय मी नुकताच घेतला आहे. त्याची परिणती खेडी निर्मनुष्य होण्यात झाली आहे. ह्या दंगलीमुळे मराठ्यांचे जकातीचे उत्पन्न घटले आहे व आमच्या बंदरातून त्यांना माल मिळेनासा झाला आहे. ते आता आमच्याकडे तहाची मागणी करतील अशी मला आशा वाटते. दुसरी गोष्ट अशी की, मराठ्यांच्या प्रदेशातून पकडून आणलेली अनेक बायका-मुले आमच्या हातात आहेत. त्यांना बाटविण्याची धमकी दिली आहे. ही गोष्ट त्यांच्या मनाला फार लागते.

साष्टी बेटाचे रक्षण करण्यासाठी इंग्रजांकडून आम्हाला मदत झाली. ती मदत जर झाली नसती तर ते बेट उध्वस्थ होऊन गेले असते, पण तिकडे मी शिबंदी पाठविल्यावर त्यांनी जेव्हा माघार घेतली तेव्हा त्यांनी माझ्याकडे मराठ्यांशी व्यापार करण्याची परवानगी मागितली. काही झाले तरी ते

व्यापारी लोक आहेत. त्यांना मराठ्यांच्या गरजांचा आपल्या फायद्यासाठी उपयोग करून घ्यायचा आहे. मराठ्यांपाशी जीवनोपयोगी वस्तूंचा तुटवडा आहे. मी इंग्रजांना अद्याप मराठ्यांशी व्यापार करण्याची परवानगी दिलेली नाही. पण मला अशी भीती वाटते की, जर ही परवानगी मिळाली नाही तर ते विलायतेहून आलेल्या हुकुमाविरुद्ध आंग्यांशी तह करतील. आंग्रे त्यांना विरोध करणार नाहीत. आणि पावसाळ्यामध्ये त्यांना समुद्रावर आंग्यांची भीती वाटत नाही. अशा रीतीने ते आंग्यांच्या प्रदेशातून मराठ्यांशी व्यापार सुरू केल्यावाचून राहाणार नाहीत. असे जर झाले तर मला भीती वाटते की, मराठ्यांचे बळ वाढेल. ते अंदाजे एक लक्ष घोडदळ गोळा करतील असे वाटते. त्यामुळे माझ्या कष्टात पुष्कळच भर पडणार आहे. ते आमची ठाणी घेणार नाहीत. कारण ते शास्त्र त्यांना अवगत नाही. पण काही झाले तरी त्यांच्याशी युद्ध चालू ठेवणे आम्हांला जड जाईल.

मोगल बादशहाचे एक बलाढ्य सैन्य मराठ्यांवर चालून येत आहे. परंतु मोगलांचे सरदार हिंदू किंवा मराठ्यांच्या जातीचे असल्याने ते त्यांच्याशी तह करतील अशी मला भीती वाटते. आणि मराठ्यांचे सैन्य नष्ट होणार नाही. कारण ते मोठे असून मराठे गनिमी काव्याने लढतात. ते शत्रूशी समोरासमोर न लढता त्याच्यावर चोरटे हल्ले चढवून त्याला हैराण करून सोडतात.

हे मराठे म्हणजेच शिवाजीचे वारसदार होत. आपणाला कदाचित माहीत असेलच की, कौंट द आल्व्होर ह्यांच्या आमदानीत शिवाजीचे आणि आमचे युद्ध जुंपले असता मोगल बादशहा आमच्या मदतीला आला होता व त्याने शिवाजीच्या सैन्याचा नाश केला होता.

आंग्यांनी आमच्याशी उघड उघड शत्रुत्व आरंभिले आहे. सिद्दी अलग आहे. परंतु उत्तरेकडील युद्धातून मुक्त होताच, त्याला मी शरण येण्यास लावणार आहे. आंग्यांची चांचेगिरी मी बंद पाडीन आणि ज्या व्यापारावर आज सिद्दी पोसला जात आहे त्याचा तो व्यापार मी बंद पाडीन. परंतु हे दोघे आमच्याशी लढण्याकरिता मराठ्यांना उत्तरेकडील प्रदेशात मदत करतील अशी मला भीती वाटते. तथापि, हा निर्णय ते घेतीलच असे सांगता येत नाही.

मला दारूगोळा, हत्यारे आणि तोफा ह्यांची फार आवश्यकता आहे. सर्व फ्रिगेट्स सज्ज करण्यात आली आहेत. आणि प्रदेशाच्या रक्षणासाठी जर माणसे असली तर महाराजांनी मला जी आज्ञा केली आहे ती अमलात

आणण्याचा मी प्रयत्न करीन. माणसे आली नसल्यास मात्र मला बचावा-पलीकडे दुसरे काही करता येणार नाही. ह्या बाबतीत देव मला मदत करील अशी आशा बाळगतो.

ध्वजनौका आणि गालिया ह्या दोन्हींचा अद्याप पत्ता नाही. त्यांच्या-वरील माणसे बेपत्ता झाली आहेत असे गृहीत धरून आम्ही त्यांच्याविषयी शोक करण्यास सुरुवात केली आहे. साष्टी बेटाच्या रक्षणाचे कामी इंग्रजां-कडून आम्हांला जी मदत झाली, त्याबद्दल इंग्लंडच्या राजाचे आभार मानणे सयुक्तिक ठरेल.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, २० मार्च १७३१.

वसई प्रांतातील पोर्तुगीजांनी मराठ्यांवर विजय मिळविल्याची बातमी गोव्याच्या व्हाइसरॉयला कळताच त्याने त्या प्रांताच्या गव्हर्नरचे अभिनंदन करून पुढील पत्र लिहिले--

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हेरा द मिनेझिश ह्यांस--

ईश कृपेने त्या प्रांतातील विजयाची बातमी ऐकावयास मिळाली. आपण मेहनत घेऊन अचूकपणे हा विजय मिळविलात ह्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. तिकडून आलेल्या बहुतेक सर्व पत्रांनी आपला गौरव केला आहे.

राष्ट्राच्या आणि धर्माच्या रक्षणार्थ काही सैनिकांनी आपले बलिदान केले म्हणून मला त्याची फिकीर वाटत नाही. शत्रूने त्यांचा आत्मविश्वास आणि त्यांचा पराक्रम जाणून घेण्यातच आमचा मोठेपणा आहे.

आंतोनियु दुश सांतुश हा खरोखर एक मोठा वीर आहे ह्यात शंका नाही. शत्रू आजपर्यंत आमच्या अपयशावर तेवढा विसंबून राहिला. यापुढे आपली उत्तरोत्तर भरभराट होईल व शत्रूला आपली भीती वाटेल अशी आशा बाळगतो.

आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्याबरोबर त्या लढाईत ज्या अधिकाऱ्यांनी भाग घेतला त्या सगळ्यांना आपण बोलावून घेऊन त्यांचे आभार मानावे व त्यांच्या पराक्रमाचे योग्य ते चीज केले जाईल असे त्यांना आश्वासन द्यावे.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, २० मार्च १७३१. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(94) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 109.

गोव्याचा व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला मराठ्यांसंबंधी काही सूचना देऊन पुढील पत्र लिहितो--

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हेरा मिनेझिश ह्यांस--

गलबतावर आलेल्या पत्रांतील मुद्यांची उत्तरे देताना मला आपणास कळवायचे आहे की, कोल राजाने तहाच्या मागणीखाली जे चातुर्य दाखविले त्याबद्दल मला आश्चर्य वाटत नाही. त्याला तहाची बोलणी करून खरोखरच आमच्या प्रदेशात आक्रमण करायचे होते. ह्या बाबतीत मी आपणाला माझ्या मागच्या पत्रात इशारा दिलाच आहे. मराठ्यांना युद्धाची झळ पोहोचल्याशिवाय ते तह करण्यास तयार होणार नाहीत, आणि आमचा मुलुखही ते खाली करणार नाहीत. आपणाला ह्याची जाणीव मी मागेच करून दिली आहे. म्हणून आपण आता तहावर विसंबून राहू नये. पण ते जर स्वतः होऊन तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आले, तर आपण त्यांना सांगावे की, त्यांनी मुलुख खाली केल्याशिवाय चकमकी थांबणार नाहीत.

आपणाला एखादी कामगिरी पार पाडायची झाल्यास ज्या अधिकाऱ्यावर आपण ही कामगिरी सोपविणार आहात त्याला ती विदित करून ह्या बाबतीत त्याला आपण सल्ला द्यावा. ह्या कामगिरीची वार्ता जर दुसऱ्याला कळली तर तिचे गौप्य फुटेल. म्हणून काळजी घ्यावी.

आपण जर मनोऱ्याला तत्परतेने मदत पाठविली नसती तर ते आम्हांला गमवावे लागले असते. ह्या ठाण्याच्या सेनापतीने त्यांची पाण्याच्या बाजूने तटबंदी केली तर बरे होईल. म्हणजे पावसाळा सुरू होण्यापूर्वी तटबंदी करण्याची आवश्यकता भासणार नाही. शत्रूने नदीमध्ये जे अडथळे उभारले आहेत ते विशेष महत्त्वाचे आहेत, असे मला वाटत नाही. कोल राज्य शत्रूला मदत करीत आहे ह्याबद्दल मला शंका वाटत नाही. आपण असेरीच्या सेनापतीला त्याच्या ठाण्याबाहेर न पडण्याची आज्ञा करावी. आणि कोल राजाने किंवा आणखी कुणी त्याच्याशी तहाच्या वाटाघाटी करण्याचा प्रयत्न केला तर त्याने सांगावे की, ह्या वाटाघाटी त्यांनी वसईमध्ये आपणाशी कराव्या.

पाद्री आंतोनियु द फिगेरेदु ह्यांच्या पत्राकडे तूर्त विशेष लक्ष देण्याची जरूरी नाही. कारण, महाराजा सवाई जयसिंग ह्यांनी शाहू राजे ह्यांना जे नवीन वेतन देऊ केले आहे ते ते स्वीकारतील, असे मला वाटत नाही. ह्या तनख्यातून शाहू राजे एक लक्ष घोडेस्वारांचा मुशाहिरा देऊ शकणार नाहीत, आणि त्यांचे सरदार आज जे लुटालुटीवर जगत आहेत तेही हा प्रस्ताव मान्य

करणार नाहीत. आणि शाहू राजेदेखील हा तनखा स्वीकारण्याइतके मूर्ख नाहीत. कारण, त्यांना माहीत असणे साहजिक आहे की, सैन्य हाताशी असल्याखेरीज तनखा सुरक्षित करणे अशक्य आहे. तीच गोष्ट शांततेचीही आहे. आणि लुटालूट केल्याशिवाय सैन्य ठेवणेही कठीण आहे, हे त्यांना माहीत नसावे असे म्हणता येत नाही. जर ही गोष्ट खरी असेल तर ते दोघे एकमेकांना फसवीत आहेत असे म्हणावे लागेल. बघू या दोघांपैकी कोण अधिक चतुर आहे ते.

आमच्या प्रदेशावर खंडणी लादण्याचा जर मराठ्यांचा विचार असेल तर त्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटणार नाही. माझा सर्व भार देवावर आहे. त्याने असे होऊ देऊ नये. अशी माझी त्याच्याकडे प्रार्थना आहे, बाजीरावाने पावसाळ्याच्या सुरुवातीला आमच्या प्रदेशात शिरू नये. मला ह्या बातमीविषयी शंका वाटते. कारण इकडचा सर्व प्रदेश उजाड असल्याकारणे त्याला इथे लुटण्यास काहीच मिळणार नाही. आणि म्हणूनच तो ह्या प्रदेशात उतरणार नाही असे मला वाटते. पण काळजी घेतलेली बरी. व त्याला माझी मान्यता आहे. तिकडे पाठविण्यासाठी दारूगोळा आणि हत्यारे तयार होत आहेत. जे जहाज हे सामान घेऊन जाणार आहे, त्याची एक डोलकाठी नादुरुस्त असून ती दुरुस्त झाल्यावर ते पाठवून देईन.

शत्रूने गोव्यामध्ये देखील दमबाजी सुरू केली आहे. पण मी जागरूक आहे. आणि त्याचीच मला आज जरुरी आहे. धैर्य आणि चिकाटी ह्या दोन्ही गोष्टी माझ्या अंगी आहेतच.

मी मुंबईच्या गव्हर्नरला लिहीत आहे. आपल्या पत्रात त्याला पाठवीत असलेल्या ज्या पत्राची नक्कल जात आहे त्यावरून आपणाला त्या पत्राची कल्पना होईलच. आंग्र्याने हुलुवे (?) वर पहारा ठेवल्याचे कळले. त्याच्या-वर हल्ला करणे शक्य होत असल्यास पहावे. आपण शत्रूची खेडी जाळण्याची मोहीम सुरू केली पाहिजे असा माझा आपणाला सल्ला आहे. आंग्रे हा आमचा सर्वांत मोठा शत्रू आहे. माझी अशी समजूत आहे की, तो ठाण्याला वेढा घालणार नाही. आणि त्याने जर हे धाडस केले तर त्याची गत मनोरासारखी झाल्यावाचून राहाणार नाही, अशी माझी खात्री आहे. शिपाई जरी वाईट असले, तरी ते चांगले होतील. आमच्याशी लढणाऱ्या मराठ्यां-पेक्षा ते चांगले होतील. त्यांचा उपयोग उघड्या ठाण्याच्या रक्षणासाठी व ज्या खेड्यात प्रतिकार होत नसेल ती खेडी जाळण्यासाठी होईल. आणि गोव्यामधून जी शिबंदी मागविली आहे ती मिळाली नाही तरी चालेल.

जी माणसे खेड्यामध्ये येऊ लागली आहेत, त्यांना आपण बऱ्या बोलाने किंवा वाईट रीतीने गोळा करावे. आणि आवश्यक असेल तर चंद्रवाडो गडावरही हल्ला करावा. ह्या गडावर ऐंशो किंवा शंभर शिपाई आणि एक पोर्तुगीज अधिकारी ठेवावा. आमच्या खेड्यात शत्रूला बऱ्या बोलाने पेरून देणे हा त्यामागील मुख्य हेतु आहे. सिद्दीचे गलबत आले. ते ताब्यात ठेवायचे नसल्यास परत करावे. परंतु हे सर्व माझ्या नावाने करू नये.

इंग्रज आपल्या सोयीसाठी भांडण उकरतात हे पाहून वाईट वाटते. मला माहीत आहे की, त्यांचे हे महत्वाचे राजकारण आहे. कल्याणमध्ये त्यांना व्यापार पाठवू देऊ नये. मुंबईच्या गव्हर्नरला कळवावे की, कल्याणला जहाजे पाठवू न देण्याचा व तिकडून जहाजे इकडे येऊ न देण्याचा माझा आपणाला हुकूम आहे. सिद्दीचे प्रकरण वेगळे आहे. त्याचा आणि ह्याचा काही संबंध नाही. तूर्त आम्हाला दुसरा इलाज नाही.

बखारवाल्याला चालू महिना अखेर थोडी रक्कम खर्चासाठी देण्यात येणार आहे. ह्या रकमेचा विनियोग अनाठायी होऊ नये म्हणून आपण काळजी घ्यावी. स्थलाभावी मी आणखी लिहू शकत नाही. मला आपणास आणखी काही लिहावेसे वाटल्यास ते छोट्या फ्रिगेटवर पाठविल्या जाणाऱ्या पत्रात लिहीन.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २० मार्च १७३१ — ज्युआंव द साल्दान्य द गामा

(100) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 109.

गैरहजर पोर्तुगीज सैनिकांनी पोर्तुगिजांच्या शत्रूशी लढण्यासाठी गोव्याला हजर व्हावे. म्हणून गोव्याच्या व्हाइसरॉयने पुढील आज्ञापत्रक काढले.

माझ्या स्वामीच्या राज्याच्या उत्तरेकडील प्रांताचे सांप्रत मराठे, आंग्रे, च्यूतिया, कोल वगैरे शत्रूशी युद्ध चालू आहे. पोर्तुगीज प्रदेशाच्या रक्षणासाठी व शत्रूला शासन करण्यासाठी लष्कराची संख्या वाढविणे आवश्यक आहे. तरी गैरहजर असलेल्या सर्व पोर्तुगिजांना माझी आज्ञा आहे की, त्यांनी हा हुकूम अमलात यावा म्हणून तावडतोब गोव्याला हजर व्हावे. जो कुणी फरारी झाला आहे, अथवा ज्याच्या हातून एकादा गुन्हा घडला आहे, असा पोर्तुगीज जर ह्या आज्ञेप्रमाणे गोव्याला हजर झाला तर त्याचा गुन्हा त्याला माफ केला जाईल. अशा आणीबाणीचे प्रसंगी आपल्या राजासाठी लढण्याकरता सर्व पोर्तुगिजांनी गोळा झाले पाहिजे. जे कुणी ह्या आज्ञेचा भंग करतील

त्यांना कडक शिक्षा केली जाईल. मंगलोरच्या वखारदाराला त्याच्या सहीचे आज्ञापत्रक काढून गुन्हेगारांना अभय देता येईल. मात्र ह्या गुन्हेगारांनी ताबडतोब सैन्यात भरती झाले पाहिजे. ते पत्रक म्हणजे ह्याच आज्ञेची नक्कल असून तिच्यावर राजचिन्हाचा शिक्का आहे".

गोवा, ३ एप्रिल १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(101) LIVRO DOSREIS VIZINHOS, No 5, FLS 94V.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला काही सूचना देऊन पुढील पत्र लिहितो—

"सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश—

आपल्या २९ मार्चच्या पत्राचे उत्तर करताना मला आपणास कळवायचे आहे की, आमच्या टोळयांनी खेडयांमध्ये शिरून जुलूम जबरदस्ती केली असे मी म्हटल्याचे मला आठवत नाही. उलट, टोळयांचे काम उपयुक्त झाले असल्याने त्याला मी मान्यता देत आहे, आणि आपणाला हुकूम करीत आहे की, टोळयांचे कार्य चालू ठेवावे. खेडयातील पट्टीवाले तक्रार करतील ह्यात शंका नाही. सगळयांना संतुष्ट ठेवून राज्यकारभार हाकणे हे एक कठीण काम असते. ते काम करण्यासाठी आपणाला पुष्कळच कष्ट करावे लागणार आहेत. परंतु माझी आपणाला सूचना आहे की, आपण मला आणि आमच्या स्वामीला संतुष्ट ठेवण्यातच समाधान मानावे.

मला ज्या सूचना येतील त्या मी आपणाकडे पाठवीत जाईन. लोक जे काय बोलतात त्याचा अहवाल आपण मला देण्याची जरूरी नाही. आपण जे काय करणार ते बरोबर करणार ह्यावर माझा विश्वास आहे. आणि माझे आपणाला सांगणे आहे की, आपण स्वत:विषयी आपण अविश्वास वाटून घेऊ नये.

कुणब्यांकडून शत्रूला मदत होत असल्यास मला त्याबद्दल मुळीच आश्चर्य वाटणार नाही. ह्या लोकांना ज्याची भीती वाटते, त्यांचीच ते सेवा करतात, व त्यांच्या बाजूने त्यांचा कल असतो. मराठयांचा विजय होत आहे ह्या समजुतीने ते त्यांची सेवा करतात. उद्या जर आमचा जय होत गेला तर ते आमची सेवा करावयास लागतील.

शत्रूवर हल्ले चढवून त्याला हैराण करण्याची जी आज्ञा आपण आंतोनियु दुश सांतुश ह्यांना दिलीत त्याबद्दल मला आनंद होत आहे. देव आम्हाला मदत केल्यावाचून राहाणार नाही. आणि मला आशा वाटते की, लवकरच आम्हाला एक मोठा विजय मिळेल. कल्याणची गलबते मुंबईला येत नाहीत

ही बातमी आपणाला नसल्याचे आपल्या पत्रावरून कळले. मराठ्यांच्या सैन्याविषयी आपण निर्धास्त असावे. कारण, कल्याणला त्यांचे जे सैन्य आहे ते कल्याणचे आणि त्याच्या शेजाऱ्यांचे आहे. त्यांच्यापैकी कुणालाही पोर्तुगिजांच्या हल्ल्याची कल्पना असणार नाही. ही बातमी मला मराठ्यांच्या दरबारातून कळली असून ती विश्वसनीय आहे.

युद्ध कैद्यांविषयी आपणाला जो आदर वाटतो त्यामुळे आपल्या हातून कर्तव्यच्युती होणार नाही ह्याची मला खात्री आहे. पण ह्याच युद्ध कैद्यां विषयीच्या आदरामुळे काही लोक आपल्या कामगिऱ्या पार पाडतात हेही मला माहीत आहे. आणि मी आपणाला सूचना देत आहे की, माझ्या इशाऱ्याकडे आपण दुर्लक्ष्य करू नये. ह्या सूचना आपणाला करीत आहे, त्याचे कारण हे की, आपली कामे अचूक होतात हे मला माहीत आहे.

इंग्रज आंग्र्यांशी तह करीत नाहीत हे ऐकून आनंद झाला. गरज पडेल तेव्हा त्यांचा आपणाला उपयोग होईल. ह्यासंबंधी मी दों लुईज द कायताने ह्यांना लिहीत आहे. त्यांना पाठविण्यात येणाऱ्या पत्राची नक्कल आपणालाही पाठवीत आहे. आपणही त्यांना लिहावे.

ठाण्याच्या तटबंदीविषयी मला आपणास कळवायचे आहे की, हा प्रदेश मला अपरिचित आहे. तरीपण आपणाला जे काय वाटेल ते करावे. मी आपणाला पुनः एकदा बजावित आहे की, आपल्या देशाच्या रक्षणासाठी युद्धकालात काहीही करण्याचा आपणाला अधिकार आहे. आणि ज्यावेळी आपणाला वाटेल की, हे अधिकार आपणाला नाहीत तेव्हा ते मी आपणाला देईन.

मला माहीत आहे की, शिपाई हे पोर्तुगीज सैनिकांसारखे चांगले लढवैये नाहीत, पण ते लुटारू आहेत हे मला माहीत आहे. मराठ्यांपाशी ह्या शिपायांशिवाय दुसरे कोणतेच शिपाई नाहीत.

जोपर्यंत कसब्यामध्ये पायदळाचे सैन्य आहे तोपर्यंत त्यांनी इतर ठिकाणी हल्ला करावयास जावे असे मला वाटत नाही. कारण असे गृहीत धरून चालायला पाहिजे की, मराठे निर्भयपणे कसब्यात प्रवेश करतील. त्यांनी कसब्यामध्ये प्रवेश केल्यावर आमचे सैन्य त्यांच्यावर हल्ला करणार नाही. आणि मला वाटते की, पायदळाने बराकीत प्रवेश केला की, शिपायांना लुटालूट करावयास जाता येईल. त्यांनी तिकडे दोन दिवसापेक्षा अधिक वेळ राहू नये. पण हे सर्व आपण आपल्या सोयीप्रमाणे करून घ्यावे. स्त्री कैदी ज्या घरात आहेत तिथून त्यांना बाहेर सोडू नये. पण अशी हूल उठवून द्यावी की, त्यांना

आणि मुलांना पाद्री ख्रिश्चनांचा बाप ह्यांच्या हवाली करण्यात आले आहे. तथापि, सदर्हू पाद्री महाशयांना सांगावे की माझा हुकूम आल्याखेरीज त्यांनी मुलांना बाटवू नये.

ह्या अफवेने कैद्यांच्या पालकांमध्ये घबराट माजल्यावाचून राहाणार नाही. आपण जरा शांत असावे.

इंग्रज कल्याण नदीतून व्यापार करतात असे कळले. सांप्रत त्यांच्या वाटेला आपण जाऊ नये. मात्र आपण मुंबईच्या गव्हर्नरला कळवावे की, त्यांनी आपल्य लोकांना शत्रूशी व्यापार करण्यास प्रोत्साहन ेऊ नये.

आंग्रे मराठ्यांना मदत केल्यावाचून राहाणार नाहीत. मल माहीत आहे की, आम्ही जरी त्यांना आमच्या बाजूने ओढण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ते आमचे कधीच मित्र होणार नाहीत. उलट ह्या प्रसंगाचा ते चांगलाच फायदा घेतील. माझी आपणाला आज्ञा आहे की, त्यांच्या लष्कराशी जर आमच्या सैन्याची गाठ पडली तर त्याला सोडून देऊ नये.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(103) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 113V.

वसईतील एक पोर्तुगीज सेनाधिकारी आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी व्हाइसरॉयला आपल्या अडचणी कळविल्या होत्या. त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले.

"कंपन्यांचे कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांस—

शत्रूशी लढा देण्याच्या कामी आपल्या मार्गात ज्या अडचणी आहेत त्यांचे दिग्दर्शन कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी आपल्या पत्रातून केले आहे. त्यांच्या नावाचा एवढा दरारा आहे की, ते हल्ला करण्याचा विचार करीत आहेत असे जरी कळले, तरीदेखील शत्रू त्याच्या हातात असलेली बंदरे सोडून देईल.

कापितांव मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांना माहीत असेलच की गोव्याचे सर्व सैन्य फक्त बंदरांचे तेवढे रक्षण करू शकेल. हे मराठ्यांना माहीत नाही. ही गोष्ट अर्थात् पोर्तुगीज राष्ट्राच्या सामर्थ्याला आणि माझ्या नावाला अभिमानास्पद नाही असे कोण म्हणू शकेल. आमच्या शत्रूने आम्हाला आजपावेतो कधीच निवांतपणे राहू दिले नाही. आम्ही त्यांच्या निदर्शनाला

आणून द्यायला पाहिजे की, आम्ही जरी संख्याबलाने लहान असलो, तरी आमच्या बापजाद्यांप्रमाणे आम्ही सतत लढत राहू.

कापिताव-मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी मनोरा येथे जो पराक्रम गाजविला तसाच पराक्रम गाजविण्याची संधी त्यांना पुन: प्राप्त व्हावी, व त्यामुळे शत्रूच्या छातीत धडकी भरावी अशी मी इच्छा करतो. आणि ज्याअर्थी, युद्धाचे कारण देव आहे, त्याअर्थी, त्याच्या पवित्र नावाने आम्ही लढणे हे उचीत. मला आशा आहे की, देव आंतोनियु दुश सांतुश ह्यांची कुठल्याही संकटातून मुक्तता केल्यावाचून राहाणार नाही. कापितांव-मोर आंतोनियु दुश सांतुश हे आपल्या पत्रात म्हणतात की, त्या प्रांतात माणसे जेव्हा अधिक होती, तेव्हा ती काहीच करू शकली नाहीत, आता माणसे कमी असल्याने ती . . . . . . . . . . . . . . . करतील. मी त्यांना सांगू इच्छितो की, ज्याअर्थी मी माणसे पाठविली आहेत, त्याअर्थी, त्यांना मी काही तरी करण्याची आज्ञा दिली आहे. त्यांनी तिकडे काही केले नसल्यास मी त्यांना तिथून माघारा बोलवीन असा इशारा त्यांना मी दिला आहे. आता मी त्या प्रांतात ग्रॅनेडियसच्या चार कंपन्या ठेवण्याचा निर्णय घेणार आहे. त्या शिवाय फिरत्या कंपन्याही तेथे राहाणार आहेत. एकूण तीनशेपर्यंत माणसे तिकडे राहाणार आहेत. शिबंदीची कंपनी आणि दोन फ्रिगेस् मी माघार बोलविणार आहे. त्यांनी पावसाळ्यामध्ये मुंबईत राहिलेले मला नको आहे हिवाळ्यामध्ये मला त्यांची गरज भासणार आहे. त्यावेळी देशाहून नौका येणार आहेत. त्या आल्या की, त्या प्रांतात शांतता प्रस्थापित झाली नसल्यास त्यांना परत नेता येईल.

पावसाळ्यामध्ये पोर्तुगीज सैनिकांना चिखलामध्ये चालता येत नाही फक्त शिपाई तेवढे युद्ध चालू ठेवतील. शत्रूच्या घोडेस्वारांना देखील पाव-साळ्यामध्ये युद्ध चालू ठेवणे कठीण जाते. आंतोनियु दुश सांतुश ह्यांना बक्षीस देण्यास मला आनंद होत आहे. हे बक्षीस यांच्या प्रतिनिधीच्या हवाली करण्याचा हुकूम मी काढीत आहे".

गोवा, ४ एप्रिल १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(104) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 114.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला लिहितो की, कल्याणमध्ये एकही मराठा सैनिक नाही अशी बातमी आपणाला शाहूराजे ह्यांच्या दरबारातील एका गुप्त हेराने कळविली आहे.

"उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस--

शाहूराजे ह्यांच्या दरबारातील माझ्या एका गुप्त हेराकडून मला कळले आहे की, कल्याणमध्ये एकही मराठा सैनिक नाही. आमच्याशी जे मराठा सैनिक युद्ध करीत आहेत ते सर्व कल्याणमधले आहेत. जर हे असेच आणखी काही दिवस चालू राहिले तर फ्रिगेटचे आगमन झाल्यावर आम्ही त्या सैनिकांना कैद करू शकू. माझी अशी समजूत आहे की, मुंबईचा गव्हर्नर साष्टी बेटाचे रक्षण दुसऱ्यांदा केल्यावाचून राहाणार नाही. असे जर झाले तर इतर ठिकाणच्या पोर्तुगीज शिबंद्या एकत्र आणून उत्तरेचे रक्षण करता येईल. इतकेच नव्हे, तर आपल्या इच्छेप्रमाणे इतर ठिकाणीही आपणाला हवे ते करता येईल. त्या प्रांताच्या रक्षणासंबंधी तूर्त मला आपणास काही सूचना अथवा हुकूम द्यायचे नाहीत. मुंबईच्या गव्हर्नरने मला कळविले आहे की, कल्याणचा सुभेदार हा सरदार दाभाडे ह्यांच्या पत्नीच्या भयाने आमच्याशी तह करण्याची शक्यता आहे. तो म्हणतो की दाभाडेची पत्नी कल्याणवर चालून येत असल्याचे आपणाला कळले आहे. असे जर झाले तर मला तहापेक्षा अधिक आनंद होईल. पावसाळ्यामध्ये इकडे जासुदाकडे पाठवायाचीं पत्रे पुष्कळ असू नयेत. कारण ती ओळखली जाण्याचा संभव असतो. दुसरी गोष्ट अशी की, आपण जी पत्रे लिहाल ती गूढ भाषेत लिहिलेली असावी आणि वखारदार व ठाण्याचे कॅप्टन ह्यांना सूचना करावी की, ज्या गोष्टींची वाच्यता होण्याचा संभव असतो त्यांचा त्यांनी पत्रांमध्ये उल्लेख करू नये.

सुरतेच्या जहाजांना परवाने द्यायचे नाहीत असे मी ठरविले आहे. सिद्दी व मराठे ह्यांची जहाजे आमच्या कक्षेत येत नाहीत. सुरतेच्या जहाजांनी जर त्यांच्याशी व्यापार बंद केला तर त्यांची फार हानी होणार आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ११ एप्रिल १७३१

ता. क. कापितानिया नौका इकडे आली आहे. ती उन्हाळ्यामध्ये प्रवास करण्याच्या स्थितीत नाही.

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(106) BASAIM, No. 5, FLS 115.

वसईच्या लष्करी छावणीतील पोर्तुगीज कंपन्याचा सेनापती कॅप्टन-मोर आंतोनियु दुश सांतुश ह्याने गुडनगड घेतल्यावर वसईच्या गव्हर्नरला त्याने जो आपल्या लष्करी मोहिमेचा दैनंदिन अहवाल सादर केला तो पुढीलप्रमाणे आहे.

चालू वर्षाच्या २५ एप्रिलला आपणाकडून मला जो हुकूम मिळाला त्या हुकुमाप्रमाणे मी ह्या छावणीतील सर्व सैन्याला चाल करण्याची आज्ञा केली. कारण, मी ज्या ठिकाणी आहे, त्या ठिकाणी ह्या सैन्याने गोळा व्हावयाचे होते. साबाजहून आपण जे नव्वद शिपाई पाठविले त्यांचाही अंतर्भाव ह्या सैन्यामध्ये करण्यात आला. तो माझे जिराल्दिश ह्या गालियोता-वरील सेकंड लेफ्टनंटच्या हाताखालील पंचवीस गोरे सैनिकही ह्या मोहिमेत सामील झाले. दि. २६ ला सकाळी मी ह्या सैन्याची पहाणी केली. ह्या सैन्यात २९० गोरे सैनिक आणि त्यांचे अधिकारी व ३०० शिपाई होते. एकूण सर्व सैन्य ५२० होते. त्याशिवाय १८ घोडेस्वार मोहिमेची दोन माणसे आणि इतर लवाजमाही होता. मी दुपारी एक वाजता सदहू गडाच्या पायथ्याशी मुक्काम केला व आवश्यक त्या रक्षकांची रवानगी केली. त्याच-बरोबर १०० शिपाईही वर पाठविले, व त्यांच्या मार्ग ५० ग्रिनेडियर्सची रवानगी केली. शिड्या, वगैरे सामानही वर पाठवून दिले. रात्री आठ वाजता गडावरील हल्ल्यास सुरूवात झाली. शत्रूने आमच्यावर भयंकर आग ओतण्यास सुरूवात केली. त्या बेफाम सरबत्तीमुळे आम्हाला फार काळजी घेणे भाग पडले. रात्री दोन वाजता आम्ही सुरक्षित जागा गाठली. ह्या ठिकाणी शत्रूपासून आम्हाला धोका नव्हता. दि. २७ ला सकाळी गोळीबारास पुन: सुरूवात झाली. एका खडकावर एक अधिकारी होता. त्याच्यावर गोळी झाडण्यात आली. शत्रूचा प्रतिकार तीव्र स्वरूपाचा होता. म्हणून मी खालून आणखी आडोशे, शिड्या आणि माणसे आणण्याचा निर्णय घेतला. अशा रीतीने मी गडाला पूर्ण वेढा घातला. रात्र पडल्यावर मी सरबत्तीचा जोर वाढविला. शत्रूला मी ओरडून सांगितले की, ते जर पळून गेले नाहीत, तर आगीत नाहक होरपळून मरतील. परंतु शत्रूने आम्हाला दाद दिली नाही. मी निराश होऊन हल्ला सोडून देण्याचा विचार केला. सासष्ट माणसे ठार झाली होती. असा वेढा यापूर्वी कधी पाहिला नव्हता.

वेढयाचे काम सोडून देऊन मी तोफखाना सांभाळण्याचा विचार करीत होतो. माझी पक्की समजूत झाली होती की, तो गड घेणे हे मानवी साम-र्थ्याच्या बाहेरील काम आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, शत्रूने आमच्या तुफान बडिमाराला आणि धाडसाला भिवून रात्री एक वाजताच भुयारातून खाली पडून गड खाली केला. मला जेव्हा हे कळले, तेव्हा मी काही माणसे घेऊन वर चढलो. मला तो खरोखरच एक चमत्कार वाटला. काही जड-वाद्यांचा चमत्कारावर विश्वास नसतो. परंतु माझा त्याच्यावर विश्वास आहे, कारण मी ख्रिश्चन आहे.

गडावर मी ८० शिपाई त्यांच्या अधिकाऱ्यांसह ठेवले. त्यांच्यामध्ये बरेच ख्रिश्चन आहेत. शत्रूने धान्याचा आणि पाण्याचा मोठा साठा गडावर करून ठेवला होता.

गडाच्या पायथ्याशी तीन मुडदे आढळले. त्यातील दोघेजण तोफांच्या गोळ्यांनी ठार झाले होते. तर तिसऱ्याला बंदुकीची गोळी लागलेली होती ज्या वाटेने हे लोक गडाबाहेर पडले, त्या वाटेवर सगळीकडे घायाळ लोकांचे. रक्त सांडलेले दिसत होते. माझे काम आटोपल्यावर मी गडावरून खाली उतरून माझ्या छावणीकडे निघालो. तिकडे मी दुपारी एकला येऊन पोहोचलो. जे काय घडले ते लिहून मी आपणाला सादर करीत आहे. त्याचप्रमाणे ह्या लोकांची बंदोतून मुक्तता झाल्याबद्दल मी आपले अभिनंदन करीत आहे. आपल्या हातून यापुढे अशाच मोहिमा व्हाव्या व त्यात भाग घेण्यास देवाने मला उत्तम आरोग्य द्यावे अशी मी त्याच्याकडे प्रार्थना करतो.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

सोपाराची छावणी, १६ एप्रिल १७३१

आपला,

आंतोनियु दुश सांतुश

(107) LIVOR DAS MONCOES, No. 99, FLS 186.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला लिहितो की, त्याने मराठ्यांवर काही विजय मिळविल्याची वार्ता त्याला चौलच्या दिवाणाने कळविली आहे. ह्या विजयाबद्दल व्हाइसरॉयने वसईच्या गव्हर्नरचे पुढील पत्रात अभिनंदन केले आहे.

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा ह्यांस—

चौलच्या दिवाणाकडून मला बातमी मिळाली आहे की, तस्मस गडावर आणि चंद्रवाडी येथे आपली शत्रूशी गाठ पडून आपण विजयी झालात. असे जर असेल तर मी आपले अभिनंदन करतो. त्या प्रांतात युद्धासंबंधी आपणाला जे काय करता येणे शक्य आहे, त्यासंबंधी माझी आपणाला सूचना आहे की, आपणाला मी जे हुकूम पाठविले आहेत त्यात सुधारणा करावी. आपणाला मी ह्या बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य देत आहे. शत्रूला शासन करण्याचा माझा जो ठराव आहे तो मात्र उन्हाळ्यापर्यंत तहकूब ठेवावा. आपण दीवला पठाणांची भरती करण्यासाठी माणसे पाठविली असल्याची वार्ता इकडे आली आहे. आपण जो मनुष्य तिकडे पाठविला आहे त्याला तिकडे येऊ न देण्याचा हुकूम

मी कास्तेलांवला पाठविला होता. त्या हुकूमाचा आपल्या कामगिरीत अडथळा येऊ नये म्हणून व गोंधळ टाळण्यासाठी मी आपल्या पत्रात आज्ञा पाठवित आहे.

मला वाटते पावसाळ्यामध्ये आपण पोर्तुगीज पायदळाला युद्धात लोटू नये. पण ह्या बाबतीत मी आपणाला आपल्या इच्छेप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य देत आहे. अलीकडे माझी प्रकृती ठीक नसल्याने आणि कामेही पुष्कळ असल्याने ह्याहून अधिक काही लिहू शकत नाही. परंतु मी आपला एक गोष्ट कळवू इच्छितो की, आपल्या कामगिरीचे चोज करण्याचा व आपल्या कारभाराचा गौरव करण्याचा माझा ठाम निर्धार झाला आहे. ह्या विषयी आपण निश्चित असावे.

जर कोणत्याही कारणावरून मी लागू केलेल्या उपाययोजना कमी पडल्या तर हिंदूवर सक्ती करण्यास मागेपुढे पाहू नये. कारण अशा परिस्थितीत सर्व काही कायदेशीर असते.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २० एप्रिल १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(108) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 117.

वसईच्या गव्हर्नरने गुडनगड घेतल्याबद्दल व्हाइसरॉय त्याचे पुढील पत्रात अभिनंदन करतो—–

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा ह्यांस—–

माझ्या कारकीर्दीत आपल्यासारखा कर्तव्यदक्ष आणि हुशार सेनापती मला लाभला ह्याबद्दल मला देवाचे आभार मानले पाहिजेत. पोर्तुगीज राष्ट्राचेदेखील आपण एक भूषण आहात ह्याबद्दल शंका नाही.

गुडनगडचा विजय हा एक मोठा विजय आहे. हा विजय मला हजारवेळा आनंददायी वाटला. ज्या अडचणीतून आपण शत्रूचा पराभव केलात त्याबद्दल नव्हे, तर तो एक चांगला विजय आहे म्हणून आपणाला असाच आणखी एक मोठा विजय मिळावा अशी माझी इच्छा आहे. जोपर्यंत मला ह्या नवीन विजयाची बातमी कळणार नाही, तोपर्यंत माझे मन उत्कंठित राहील.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २४ एप्रिल १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(109) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 118.

ज्या पोर्तुगीज सेनाधिकाऱ्याने गुडनगड घेतला त्याचे व्हाइसरॉय पुढील पत्रात अभिनंदन करतो.

"कंपन्यांचे कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांस—

गुडनगड येथे आपण जो विजय मिळविलात त्या विजयाची बातमी ऐकून मला आनंद झाला. हा विजय सहस्त्रपटींनी मोठा आहे. कारण, त्यामुळे आमच्या सैन्याची प्रतिष्ठा तर वाढणार आहेच पण त्याचा परिणामही मोठा होणार आहे. आणि माझ्या अभिनंदनाचा स्वीकार केल्यावर आपले अचुक धोरण, सुदैव आणि पराक्रम ह्याबद्दलही मी आपले आणखी अभिनंदन करीत आहे. ज्या अधिकाऱ्यांनी ह्या मोहिमेत भाग घेतला त्या सगळ्यांना माझा आनंद कळवावा.

ज्या परिस्थितीत आम्हाला हा विजय मिळाला ती परिस्थिती आनंददायक आहे ह्यात शंका नाही. पहिली गोष्ट ही की, आम्ही शत्रूच्या तळावर जाऊन हल्ला केला. दुसरी गोष्ट म्हणजे ध्वजनौका तिकडून इकडे निघाल्यावर हा विजय मिळाला. पण शत्रू हे मान्य करणार नाही हे मला माहीत आहे. तो म्हणेल की, ह्या प्रांताच्या सेनापतीने आपणाला हवे ते सैन्य ठेवून घेऊन बाकीचे गोव्याला पाठवून दिले.

मी आपणाला ह्यापूर्वीच सूचना दिली आहे की, आपणाला मनोराचे कारभारी म्हणून नेमण्याचा माझा निश्चय झाला आहे. परंतु माझ्यासमोर एक पेच उभा राहिला आहे. आणि तो म्हणजे त्या प्रांताच्या सैन्याच्या मुख्य पदावरून आपली दुसरीकडे बदली कशी करावी हा. जोपर्यंत शत्रू तिकडे आहे, तोपर्यंत आपणाला तिथल्या सैन्याच्या सेनापती पदावरून हलविण्यात धोका आहे. आपली जागा भरून काढणारा दुसरा कुणी मनुष्य मला दिसत नाही. दुसरी गोष्ट अशी की सैन्यालाही काळजी वाटेल व ते आपणाबरोबर जाण्याची इच्छा दर्शवील. म्हणून मी असा ठाम निर्णय घेतला आहे की, आपली आणखी तीन वर्षेपर्यंत बदली करू नये. मात्र तीन वर्षानंतर आपली नक्कीच बदली केली जाईल. ह्या बाबतीत भाडोत्री सैनिक अनेक प्रश्न विचारतील ह्यात शंका नाही. पण त्याकडे दुर्लक्ष केले म्हणजे झाले. तरी माझा हा निर्णय आपणाला मान्य आहे असे मी गृहीत धरतो.

युरोपात ही पद्धती आहे हे आपणाला माहीत असेलच.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २४ एप्रिल १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(110) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 118.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला लिहितो की, मराठ्यांकडून गोव्याला धोका निर्माण झाला आहे. ह्याच पत्रात तो गुडनगड व चंद्रवाडी ह्या दोन्ही गडांची तटबंदी करण्याचीही त्याला सूचना करतो.

"उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस—

गुडनगड शिबंदी ठेवण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे, तो बरोबर आहे, असे मला पुष्कळ वेळा वाटते. केवळ आताच नव्हे, तर पुढेदेखील तेथे शिबंदी असावी असे मला वाटते. त्या गडावर जाणारा मार्ग आपण शोधून काढला पाहिजे. फक्त एकच दुर्गम मार्ग तेवढा ठेवावा असे माझे मत आहे. मार्ग शोधून काढला आणि तटबंदी केली की गडावर तलाव किंवा टाक्या बांधण्याचीही व्यवस्था झाली पाहिजे. ही व्यवस्था झाल्याखेरीज शत्रूचे आक्रमण झाले असता, गडाचा आश्रय घेणाऱ्या लोकांच्या कुटुंबांची तेथे व्यवस्था होणार नाही. चंद्रवाडीच्या गडाचीही तटबंदी करून तेथे शिबंदी ठेवली पाहिजे असे मला वाटते. अर्थात हा प्रदेश माझ्या माहितीचा नसल्याने आपणाला हे काम ज्यारीतीने करून घ्यायचे असेल त्यारीतीने करून घ्यावे.

मला असे वाटते की, सैबाणची छावणी सशस्त्र करण्यापूर्वी तटबंदीचे काम पूर्ण करून घ्यावे.

महसूल खात्याच्या व्हेदोर—नजरलने वखारदाराला जो हुकूम पाठविला आहे, त्यात मी बदल केला आहे. अशा निषेधामुळे आपली यत्किंचितही हानी होणार नाही ह्याबद्दल आपण निश्चित असावे. मला आपणास पुन: एकदा कळवायचे आहे, कीं मराठ्यांकडून येत्या वर्षी गोव्यावर स्वारी होण्याचा संभव आहे. परंतु ह्या लोकांचा कृतीपेक्षा वाचाळपणावरच अधिक भर असतो. म्हणून मला त्यांची भीति वाटत नाही. मी दक्षता घेतलेली आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २५ एप्रिल १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(118) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 120.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला कळवितो की, वसईमध्ये जे स्त्री आणि पुरुष कैदी आहेत त्यांच्या सुटकेबद्दल मोठ्या रकमा घेतल्याशिवाय त्यांची मुक्तता करू नये. त्यांनी पैसे भरून मुक्तता करून घेण्यास नकार दिल्यास त्यांना गोव्याला पाठविण्याची धमकी द्यावी.

" उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यास—

दोन दिवसांच्या प्रवासाच्या सुदैवी यशानंतर आरमार येथे येऊन पोहोचले. आपले पत्र वाचून बघितल्यावर पुढच्या यशाची आशा निर्माण झाली. देवाच्या कृपेवर विसंबून राहून मी यशाचे पोवाडे गाण्याची मनीषा मनात बाळगीत आहे. ईशकृपेने जर चंद्रवाडी गड खाली करण्यात आला, तर त्याची तटबंदी करावी, व त्यात शिबंदी ठेवावी. कारण दुसरे दोन्ही गड शत्रू सोडून देणार आहे, किंवा आमच्याकडे तहाची मागणी करणार आहे. असे जर घडले तर आपण त्यांना कळवावे की, माझ्या हुकुमाशिवाय त्यांच्याशी तह करण्याचा आपणाला अधिकार नाही. तसेच त्यांनी पोर्तुगीज प्रदेश खाली केल्याशिवाय त्यांच्याशी तहाच्या वाटाघाटी करणे अशक्य आहे. असे ऐकतो की, वसईला असलेले पुरुष आणि स्त्री कैदी श्रीमंत आहेत. त्यांच्या मुक्तते-साठी भरभक्कम रकमांची मागणी करावी. त्यांनी त्या रकमा भरण्यास नकार दिल्यास त्यांची मुक्तता केली जाणार नाही. अशी त्यांना धमकी द्यावी. त्यांना सांगावे की त्यांनी पैसे भरून आपली मुक्तता करून घेतली नसल्यास त्यांची मुक्तता केली जाणार नाही. त्यांना दहशत घालावी की, त्यांनी पैसे भरून आपली मुक्तता करून घेतली नसल्यास त्यांना गोव्याला पाठवून देण्यात येईल. त्यांच्या आईबापांनाही असे लिहून त्यांच्याकडन पत्रांची उत्तरे मागवावी.

पाद्री फिगेरेदु दि. १२ ला अहमदाबादेस खंबायत मार्गे रवाना झाले. त्यांना शाहू राजाकडून पासपोर्ट मिळाला. ही घटना आशादायक आहे असे मला वाटते. मला आशा आहे की, आपल्या कारकीर्दीत आपणाला पुष्कळ सौख्य प्राप्त होईल. उन्हाळ्याच्या सुरुवातीला त्या प्रांतास मदत करण्याच्या तयारीस मी लागत आहे. तोपर्यंत युद्ध संपेल असे मला वाटत नाही.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ३० एप्रिल १७३१

LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 121V.

वसईतील कंपन्यांचे व लष्करी तळाचे कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश हे उत्तरेकडील प्रदेशाचे आणि किल्ल्याचे कॅप्टन मोर मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांना वरळीच्या मोहिमेचा दैनंदिन अहवाल पुढील निवेदनातून सादर करतात.

कॅप्टन मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांनी त्यांना मराठ्यांच्या वरळी ह्या नावाच्या खेड्यात आक्रमण करण्याचा हुकम केला होता.

कॅप्टन मोर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी भिवंडीपर्यंत जो प्रवास केला त्याचाही वृत्तांत खालील निवेदनात आला आहे.

चालू वर्षाच्या २४ मेला आपण मला आमच्या हद्दीला लागून असलेल्या शत्रूच्या प्रदेशात आक्रमण करण्याचा हुकूम केला होता. त्या हुकुमाप्रमाणे मी शिपायांच्या सर्व कंपन्यांना बंदरात गोळा होण्याचा हुकूम केला. त्या सर्व कंपन्यांची पहाणी करण्यात आली असता ते एकूण ५०० भरले. त्यांच्यामध्ये साबाज आणि साष्टी येथील शिपायांचाही अंतर्भाव होत होता. दुपारी एक वाजता त्या सर्व शिपायांसह मी कौंद द आंकोलाकडे चाल करण्यास सुरुवात केली. त्यांच्यावर मी पहिला अधिकारी म्हणून दों ज्युआंव द आझेवेदु व दुसरा अधिकारी म्हणून साबाजचा नाईक--मोर ह्या दोघांची नेमणूक केली सैन्याची विभागणी करून मी प्रत्येक अधिकाऱ्याकडे एकेक विभाग सुपूर्त केला. पैकी पहिल्या विभागाकडे लढण्याचे काम देण्यात येऊन दुसऱ्या विभागाकडे खेड्यांची जाळपोळ करण्याचे काम सोपविले. त्या खेड्यांमध्ये एक जत्रा भरणार असल्याची बातमी मला कळली होती. त्या दोघां अधिकाऱ्यांना आवश्यक ते आणखी काही हुकूम देऊन मी त्यांना मार्गस्थ केले व मी माझ्या छावणीकडे परतलो. तेथे मला गलबते आणि इतर तयारी करण्याचे काम करायचे होते.

दि. ५ ला मला पहिल्या अधिकाऱ्याने कळविले की, तो सैबाणला असून, तिथून पुढे गेलेला नाही. कारण, त्याला दोन गुप्त हेरांकडून कळले की, ज्या खेड्यात जत्रा भरली होती, तेथे कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत हे बऱ्याच सैन्यासह आले होते. त्या सैन्यात घोडदळ तसेच पायदळही होते. हे सैन्य त्यांनी त्या खेड्यातील मंदिराच्या रक्षणार्थ आणले होते. अप्पाजीपंत ह्यांच्या आगमनाची बातमी कळल्याने पहिल्या अधिकाऱ्याने हल्ल्याचा हुकूम अमलात आणला नाही.

दि. ६ ला मी ह्या सैन्यास माघार घेण्याचा हुकूम केला. कारण, त्यांनी जर हल्ला करण्याचे धाडस केले असते, तर शत्रूकडून त्यांचा नाश केला जाण्याची भीती होती. माझा हुकूम मिळताच त्याने मला कळविले की, त्याने खेड्याकडे गुप्त हेरांची रवानगी केली आहे. त्यास हेरांनी बातम्या आणल्या की, पुढे काय करायचे ते ठरवू. त्याने वाटेत काही खेडूत पाठविले होते त्यांना त्याने माझ्याकडे पाठवून दिले. त्याच दिवशी त्याने मला निरोप पाठविला की, कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत हे निघून गेले असून खेड्यामध्ये त्यांनी फारच थोडे सैन्य मागे ठेवले आहे. त्या माहितीप्रमाणे त्याने दि. ७ ला

पहाटेस खेड्यावर हल्ला करण्याचा निर्णय घेतला. त्या हल्ल्यात त्याने खेड्याची पुष्कळ हानी केली. त्याने लुटालूट आणि जाळपोळ तर केलीच पण अनेक खेडुतांना आणि पाच घोड्यांना ठार मारले. त्याने माघारा फिरताना आपणाबरोबर एक घोडा, एक घोडी, काही बैल आणि पुष्कळ कापड आणले. तो त्या दिवशी दुपारी छावणीत परतला. त्याच दिवशी मी त्याला दुसऱ्या मोहिमेची तयारी करण्याचा हुकूम केला. प्रवास लांबचा असल्याने वाटेत शत्रूकडून वाटेत पराभव होऊ नये म्हणून चांगली तयारी करणे आवश्यक होते. दि. ८ ला दुपारी २१६ गोरे शिपाई, त्यांचे गोरे अधिकारी व ४५० शिपाई ह्यांच्यासह नौका हाकारल्या. ती एकूण ३८ गलबते होती. मी पालेपर्यंत अशा रीतीने प्रवास केला. तेथे भिवंडी नदीत शिरण्यासाठी भरतीची वाट पहात राहिलो. येथे आपण दिलेले हुकूम मला मिळाले. लगेच मी लढाईची चार गलबते बरोबर नेली. दि. ९ ला पहाटेस तीन वाजता मी सैन्य उतरविले, व त्यांची बटलिअन्समध्ये रचना करून त्यांना खेड्याकडे चाल करण्याचा हुकूम केला. लवकरच आमची शत्रूच्या घोडदळाशी गाठ पडली त्यांना आमच्या आगमनाची वार्ता कळल्याने सुभेदार अप्पाजीपंत हे तेथे आमची वाट पहात होते. आम्ही शत्रूशी लढता लढता खेडे गाठले व त्याला पाच बाजूंनी आग लावून दिली.

शत्रूने आमच्यावर आतून आणि बाहेरून असा दोन्ही बाजूनी हल्ला केला. शत्रूकडून माझी पुष्कळ माणसे मारली जाणार आहेत ह्याचा मी पुर्वानुभवाप्रमाणे अंदाज केला. तसे झाले असल्यास आम्हाला माघार घेणे कठीण होऊन बसले असते, म्हणून मी सैन्याला माघार घेण्याचा हुकूम केला. त्याच वेळी शत्रूच्या घोडदळाप्रमाणेच पायदळानेही खेड्यातून बाहेर पडून आमच्यावर सर्व बाजूंनी गोळीबार करण्यास सुरुवात केली. त्यांनी आमच्याशी नुसता लपंडाव सुरू केला होता. ते झटकन येत गोळीबार करीत आणि पसार होत. त्यामुळे त्यांच्याशी आम्हाला समोरा समोर लढता आले नाही. ते पाहून मी लढता लढता माघार घेण्यास सुरुवात केली. आम्ही शत्रूचे अनेक घोडेस्वार आणि पायदळाचे सैनिक ठार केले. त्यांची मी गणती केली नसल्याने नक्की आकडा देऊ शकत नाही. आमच्या पैकी दोन गोरे आणि चौदा शिपाई जखमी आणि एक ठार झाला. जखमींना बंदरापर्यंत आणण्यास फार सायास पडले. शत्रूचा गोळीबार चालूच होता. त्यांतच पाण्याची दलदलही होती. शेवटी आम्ही कसे बसे वसई बेटापर्यंत येऊन पोहोचलो. तेथे सैनिकांना भोजन करण्यास आणि विश्रांती घेण्यास थोडा अवकाश दिला. दुपारी तीन वाजता वसईच्या छावणीकडे निघालो. तेथे पोहोचल्यावर



व्ही ५५५८–२१

सैनिकांना प्रत्येकाच्या ठाण्याकडे पाठवून दिले. ह्या मोहिमेत लहान मोठ्या एकूण एकोणतीस अधिकाऱ्यांनी भाग घेतला. ते सर्व चकमकीत शौर्याने लढले. त्यांचे आपण आभार मानावे.

देव आपणाला दीर्घायुष्य देऊन सुखी करो".

सोपाराची छावणी, १३ मे १७३१.

आपला,

आंतोनियु दुश सांतुश

(113) LIVRO DE MONSOES, No. 99, FLS 188.

वसईच्या गव्हर्नरला मराठ्यांकडून जो पराभव खावा लागला त्याबद्दल व्हाइसरॉय त्याचे पुढील पत्रात सांत्वन करतो. तो म्हणतो की, पोर्तुगीज सैन्यांत मराठ्यांचे गुप्त हेर असल्याबद्दल आपणाला आश्चर्य वाटत नाही.

उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस——

आपण पाठविलेले जहाज इकडे १६ ला येऊन पोहोचले व त्याची १८ ला पत्रे देऊन रवानगी केली. पत्रे घाईत आणि सूचतील तशी लिहिली आहेत. आपण जे काय केलेत ते मला पसंत आहे. जे काय घडले त्याबद्दल आपण कष्टी होऊ नये. कारण विजय हे नेहमीच मिळत नसतात. आम्ही चालू परिस्थिती लक्षात घेतली पाहिजे, शत्रूला जाणून घेतले पाहिजे. शत्रूचा शोध करून त्याच्यावर हल्ले चढविले पाहिजेत.

आमच्यामध्ये शत्रूचे गुप्त हेर असल्यास त्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटणार नाही. आणि ज्याअर्थी, ते आपणाला माहीत आहे, त्याअर्थी, त्यांनी एकादी योजना अमलात आणण्याचा प्रयत्न केल्यास आपण ती उधळून लावली पाहिजे. भिवंडी शहर जाळून टाकले अथवा नाही हा महत्त्वाचा प्रश्न नाही, प्रश्न महत्त्वाचा आहे तो आम्ही शत्रूच्या नाकावर टिच्चून तेथे सैन्य उतरविले, त्याच्याशी लढाई देऊन त्या शहराला आग लावून दिली. आणि तिथून माघार घेतली हा आमचा मुख्य उद्देश हा शत्रू प्रदेश काबीज करण्याचा नसून तो जाळून बेचिराख करणे हा आहे. आपण मला कळविले आहे की,

लशालांच्या कॅप्टन मोरला सहा मांशुआ देऊन किल्ल्यावर तोफा डागण्यासाठी पाठविले आहे. पण त्या शहरावर काही बँज अथवा गोळे पडणार आहेत की काय ते आपण मला कळविलेले नाही. ते जाणून घेण्यास मी फार उत्सुक आहे. चंद्रवाडी गडावर शत्रूने सैन्य आणून ठेवले असेल तर या गडावर हल्ला करण्याचा प्रयत्न आपण करू नये. आपण म्हणता की, कोल राजा मराठ्यांबरोबर आला आहे. पण त्याच्या खेड्यात आपणाला आक्रमण करायचे आहे हे आपण विसरता कामा नये. आपण आपल्या सैन्याला तसा हुकूम द्यावा. आमची आक्रमणे सुरू झाली आणि मराठ्यांनी त्याची नुकसानभरपाई केली नाही की, कोल राजा आमच्याशी सरळ तह करण्यास तयार होईल.

दमणच्या कॅप्टनला अपयश आलेले पाहून वाईट वाटले. मी सुचविलेल्या अधिकाऱ्याची त्याने नेमणूक केली नाही, म्हणून असे झाले अशी माझी समजूत आहे. आपल्या पत्रांबरोबर मी दमणच्या कॅप्टनलाही एक पत्र पाठविले आहे. ते त्याला पोहोचते करावे. त्या पत्रात मी त्याची चांगलीच हजेरी घेतली आहे.

बाजीरावाविषयी इकडे आलेल्या बातम्या गोंधळात टाकणाऱ्या आहेत. कुणी म्हणतात तो लढाई हरला आहे, तर कुणी म्हणतात त्याने लढाई जिंकली आहे. माझी आपणाला आज्ञा आहे की, आपण पोर्तुगीज सैनिकांना पावसाळ्या मध्ये लढाईवर पाठवू नये. समुद्रावरील युद्ध आपल्या अनुभवाप्रमाणे व संधी मिळेल त्याप्रमाणे करण्यास हरकत नाही. शिपायांना वाटेल त्या ठिकाणी लुटालूट आणि जाळपोळ करता येईल. पोर्तुगीज सैनिकांना पावसाळ्यामध्ये अन्नाची बेगमी कमी पडू नये म्हणून काळजी घ्यावी. त्यांच्या बिछान्याकडे आणि इतर सोयींकडे लक्ष देण्यास विसरू नये. तारापूरच्या कॅप्टनने आपणाला कोल राजाविषयी ज्या बातम्या कळविल्या आहेत त्या खऱ्या असण्याची शक्यता आहे. परंतु ह्या अधिकाऱ्याच्या काही बातम्यांविषयी मला संशय येतो.

फोंडू सावंत मला शिपाई पुरविणार असल्याची बातमी मुंबईच्या गव्हर्नरला जी कळली आहे ती अजीबात खोटी आहे. फोंडू सावंत ह्यांच्याकडे मला शिपाई पुरविण्याइतके मुबलक सैन्य नाही. त्यांचे आणि आंग्र्यांचे वाकडे असल्याकारणाने ते नेहमी युद्धाच्या तयारीत असतात. आणि म्हणून ते आपल्या राज्याबाहेर शिपाई पाठवू शकत नाहीत. उन्हाळ्याच्या सुरुवातीपर्यंत युद्ध संपले नसल्यास आपणाला कुमक पाठविली जाईल. आपण माझ्यासाठी काही घरे राखून ठेवलीत तर मला आनंद होईल.

आपल्या पत्रासोबत चौलच्या कॅप्टनला एक पत्र पाठविले आहे ते त्याला पोहोचते करावे. कारण ते अतिशय महत्त्वाचे आहे.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, १७ मे १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(114) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 125C.

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला राज्य-सचिवास वसईतील घडामोडींचा आढावा घेऊन पुढील पत्र लिहितो :—

राज्य सचिव, दियोग द मिनेझिश कोर्तरेआल ह्यांस,—

सां तेरेझा ही नौका तिकडे निघून गेल्यावर देखील इकडे उत्तरेकडील प्रदेशांतील युद्ध चालू राहिले. परंतु शत्रूला विशेष यश आले नाही. त्यांनी आमच्या सर्व ठाण्यावर हल्ले चढविले. शेवटचा हल्ला मनोरा येथील ठाण्यावर झाला. ह्या ठाण्याचा कारभार फ्रांकु बारांव द गालेन्फिल्ड हे पाहात होते. हे धोक्यात होते, कारण तेथे मोहिमेतील सर्व सैन्य गोळा झालेले होते. शत्रूने पाण्याची बाजू व्यापून नदी काठावर तोफा मांडून ठेवल्या होत्या त्याशिवाय बंदुकधारी शिपाई होते ते वेगळेच. वेढ्यात सांपडलेल्या सैन्याला बाहेरून कुमक न येऊ देण्याची कामगिरी ह्या बंदुकधारी सैन्यावर सोपविण्यात आली होती. परिस्थिती आणीबाणीची होती, पण तरीही प्रांताचे गव्हर्नर मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांनी सर्व धोके पत्करून ठाण्याला कुमक धाडली. ही कामगिरी त्यांनी वसईच्या छावणीचे प्रमुख कमांडर आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्याकडे सोपविली. ते २०० शिपाई आणि १५० ग्रॅनेडियर्स ह्यांच्यासह नदीत शिरले. त्यांनी नदीतील अडथळे दूर केले व नदीकाठावरील शत्रूचा विरोध मोडून काढून मनोरा येथे सैन्य उतरविले. त्या सैन्याच्या आगमनामुळे पाण्याकडील बाजू शत्रूच्या धोक्यापासून मुक्त झाली. शत्रूने नंतर आपल्या छावणीत माघार घेतली. पण आंतोनियु दुश सांतुश ह्यांच्या हाताखालच्या सैन्याला एवढा चेव आला की, त्यांनी शत्रूचा त्यांच्या छावणीपर्यंत पाठलाग केला. शत्रूचे २०० घोडेस्वार आणि सर्व पायदळ त्यांच्या सामोरा आले. घोडेस्वार दौडत आलेले पाहाताच आमच्या शिपायांनी २५ शिपायांना मागे ठेवून पळ काढला. शत्रूने आमच्या सैन्याला सर्व बाजूने वेढले होते. परंतु कमांडंट आंतोनियु दुश सांतुश हे रतिमात्रही डगमगले नाहीत. शत्रूशी त्यांनी निधड्या छातीने दोन हात केले. ह्या चकमकीत शत्रूचे ६० घोडेस्वार आणि पायदळाचे दिडशेहून अधिक सैनिक ठार झाले. ते पाहाताच शत्रने वाट

फुटलेल्या बाजूने पळ काढण्यास सुरूवात केली. अशा रीतीने शत्रूच्या छावणीत गोंधळ माजल्याने आमच्या सैन्याचे चांगले फावले. त्यांनी छावणीची मन:पूत लूट केली. त्यांनी शत्रूच्या तोफा देखील काबीज केल्या.

शत्रू पळून गेल्यावर आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी आपल्या सैन्याला माघार घेण्याचा हुकूम केला. पण दबा धरून बसलेल्या शत्रूने त्यांच्यावर पिछाडीच्या बाजूने हल्ले चढविले. आमच्या सैन्याला शत्रूशी अनेक ठिकाणी लढणे भाग पडले. त्याचा परिणाम असा झाला की, सैन्याचे बळ विभागून गेले व शत्रूचा जोर झाला. त्यामुळे आंतोनियु दुश सांतुश ह्यांना माघार घेणे भाग पडले. त्यांची ही दुसरी माघार होती. पण त्यांनी जरी माघार घेतली असली तरी शत्रूला चांगलेच चोपून काढले असल्याने त्यांची त्याने दहशत घेतली होती. ते पुनः चढाई करतील ह्या भीतीने त्यांनी आपली सर्व ठाणी सोडून देऊन माघार घेतली. पोर्तुगिजांच्या नावाचा पुन: एकदा वचक निर्माण झाला.

सदहू आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी वसईच्या गव्हर्नरच्या हुकुमावरून गुडनगड ह्या नावाच्या दुर्गम गडावर हल्ला चढविला. ह्या गडावर शत्रूच्या अनेक तटबंद्या होत्या. आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी प्रस्तुत गडाच्या समांतर रेषेत असलेली एक टेकडी शत्रूशी सबंद दिवस लढून जिंकली. गड लढविणे अशक्य असल्याचे पाहातच शत्रूने तो खाली करून सोडून दिला.

चंद्रवाडी ह्या नावाचा आणखी एक गड आंतोनियु दुश सांतुश यानी वसईच्या गव्हर्नरच्या हुकुमावरून घेतला. हा तिसरा हुकूम होता. ह्या गडावर शत्रूचे बरेच मोठे सैन्य होते, व तटबंदीही मजबूत होती.

वसईच्या गव्हर्नरने भिवंडी ह्या नावाच्या शहरावर हल्ला करण्याचा व कल्याणवर तोफा डागण्याचा निर्णय घेतला. शत्रूला ह्या हल्ल्याचा सुगावा लागल्याने त्याने भिवंडी येथे बरेच सैन्य आणून ठेवले. आंतोनियु दुश सांतुश हे ४० गलबते घेऊन भिवंडीला गेले. त्यांच्यापाशी २५० गोरे सैनिक आणि ४५० देशी शिपाई होते. शत्रू त्यांची किनाऱ्यावर वाट पाहात राहीला. आमचे सैन्य बंदुकांना संगिनी लावून किनाऱ्यावर उतरले व त्याने शत्रू सैन्यावर हल्ला चढविला. शत्रूने शहराच्या बाजारापर्यंत माघार घेतली. आमच्या सैन्याने दरवाजातून आत घुसून व केंबळाची सुमारे शंभर घरे जाळून टाकली. त्यांनी नंतर आपल्या नौकांपर्यंत शिस्तीत माघार घेतली. ह्या वेळी काळ्या शिपायांची शिस्त गोऱ्या शिपायांच्या शिस्तीहून चांगली होती. ह्या वरून एक गोष्ट सिद्ध झाली ती ही की, अशा रीतीने शिस्तीत लढणाऱ्या सैन्याला घोड-

दळाची भीती वाटण्याचे कारण नाही. पायदळाच्या शिपायांना घोडदळाची नेहमीच भीती वाटत आली आहे. मनोराच्या मोहिमेंत आमचे दोन सार्जंट, पाच गोरे सैनिक आणि पाच देशी शिपाई ठार होऊन १७ गोरे आणि काळे सैनिक ठार झाले.

गुडनगडावरील मोहिमेत फक्त दोन सैनिक जखमी झाले. भिवंडीवरील छाप्यांत आमचे तीन सैनिक ठार आणि सुमारे वीस जखमी झाले. त्या सगळ्यांना माघारा नेण्यात आले.

ह्या तिन्ही विजयानंतर शत्रूने आमच्यावर आणखी हल्ले चढविले नाहीत. दि. ६ नंतरची तिकडील बातमी नसल्याने शत्रूने आमच्याशी तहाची मागणी केली की काय ते कळलेले नाही. सांप्रत शाहूराजे ह्यांचे ह्या प्रदेशावरील लक्ष दुसरीकडे वेधले आहे. त्यांच्या सरदारांमध्ये दुफळी माजली आहे. दुसरी गोष्ट ही की, मोगल सरदार किलिचखान ह्यांच्याशीही ते लढत असल्याने त्यांना खाली सैन्य पाठविण्यास सवड नाही.

आमचे वकील पाद्री फिगेरेदु हे सांप्रत महाराजा सवाई जयसिंग ह्यांच्या दरबारात आहेत. शाहूराजे हे महाराजा सवाई जयसिंग ह्यांच्या जातीचे असल्याकारणे त्यांच्याविषयी महाराजांना सहानुभूती वाटते. परंतु ते पोर्तुगिजांचेही मित्र आहेत. म्हणून शाहू राजे व पोर्तुगीज ह्या दोघांचा ते तह घडवून आणण्याची शक्यता आहे.

इंग्रज आम्हाला फक्त पावसाळ्यामध्ये मदत करतात. ते साष्टी बेटाचे रक्षण करतात. पण आज त्यांच्यावर पोर्तुगीज हे आपले रक्षणकर्ते आहेत असे म्हणण्याची पाळी आली आहे. आंग्रयांनी त्यांच्यावर त्यांच्या बंदरातच हल्ला चढविला. त्यांच्यापाशी शिबंदी नव्हती फक्त तीन छोटया युद्धनौका होत्या. आमचा फिस्कलही तिकडेच होता. तो इस्त्रेला ह्या नावाच्या फ्रिगेटसह इंग्रजांच्या मदतीला धावला. त्याचे ते धाडस इतके यशस्वी झाले की, आंग्रयांच्या आरमारी तुकडीत नऊ पाले, तीन गलबते आणि दोन हजार खडे आणि शिवाय राखीव सैन्य असून देखील आमच्या युद्ध नौकेसमोर त्याला माघार घ्यावी लागली. अशा रीतीने इंग्रज युद्धनौका आंग्र्याच्या तावडीतून सुटल्या व त्या आपल्या आरमाराला जाऊन मिळाल्या.

ही वार्ता वसईच्या गव्हर्नरला आणि इंग्रजांना कळताच त्यांनी फार आनंद झाला. गव्हर्नरने माझे आभार मानले. इंग्रजांच्या मदतीला जाणारे पोर्तुगीज फिस्कल म्हणजे लुईज व्हियैरा मातोझु हे होत.

कमांडंट आंतोनियु दुश सांतुश ह्यांनी जी बहादुरी गाजविली त्याबद्दल त्यांना ९०० असुप्यींचे उत्पन्न बक्षीस म्हणून मी नेमून दिले आहे. महाराजांनी त्याला मान्यता द्यावी अशी माझी प्रार्थना आहे.

मी सहा फ्रिगेटस् बांधून घेतल्या असून त्यांतील तीन हलक्या आहेत. त्यांच्यावर किनाऱ्यावर पहारा करण्याची कामगिरी सोपविण्यात येणार आहे. सिद्दी व आंग्रे ह्यांच्या जहाजांवर पाळत ठेवण्याची कामगिरी त्यांच्याकडे राहाणार आहे. बाकीच्या तीन्ही फ्रिगेटस्चे एक आरमार बनविण्यात येणार आहे. माझ्यापाशी सांप्रत सैन्य आणि दारूगोळा ह्यांची कमतरता आहे. तिकडून येणाऱ्या नौकाही कमतरता दूर करतील. अशी आशा आहे. पैशांचीही अडचण आहे. कारण युद्धासाठी फार खर्च करावा लागला हे तर झालेच. पण सरकारी उत्पन्नातही घट झाली आहे.

आमच्या अडचणीकडे महाराज लक्ष देतील अशी आशा बाळगतो.

देव आपले रक्षण करोद्र वगैरे".

गोवा, २७ जून १७३१

(115) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 248.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, मराठ्यांनी तह केला नसल्यास त्यांच्या प्रदेशांत देशी शिपायांना पाठवून आक्रमणे सुरू करावीत.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस,—

आपण पाठविलेले शेवटचे गलबत ह्या बंदरातून तिकडे तीनदा जाण्यास निघाले आणि तीनदा परत आले. ते इंग्रजांच्या गलबतांसह इकडे पावसाळ्या-साठी आले. इंग्रजांच्या गलबतांसह इकडे पावसाळ्यासाठी आले. इंग्रजांच्या तीन गलबतापैकी एक गलबत फुटले.

मुंबईहून पाठविलेल्या एका जासुदाकडील वरील पत्रावरून कळले की, भिवंडीच्या मोहिमेनंतर उत्तरेकडील प्रदेशात आता शांतता आहे. आमच्या आणि शत्रूच्या दोघांच्याही लष्करी हालचाली बंद आहेत. काही विशिष्ट पत्रांवरून असेही कळते की, तिकडील काही खेड्यात पेरणी झाली आहे. परंतु आपणाकडून ह्या बातम्या अधिकृतपणे कळल्याशिवाय त्या खऱ्या आहेत असे मी मानू शकत नाही. तह जर झाला नाही, तर आपण शत्रू प्रदेशात शिपायांना धाडून आक्रमणे सुरू करावीत. हिंदुस्थानांत मला जो अनुभव मिळाला आहे, त्यावरून माझा असा अंदाज आहे की, बाजीरावाने जर माघार

घेतली, आणि किलिचखानाने शाहूराजे व बाजीराव ह्या दोघांशी युद्ध घोषणा केली तर कल्याणचे सुभेदार स्वतः होऊन तहाला तयार होतील. त्यांनी जर तहाची मागणी केली, तर आपण त्यांना सांगावे की, त्यांनी आमचा जो मुलुख घेतला आहे तो परत केल्याशिवाय त्यांच्याशी आपणाला तह करता येणार नाही. दुसरी गोष्ट आम्ही खंडणी भरणार नाही असेही त्यांना सांगावे. कारण, ह्या दोन्ही गोष्टी म्हणजे गुलामगिरीचे द्योतक आहे.

शत्रूकडून लुटण्यात आलेल्या वस्तू लिलावात काढाव्या. स्त्री कैद्यांच्या शिध्यात कपात करावी व त्यांनी आपल्या घरी आपल्या नातेवाईकाना पत्रे लिहावी म्हणून त्यांच्यावर सर्व प्रकारचे दडपण आणावे. त्यांनी जर लिहिले तर आपण त्यांना विरोध करू नये. कैद्यांना एका मापट्याचे तीन भाग तांदुळ आणि १२ पया इतका शिधा रोज द्यावा. ह्या संबंधीचा हुकूम कोठीदाराला द्यावा.

मला आलेल्या खासगी पत्रावरून कळते की, त्या प्रांतातील लोक आपल्या राज्य कारभारावर फार खुष आहेत. माझ्या मनातही आपणाविषयी आदर वसत आहे. हे आपणाला कळविण्याची जरूरी नाही.

जर तह झाला, तर तिकडील नवे पाले व दोन गाली ग्रेनेडियसंसह पाठवून द्यावी. फिरत्या सैनिकांना ठेवून द्यावे. माझ्या बदली येणारा व्हाइसरॉय जर आला नाही तर आंग्रे आणि सिद्दी ह्या दोघांना माझ्याशी तह करावयास लावण्याचा माझा विचार आहे.

जर पठाण आले, तर आपण त्यांचा उपयोग करून घ्यावा. कारण त्यांना कामाशिवाय मुशाहिरा देणे बरे वाटत नाही.

पत्रे गलबतावर पाठविली जात आहेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, ३० जून १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(114) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 127.

गोव्याचा गव्हर्नर इंग्लंडच्या दरबारातील पोर्तुगीज वकिलाला लिहितो की, वसई प्रांतात पोर्तुगिजांनी काही विजय संपादन केले असल्याने पोर्तुगीज आणि मराठे ह्यांच्यामध्ये तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या आहेत.

लंडनच्या दरबारातील पोर्तुगीज वकील आंतोनियु गाल्व्हांव द लासेदे ह्यांस,--

गेल्या वर्षी इंग्रज नौकांवरून मला आपले पत्र आले नाही. परंतु इतर बातम्यांवरून मला कळले आहे की, आपली प्रकृती उत्तम आहे. आपणाविषयी मला आदर वाटतो हे आपणास लिहिण्याची जरूरी नाही. आपल्या पत्रासमवेत जात असलेली पत्रे आमच्या दरबारात लवकर पोहोचती करण्याची तसदी घ्यावी.

इकडे सांप्रत विशेष घडामोडी नाहीत. उत्तरेकडील प्रांतात आम्ही काही विजय संपादन केल्यामुळे मराठ्यांशी तहाच्या वाटाघाटी सुरू होण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

देवाने आपणाला पुष्कळ वर्षे आयुष्य द्यावे अशी त्याच्यापाशी प्रार्थना आहे.

गोवा, १ ऑगस्ट १७३१

आपला मित्र,

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(118) LIVRO DAS MONCOES, No. 99, FLS 262.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत ह्यांच्या वकीलाने पोर्तुगिजांशी जुळवून आणलेला तह मोडला गेल्याबद्दल आपणाला आश्चर्य वाटत नाही.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस--

आपले दिनांक २४ जुलैचे पत्र मिळाले. पावसाळ्यामध्ये आपण मला लिहिलेले हे पहिलेच पत्र आहे. तिकडील बातम्या नसल्याने मी काळजीत होतो. आपले पत्र आल्यावर ती काळजी दूर झाली.

अप्पाजीपंत ह्यांच्या वकिलाने आमच्याशी जुळवून आणलेला तहाचा करार त्यांनी मोडला ह्या बद्दल मला बिलकूल आश्चर्य वाटत नाही. माझ्या अनेक पत्रावरून आपणाला ते कळून येईलच. आप्पाजीपंतांचे वकील त्यांचे कटुंब आणि कल्याणमधील व्यापारी ह्यांना मुक्त न करण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे तो मला मान्य आहे. त्यांना अटक करून ठेवल्याने तरी तह होतो का बघूया. मग हा तह भावी कालात टिको वा न टिको. आता आपण एकाच गोष्टीचा भरवंसा ठेवला पाहिजे आणि तो म्हणजे बाजीराव आणि शाहूराजे हे दोघे हा तह मान्य करतात की काय हा. किंवा

किलिचखानाने त्यांच्यावर हल्ला करताच त्यांनी तहाची मागणी करणे. येत्या जासुदाकडे तहाची कलमे येण्याची मी वाट पाहात आहे. आणि त्यांनी जर तहासंबंधी काही हालचाल केली नाही तर आपण त्यांच्याशी चकमकी सुरू कराव्या.

आपणाला ज्या बातम्या कळल्या आहेत त्याच बातम्या चौलच्या कॅप्टननेही मला कळविल्या आहेत. तह जर झाला तर नवीन पाली आणि दोन्ही गाली ह्यांच्यावर ग्रॅनेडियर्सच्या कंपन्या इकडे पाठवून द्याव्या. ह्या संबंधी मी आपणाला मागे लिहिले होते, ते आठवत असेलच. त्या नौका आणि माझ्यापाशी असलेल्या नौका मिळून एक चांगले आरमार होईल. त्या आरमाराचा उपयोग बंदरांवर छापे घालण्यासाठी व ह्या प्रांताच्या किनाऱ्याचे रक्षण करण्यासाठी होईल. व्यापाराचे रक्षण करणारे आरमार म्हणूनही त्याचा उपयोग करता येईल असे मला वाटते.

सिद्दी आणि आंग्रे ह्या दोघांचे युद्ध पेटले आहे. चौलच्या कॅप्टनला मी सावध राहाण्याचा इशारा दिला आहे. जर माझ्याजागी दुसरा व्हाइसरॉय आला नाही, तर मी तिकडे ठाण्याच्या पहाणीसाठी जाणार आहे. ठाण्याच्या दुरुस्तीची आवश्यकता तर आहेच. पण भावी कालात नवीन पद्धत स्वीकारण्याचीही आवश्यकता आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २० ऑगस्ट १७३१

ता. क. मनोराच्या जंगलात मिळालेल्या विजयाबद्दल अभिनंदन.

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 128V.

मराठ्यांनी पोर्तुगिजांचे कांब ह्या नावाचे ठाणे घेतले असता, त्या ठाण्याच्या कॅप्टनने व्हाइसरॉयला जेव्हा ती वार्ता कळविली, तेव्हा त्याने त्याला पुढील उत्तर लिहिले.

"लुईज द मेलु द सांपायु ह्यांस––

आपले दि. २५ जुलैचे पत्र मिळाले. त्या पत्रात आपण कांब मराठ्यांनी घेतल्याचे कळविले आहे. त्याचप्रमाणे शत्रूने दगलबाजीने युद्धकैदी केल्याचे, त्यांची नंतर मुक्तता केल्याचे, व त्यांना वसईला जाण्यास परवानगी दिल्याचेही आपण कळविल आहे. आणि शेवटी आपण सैबाणच्या छावणीचे कॅप्टनपद आपल्याकडे परत देण्याची मागणी केली आहे.

ह्या सर्व प्रश्नांची उत्तरे देताना मला आपणास कळवायचे आहे की, केवळ अंदाधुंदीमुळे कांब शत्रूच्या हातात पडले. शत्रूला हा विजय अगदी स्वस्तात मिळाला. त्यांनी आमच्या अधिकाऱ्यांना आणि सैनिकांना केवळ युक्तीने कैद करून निःशस्त्र केले. हा विजय त्यांनी केवळ क्लृप्ति लढवून मिळविला.

आपण म्हणता की, आपण शत्रूच्या शपथेवर विसंबून राहिलो. हा गाफीलपणा आपणाला क्षमा करता येण्यासारखा नाही. आपण ओलीस ठेवलेल्या माणसांना बरोबर न घेता बाहेर पडला हा आपल्या हातून मोठाच हलगर्जीपणा घडला. आणि वर आपण माझ्याकडे आपल्या अधिकारपदाची मागणी करता मी आपणाला कळवीत आहे की, ही मागणी करण्याचा आपणाला अधिकार नाही. कारण, आपले कर्तव्य आपण नीट बजावलेले नाही.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २० ऑगस्ट १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(120) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 128.

वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांशी जो तहजुळवून आणला त्याला व्हाइसरॉयने मान्यता दिली.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझीस, ह्यांस—

चौधरीच्या मुलांविषयी आपण जे गूढ भाषेत लिहिले आहे ते वाचून आनंद झाला. त्या प्रांतात शांतता राखण्याचा तो एकच काय तो सुरक्षित मार्ग आहे. आपण त्याला जी उत्तरे पाठविलीत ती मला मान्य आहेत. आपणाला मला फक्त एकच गोष्ट सूचवावयाची आहे ती ही की, आम्ही आता तिकडे तह केला असल्याने युद्धाची सर्व जबाबदारी मुसलमानांवर टाकण्याचा प्रयत्न करावा. पैशांसंबंधी आपण त्याला लिहावे की, मराठ्यांशी पुष्कळ दिवस युद्ध करावे लागल्याने आपणापाशी पैसा नाही. इंग्रज गव्हर्नरकडेही कर्ज मागता येत नाही. त्याची कारणे दोन आहेत. इंग्रजांना प्रस्तुत गोष्टीचा सुगावा लागू न देणे, युरोपियन राष्ट्रांमध्ये पैशाच्या टंचाईचा गवगवा होऊ न देणे. तिसरी गोष्ट आपणाला दुसऱ्यांकडे कर्ज मागण्याचे स्वातंत्र्य नाही असे सांगणे.

रघुनाथपंत ह्यांच्याशी आपण जो तह जुळवून आणला आहे त्या तहाची कलमे मला पसंत आहेत. पण ह्या बाबतीत मी आपणाला आठवण करून

देत आहे की, त्या करारात मराठयांनी बळकावलेली इंचभरदेखील शाही जमीन सोडण्याचे व नजराणे पाठविण्याचे कलम असू नये. हा करार झाला नाही तर, आपण पंतांचा वकील आणि कल्याणचे व्यापारी ह्यांची मुक्तता करू नये".

गोवा, २० ऑगस्ट १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

व्हॉइसरॉय वसई शहराच्या कॅप्टनला लिहितो की, केवळ दैवी कृपा आणि पोर्तुगिज लष्कराची भीती ह्यामुळेच मराठे तह करण्यास तयार होतील.

"वसई शहराचे कॅप्टन दों. लुईज कायतानु द आल्मैद ह्यांस--

आपले मागच्या महिन्याच्या २४ चे पत्र मिळाले. आपण मला पत्र लिहिण्याची तसदी घेतलीत ह्याबद्दल मी आपला आभारी आहे. कल्याणच्या सुभेदाराने तहाच्या करारात कोलदांडा घातला ह्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. आम्ही त्यांना तहाला प्रवृत्त केल्याने ते तह करण्यास तयार होतील असे मला वाटत नाही. फक्त दैवी कृपा आणि पोर्तुगिजांचे लष्करी बळ ह्यामुळेच हा तह होईल.

त्या ठाण्याच्या ज्या गरजा आहेत त्यांना मी तूर्त मंजुरी देऊ शकत नाही कारण, वेळ योग्य नाही. साधनांचा उपयोग करण्याची परिस्थिती निर्माण होताच मी त्या गरजा मंजुर करीन.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २२ ऑगस्ट १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(121) BACAIM, No. 5, FLS 128.

उत्तरेकडील प्रांतातील सैन्यांच्या कंपन्यांचे कप्टन--मोरने मराठयांची तीन खेडी जाळल्याबद्दल व्हाइसरॉय त्याचे खालील पत्रात अभिनंदन करतो व जाळपोळीचे सत्र असेच चालू ठेवावे अशी त्याला चिथावणी देतो. आपल्या १३ जुलैच्या पत्राचे उत्तर पाठविताना त्या प्रांतांत आपणाला जे यश मिळत आहे त्याबद्दल मी आपले अभिनंदन करीत आहे. मनोरा नदीवरील जंगलात आपणाला जो विजय मिळाला आणि आपण नजीकची जी तीन खेडी जाळलीत तो आपला पराक्रम खरोखरच कौतुकास्पद आहे.

मराठ्यांशी होऊ घातलेला करार जर झाला नाही तर, चकमकींचे सत्र आपण असेच चालू ठेवावे. मला वाटते शत्रूच्या छातीत धडकी भरण्यास आपले नाँव बस आहे".

गोवा, २२ ऑगस्ट १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(123) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 131.

व्हॉइसरॉय वसईच्या गव्हर्नरला असा सल्ला देतो की, मराठ्यांशी होऊ घातलेला तहाचा करार होवो अथवा न होवो, पण मोगल सैन्य जर कल्याणवर चालून आले तर त्याला मदत करावी.

"उत्तरेकडील सेनापतीस—

मराठ्यांशी तह झाला तर फार चांगले. पण जरी तो झाला नाही, तरीदेखील मोगल सैन्य कल्याणवर चालून आल्यास आपण ह्या सैन्यास पैशाची मदत सोडून इतर सर्व प्रकारची मदत करावी. ह्या बाबतीत किलिच-खान व इतर मुसलमान ह्यांना आपण जी पत्रे लिहिलीत ती पत्रे मला मान्य आहेत. मुसलमानांकडून आपणाला जी पत्रे येतील ती पत्रे आपण माझ्याकडे जशीची तशी न पाठविता त्यांचा आशय तेवढा सांकेतिक भाषेत पाठवावा मग पत्र घेऊन येणारी जहाजे सुरक्षित असोत वा नसोत.

भिवंडीच्या व्यापाऱ्यांना पकडावे. त्यांच्याशी वाटाघा ी करू नयेत मात्र पैसे घेऊन त्यांची मुक्तता करण्यास हरकत नाही. त्यांच्याकडे मोठ्या रकमांची मागणी करावी. परंतु माझ्या परवानगीशिवाय सौदा पटवू नये.

ेव आपले रक्षण करो".

गोवा, २९ ऑगस्ट १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(124) BASAIM, No. 5, FLS 131V.

कल्याणच्या सुभेदाराने तह केला नाही म्हणून व्हाइसरॉय त्याला शिव्या देऊन वसईच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहितो।—

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन सिव्हैराद मिनिझीश ह्यांस—

आपले दि. ३१ जुलैचे पत्र मिळाले. कल्याणच्या गव्हर्नरने आपला शब्द पाळला नाही. ह्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. कारण,

ही माणसे विश्वास ठेवण्याच्या लायकीची नाहीत. ती पाजी आणि लुच्ची आहेत. मी मनात पक्की खूणगाठ मारली आहे की, हा तह आमच्या सामर्थ्याच्या बळावर तरी होईल अथवा घाटामध्ये होणाऱ्या युद्धानंतर तरी होईल. ज्याअर्थी, कल्याणच्या सुभेदाराविषयी आपणाला तिरस्कार वाटत आहे त्याअर्थी, आपण त्यांच्याशी कुरापत चालू ठेवाल अशी आशा आहे. अलीकडे सैवाण नजीकच्या खेड्यात ज्या चकमकी झडल्या त्यांची बातमी वाचून आनंद झाल्यावाचून राहिला नाही. त्यांनी केळमे नावाच्या खेड्यात कुरापत काढल्याची बातमी इकडे आली आहे. परंतु ही बातमी मला आपणाकडून अधिकृतपणे कळली नसल्याने तिच्यावर मी विश्वास ठेवीत नाही. आणि ती जर खरी असेल तर ते त्यांच्या ओसरलेल्या उत्साहाचे द्योतक आहे असे म्हणावे लागेल.

अप्पाजीपंत ह्यांच्या पत्राला आपण जे शेवटचे उत्तर पाठविलेत ते मला पसंत आहे. आणि शाहूराजे यांच्या दरबारात पोर्तुगीज व मराठे ह्यांच्यामध्ये होऊ घातलेल्या तहाविषयी कुणीच काही बोलत नाही अशा आशयाचे जे मुजोरपत्र मला गणेश नाईक ह्यांच्याकडून आले आहे त्या पत्राची नक्कल मी आपणाकडे पाठवीत आहे. अंताजी रघुनाथपंत आणि पिलाजी जाधव ह्या दोघांकडूनही मला पत्रे आली आहेत. परंतु त्या पत्रावर माझा विश्वास बसत नाही. त्या पत्रांना मी जी उत्तरे पाठविली आहेत त्यांच्या नकला मी आपणाकडे पाठवीत आहे. ह्या उत्तरांचा आशय कल्याणला कळावा म्हणून आपण ती कल्याणच्या वकिलाला दाखवावी. त्यांनी मला केलेल्या सूचना किती भयंकर आहेत ते एकदा कल्याणच्या सुभेदाराला कळून चुकलेले बरे. ही काळजी घेतलेली बरी. कारण तथाकथित गणेश नाईक उर्फ इग्नासियु द सांतातेरेझा हा एक क्षुद्र म्हातारा आहे. त्याच्याविषयी मला जे काय माहीत आहे त्यावरून त्याला पोर्तुगिज लिहीता येते हे मला माहीत आहे. तो पुष्कळ दिवस माझ्याकडे होता. त्यांनी मला जी तहाची कलमे सूचविली आहेत, ती मला मान्य आहेत असे सांगणारे एकादे माझे बनावट पत्र तयार करण्यास हा मनुष्य कमी करणार नाही.

माझ्या मार्गातील पैशाची अडचण ही सर्वांत मोठी अडचण आहे. पण तरीही मी तयारी करीत आहे. माझ्याबदली जर नवीन मनुष्य आला नाही तर, तिकडे युद्ध चालू झाल्यास मी नक्कीच येणार आहे. तरी माझ्यासाठी एकादे घर बघून ठेवावे.

ग्रॅनेडियर्सच्या कंपन्यांनी बंड केले असल्याची वार्ता इकडे आली आहे. ह्या बंडाळीमागे एकाद्या अधिकाऱ्याचा हात आहे की काय याची गुप्तपणे

चौकशी करून मला ताबडतोब गुप्त रीतीने कळवावे. माझ्याकडे आपण ज्या मंजुऱ्या पाठविल्या होत्या त्या परत जात आहेत.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २९ ऑगस्ट १७३१ ज्युआंव द साल्दान्य द गामा

## (125) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 131.

वसई प्रांतातील घोडदळाचे कमिशनर जनरल, साष्टी बेटाचे आणि ठाण्याच्या किल्ल्याचे कमांडर सिंज्योर फ्रान्सिश्कु द मेलु द काश्त्रु हे उत्तरेकडील प्रांताचे दीवपर्यंतच्या शाही महसूल खात्याचे कॅप्टन जनरल सिंज्योरा मार्तीन्यु द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांना मराठ्यांचे एक उत्कृष्ठ बंदर पनवेल ह्याच्यावर केलेल्या हल्ल्याचा दैनंदिन वृतांत खालील पत्रात सादर करतात.

"आपण मला चालू महिन्याच्या दोन तारखेस पनवेल जाळून टाकण्याचा हुकूम केला होता. तसेच त्या बंदरात जी जहाजे होती त्यांनाही आग लावून देण्याचा व शत्रूची सर्व प्रकारची हानी करण्याची आपण मला आज्ञा केली होती आपल्या हुकुमाप्रमाणे प्रस्तुत मोहीम मी पुढील प्रमाणे पार पाडली.

त्याच रात्री वसईच्या शिबंदीत असलेली शिबंदी मी पनवेलला पाठवून दिली. सोपाराच्या छावणीत ज्या दोन कंपन्या होत्या त्यांनाही मी तिकडे निघण्याचा हुकूम केला. ह्या कंपन्यांबरोबर शिपायांच्या पंधरा कंपन्या जात होत्या. हे सैन्य बावीस गलबतात बसून रवाना झाले. ह्या गलबतांना ठाण्याच्या किल्ल्यातील दोन कंपन्या भरलेली आणखी पाच गलबते येऊन मिळाली. ह्या दोन्ही गोऱ्या कंपन्यांबरोबर शिपायांच्या आणखी दोन कंपन्या होत्या. ह्या सर्व सैन्याची एक सलग तुकडी बनली व ती गंटा नदीत प्रवेश करती झाली. (तेथे दिवस उजाडला). तो दिवस तेथे घालविण्याचा माझा विचार होता. पण ते शक्य झाले नाही. कारण, त्या किनाऱ्यावर फार चिखल असल्याने सैन्य उतरविता आले नाही. फक्त शिपायांचे तेवढे थोडे सैन्य तेथे उतरविण्यात आले. हे सैन्य जमिनीवरून तुर्भेकडे रवाना झाले नंतर जहाजेही तुर्भेकडे रवाना झाली, व त्या किनाऱ्यावर सैन्य उतरविण्यात आले. ते सैन्य पुढीलप्रमाणे होते. ग्रॅनेडियर्सच्या चार कंपन्या, फ्युजिलियर्सची एक कंपनी, एकूण गोरे सैन्य त्यांच्या अधिकाऱ्यासह २०८. शिपाई ५०२. हे सर्व सैन्य मी जहाजांवर चढविले. हे काम संध्याकाळी सहा वाजेपर्यंत पूर्ण झाले. ती वेळ भरतीची होती. भरतीची जरूरी असल्याने मी तिची वाटच पाहात होतो.

मी त्या किनाऱ्यावरून एकूण ३५ गलबतासह पुढे निघालो. ह्या गलबतांबरोबर आणखी दोन गलबते जात होती. त्यातील एक गलबत बाँब्सनी भरलेले तर दुसरे दारूगोळ्याचे होते. ह्या सर्व गलबतांना पाच युद्धनौकांचे संरक्षण होते. मी थेट साबाजला गेलो. तेथे मला आपले शेवटचे हुकूम मिळाले. तेथे माझ्या गलबतांना आणखी दोन गलबते येऊन मिळाली. ती तिथल्या ख्रिश्चन शिपायांची होती. त्या गलबतांवर सेकंड लेफ्टनंट आलेशांद्र पेरैरा कौतिन्यु व दोमिंगुश एल्सा हे दोघे अधिकारी जात होते. दारूगोळा आणि बाँब्स ह्यांनी भरलेली दोन्ही जहाजे मी मागे ठेवली. कारण ही जहाजे पनवेल नदीत ओहोटीच्या वेळी ठेवता येत नव्हती. ती जर ठेवली असती तर ती नेण्याचा हेतु सफल झाला नसता. लोकांची अशी कल्पना होती की, पनवेल नदीत आम्हाला काही अडथळ्यांना तोंड द्यावे लागेल. पण तसे काही घडले नाही. आम्ही कांदेच्या किनाऱ्यावर सैन्य उतरविले. तेथे मी १३ गलबतांसह जाऊन पोहोचलो. सैन्य उतरविण्याचे काम कोणताच गोंधळ न होता पार पडले. अशा प्रसंगी हे काम शांतपणे क्वचितच होत असते. आणि तेही शिपायांसारख्या कमी शिस्तीच्या माणसांचे बाबतीत.

ज्या ठिकाणी सैन्य उतरविण्यात आले ती जमीन इतकी अरूंद आणि लहान होती की, तेथे एक बटॅलिअनदेखील बनविणे अशक्य होते. म्हणून मला ओहोटीपर्यंत थांबावे लागले. तत्पूर्वी नदीच्या पैल तिरावर तिनशे शिपाई पाठविले. ते पलीकडे छातीभर पाण्यातून गेले. त्या शिपायांच्या प्रत्येकी दीडशेच्या दोन तुकड्या पाडण्यात आल्या व त्यांचे नेतृत्व घोडदळातील कॅप्टन झुजे द फिगेरेदु ह्यांच्याकडे देण्यात आले. मी त्या ठिकाणी चंद्रोदया-पर्यंत थांबलो व मग मी पनवेलच्या दिशेने चाल करण्यास सुरूवात केली. कॅप्टन झुजे द फिगेरेदु ह्यांच्या हाताखाली देण्यात आलेल्या दोन्ही तुकड्यांपैकी एक तुकडी किनाऱ्याच्या रोखाने आणि दुसरी किल्ल्याच्या रोखाने निघाली. ह्या सैन्याला शत्रुकडून प्रतिकार झाला. परंतु आमच्या सैन्याचा जोर झाल्याने त्यांनी माघार घेतली. आमच्या सैन्याने आपली कामगिरी यशस्वीपणे पार पाडली. त्यांनी किल्ल्यावर हल्ला केला नाही, कारण, आपणाकडून मला तसा हुकूम नव्हता. पनवेलीवर हल्ला यशस्वी तर झालाच, पण ते गांव ह्या हल्ल्यात पूर्णपणे उध्वस्थ झाले. सर्व प्रकारची चीजवस्तू त्या हल्ल्यात जळून खाक झाली. शिपायांनीही मोठी लुटालूट केली. मी त्यांना साबाजला ७९ गुरे आणण्याचा हुकूम केला. ही गुरे त्यांनी पनवेलच्या हल्ल्यात पकडली होती.

हल्ल्यात ठार झालेल्या माणसांची आम्ही गणती केली नाही. परंतु पुष्कळ माणसे जाळपोळीत होरपळून मेली. आमच्या बाजूची काही माणसे

ठार आणि अकरा जखमी झाली. ह्या हल्ल्यात ज्या गोऱ्या सैनिकांनी देशी शिपायांनी आणि अधिकाऱ्यांनी भाग घेतला त्या सगळ्यांनी त्यांना नेमून दिलेली कामे शिस्तीत पार पाडली.

देव आपले रक्षण करो ".

ठाण्याचा किल्ला, ७ ऑक्टोबर १७३१

फ्रान्सिश्कु द मेलु द कास्त्रु

(126) LIVRO DAS MONCOES, No. 91, FLS 190.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात तिकडून पत्रे आली नाहीत म्हणून चिंता व्यक्त करतो.

" उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिस, ह्यांस––

अलीकडे त्या प्रांताची खबरबात नसल्याने मी फार बेचैन होऊन गेलो आहे. कारण, अजूनपर्यंत तरी तिकडून एकही गलबत इकडे आलेले नाही. मी आपणाला जासुदाबरोबर आणि १० सप्टेंबरला गलबतावर पाठविलेली पत्रे आपणाला मिळाली की नाही ते जाणून घेण्यास फार उत्सुक झालो आहे. पत्रे गहाळ झाली असल्यास आपण मला तसे कळविणे आवश्यक होते.

देशाहून अद्याप नौका आल्या नसल्याने मी फार अस्वस्थ झालो आहे. इकडून मोसमामध्ये पाठविलेली पत्रे आपणाला मिळाली की नाही ते ताबडतोब कळवावे.

युद्ध चालू असल्यास चकमकी चालू ठेवाव्या, आणि दीवला पठाणांचे सैन्य तयार करण्याच्या बाबतीत हलगर्जीपणा करू नये. जेरोनिमु द व्हाद्र ह्यांनी मला कळविले आहे की, पठाणांना निश्चितपणे पाठविण्यात येईल. जर तह झाला तर ग्रॅनेडियर्सच्या तुकड्या, नवीन पाले व दोन्ही गाली ह्यांच्यासह इकडे त्वरीत पाठवून द्याव्या. कारण ह्या नौकांशिवाय उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील आरमार तयार करता येत नाही. तह जरी झाला तरीदेखील त्या प्रांतातील ठाणी आणि बुरूज ह्यांच्या दुरूस्तीसाठी मी पैसा पाठवीत आहे. आपल्या सूचनांची वाट पाहात आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, १० ऑक्टोबर १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(127) LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 134.

वसई येथील पोर्तुगीज सैन्याने पनवेलवर यशस्वी छापा घातल्याबद्दल व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरचे पुढील पत्रात अभिनंदन करतो.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

पनवेलच्या यशाबद्दल मी आपले अभिनंदन करतो. मी फ्रान्सिस्कु द मेलु ह्यांना पत्र लिहून त्यांचे आभार मानले आहेत. ह्या मोहिमेच्या तयारीसाठी दों. लुईज द कायतानु व त्यांचे सासरे दों आंतोनियु द कास्त्रु ह्या दोघांनी जी मेहनत घेतली त्याबद्दल त्या दोघांचे आपण माझ्या वतीने आभार मानावेत.

बाजीरावांचे बंधू त्या प्रांतावर चालून येत असल्याची जी बातमी आहे तिच्यावर माझा विश्वास बसत नाही. कारण मला इकडे ज्या बातम्या कळल्या आहेत त्या बातम्याशी प्रस्तुत बातमी विसंगत आहे".

गोवा, २४ ऑक्टोबर १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(128) LIVRO DE BAEAIM, No. 5, FLS 138B.

व्हाइसरॉय वसईच्या गव्हर्नरला कळवितो की, गोव्याला संभाजी व बाजीरावाच्या सैन्याचा एक भाग ह्यांच्यापासून धोका निर्माण झाला आहे.

"उत्तरेकडील सेनापती मार्तित्यु द सिल्व्हैर द मिनेझिश, ह्यांस—

ह्या फ्रिगेटवर २० हजार असुर्प्या पाठवीत आहे. त्याचा विनियोग आपल्या आज्ञेप्रमाणे करावा. चौलला २० हजार पाठवीत आहे. त्या ठाण्याविषयी आपण आता निश्चित असावे.

किनाऱ्यावरील फ्रेंच माणसे इकडे पोहोचली आणि युद्ध चालू राहिले तर, मी त्यांना तिकडे लगेच पाठवून देईन. युद्ध थांबले तर ते पाच किंवा सहा जानेवारीपर्यंत थांबेल. युद्ध थांबल्यास युद्धातून बचावलेल्या ग्रॅनेडियर्सना इकडे त्यांच्या अधिकाऱ्यासह पाठवून द्यावे. फिलीप द व्हालादारिश ह्यांनाही त्यांच्या-बरोबर इकडे येण्याचा माझा हुकूम आहे असे त्यांना कळवावे. आमची फ्रिगेटस् किनाऱ्यावर असल्याने त्यांच्यामधन आणि छोट्या गा लियांतून त्यांना इकडे येता येईल. कारण, त्यांची मला इकडे फार जरूरी आहे. फ्रिगेटस् नसल्यास त्या माणसांना नवे पाले आणि गालिये ह्यांच्यामधून आणता येईल.

इश्त्रेला हे फ्रिगेट चौल आणि वसई येथे दारू घेऊन जात आहे. ह्याच फ्रिगेटवर दीवलाही दारू आणि काही माणसे पाठविण्यात येत आहेत. ही नौका दीवहून सुरतलाही जाईल, व तिथनवसईला येईल, ह्या कालात जर

त्या नौकेवरील माणसांची आपणाला आवश्यकता असली. तर त्यांना मुंबईला सोडण्याचा हुकूम देण्यात आला आहे. इथून लवकरच निघणाऱ्या इतर दोन फ्रिगेटसनाही हाच हुकूम देण्यात आला आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १९ नोव्हेंबर १७३१

ता. क. मला संभाजी व बाजीरावाची एक तुकडी ह्या दोघांपासून धोका निर्माण झाला आहे. परंतु माझ्या आतापर्यंतच्या अनुभवावरून त्यांना अगोदर धमकी दिली तर हा धोका टळेल असे मला वाटते. मी आवश्यक ती काळजी घेत आहे.

माझी अशी समजूत आहे की, कोठीदार दुरुस्त व्हायची व दुरुस्त न होण्यासारखी हत्यारे फ्रिगेटने परत मागविणार आहेत. त्यांनी हा हुकूम जरी धाडला नाही तरीदेखील आपण त्याची अंमलबजावणी करावी.

ज्युआंव साल्दान्य द गामा

LIVRO DE BACAIM, No. 5, FLS 144.

उत्तरेकडील प्रदेशाच्या पायदळाचे कॅप्टन मोर आंतोन्यु दुश सांतुस ह्यांना मनोराच्या वेढ्यासंबंधी मिळालेला वृत्तांत :—

मराठ्यांनी मनोराला वेढा घातला असता त्या ठाण्याच्या कप्टनने प्रांताचे सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांना ती बातमी कळविली व संरक्षणाला आवश्यक असलेल्या गोष्टी पाठविण्याची त्यांना विनंती केली. ठाण्यामध्ये पाण्याची मोठी टंचाई होती व महत्त्वाची उणीव तीच होती. सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांनी कॅप्टन मोरना हुकूम केला की, त्यांनी सोपारा येथील ठाण्यातील माणसांसह मनोराच्या मदतीला आवश्यक त्या वस्तू घेऊन जावे. गल्व्होतज (?) येथील ठाण्यामध्ये दीडशे माणसे होती. ह्या माणसांना दोन युद्ध नौकामध्ये भरून ती सोपारा नदीतून मनोराकडे हाकण्यात आली. नदी इतकी अरूंद आहे की, तिच्या काठावरून सुटणाऱ्या बंदुकीच्या गोळ्या नौकांवरून जात होत्या. नदीच्या एका कांठावर शत्रू होता, व त्याने फेइराझ हे बेट घेतले होते. नदीमध्ये शत्रूने अडथळे उभारले होते. त्यामुळे नौकांना थांबवावे लागले. शत्रूचा गोळीबार चालू असतानाही ते अडथळे कुऱ्हाडीने तोडण्यात आले. हे अडथळे शत्रूने मनोरापर्यंत सर्वत्र उभारले होते. सैन्यदेखील शत्रूच्या गोळीबारास न जुमानता उतरवावे लागले. सैन्य उतरल्याबरोबर मोर्च्यांच्या आड गेले. कारण शत्रचा

गोळीबार अविरत चालू होता. ठाण्याला वेढा घालणारे शत्रूसैन्य दोनशे पायदळ आणि दीडशे घोडेस्वार ह्यांचे होते. कॅप्टन मोरनी आपल्या सैन्याला पुढे चाल करण्याचा हुकूम दिला. त्या हुकुमाप्रमाणे सैन्याने चाल करताच उभयपक्षी क्षणभर तीव्र स्वरूपाची चकमक उडाली. ह्या चकमकीत आमच्या सैन्याची सरशी होऊन शत्रूने वेढा उठवून माघार घेतली. शत्रूची छावणी तिथून थोड्याशा अंतरावर असल्याची बातमी कळताच तिच्यावर हल्ला करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्याप्रमाणे हल्ल्यास सुरूवात झाली. परंतु छावणीतील शत्रू सैन्य पुष्कळच अधिक असल्याने चढाई थांबविण्यात आली. पण कॅप्टनमोर आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना म्हणाले की, आम्ही चढाई थांबविलेली पाहून शत्रूला वाटेल की, आम्ही त्यांना भ्यालो. म्हणून ते आमच्यावर फेर हल्ला चढवून आमचा नाश करतील. तरी धाडस करून चढाई पुढे चालू करू या. त्या निश्चयाप्रमाणे चढाई चालू करण्यात आली असता शत्रू मोर्च्याआड जाऊन लढू लागला. मोर्चे उध्वस्थ झाल्यावर शत्रूने माघार घेतली. पण नंतर चारशे पायदळाचे आणि दोनशाहून अधिक घोडेस्वारांनी आमच्यावर फेर हल्ला चढविला. आम्ही त्यांचा अगदी कडवा प्रतिकार केला. ह्या फेर हल्ल्यात शत्रूची शंभराहून अधिक माणसे ठार झाल्याने त्याने माघार घेतली. कॅप्टनमोरच्या सैन्यापैकी अवघे चार ठार आणि वीस जखमी झाले.

(७-१०-१७३१ आणि १६-१०-१७३१).

(130) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 192.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला कळवितो की, मुसलमानांच्या शब्दावर विश्वास ठेवू नये.

"उत्तरेकडील सेनापती मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस--

किलिचखानाने व इतर मुसलमानांनी लिहिलेल्या पत्रांच्या नकला वाचल्या. फक्त परिच्छेद सोडून इतर सर्व मजकूर मला मान्य आहे.

परिच्छेदात म्हटले आहे की, कराराचे बंधन नसताना आम्ही मदत करू. ह्या लोकांना गुपितांची दिक्कत नसते. हा दोष त्यांच्या बोलण्यातही असतो. म्हणून मजकुराचे भाषांतर करून ते जाहीर केले पाहिजे. कल्याणच्या लोकांशी कधीच तह करू नये. ही गोष्ट गुप्त असायला पाहिजे होती, ती कागदावर आणायला नको होती. कारण ती किलिचखानाच्या बाजूने असूनदेखील त्याला त्याबद्दल आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही.

देशाहून नौका न आल्याने सैन्याची टंचाई निर्माण झाली आहे. त्या प्रांताला मी फक्त ग्रॅनेडियर्सच्या दोन कंपन्याची तेवढीमदत पाठवू शकेन. संभाजीच्या धोक्याला तोंड देण्यासाठी मी गोव्यांमध्ये काही देशी सैन्य उभारले आहे. ते सैन्य आणि काही शिपाई इकडेच राहाणार आहेत. जेरोनियु द व्हाद्र ह्यांनी मला कळविले आहे की, पठाण तयार आहेत तोपर्यंत ते आले नाहीत तर जे फ्रिगेट मदत घेऊन जाईल ते त्यांना आणील.

खर्चाचा तक्ता पाहिला. मी आपणाला सांगितलेच आहे की, युद्ध कैद्यांना विशेष मानाने वागवू नये. आमच्या युद्ध कैद्यांना ते ज्यारीतीने वागवितात त्याचप्रमाणे आम्ही त्यांच्या युद्ध कैद्यांना वागविले पाहिजे. माझी तर अशी समजूत आहे की, त्यांच्या युद्ध कैद्यांना जर आम्ही वाईट रीतीने वागविले तर ते तहाला लवकर तयार होतील.

देशाहून नौका न आल्याने मी त्या प्रांताकडे जाऊ शकत नाही. मी अडीचशे फ्रेंचांची वाट पाहात आहे. मी आपणाला पुनः आठवण करून देत आहे की, तह झाल्यावर तिकडील ग्रॅनेडियर्स आणि नौका इकडे त्वरित पाठवून द्याव्या.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २५ ऑक्टोबर १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(131) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 139V.

व्हाइसरॉय वसईच्या सेनापतीला कळवितो की, त्याने मराठ्यांच्या युद्ध कैद्यांसंबंधाने जे धोरण स्वीकारले आहे ते आपणास पसंत आहे.

"आपल्या दि. ५ च्या पत्रात आपण जो अहवाल मला सादर केला आहे, तो माझ्या पहाण्यात आला. अप्पाजीपंत ह्यांच्या बेमुर्वतखोर सूचनांमुळे हा करार होऊ शकला नाही, हे मला आता कळून चुकले. वसईमध्ये असलेल्या युद्ध कैद्यांना आपण जी वागणूक देता आहात ती मला मान्य आहे. ख्रिश्चनांच्या पाद्री बापाला सांगावे की, त्यांच्या हवाली ज्या हिंदूना करण्यात आले आहे, त्यांच्या धर्मांतराच्या बाबतीत त्यांनी घाई करू नये. कारण, तसे झाले तर आम्हाला दुसऱ्या एका झगड्याला तोंड द्यावे लागेल. ख्रिश्चनांच्या बापाला सांगावे की, हे कैदी युद्धकैदी म्हणून त्यांच्याकडे ओलीस ठेवण्यात आले आहेत.

मला सातान्याहून ज्या बातम्या मिळाल्या आहेत त्या बातम्यांप्रमाणे पिलाजी जाधव हे अद्याप खाली उतरलेले नाहीत असे मला वाटते. मला सातान्याहून खुद्द पिलाजी जाधव ह्यांचेही पत्र आले आहे.

कल्याणच्या सुभेदाराला आपण जे उत्तर पाठविलेत ते चांगले आहे. व्यापारी कैद्यांना तुरुंगात टाकू नये, फक्त त्यांच्या शिध्यात तेवढी कपात करावी. त्यांना त्यांच्या पदरच्या पैशातून खाद्य जिन्नस विकत आणण्यास सांगावे, व सरकारी पैशातून फक्त मर्यादित अन्न तेवढे द्यावे.

सैनिक आणि अधिकारी ह्यांच्यामध्ये पसरलेल्या पटकीच्या साथीबद्दल वाईट वाटते. त्यांची छावणी दर पंधरा दिवसांनी किंवा महिन्याने बदलावी. केवळ ह्याच उपायाने साथीचे रोग आटोक्यात येतात.

लेप्टनंट जनरलचे पत्र वाचले, व मनोरा येथे मिळालेल्या विजयाबद्दल आनंद झाला. दर पंधरा दिवसांनी इकडे गलबत पाठवावे. फ्रिगेटवर पैसे पाठविले आहेत. त्या पैशातून इंग्रजांचा पगार नियमित द्यावा. आणि दीवहून जी हुंडी आली आहे तिच्यातून आणि इतर पैशातून सैन्याचा पगार द्यावा. आणि सवड झाल्यास ह्याच गलबतावर ३० हजार असुप्यांची एक हुंडी पाठविली जाईल. पाद्र्यांच्या इच्छेचा आपण वाईट अर्थ केल्याचे पाहून वाईट वाटते. ते आमच्या स्वामीची जी सेवा करतात ती फारच बहुमोल आहे.

तोफखाना आणि बडागड ह्यासंबंधी आपण कल्याणच्या सुभेदाराला जे पत्र पाठविलेत ते मला पसंत आहे. खेडी जाळण्याच्या मोहिमेत आपणाला जे यश आले ते कौतुकास्पद आहे. मानुएल लोपिश ह्यांना जे अपयश आले त्याचे समर्थन मी करू शकत नाही. मनोरा येथील पठाणांना मागे ध्यावे. ते तेथे आजारी पडत असल्याचे पाहून वाईट वाटते. साष्टी आणि सोपारा येथील तळ त्यांना चांगले आहेत. तिथून त्यांना मोहिमेवर पाठविता येईल. आंतोनियु दुश सांतुश ह्यांचे बदली दुसरा अधिकारी जात आहे. त्यांना आणि त्यांच्याबरोबर जाणाऱ्या सैनिकांना चांगली वागणूक द्यावी. लेप्टनंट कर्नल हे अनुभवी आहेत हे तर झालेच, परंतु खुद्द आमचे स्वामीनी त्यांची हिंदुस्थानात पाठविण्यासाठी निवड केली आहे.

फ्रिगेटवर सर्जन आणि दवाखाना जात आहे. रुग्णालयातील सैनिकांना चांगली वागणूक देण्याचा हुकुमही पाठवीत आहे.

सांताक्रुझच्या गडाच्या किल्लेदाराची नेमणूक केली आहे. त्याशिवाय आपण ज्यांची नेमणूक केली आहे, तेही फ्रिगेटवर जात आहेत. मिठाविषयीचा

आपला निर्णय मला मान्य आहे. मिठाची निर्यात करण्यास माझी परवानगी आहे. परंतु ह्या हुकुमाचा गाजावाजा न करण्याची काळजी घ्यावी. शिपायांच्या शुश्रुषेची परवानगी जात आहे. त्याचप्रमाणे छावणीतील सैन्याला खायला देण्याचीही मंजुरी जात आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे"

गोवा, १६ नोव्हेंबर १७३१

ज्युआंव द साल्दान्य द गामा

(132) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 140V.

मुंबईला गव्हर्नर वसईच्या किल्लेदारास लिहितो की, कल्याणच्या सुभेदाराने त्याला मराठे व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये मध्यस्थी करण्याची विनंती केली आहे.

"महाशय दों लुईज द आलमैद ह्यांस--

ह्या शहराच्या मोहिमेच्या सार्जंटमार्फत पाठविलेले आपले पत्र मिळाले. त्यांच्यामार्फत पाठविण्यात आलेली छोटी तोफही मिळाली.

काही दिवसामागे अशी बातमी कळली होती की, शत्रूने केळम ह्या नावाच्या खेड्यात आक्रमण करून काही खेडी जाळली. ह्या हल्ल्यात शत्रूची काही माणसे ठार होऊन त्याने माघार घेतल्याचीही बातमी होती. मी आमच्या दक्षिणेकडील नौकांच्या आगमनाची वाट पाहात आहे. ती गोव्याला थांबून तिथल्या बातम्या आणल्याशिवाय राहाणार नाहीत.

दोन दिवसामागे मी उत्तरेकडील सेनापतीला पत्र लिहून कळविले की, कल्याणच्या सुभेदाराने मला पत्र घालून मराठे व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये तह घडवून आणण्यासाठी मध्यस्थी करण्याची विनंती केली आहे. ह्या संबंधी वाटाघाटी करण्याकरता आपला एक वजनदार मनुष्य इकडे पाठविण्याची त्यांनी तयारी दर्शविली आहे, जर सेनापती महाशयांना ही गोष्ट पसंत असेल, तर त्यांनी आपला एकादा दूत इकडे पाठवावा. त्यांच्या उत्तराची मी वाट पाहात आहे. कारण, त्यांचे उत्तर आल्याशिवाय मला कल्याणच्या सुभेदारांच्या पत्रास उत्तर पाठविता येणार नाही. ह्या वाटाघाटीतून जे काय निष्पन्न होईल ते आपणाला कळविण्याची व्यवस्था केली जाईल. तथापि, मला आपणास मित्र ह्या नात्याने कळवायचे आहे की, कल्याणच्या सुभेदाराचा हा प्रस्ताव इथल्या माझ्या एका विश्वासातील व्यक्तीच्या प्रयत्नांनी आलेला आहे.

आपणाला कदाचित वाटण्याचा संभव आहे की, कल्याणच्या सुभेदाराने हा प्रस्ताव केवळ अडचणीमुळे पुढे मांडला आहे. पण वस्तुस्थिती तशी नाही तह आणि युद्ध ह्या दोन्हींपैकी चांगले काय ते आपणाला व आपल्या सारख्या लोकांना माहीत आहे. आमच्या शेजारच्या प्रदेशात शांतता प्रस्थापित व्हावी म्हणून ह्या प्रकरणी लक्ष घालण्याचे ठरविले.

आपण जो पक्षी मला भेट म्हणून पाठविला, त्याबद्दल मी आपला आभारी आहे. ह्या पक्ष्याचे युरोपात कौतुक झाल्यावाचून राहाणार नाही. तो मी युरोपात पाठवून देण्याचे ठरविले आहे. तिकडे पाठविण्याची जर आपली पत्रे असतील तर ती आमच्या जहाजांवर पाठवावी· जहाजे येत्या महिन्याच्या २० ला इथून निघणार आहेत.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

फोर्ट मुंबई, २५ डिसेंबर १७३१

आपला विश्वासू,

मित्र आणि सेवक,

राबर्ट कोइव्हन

## (133) LIVRO DAS MONSOES, No. 99, 321.

व्हाइसरॉय वसईची पत्रे नियमित येत नाहीत म्हणून चिंता व्यक्त करून वसईच्या गव्हर्नरला लिहितो.

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस--

यंदा तिकडून येणारी पत्रे कमी होत गेल्याने मला काळजी लागली आहे. म्हणून मी काही दिवसामागे तिकडे एक नौका रवाना केली. ती नौका तिकडे पोहोचली असेलच. आता हे गलबत पाठवीत आहे. तिथून आलेली पत्रे मेलुंडीला घेता येतील अशी आशा आहे.

तिकडून इकडे येणारी माणसे वेगवेगळी भाषा बोलतात. म्हणून तिकडला निरोप कळल्यावाचून मी नवीन निर्णय घेऊ शकत नाही. आणि म्हणून फ्रेंचांची व इतर राष्ट्रांची मदत मी थोपवून धरली आहे. जोपर्यंत ह्या मदतीची तिकडे जरूरी आहे असे मला कळविण्यात येणार नाही, तोपर्यंत ही मदत तिकडे पाठविली जाणार नाही. कुणाकडून तरी मला कळले आहे की, कोल राजाच्या एका दूताने मध्यस्थी करून तह घडवून आणला आहे. असे जर झाले तर मला फार आनंद होईल.

माझा प्रवास येत्या महिन्याच्या २५ तारखेपासून सुरू होणार आहे. जर तो पुढे ढकलला गेला तर मी आपणाला लगेच कळवीन.

देव आपले रक्षण करो, वगैरे". गोवा, २२ डिसेंबर १७३१.

ता. क. त्या प्रांतात जे पोर्तुगीज सैनिक, शिपाई आणि देशी माणसे आहेत त्यांची एक यादी करून माझ्याकडे पाठवून द्यावी.

गोवा, २९ डिसेंबर १७३१. ज्युआंव द साल्डान्य द गामा.

(134) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 144V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, बाजीरावाकडून आपणाला पत्र आले असून त्यात पोर्तुगीज तह का करीत नाहीत अशी विचारणा करण्यात आली आहे. ह्याच पत्रात बाजीरावाने खंडणी भरण्याबद्दलही लिहिले आहे, असे तो म्हणतो—

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश, ह्यांस—

आपल्या दि. ४, ५, ७ आणि २० डिसेंबरच्या पत्रावरून त्या प्रांताच्या परिस्थितीचे आकलन झाले. चौलचा दिवाण, बाजीराव आणि आंग्रे ह्यांचा हेतु कळला. त्यांना आपण जे उत्तर दिलेत ते मला पसंत आहे. मी आपणाला आंग्र्यांना न लिहिण्याबद्दल कळविले होते. पण हा एक मी अपवाद आहे असे धरून चालतो. मलाही बाजीरावाकडून पत्र आले आहे. ते दोन दूतांमार्फत पाठविण्यात आले. त्या पत्रात त्याने आम्ही तह का करीत नाही अशी विचारणा केली आहे. त्याने माझ्याकडे मागणी केली आहे की, वार्षिक खंडणी गोव्यामध्ये भरण्यात यावी. आपण चुतियाच्या पत्राला जसे उत्तर पाठविले तसेच उत्तर मी बाजीरावाच्या पत्राला पाठविले आहे. त्या उत्तराची नक्कल मी आपणाकडे पाठवीत आहे.

अप्पाजीपंत ह्यांनी जो लपंडाव चालविला आहे तो मी बाजीरावाला कळविला आहे.

माहीम केळमच्या प्रवेशाबद्दल आपला जो ग्रह झाला आहे तोच ग्रह माझाही झाला आहे. शत्रुप्रदेशात आक्रमणे करण्याबद्दल आपण जो निर्णय घेतला आहे तो मला मान्य आहे. कोल राजाच्या वकिलाच्या ठरावाबाबत मला आपणाला कळवायचे आहे की, आपण जे काय लिहिता त्याप्रमाणे वागावे.

बऱ्याच दिवसांपासून चौलची बातमी नसल्याने मी काळजीत आहे. संघाच्या पाद्रीकडे पैशांची आणखी मागणी करू नये. कारण त्या प्रांताकडे जो पैसा गेलेला आहे, तो त्यांनीच दिलेला आहे.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, ९ जानेवारी १७३२. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(135) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 145V.

व्हाइसरॉय वसईच्या किल्लेदारास लिहितो की, त्याच्या निवृत्तीपूर्वी आंग्रे आणि चूतिया ह्या दोघांनी जर पोर्तुगिजांशी तह केला, तर आपणाला आनंद वाटेल.

" वसईचे किल्लेदार दों. लुईज कायतानु द आल्मैद ह्यांस—

आपली दि. १० व ३० डिसेंबरची पत्रे मिळाली. त्या शिबंदीसाठी शस्त्रे मिळविण्याची आपण जी खटपट चालविली आहे, तिच्यामागील सद्हेतु मला कळला. पण ह्या आणि इतर प्रश्नासंबंधीचा निर्णय घेण्याचे काम माझे नसून ते माझ्या जागी येणाऱ्या नवीन व्हाइसरॉयचे असल्याने हा प्रश्न मी त्यांच्याकडे सोपवीत आहे.

तिकडून इकडे येण्याकरता निघालेले गलबत मेलुंदी येथे शत्रूने पकडल्या-मुळे मला आपली पत्रे मिळाली नाहीत.

आंग्रे व चूतिया ह्या दोघांनी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्याचे ऐकून आनंद झाला. हा तह जर मी हे सरकार सोडण्यापूर्वी झाला असता, तर त्याचे श्रेय मला मिळाले असते.

इंग्रज आणि आंग्रे ह्या दोघांमधील तह व्यवहारात उतरणार नाही हे मला माहीत होते. इंग्रजांनी नेहमी जागरूक राहिले पाहिजे, त्याचे हे एक कारण आहे.

कल्याणच्या सुभेदाराला आपल्या खेड्यात यश आले नाही हे ऐकून आनंद झाला.

मला कळविण्यात आले आहे की, परैकाची तटबंदी ही आपल्या कक्षेतील एका खेड्यात आहे. आणि म्हणून तेथे एका कॅप्टनची नेमणूक करण्याचे आपले वैशिष्ट्य आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, ९ जानेवारी १७३२. ज्युआंव द साल्दान्य द गामा.

(136) BASAIM, No. 5, FLS 146V.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या पत्रात वसईतील परिस्थितीचा आढावा घेतो.

" महाराज—

उत्तरेकडील सेनापतीने ज्या अहवालाची प्रत माझ्याकडे पाठविली आहे, तिच्यावरून त्या प्रांतातील विजयाची महाराजांना कल्पना होईलच अशी आशा आहे. गेल्या सहा महिन्यापासून तिकडे शत्रूची काही हालचाल नाही. मात्र, आमच्या हालचाली त्यांच्या प्रदेशात चालू आहेत. त्या प्रांतात पोर्तुगीज सैन्य आहे. नोंदणी पत्रकावरून ते दिसून येते. पोर्तुगीज सैन्याशिवाय ५०० पठाण आणि ३०० लष्करी शिपाईही तिकडे आहेत. ह्या सैन्यामुळे त्या प्रांताच्या नेहमीच्या शिबंदीत वाढ झाली आहे. ते आज बरेच मोठे आहे. शत्रूने अनेक वार तहाची मागणी केली, आमच्या लष्करी सामर्थ्याला भिवून नव्हे, तर अंतर्गत अडचणीमुळे. त्या कारणास्तव त्यांना कोकणात उतरता येत नाही, मराठे आज एवढे बलाढ्य आहेत की, ते आज केवळ मोगलांशीच लढत आहेत असे नाही, तर त्यांचा छळही करीत आहेत. सुदैवाने ईश्वराची आमच्यावर कृपा आहे म्हणून ठीक आहे, नाहीतर उत्तरेकडील प्रांताची परिस्थिती खरोखरच काळजी करण्यासारखी आहे.

मराठ्यांनी जो तहाचा प्रस्ताव सुचविला आहे त्यात दोन कलमे आहेत, आणि ती म्हणजे हिंदूचे धर्मस्वातंत्र्य मान्य करणे, त्यांना मंदिरे बांधू देणे व प्रत्येक खेड्यामागे मराठ्यांना खंडणी भरणे. त्यांचा ह्या बाबतीत असा युक्तिवाद आहे की, जर चूतिया राजा आणि कोल राजा खंडणी घेतात, तर मग ती आम्हीच का घेऊ नये ? पण ही दोन्ही कलमे मला मान्य नसल्याने त्यांना मी मान्यता दिलेली नाही. हा पोर्तुगीज हट्ट यशस्वी होऊन तह होईल किंवा माझ्या प्रयाणानंतर तरी तो होईल अशी मी आशा करतो. माझ्या बलाढ्य आणि सर्वश्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्यांचे रक्षण करो ".

गोवा, १० जानेवारी १७३३.

(137) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 185.

वसईचा किल्लेदार व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, कल्याणच्या सुभेदाराच्या विनंतीवरून मुंबईच्या गव्हर्नरने मराठे व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये तह घडवून आणण्यासाठी खटपट सुरू केली आहे.

" महाशय (सिज्योर)--

हे फ्रिगेट तिकडे जात असल्या कारणे, त्याच्यावर आपणाला पत्र पाठविण्याची संधी मी साधीत आहे. आपणाविषयी मला केवढा आदर वाटतो ते आपणास लिहिण्याची जरूरी नाही.

आपल्या निदर्शनास मी आणलेच आहे की, ह्या फ्रिगेटच्या समुद्रावरील आणि जमिनीवरील कॅप्टनने सुरतेच्या बंदरात दोन मालवाहू जहाजे पकडली होती. आता असे कळते की, ती जहाजे त्या बंदराच्या फ्रेंच आणि इंग्रज डायरेक्टर्सची आहेत. इंग्रज डायरेक्टरने मला पत्र घालून आपल्यामार्फत त्या जहाजांची मुक्तता करण्याची विनंती केली आहे. त्या राष्ट्राशी ज्या अर्थी आमचा चांगला संबंध आहे, त्याअर्थी त्या जहाजांची मुक्तता करावी असे मला वाटते.

आपणाला कळविण्यास मला आनंद वाटतो की, कल्याणच्या सुभेदाराने पोर्तुगीज व मराठे ह्या दोघांमध्ये उत्तरेकडील प्रांतात तह घडवून आणण्याची विनंती मुंबईच्या गव्हर्नरला केली होती. त्या विनंतीप्रमाणे मुंबईच्या गव्हर्नरने हालचाली सुरू केल्या आहेत. ह्या बाबतीत त्यांनी मला जे पत्र पाठविले होते, ते पत्र मी आपणाकडे प्रस्तुत पत्रासोबत पाठवित आहे. हा तह लवकर होईल अशी आशा आहे. ह्या वाटाघाटींचा वृत्तांत आपणाला कळविण्यात येईलच.

किलिचखान खाली उतरला असून त्याचे काही सैन्य चूतियाच्या प्रदेशात शिरले आहे. शाहूराजे ह्यांचा एक सरदार इकडे बाजीरावाच्या सैन्याला मिळण्याकरता आला आहे. शत्रूची काही माणसे पळून जात आहेत, व किलिचखानापासून आपला बचाव करण्याकरता आमच्या प्रदेशात शिरत आहेत. त्यामुळे तह लवकर होण्याची चिन्हे दिसत आहेत.

आपण ह्या मोसमात पोर्तुगालला निघून जात असल्याच्या बातमीला दुजोरा मिळत आहे. आपण निघून जात असल्याचे पाहून मला फार वाईट वाटते. कारण आपणाकडून मला नेहमीच प्रोत्साहन मिळत आले आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

वसईचा किल्ला, १५ जानेवारी १७३२.

(138) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 320.

मुंबईच्या गव्हर्नरने वसईच्या गव्हर्नरला पत्र घालून कळविले की, मराठ्यांचे दूत तहाच्या वाटाघाटीसाठी मुंबईला आले आहेत.

" महाशय (सिंज्योर) मार्तीन द सिल्व्हैरा द मिनझिश ह्यांस—

चालू महिन्याच्या १६ तारखेचे आपले पत्र आज सकाळी मिळाले. आपणास कळविण्यात येत आहे की, कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत ह्यांचे दोन दूत शिवराम पंडीत आणि रायाजी रामजी हे दोघे इकडे तहाच्या वाटाघाटी-साठी आले आहेत. त्यांचा दर्जा माझ्यापेक्षा आपणालाच अधिक माहीत असला पाहिजे. तरी ह्या वाटाघाटीत भाग घेण्यासाठी आपली समान दर्जाची माणसे आवश्यक ते अधिकार देऊन इकडे पाठवावी. आपल्या सेवेस मी सदैव हजर आहे. देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

फोर्ट मुंबई, १८ जानेवारी १७३२. आपला विश्वासू सेवक,
रॉबर्ट कोइव्हन.

वसईच्या गव्हर्नरने मुंबईच्या गव्हर्नरच्या पत्रास पुढील उत्तर पाठविले.

" सर रॉबर्ट कोइव्हन ह्यांस—

आपले दिनांक १८ जानेवारीचे पत्र मिळाले. त्या पत्रात आपण कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत ह्यांचे दोन दूत शिवराम पंडीत आणि रायाजी रामजी हे दोघे तहाच्या वाटाघाटीसाठी मुंबईला आले असल्याचे मला कळविले आहे. त्या दोघांचा दर्जा आपणापेक्षा मला अधिक माहीत नाही. तथापि त्यापैकी एकजण अप्पाजीपंत ह्यांच मेहुणे असावेत असे वाटते. मी लवकरच ह्या शहरातील एक प्रमुख नागरिक फ्रांकु द मेलु द कास्त्रु ह्यांना तहाच्या वाटा-घाटीसाठी आवश्यक ते अधिकार देऊन तिकडे पाठवित आहे. व्यक्तिमत्ता आणि व्यवसाय ह्या दोन्हीही बाबतीत ते अग्रेसर आहेत.

आपल्या सेवेस मी नेहमीच रूजू आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

वसई, १९ जानेवारी १७३२.

(14) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 131.

वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांशी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आपला जो दूत मुंबईला पाठविला त्याला त्याने पुढील सूचना दिल्या—

ह्या प्रांताच्या घोडदळाचे कमिशनर जनरल आणि साष्टी प्रांताचे कमांडंट फ्रान्सिस्कु द मेलु द कास्त्रु ह्यांना मी व्हाईसरॉय नामदार ज्युआंव द साल्दान्य द गामा ह्यांच्याकडून मिळालेल्या हुकूमान्वये कल्याणचे सुभेदार अप्पाजीपंत ह्यांचे दूत शिवरामपंत व रायाजी रामजी ह्यांच्याशी तहाच्या

वाटाघाटी करण्यासाठी मुंबईस पाठवीत आहे. ह्या प्रसंगी त्यांना मी पुढील सूचना करीत आहे :—

(१) कल्याणचे सुभेदार कृष्णराव महादेव ह्यांचे वकील राघोपंत ह्यांनी त्यांना सदर्हू सुभेदाराकडून मिळालेल्या अधिकारान्वये जो करार केला होता, तो करार आम्हाला अधिक सोयीचा आहे. हा करार मान्य व्हावा म्हणून आपण शक्य ते करावे. किंवा त्या करारातील कलमाप्रमाणे नवीन करार करावा. आणि जर असा करार होऊ शकत नसेल, तर नवीन करारात आपण पुढील अटी घालाव्या :—

(१) आमचे गड परत मिळावेत, (२) कोणतेच भाष्य न करता आमचा प्रदेश खाली करावा, (३) आणि ह्या अटी लवकर अंमलात आणून पहिल्या कलमाचे पालन करावे.

(२) कैद्यांची अदलाबदल व्हावी व ती शक्य तो मुंबईला अथवा परेइक (?) ला किंवा अन्य कोणत्याही सोयीच्या जागी व्हावी.

(३) आमचा तोफखाना आम्हाला परत मिळावा म्हणून आपण सर्व प्रकारचे प्रयत्न करावे. त्याच्याबदली आम्ही जहाजांचे कापड परत करू.

हे कलम जर त्यांना मान्य नसेल, तर आणि त्यामुळे जर वाटाघाटीत पेच प्रसंग निर्माण झाला, तर निदान आपला तोफखाना, विशेष करून कांब येथील तोफखाना की जे ठाणे त्यांनी दगलबाजीने घेतले. तरी आम्हाला परत मिळावा.

(४) कृष्णराव महादेव ह्यांनी जो तह केला तो कुलाबा येथे झालेल्या तहानुसार केला होता. त्या करारातील तिसऱ्या कलमाप्रमाणे सरकारच्या महसूल खात्याचा कर न भरण्याचा अधिकार आम्हाला मिळाला होता. त्याचप्रमाणे पाचव्या कलमाप्रमाणे दारूगोळा, औषधे, वगैरे वस्तू त्यांना आमच्या प्रदेशातून नेण्याची सवलत होती. ह्या कराराला जनरल दों लुईज द कोस्त ह्यांनी मान्यता दिली होती. त्यांना सांगावे की, त्यांनी ह्या कराराचा भंग करून आमच्या प्रदेशात लुटालूट आणि आक्रमण केले तरी त्यांनी जी लूट आमच्या प्रदेशात केली, ती आम्हाला परत मिळावी. कृष्णराव महादेव ह्यांच्याशी झालेल्या कराराप्रमाणे त्यांना आमच्याकडून कर वसूल करण्याचा अधिकार नव्हता. हल्ली आंग्रे हा कर बळजबरीने वसूल करीत आहेत. कुलाबा येथे झालेल्या करारातील तिसऱ्या कलमाप्रमाणे त्यांना आमच्या प्रदेशात दारूगोळा आणि इतर सामान खरेदी करून त्यांच्या प्रदेशात नेता येईल.

(५) त्यांनी जर आमच्या तोफा परत करण्यास नकार दिला, तर त्यांना आपण सांगावे की, ह्या युद्धात त्यांचे जे युद्ध साहित्य आमच्या हातात पडले आहे ते आम्ही त्यांना परत करणार नाही.

(६) मागील करारातील कलमाप्रमाणे आपण दोन्ही प्रदेशांतील व्यापारांच्या अदलाबदलीस परवानगी द्यावी. कारण दोन्हीही बाजूचा व्यापार कमकुवत स्वरूपाचा असल्याने ही तरतूद करता येईल.

(७) त्यांनी जर पूर्वीप्रमाणे भिवंडी येथून कोणताही कर न भरता मीठ नेण्याची परवानगी मागितली, तर ही सवलत आपण त्यांना देऊ नये. मात्र ते कर भरण्यास तयार झाले असल्यास त्यांना मीठ नेण्याची परवानगी द्यावी.

(८) कृष्णराव महादेव ह्यांनी जर आपल्या मालाच्या वहातुकी-साठी चार पाच गलबतांच्या वाहतुकीकरता परवानगी मागितली, पण गलबतांचा कर भरण्यास तयारी दर्शविली नाही, तर आपण सरकारी खजिन्याची नुकसानी करून त्यांना ती परवानगी देऊ नये.

(९) त्यांनी जर आमच्या प्रदेशातून भिवंडी, कल्याण किंवा आपल्या प्रदेशातील कोणत्याही ठिकाणी चुन्याची वाहतुक करण्याची परवानगी मागितली, तर त्यांना जकात भरल्याशिवाय हा माल नेण्याची परवानगी देऊ नये. कारण ही सवलत त्यांना आम्ही यापूर्वीच्या कुठल्याच करारात दिलेली नाही.

(१०) त्यांनी जर ताव्हेर्ली ह्या नावाच्या खेड्यात घरे, वखार किंवा आणखी काही बांधण्यास परवानगी मागितली, तर ही परवानगी आपण त्यांना देऊ नये. मग ही जमीन खासगी असो वा सरकारी असो. ही सवलत फक्त आमचे महाराज पोर्तुगालचे राजे हेच तेवढी देऊ शकतात.

(११) त्यांनी जर आमच्या तोफा आणि आमची जहाजे परत करण्यास नकार दिला, आणि त्यांच्या सुरतेहून मुंबईकडे निघालेल्या जहाजांवरील आम्ही जप्त केलेला माल परत मागितला, आणि हा माल त्यांना मिळाला नसल्यास तह जर होत नसेल तर हा माल सशर्त परत करण्याचे आपण त्यांना आश्वासन द्यावे.

(१२) त्यांनी जर आमच्या हद्दीतील खेड्यांवर खंडणी बस-विण्याचा प्रयत्न केला, तर त्यांना आपण ही खंडणी भरण्यास साफ नकार द्यावा. कारण, पोर्तुगालच्या राजाचा मुलुख कुणालाच कर भरत नाही.

(१३) कल्याणच्या सुभेदाराच्या प्रतिनिधींनी जर आमच्या प्रदेशावर कुठल्याही शत्रूने हल्ला केला असता आम्हाला मदत करण्याचा व आमच्या बाजूने आमच्या शत्रूशी लढण्याचा प्रस्ताव तहाच्या वाटाघाटीचे वेळी मांडला, व त्याच्या बदली आपल्या शत्रूशी आम्ही लढावे असे कलम करारात घालण्याचे ठरविले, तर आपण हे कलम मान्य करू नये. मात्र जर दुसऱ्या मराठ्यांना आमच्या प्रदेशांत आक्रमण किंवा लुटालूट करण्यास मज्जाव करण्याची त्यांनी तयारी दर्शविली तर, मात्र त्यांना मदत करण्यास कबूल व्हावे.

त्यांनी जर आणखी काही नवीन सूचना केली तर आपण मला लगेच कळवावे.

वसई, २० जानेवारी १७३२

वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांशी तह जुळवून आणल्याची वार्ता व्हाइसरॉयला कळविली असता, तो त्याला पाठविलेल्या उत्तरात म्हणतो की, केवळ मोगल स्वारीच्या भीतीने मराठे तह करण्यास तयार झाले--

"उत्तरेकडील सेनापती मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस--

आपले दि. १३ चे पत्र मिळाले. तह जुळवून आल्याची वार्ता कळून आनंद झाला. तो पार पडलाच असेल. हा तह करण्यास मराठे केवळ मध्यस्थीमुळे तयार झाले नसून ते मोगलांच्या भीतीने तयार झाले. महाराजांचे पत्र शाहूराजे ह्यांना पोचते करीत आहे. पाद्री फिगेरेदु ह्यांच्या पत्राचे उत्तर पाठविण्याचे काम मी माझ्या बदली येणाऱ्या व्हाइसरॉयसाठी ठेवीत आहे. कारभाराची सूत्रे परवा सुपूर्त केली जाणार आहेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २० जानेवारी १७३२ ज्युआंव द साल्दान्य द गामा

(143) LIVRO DE BASAIM, No. 5, FLS 148.

वसईच्या गव्हर्नरने मराठ्यांशी होऊ घातलेल्या करारासंबंधाने आपला प्रतिनिधी फ्रान्सिश्कु द मेलु द काश्त्रु ह्याला पुढील खासगी पत्र पाठविले.

"फ्रान्सिश्कु प मेलु द काश्त्रु ह्यांस--

आमचे स्वामी पोर्तुगालचे राजे व मोगल सम्राट ह्या दोघांच्या मैत्रीचा करार आहे हे आपणाला माहीत आहेच. ह्याच कारणावरून दखनचे मोगल

सुभेदार किलिचखान ह्यांचा आणि माझा संबंध आलेला आहे. त्यांचा कल्याणवर स्वारी करण्याचा विचार असल्याने त्यांनी माझ्याकडे मदत मागितली होती. त्या पत्राचे मी उत्तर पाठविले. मराठ्यांनी जो प्रस्ताव पुढे मांडला आहे, त्याच्यामध्ये देखील ह्याच मुद्याचा अंतर्भाव झालेला आहे, हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे. ह्या वाटाघाटी मुंबई गव्हर्नरच्या मध्यस्थीनुसार होत आहेत. मराठ्यांना मोगलांविरुद्ध लढण्यासाठी आमची दोस्ती किंवा मदत तरी हवी आहे, अथवा आम्ही तटस्थता तरी पाळावी अशी त्याची इच्छा आहे. तरी माझा आपणाला सल्ला आहे, की, हा प्रश्न आपण तहातून वगळण्याचा प्रयत्न करावा. पण मराठे जर हट्टच धरून बसले तर आपण तटस्थता स्वीकारण्याची इच्छा दर्शवावी. पण मुंबईच्या गव्हर्नरना आतून सूचना द्यावी की, मोगल सैन्य जर खाली उतरले आणि त्यावेळी जर दोन्ही पक्षांपैकी कुठल्या एका पक्षाला मदत करावयाची झाली तर आम्ही मोगलांना मदत करू. त्याचे कारण मी वर दिलेच आहे. मोगलांनी उद्या मराठ्यांप्रमाणे आमच्याशी शत्रूत्व करू नये म्हणून ही काळजी घेणे भाग आहे.

देव आपले रक्षण करो. वगैरे.

वसई, २० जानेवारी १७३२.

(144) LIVRO DAS MONSOES

गोव्याचे हंगामी गव्हर्नर जनरल पोर्तुगीजांच्या हिंदुस्थानातील राज्यातील परिस्थितीचा अहवाल आपल्या राज्यास पुढील पत्रात सादर करतात. ते म्हणतात की ह्या राज्याची स्थिती फारच वाईट आहे.

महाराज--

ह्या राज्याचा कारभार आम्ही आमच्या हाती घेतला. आपण ह्या जागी आमची नेमणूक केलीत त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आम्ही गुडघे टेकून आपल्या शाही हाताचे वारंवार चुंबन घ्यायला पाहिजे, हे तर झालेच, परंतु त्याचबरोबर ह्या राज्यावर जे विनाशाचे संकट तरंगत आहे, त्यातून त्याची मुक्तता करून त्याला आपण वर उठविले पाहिजे.

उत्तरेकडील युद्ध चालूच आहे. तिथल्या परिस्थितीत फारसा बदल नाही. व्हाइसरॉयनी तह घडवून आणण्याचा निष्फळ प्रयत्न केला. पैसा आणि सैनिक ह्यांचा काही उपयोग झाला नाही. युद्ध चालू राहिल्याने सरकारी खजिना तर रिकामा झालाच आहे, परंतु वारंवार होणाऱ्या कर-

वाढीमुळे प्रजा हवालदील झाली आहे. कानारी (देशी) शिपायांच्या पलटणी उभारण्याचा प्रयत्न झाला, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. ह्या देशी शिपायांपैकी काहीजण तर वेठीस धरून आणलेली कोवळी पोरे आणि भणंग भिकारी होते. अशा लोकांना हत्यार पेलता येणे तरी शक्य आहे का? पाँडेचरीहून लाबोर्दिन ह्या नावाच्या फ्रेंचाने शंभर गोरे आणि काही मलबारी शिपाई आणले. (गोऱ्या सैनिकांपैकी दहा बारा फरारी पोर्तुगीज होते). ह्या लोकांचा पगार आगाऊ देण्यात आला होता. परंतु ते निरुपयोगी ठरल्याने त्यांना परत पाठवून देण्यात आले.

राज्याचे बहुतेक सैन्य नष्ट झाले आहे. बहुतेक सर्व पराक्रम गाजविलेल्या सैनिकांना बढती देण्यात येऊन ते अधिकारी झाले. तर जे सामान्य सैनिक होते. ते निधन पावले. उत्तरेप्रमाणेच (तिकडे पटकीच्या साथीने अनेक सैनिक मरण पावले). इकडेही सैन्याची कमतरता आहे. आतापर्यंत देशाहून देव माता (माद्र देउश) ही एकच नौका तेवढी येथे येऊन पोहोचली आहे. ह्या नौकेवर अवघे दोनशे सैनिक आहेत. तिचा प्रवास इतका संथ झाला की ती मोसांबिकला न थांबता थेट इकडे आली. ती ह्या बंदराला दिनांक २९ नोव्हेंबरला लागली. अलीकडे ह्या राज्यावर ओढवलेल्या अनेक संकटांमुळे आणि अनिश्चित परिस्थितीमुळे ह्या राज्याच्या शत्रूंचे आणि शेजाऱ्यांचे चांगलेच फावले आहे. आंग्रे दिवसेंदिवस आपल्या नौकांसह आमच्या किनाऱ्याच्या अगदी नजीक येत चालला आहे. त्यामुळे उत्तरेकडील नौकायन कठीण होऊन बसले आहे. टपालाच्या गलबतांना देखील त्याचा उपसर्ग पोचत आहे.

न्यायदानांतही सावळा गोंधळ आणि भानगडी माजल्या आहेत. न्यायमूर्ती काम नीट करीनासे झाले आहेत. ह्या न्यायमूर्तींपैकी एकजण सोडल्यास बाकीचे नालायक आहेत. त्यांना स्वच्छतेची देखील कल्पना नाही.

साष्टी आणि बार्देश ह्या दोन्ही प्रांतांतील प्रजेचा तिथल्या गव्हर्नरांकडून फार छळ होत आहे. ह्या छळाला कंटाळून लोकांनी स्थलांतर करण्यास सुरूवात केली आहे. ह्या स्थलांतरामध्ये निष्ठावंत कॅथॉलिक म्हणवून घेणारे लोक देखील आहेत.

धर्मामध्ये बजबजपुरी माजली आहे. दोन पंथांचे लोक सोडल्यास उरलेल्या ख्रिश्चनांमध्ये शिस्त अशी मुळीच उरलेली नाही. थोडक्यात सांगायचे म्हणजे ह्या प्रांतात सगळीकडे सावळागोंधळ माजून राहिला आहे. ही परिस्थिती कशी सुधारावी हाच आमच्या समोरील आज महत्वाचा प्रश्न आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीचे देव पुष्कळ वर्षे रक्षण करून, त्याला सुखी करो."

गोवा, २४ जानेवारी १७३२.

(145) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 263.

गोव्याचे हंगामी गव्हर्नर पोर्तुगालला आपल्या राजास कळवितात की पोर्तुगीजांचा मराठ्यांशी तह होताच सुरतेमध्ये त्यांच्याविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली आहे.

"महाराज—

ही डाक बंद करीत असतानाच उत्तरेकडील प्रांतातील पत्रे आली त्या पत्रांच्या नकलांचा ह्या टपालांत अंतर्भाव करण्यात येत आहे. ही प ` नजरेखालून तल्यावर मराठे व पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये झालेला तह आणि इश्त्रेला ह्या युद्ध नौकेचे कप्तान ज्याआंव द सौझ फेरराज यांनी सुसा बंदरानजीक जी दोन गलबते पकडली त्याची सुरतेमध्ये काय प्रतिक्रिया झाली ते आपल्या ध्यानी येईलच.

ती दोन्ही गलबते छोटी होती. मावळत्या व्हाइसरॉयनी ती सोडून देण्याचा हुकूम केला. त्या घटनेमुळे जो बदल झाला, त्याचे निवारण करण्याचे काम आमच्यावर आले.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ट स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्याला सुखी करो."

गोवा, २६ जानेवारी १७३२.

(146) LIVRO DAS MONSOES, No. 99, FLS 299.

गोव्याचे हंगामी गव्हर्नर कर्नाटकाच्या राजाच्या दरबारांतील पोर्तुगीज वकिलाला सूचना देतात की, त्या राजाच्या दरबारांत आंग्र्यांना जे वजन आहे ते नष्ट करण्याचा त्यांनी प्रयत्न करावा.

---

बेदुरच्या दरबारात आंग्र्यांना जे वजन आहे ते वजन आमच्या राज्याला घातक असल्याकारणाने ते कोणत्याही मार्गाचा अवलंब करून नष्ट करण्याचे काम आपणाला पार पाडायचे आहे हे आपण लक्षांत घ्यावे.

देव आपले रक्षण करो."

गोवा, २९ जानेवारी १७३२

आर्च बिशप प्रिमज दों. क्रिस्तोव्हांव द मेलु, तोमे गोमिश मोरेइश

(147) LIVRO DOSREIS VIZINHOS, No. 7, FLS 101.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास मराठे व पोर्तुगीज ह्यांच्यामधील तहाची कलमे पाठवून लिहितो.

"महाराज---

उत्तरेकडील तहाच्या कलमांची नक्कल ह्या पत्रासमवेत आपणाकडे जात असून त्या प्रांताच्या गव्हर्नरची पत्रेही त्यांच्यासोबत पाठवीत आहे. त्यावरून हा करार झाल्याची आपली खात्री पटेल अशी आशा बाळगतो. हा करार अमलांत आला आहे. मराठ्यांनी विलंब न लावता गड खाली केले आहेत, व गव्हर्नरच्या हुकुमान्वये ते ताब्यात घेण्यात येत आहेत. हे गड मोक्याचे जागी असल्याने त्यांना महत्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. हे गड मराठ्यांचे हाती असल्याने तहाचे मार्गात त्यांचा मोठाच अडथळा निर्माण झाला होता.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन त्याचे रक्षण करो.

गोवा, ११ जानेवारी १७३३

(151) LIVRO DAS MONSOES, No. 101, FLS 1187.

खालील पत्र मुंबईच्या गव्हर्नरचे आहे. ते त्याने पोर्तुगीज हिंदुस्थानच्या मावळत्या गव्हर्नरला लिहिले आहे. ह्या पत्रात मराठे व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये झालेल्या तहाचा उल्लेख आहे.

मी दिनांक १४ मार्चला नामदार व्हाइसरॉय ह्यांना जी पत्रे पाठविली होती, त्या पत्रांच्या उत्तरादाखल लिहिलेली दोन्हीही पत्रे मिळाली. ही पत्रे दिनांक २६ ला लिहिण्यात आलेली आहेत.

आपण आपली अधिकारसूत्रे खाली ठेवताना इश्त्रोला ह्या युद्धनौकेच्या कॅप्टनने पकडलेल्या दोन छोट्या नौका सोडून दिल्याची आनंदाची बातमी प्रस्तुत पत्रात आहे. आपल्या सौजन्याबद्दल आभारी आहे. ह्या छोट्या नौकाची मुक्तता व्हावी अशी मी मागणी केली होती. यापुढे अशा घटना घडू नयेत म्हणून आपण जो हुकूम काढलात त्या बद्दलही आभारी आहे.

आपणास कळविण्यास आनंद वाटतो की, काल माझ्या समक्ष उत्तरेकडील सेनापती व कल्याणचे गव्हर्नर ह्या दोघांमधील तहाच्या करारावर सह्या झाल्या. ह्या सह्या त्या दोघांच्या प्रतिनिधींनी केल्या. प्रस्तुत कराराची एक प्रत

मी आपणाकडे पाठवीत आहे. कलमें मंजुरीसाठी कल्याण व वसई येथे पाठविण्यात आली आहेत. हा करार अंमलात लवकर येईल अशी मला आशा आहे. हा करार व्हावा म्हणून मी जे परिश्रम घेतले ते आपणाला माहीत असतीलच. आपल्या सेवेस मी सदैव हजर आहे."

फोर्ट, मुंबई ३१ जानेवारी १७३२

१ फेब्रुवारी १७३२ आपला सेवक,

रॉबर्ट कोइव्हान

उत्तरेकडील प्रदेशांचे आणि किल्ल्यांचे कॅप्टन जनरल सिज्योर मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश व कल्याणचे आणि कोकणातील किल्ल्यांचे व प्रदेशाचे सुभेदार श्री. कृष्णराव महादेव ह्या दोघांमध्ये झालेला शांततेचा आणि मैत्रीचा करार. हा करार मुंबई बेटाचे आणि किल्ल्यांचे गव्हर्नर आणि अध्यक्ष सर रॉबर्ट कोइव्हन ह्यांच्या मध्यस्थीने घडून आला. ह्या करारावर पोर्तुगिजांचे वतीने उत्तरेकडील घोडदळाचे कमिशनर जनरल व साष्टी बेटाचे कॅप्टन मोर सिज्योर फ्रान्सिश्कु द मलु द काश्त्रु व मराठ्यांच्या राज्याच्या वतीने श्री. शिवराम पंडित व रायाजी नाईक ह्या दोघांनी सह्या कल्या :

१. पोर्तुगीज व मराठे ह्या दोन्ही राष्ट्रांमध्ये उत्तरेकडील प्रदेशावरून तेढ निर्माण झाली होती. ह्या दोन्ही राष्ट्रांनी आता आपल्या समाईक कल्याणाचा हेतु डोळ्यासमोर ठेवून आपापल्या प्रदेशाच्या स्वास्थ्यासाठी एक बळकट असा, कायमचा, अस्सल आणि प्रामाणिक शांततेचा करार करण्याचे ठरविले आहे. ह्या करारान्वये दोन्ही पक्षातील व्यापार मुक्त होणार असून एकमेकांकडील एकमेकांच्या संपर्काची वृद्धी होणार आहे.

२. ज्या अर्थी ह्या युद्धात उभय पक्षांची प्राणहानी होऊन माणसे घायाळ होऊन लुटालूट झाली, त्या अर्थी आता उभय पक्ष मान्य करीत आहे की, ते यापुढे शांततेचे पूर्ण पालन करतील व अशा गोष्टी होऊ न देण्याची काळजी घेतील.

३. ह्या युद्धात मराठ्यांनी चंद्रवाडी, टकमक, कमणदुर्ग, आणि बडागड हे गड आपल्या ताब्यात घेतले होते. ते त्यांनी ह्या करारान्वये खाली करावे, व तियल्या शिबंदया काढून घ्याव्या. तसेच हे गड आणि पोर्तुगिजांचा जो प्रदेश त्यांनी व्यापिला होता तो त्यांनी पोर्तुगिजांच्या हवाली करावा. ह्या

गडांवर जो भात आणि दारुगोळा असेल तो किंवा त्याची किंमत कृष्णराव महादेव ह्यांना चुकती करण्यात यावी.

४. कांब, फिरंगीपाडा, आणि सैबाण ह्या किल्यांमध्ये असलेल्या पोर्तुगिजांच्या ज्या तोफा मराठ्यांनी घेतल्या होत्या त्या तोफा कृष्णराव महादेव ह्यांनी उत्तरेकडील प्रदशाचे गव्हर्नर सिंज्योर मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांना परत कराव्या. त्या लहान मोठ्या एकूण चौदा तोफा होत्या. त्या सिंज्योर मार्तिन द सिल्व्हैरा हे ज्यांच्या हवाली करावयास सांगतील त्यांच्या हवाली करण्यात याव्या.

५. ह्या युद्धांमध्ये जे युध्दकैदी दोन्ही पक्षांच्या हाती पडले त्यांची अदलाबदल करण्यात यावी. आणि जे फरारी एकमकांच्या प्रदेशात पळून गेले आहेत त्यांना एकमेकांच्या ताब्यात मुंबई येथे देण्यात यावे.

६. पोर्तुगीजांनी कल्याणची बरीच जहाजे पकडली होतीं, आणि मराठ्यांनीही पोर्तुगीजांची दोन फ्रिगेट्स्, एक बोट, आणि त्यांच्या प्रजाजनांच्या नौका पकडल्या होत्या. ह्या सर्व नौकांची अदलाबदल करण्यात यावी.

७. पोर्तुगीजांनी मराठ्यांचे दोन घोडे घेतले होते. ते सांप्रत वसई येथील खिल्लारांत आहेत. वसईचे गव्हर्नर सिंज्योर मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांनी हे घोडे कल्याणचे सुभेदार कृष्णराव महादेव ह्यांच्या हवाली करावे.

८. कौंट द तिलेर (?) हा रस्ता राठ्यानां खुला होईल. व नांदुर्की व इतर नद्यांतून त्यांना नौकायन करण्यास परवानगी मिळेल. मात्र ह्या बाबतीत सरकार महसूल खाते व आपले प्रजानन ह्यांची कांही नुकसानी न होऊ देण्याची दक्षता घेईल.

९. कल्याण प्रांतांच्या नद्यांतून आणि प्रदेशांतून व्यापाराची वाहतुक करण्याची सवलत ह्या राज्याच्या प्रजाजनांना प्राप्त होईल व अशा रीतीने दोन्ही राज्यांतील प्रजाजनांना एकमेकांच्या प्रदेशांत सारख्याच सवलती मिळतील.

१०. कल्याणला जर दारूगोळा, गंधक, शिशें, वगैरे वस्तूंची आवश्यकता असेल, तर त्याला ह्या वस्तू ह्या राज्यात खरेदी करण्याची सवलत असेल. ह्या वस्तू इकडे त्याला माफक किंमतीला मिळू शकतील. तीच गोष्ट तोफांचीही असेल.

११. कल्याण आणि भिवंडी येथील जहाजांची पोर्तुगीज राज्यांतील, नद्यांतून ये जा चालू असता त्यांच्यावर जर पांच शेरांपर्यंत तंबाखू असेल तर त्या जहाजांना कोणत्याच प्रकारचा अडथळा अथवा उपद्रव होणार नाही.

१२. प्रस्तुत कलमें पालन करण्यात आल्यावर असे जाहीर करण्यात येत आहे की, कल्याण आणि भिवंडी येथील व्यापाऱ्यांना वसई शहरांत त्यांच्या व्यापाराच्या वाहतुकीचे वेळी विश्रांति घेण्याची परवानगी देण्यात येईल.

१३. कल्याण आणि भिवंडी येथील जहाजांना पोर्तुगीज प्रदेशांतून दिवसा अथवा रात्री त्यांची तपासणी करण्यात आल्यावर अनिर्बंधपणे ये जा करता येईल. जुन्या पद्धतीप्रमाणे ही तपासणी लायक अधिकाऱ्यांकडून केली जाईल. त्यांच्याकडून जहाजांना कोणत्याच प्रकारचा उपद्रव होणार नाही.

१४. जे घोडे पोर्तुगीज अथवा अन्य प्रदेशातून खुष्कीच्या मार्गे किंवा जलमार्गे आणण्यांत येतील त्यांना कोणताच अडथळा न करता जाऊ दिले जाईल. मात्र त्याबद्दल नेहमीचा कर भरावा लागेल. ही अट खाजगी लोकांनाही लागू आहे. पण कल्याणच्या सुभेदाराच्या बाबतीत जुनी अट लागू केली जाईल.

१५. हा करार टिकावा म्हणून सगळ्यांनी इच्छा केली पाहिजे. कारण दोन्ही राज्याच्या समाईक हिताच्या दृष्टीने त्याची आवश्यकता आहे. म्हणून उभय पक्षांमध्ये परस्परांविषयी वाटणारा संशय दूर व्हावा या हेतूने सदर्हू मार्तिन द सिल्व्हैरा व कृष्णराव महादेव ह्या दोघांनी भावी कालात पकडण्यात येणाऱ्या व एकमेकांच्या राज्यांतून पळून जाणाऱ्या सैनिकांना एकमेकांच्या हवाली करण्याचे ठरविले आहे. त्याचप्रमाणे सदरहु कृष्णराव महादेव हे कबूल करतात की, यामुळे मराठे पोर्तुगीज प्रदेशांत आक्रमण करणार नाहीत. इतकेच नव्हे, तर ते असे आश्वासन देतात की, पोर्तुगीज प्रदेशावर कोणी हल्ला केला, तर जणू काही हा हल्ला आपणावरच झाला आहे असे समजून ते तो हल्ला परतवून लावण्याचा प्रयत्न करतील. ह्या बाबतीत मराठ्यांचे धोरण देखील पोर्तुगीजांच्या सारखेच असावे.

१६. ह्या करारात भाग घेणारे प्रतिनिधी सिंज्योर फ्रान्सिश्कु द मेलु आणि शिवराम पंडित आणि रायाजी रामजी असे जाहीर करतात की, प्रस्तुत कराराला मान्यता मिळावी म्हणून पोर्तुगिजांचे वतीने सिंज्योर मार्तीन द सिल्व्हैरा द मिनेझिश व मराठ्यांच्या वतीने श्री कृष्णराव महादेव ह्या दोघांनी करार झाल्यापासून दहा दिवसांचे आत त्याच्यावर सह्या कराव्यात, व शक्य तितक्या लवकर तो अंमलात आणावा.

हा करार झाला आहे म्हणून पुराव्यादाखल साक्षीदार ह्या नात्याने त्याच्यावर पोर्तुगीज राज्याचे वकील सिंज्योर फ्रान्सिश्कु द मेलु द काश्त्रु व मराठ्यांचे वकील श्री. शिवराम पंडित व श्री. रायाजी रामजी ह्या तिघांनी सह्या केल्या आहेत. हे अधिकार त्यांना देण्यात आले होते व आपापल्या राज्यांची प्रमाणपत्रे त्यांनी बरोबर आणली होती. ती त्यांनी वकिलातींच्या स्वागताचे वेळी सादर केली.

हा करार मुंबई बेटाचे आणि किल्याचे अध्यक्ष आणि गव्हर्नर जनरल सर रॉबर्ट कोइव्हन ह्यांच्या मदतीने त्यांच्या समक्ष पार पाडला. त्यांची ह्या करारावर सही आहे.

फोर्ट, मुंबई, ३० जानेवारी, १० फेब्रुवारी १७३२–३२

रॉबर्ट कोइव्हन, फ्रान्सिश्कु द मेलु द काश्त्रु
मार्तिन द सिल्व्हैरा द मिनेझिश.

## (153) LIVRO DAS MONCOES, No. 101, FLS 1189.

वसईच्या किल्ल्याचा कॅप्टन जनरल फ्रान्सिश्कु द मेलु द काश्त्रु हा मराठ्यांशी झालेल्या कराराप्रमाणे चंद्रवाडी आणि टकमक हे दोन्ही गड ताब्यात घेऊन चंद्रवाडी ह्या गडास सांता मारिया (सेंट मेरी) हे नाव दिल्याचे व्हाइसरॉयला कळवितो.

" महाराज—

मी फ्रान्सिश्कु दे मेलु द काश्त्रु आपणाला कळवित आहे की, कल्याणच्या सुभेदाराने मला गडाच्या कबजासंबंधी लिहिले असता मी ह्या कामगिरीवर लगेच एक तुकडी रवाना केली. त्या तुकडीचा सेनापती मला कळवितो की, त्याने दिनांक १८ च्या दुपारी चार वाजता चंद्रवाडी गडाचा कबजा घेतला. ह्या गडाचे नाव आता सांता मारिया असे ठेवण्यात आले आहे. टकमक गडाचा कबजा दिनांक २० रोजी संध्याकाळी पाच वाजता घेण्यात आला.

हे दोन्ही गड अत्यंत महत्वाचे आहेत. तहाची फलश्रुती ही असून, त्याबद्दल मी आपले अभिनंदन करीत आहे.

सांता मारिया ह्या गडावर सांप्रत १४० माणसांची शिबंदी ठेवण्यात आली आहे, टकमक गडावर ६० माणसे आहेत. ही ठाणी गोगारी (?) च्या हाती ठेवणे इष्ट नसल्याने मी त्यांना त्यांच्या मुलुखाकडे परत पाठवून देण्याचा विचार करीत आहेत. हे लोक खर्च फार करतात, ह्या गडांच्या नायकांनी मला त्या गडासंबंधीची माहिती पुरविली आहे. टकमक गडाचा

नायक म्हणतो की, ह्या गडाला नैसर्गिक संरक्षण असल्याने त्याच्या रक्षणासाठी पुष्कळ माणसांची जरूरी नाही. सांता मारिया गडाच्या किल्लेदाराने माझ्याकडे आणखी माणसांची मागणी केली आहे. तो म्हणतो की, ह्या गडाच्या रक्षणासाठी १४० माणसे पुरेशी नाहीत. ह्या दोन्ही गडांपैकी एक गड माहीमच्या हद्दीत पडतो तर दुसरा मनोराच्या. ही दोन्ही गावे त्या गडांच्या शिबंद्यांना दाणागोटा पुरवितात. ह्या पुढे ह्या गावानी त्या शिबंद्यांना दाणागोटा पुरविला पाहिजे की नाही तत्संबंधीचा हुकूम माझ्याकडे त्वरित पाठवावा. मला वाटते की, ह्या गावानी जर शिबंद्यांना दाणागोटा पुरविण्याचे बंद केले, तर त्यांच्यावर उपासमारीची पाळी येईल. मी लवकरच सैवाणला जात आहे. तिथल्या लोकांच्या राहणीसाठी नवीन जागेची निवड करणे आवश्यक आहे. आपणाकडून हुकूम आल्या शिवाय मी तटबंदीच्या तयारीस लागत नाही.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करून आपणास सुखसमृद्धी देवो."

वसई, २२ मार्च १७३२.

(154) LIVRO DAS MONCOES, No. 101, FLS 1192.

गोव्याहुन पोर्तुगालला राज्यसचिवाला गेलेल्या एका पत्रात म्हटले आहे की, मराठे शांत आहेत. परंतु नुकतेच त्यांनी सिद्दीच्या एका सेनाधिकाऱ्याला फितवून त्याचे काही गड आणि किल्ले दगलबाजीने घेतले.

" राज्यसचिव, ह्यास—

ह्या बंदराला लागलेल्या एका फ्रेंच जहाजावर प्रस्तुत पत्र काही बातम्या देऊन पाठवीत आहे. हे जहाज फ्रान्सला जुलै महिन्यात पोहोचणार आहे असे सांगण्यात येते. पत्रातील बातम्या आपण महाराजांना सादर कराव्या.

ह्या मोसमांतील दोन नौका इकडे दिनांक १२ आणि १५ सप्टेंबरला येऊन पोहोचल्या. त्यांचा प्रवास चांगला झाला. मोसांबिकला बांधलेली नौकाही इकडे येऊन पोहोचली. ह्या नौकेवर माणसे इतर नौकावरील माणसांहून बरीच अधिक मेली.

सांप्रत मी सां तेरेझा (सेंट थेरिसा) ह्या नौकेच्या दुरुस्तीचे काम हाती घेतले आहे. ही नौका जानेवारी महिनाअखेर प्रवासास निघू शकेल असे वाटते.

आमच्या राज्याचे शेजारी हल्ली शांत आहेत. मात्र पावसाळयाच्या सुरुवातीला मराठ्यांनी सिद्दीच्या एका सेनाधिकाऱ्याला फितवून त्याचे काही

गड आणि किल्ले दगलबाजीने घेतले. हे गड आणि किल्ले मराठ्यांचे हाती पडल्याने त्यांच्या सामर्थ्यात पुष्कळच वाढ झाली आहे. माझ्या मनात सिद्दीचे दोन जलदुर्ग घेण्याचा विचार होता.

सिद्दी आणि मराठे या दोघांनीही माझ्याकडे मदतीची याचना केली होती. त्यांना मी कळविले की, त्या दोघांमध्ये मध्यस्थी करण्यास मी तयार आहे. त्याची पूर्वतयारी म्हणून दांडा बंदराकडे मी दोन युद्धनौका रवाना केल्या. तेथे शाहू राजे ह्यांचा सेनापती बाजीराव हा आपल्या सैन्याचा तळ देऊन बसला आहे. त्याने त्या बेटास वेढा घातला आहे. सिद्दीची ती राजधानी आहे. परंतु ह्या बेटाला नैसर्गिक संरक्षण असल्याने ते बाजीरावाला घेणे शक्य होईल असे वाटत नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, १३ डिसेंबर १७३३.

चौलच्या ठाणेदाराने व्हाइसरॉयला बाजीरावाने दांड्याचा वेढा उठविला असल्याचे कळविल्याचे व्हाइसरॉयच्या प्रस्तुत ठाणेदाराला लिहिलेल्या खालील पत्रावरून कळून येते :

आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस,

वसईहून आलेल्या एका गलबतावर पाठविलेली आपली चौल येथे १६, १७ आणि १८ डिसेंबरला लिहिलेली व त्याच महिन्याच्या २२ ला आणि २३ ला ठाणे येथे लिहिलेली पत्रे मला मिळाली. ह्या पत्रांची उत्तरे मी चौलच्या गलबतावर पाठवीत आहे. ह्याच गलबतावर आपली पहिली पत्रे येण्याची मी वाट पहात होतो. परंतु ती न आलेली पाहून मी असा अंदाज केला की, काहीतरी हलगर्जीपणा झाल्याने ती मागे राहिली. त्याचा खुलासा आपण दुसऱ्या पत्रात केलाच आहे.

बाजीरावाने वेढा उठवून सिद्दीशी तडजोडदेखील न करता माघार घेतल्याचे कळले. शत्रूची जिंकलेली ठाणी हाती ठेवण्यातच युद्धातील खरा विजय असतो.

आपल्या १७ डिसेंबरच्या पत्रावरून कळले की, सिद्दीच्या जहाजांनी आमचे परवाने बाळगावे म्हणून तातेखान ह्यांनी आमच्याशी जी तडजोड केली होती ती आता सिद्दी पाळावयास तयार नाही. आपण त्याच पत्रात

म्हणता की सिद्दीला आमचे परवाने घ्यायला लावणे माझ्या हातात आहे. असे आपण का लिहिले ते माझ्या ध्यानी आले नाही. तरी त्याचा खुलासा करावा.

, आमच्या ह्या जुन्या हक्काची पुनर्स्थापना करण्याचे काही मार्ग आपणांला मला सुचवायचे आहेत का ते आपण मला उलट पत्री कळवावे. बाजीराव निघून गेल्यावर व दिवाणाच्या गढीच्या योजनेसंबंधाने सर्व उपाययोजना अमलात आणल्यावर सेनापतीशी सल्लामसलतीला गेलात हे फार चांगले केलेत.

आंगऱ्यांना मराठ्यांकडून मदत होण्याचा संभव आहे. पण आम्हांला दोन बाजूंनी मदत होण्याची शक्यता आहे. पहिली गोष्ट ही की चौलचा किल्ला जवळ आहे. आणि दुसरी गोष्ट म्हणजे आमच्या नदीतील पालांकडून ह्या योजनेला मदत होणार आहे, आणि ज्याअर्थी ही योजना आपल्या हातून पार पडणार आहे. त्याअर्थी, ती यशस्वी होणार ह्याबद्दल मला तिळमात्रही संदेह वाटत नाही. मी ह्या बाबतीत उत्तरेकडील सेनापतीला लिहीत आहे. आपणांला सर्व प्रकारची मदत करण्याबाबत मी त्याला कळवीत आहे. मी आरमाराची रवानगी केली आहे. मला आपणांस एक सूचना द्यायची आहे ती ही की, ह्या मोहिमेत जे अधिकारी भाग घेणार आहेत त्यांच्यापैकी एकाला तरी हल्ल्याचा अनुभव असायला पाहिजे.

माद्रा फावालसंबंधी बोलायचे झाल्यास ही मोहीमदेखील फारच कठीण आहे. कारण सिद्दींना तटबंदीची माहिती असणार ह्यात शंका नाही. आणि म्हणून त्यांनी बचावाची तयारी चांगलीच केली असली पाहिजे.

आंगऱ्याविरुद्ध इंग्रज आणि पोर्तुगीज ह्या दोघांची युती व्हावी म्हणून जे प्रदान चालू आहेत त्यामध्ये इंग्रजांचा कधी ना कधी आक्षेप हा असतोच. तरी ह्या युतीसंबंधी त्यांच्या काय अपेक्षा आहेत ते एकदा त्यांनी जाहीर केलेले बरे".

गोवा, २ जानेवारी १७३४. कौंट द सांदोमिल.

(166) LIVRO DE CHAUL, No. 2, FLS 2.

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदारास पुढील पत्र लिहितो :—

आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस,

आपली सर्व पत्रे मिळाली. मी आपणाला कळवीत आहे की, माझा दुसरा हुकूम येईपर्यंत दिवाणाची गढी आपल्या हाती ठेवावी. मी ह्या बाबतीत उत्तरेकडील सेनापतीला लिहिलेच आहे. मला कळले आहे की, मराठ्यांचा

मोहरा पुन्हा सिद्दीकडे वळला आहे, ही बातमी फोंडू सावंत ह्यांच्या राज्यातून इकडे आली आहे. ही बातमी जर खरी असेल तर आपली योजना कृतीत उतरविण्याच्या बाबतीत काळजी घेतली पाहिजे. मी ह्या प्रश्नासंबंधी आपणांला व उत्तरेकडील सेनापतींना लिहिलेच आहे. तरी आपण विचारविनिमय करून काय तो निर्णय घ्यावा. ह्यासंबंधी मी आपणांला ह्याच पत्रात पुन्हा एकदा लिहीत आहे.

आंग्र्यांनी ग्रियेहून एक पाले इकडे पाठविले आहे हे खरे आहे. दमणच्या पालात त्याला जे पोर्तुगीज आणि पाद्री सापडले होते, त्यांना त्याने ह्या पालावर इकडे पाठविले आहे. परंतु ह्यावरून अशी समजूत करून घेण्याचे कारण नाही की, कैद्यांना परत करून त्याला आमच्याशी सलोखा साधायचा आहे. त्याने आम्हांला पाठविलेल्या पत्रात म्हटले आहे की, दमणच्या पालांपाशी आपले परवाने नव्हते म्हणून ही पाले आपण घेतली. मी आंग्र्याला उलट पत्री कळविले आहे की, त्यांनी जर आमची पाले परत केली नाहीत आणि तो जर अशी लूट करण्यास पुन: प्रवृत्त झाला तर त्याला शत्रू म्हणून वागविण्यात येईल.

इंग्रजांचे उत्तर माझ्या पाहण्यात आले आहे. त्या पत्रातील मजकुरासंबंधी मी जो अंदाज केला होता तो खरा ठरला आहे.

मी चौल नगरपालिकेला घरे बांधण्याची जी शिफारस केली होती, तिची मी फिरून द्विरुक्ती करीत आहे. ह्यासंबंधी वारंवार सर्व प्रकारचे हुकूम देणार आहे. निजामउल्मुल्क ह्याने मला जे पत्र पाठविले आहे ते आभार प्रदर्शनाचे आहे. मी सिद्दीला जी मदत पाठविली होती त्याबद्दल निजामउल्मुल्कने माझे आभार मानून हे पत्र पाठविले आहे. त्या पत्रात त्याने सिद्दीला आणखी मदत पाठविण्याची विनंती केली आहे. त्यावरून मला असा संशय येतो की सिद्दीवर मराठ्यांची फिरून स्वारी होणार असल्याचा त्याला सुगावा लागला असावा.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १५ जानेवारी १७३४. कौंट द सांदोमिल.

(168) LIVRO DE CHAUL, No. 2, FLS 4V.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, इंग्रजांनी जर मराठ्यांच्या ठाण्यांमधील प्रसरणाला आळा घातला नसता, तर मराठ्यांनी पोर्तुगिजांचा उत्तरेकडील प्रांत विशेषकरून साष्टी बेट कधीच घेतले असते.

" महाराज—

उत्तरेकडील प्रांत हा ह्या राज्याचा महत्त्वाचा भाग असून साष्टी बेट हा त्याचा सर्वांत उत्तम आणि सगळ्यांचे लक्ष असलेला तुकडा आहे. ह्या मुलुखावर मराठ्यांचा नेहमीच डोळा होता. आणि जर इंग्रजांनी त्यांच्या आक्रमणाला ठाणे जिल्ह्यात आळा घातला नसता, तर त्यांनी हा मुलुख कधीच गिळंकृत केला असता. परंतु असे जरी असले तरी ह्या बेटाला धोका हा आहेच. आणि म्हणून मी उत्तरेकडील प्रांताचे सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांना हुकूम केला की, त्यांनी ह्या बेटाची पहाणी करून त्याच्या रक्षणासाठी एकादी तटबंदी उभारणे शक्य आहे का ते पहावे. तदनंतर मी वसई नगरपालिकेच्या सिनेटला लिहिले की, ह्या तटबंदीच्या उभारणीचा एकादा मार्ग शोधून काढावा. आंद्रे रिबैरा कौतिन्यु ह्यांनी एका तटबंदीचा आराखडा काढला आहे. त्या आराखड्याची एक प्रत मी महाराजांकडे पाठवीत आहे. त्याचप्रमाणे सदरहू आंद्रे रिबैरो ह्यांनी ह्या तटबंदीच्या खर्चाचे जे अंदाजपत्रक तयार केले आहे त्याचीही एक प्रत मी ह्या पत्रासोबत पाठवीत आहे. ह्या कामावरून सदरहू आंद्रे रिबैरा ह्यांनी केवढी मेहनत घेतली त्याची महाराजांना कल्पना होईलच. ह्या कार्यानुसार त्यांनी महाराजांची बहुमोल अशी सेवा केली आहे. ईश कृपेने हे कार्य पूर्ण झाल्यावर अशाच आणखीही तटबंद्या उत्तरेकडील प्रांतात ठिकठिकाणी उभारण्याचा माझा विचार आहे. ह्या तटबंद्यांमुळे तो प्रांत सुरक्षित होईल अशी मला खात्री वाटते आणि ह्या तटबंद्या एकदा पूर्ण झाल्या की बलाढ्य आणि घमेंडखोर मराठ्यांच्या शेजारापासून आम्ही बिनधोक होऊ.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो ".

गोवा, १९ जानेवारी १७३४.

(169) LIVRO DAS MONÇOÊS, No. 102b, FLS 657:

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, इकडे गोऱ्या सैनिकांची कमतरता असल्याने आपणाला देशी शिपायांच्या पलटणी उभारणे भाग पडले आहे.

" महाराज—

ह्या राज्यातील पोर्तुगीज सैनिकांची कमतरता ही नेहमीचीच तक्रार आहे. विशेषेकरून अलीकडच्या काळात रोगराईच्या प्रादुर्भावामुळे पुष्कळ गोरे सैनिक मृत्युमुखी पडले आहेत. त्याचा परिणाम असा झाला की, सैनिकांच्या

कमतरतेमुळे आम्हांला देशी शिपायांच्या पलटणी उभारणे भाग पडले. ह्या पत्रासोबत महाराजांकडे जो तक्ता पाठविला जात आहे त्यावरून महाराजांना ह्या सैन्याची कल्पना होईलच. ह्या सैन्याकडे सरहद्दीच्या रक्षणाचे काम सोपविण्यात येणार आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो.

गोवा, १९ जानेवारी १७३४.

## (169) LIVRO DAS MONÇOES, No. 102b, FLS 680.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास कळवितो की, पोर्तुगिजांचे शत्रू शांत आहेत. मात्र मराठ्यांचे आणि सिद्दीचे युद्ध पेटले आहे.

"ह्या राज्याचे आमचे शेजारी सांप्रत शांत आहेत. परंतु पावसाळ्याच्या सुरुवातीला मराठ्यांनी सिद्दीचे काही किल्ले आणि गड घेतल्याने मला काळजी पडली आहे. सिद्दीच्या एका सेनापतीला मराठ्यांनी फितुर करून घेतल्याने ते गड आणि किल्ले मराठ्यांच्या हाती पडले. त्याने सिद्दीचे काही जलदुर्गही मराठ्यांच्या ताब्यात देण्याचे कारस्थान रचले होते. ह्या कामी दोन सेना-विभाग उपयोगात आणण्यात आले होते. त्यांनी सिद्दीच्या किल्ल्यावर हल्लेही चढविले होते. पण सिद्दीला मुंबईकर इंग्रजांनी मदत पाठविल्याने मराठ्यांची ही मोहीम फसली व त्यांना माघार घ्यावी लागली. माझ्याकडेही त्या दोघांनी मदतीची मागणी केली होती. त्या विनंतीप्रमाणे मी दांडा बंदराकडे दोन युद्धनौका पाठविल्या होत्या. ह्या शिष्टमंडळाचे नेतृत्व आंतोनियु कार्दिन फ्रांइश ह्यांच्याकडे देण्यात आले होते. त्यांच्याविषयी उभयपक्षांमध्ये चांगले मत आणि आदर असल्याने मध्यस्थीचे काम करण्यास त्यांच्याशिवाय दुसरा कुणी लायक मनुष्य मला आढळला नाही. परंतु मराठ्यांनी सिद्दीवर विजय न मिळविताच किंवा त्याच्याशी समझोता करण्यापूर्वी माघार घेतली. मराठ्यांनी युद्धातून माघार घेतलेली मला नको होती. त्याचे कारण हे की, आमचे शेजारी एकमेकांशी युद्धात गुंतले म्हणजे आम्हांला स्वास्थ्य मिळते. व त्या दरम्यान शत्रूचा हल्ला होऊ नये म्हणून तटबंदी करून घेता येते आमचा शेजारी आंगरे हा मात्र आमचा नेहमी काळजीचा विषय होऊन राहिला आहे. त्याच्याकडून व्यापारात अडथळे होत आहेत. त्याच्या सागरी सामर्थ्यात अलीकडे पुष्कळच भर पडली आहे. त्याने दगलबाजीने सिद्दीच्या आरमाराची पुष्कळच हानी केली. तो आता मराठ्यांशी तुल्यबळ झाला आहे. त्याच्यापाशी १२ हून अधिक पाली आणि ३० अथवा ४० गलबते आहेत.

तो एक मोठा चाचा आहे. त्याच्या नौकांच्या हालचाली द्रुत होत असल्याने तो चपलतेने हल्ला करून पळ काढतो. त्याने अनेकदा माझ्याशी तह करण्याचे ध्वनित केले आहे. पण एके बाजूने तो तहाची भाषा बोलतो आहे, तर दुसऱ्या बाजूने आमच्या व्यापाऱ्यांची जहाजे पकडतो आहे. त्यांच्या पत्रात तहाची भाषा असते, पण त्याचबरोबर तो निर्भयपणे लिहितो, की, आमचे व्यापारी त्याचे परवाने बाळगीत नाहीत म्हणून तो त्यांच्या जहाजांना अटक करीत आहे. मी त्याला माझ्या दृष्टिकोनाप्रमाणे उत्तर पाठविले आहे. परंतु हे असे फार दिवस चालू राहणे इष्ट नाही. त्याचा नाश केल्याशिवाय आम्हांला शांतता लाभणार नाही. आणि तेच विचार सांप्रत माझ्या मनात घोळत आहेत. परंतु हे काम पार पाडावयाचे झाल्यास त्याच्या आरमारासारख्या मोठ्या आरमाराची आवश्यकता आहे. आणि हे आरमार येथे उपलब्ध होणे अशक्य आहे. ह्या राज्याला ते बांधणेही शक्य नाही.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, १९ जानेवारी, १७३४.

## (172) LIVRO DAS MONÇOÊS, No. 102, FLS 710.

मुंबई गव्हर्नरच्या मध्यस्थीने पोर्तुगीज आणि मराठे ह्यांचा जो तह झाला, त्या तहासंबंधी पोर्तुगालचा राजा व्हाइसरॉयला लिहितो--

मी ईश कृपेने पोर्तुगाल आणि आल्गार्व्ह प्रांताचा राजा, आफ्रिकेतील प्रदेशाचा आणि गिनीचा स्वामी दों. ज्युआंव हिंदुस्थानचे व्हाइसरॉय आणि कॅप्टन जनरल कौंट द सांदोमिल ह्यांना कळवीत आहे की, आपले गेल्या वर्षीच्या दिनांक ११ जानेवारीचे पत्र मला मिळाले. त्या पत्रात आपण माझ्याकडे उत्तरेकडील प्रदेशात झालेल्या तहाची कलमे पाठविली आहेत. ह्या तहाच्या वाटाघाटी व्हाइसरॉय ज्यु आंव द साल्दान्य द गामा ह्यांच्या कारकिर्दीत सुरू होत्या. ह्या तहाची कलमे नजरेखालून घातली असता ती उपयुक्त आणि मानाची आहेत असे मला आढळून आले. ज्याअर्थी, हा करार मुंबईचे गव्हर्नर रॉबर्ट कोइव्हन ह्यांच्या मध्यस्थीने मुंबई येथे झाला, की ज्यांनी मराठ्यांशी झालेल्या युद्धाच्या वेळी साष्टी बेटाला मदत पाठविली होती, त्याअर्थी, त्यांच्या ह्या सेवेबद्दल मी त्यांचे आभार मानावे असे आपणांला वाटले; आपली सूचना मला पटल्याने मी दिनांक ३ फेब्रुवारीला भरलेल्या माझ्या सागरोत्तर सल्लागार मंडळाच्या बैठकीत हा ठराव पास करून घेतला. तरी

आपणांला कळविण्यात येत आहे की, माझ्या वतीने आपण सदरहू रॉबर्ट कोइव्हन ह्यांचे आभार मानावेत. त्यांना माझा निरोप कळवावा की, त्यांनी ही जी आमच्या राज्याची सेवा केली आहे त्याबद्दल मी इंग्लंडचे राजे माझे बंधू आणि मावसभाऊ ह्यांना रॉबर्ट कोइव्हन ह्यांच्या सेवेबद्दल त्यांना पारितोषिक देऊन त्यांच्या कार्याचे चीज करण्याची शिफारस करीत आहे.

हे पत्र लिस्बन शहरी दि. ११ मार्च १७३४ रोजी लिहिण्यात आले.

## (173) LIVRO DAS MONÇOÊS, No. 103, FLS 132.

मराठे सिद्दीवर हल्ला करण्याची तयारी करीत असल्याची वार्ता चौलच्या पोर्तुगीज ठाणेदाराला कळताच, त्याने ती व्हाइसरॉयला कळविली. व्हाइसरॉयने त्याला पुढील उत्तर पाठविले.

'चौलचे कॅप्टन ह्यांस—

आपले चालू महिन्याच्या १८ तारखेचे पत्र मिळाले. चौल शहरासंबंधी आपण जी चांगली बातमी दिली आहे, त्याबद्दल मी आपला आभारी आहे व त्याला मान आहे हे वाचून आनंद झाला. आपल्या कारकिर्दीत त्या शहरात सांप्रत सुबत्ता असून ते जागरूक आहे. ह्या शहराची अशीच भरभराट होऊन ते सुखी असावे अशी इच्छा करतो.

आंग्र्यांनी केलेल्या तहाच्या मागणीमागील हेतूसंबंधाने आपणे जे विचार व्यक्त केले आहेत ते मला मान्य आहेत. ह्यासंबंधी मी आपणांला दुसऱ्या एका पत्रात लिहिले आहे.

सिद्दीविरुद्ध सैन्य तयार होत आहे ही काळजी करण्यासारखी गोष्ट आहे. त्याचे कारण हे की, हे युद्ध चालू ठेवण्याचे सामर्थ्य सिद्दीमध्ये नाही. परंतु इंग्रजांना त्याला मदत करता येईल. आणि माझी अशी समजूत आहे की, ते त्याला मदत केल्यावाचून राहाणार नाहीत. कारण, दाभोळ अथवा दांडा ह्या दोन्ही ठाण्यांपैकी एकादेही ठाणे जर मराठ्यांच्या हातात पडले तर, इंग्रजांची फार हानी होणार आहे. ते काहीही असो, पण गेल्या वर्षाप्रमाणे ह्या युद्धातदेखील आपण सिद्दीला मदत करण्याच्या बाबतीत जागरूक राहिले पाहिजे. कारण, तो टिकून राहाणे हे आमच्या हिताचे आहे. त्याला मदत करण्याचा एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे किनाऱ्यावर एक मोठे आरमार ठेवणे.

चौलच्या दिवाणाने चौल शहराशी बेइमानीपणा केल्याचे आपण जे म्हणता त्यावर माझा विश्वास बसत नाही. परंतु काळजी घेतलेली बरी. त्याचा बेइमानीपणा सिद्ध करण्यासाठी म्हणून त्याची पत्रे मिळविण्याकरता आपण जी युक्ती लढविण्याचे ठरविले आहे, ती युक्ती मला पसंत आहे. मार्दा फावलसंबंधी आंग्र्यांचा जो हेतू आहे, त्याची कल्पना देणारी आपली बातमी वाचली. ह्या बातमीचा मला सिद्दीशी ह्या प्रश्नासंबंधी वागताना उपयोग झाला.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २९ सप्टेंबर १७३४. कौंट द सांदोमिल

(177) CHAUL, No. 2, FLS 13.

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदारास कळवितो की, निजामउल्मुल्कने मराठ्यांच्याविरुद्ध सैन्याच्या हालचाली सुरू केल्याची जी वार्ता त्याने पाठविली ती ऐकूण आपणांस आनंद झाला.

"चौलचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

आपले १३ ऑक्टोबरचे पत्र मिळाले. ह्या फ्रिगेटवर पन्नास बंदुका त्यांच्या संगिनीसह पाठविण्याचा मी हुकूम केला आहे. त्या ठाण्याला सांप्रत मी एवढ्याच काय त्या बंदुका पाठवू शकतो. कारण, देवाच्या कृपेने देशाहून इकडे २६ ऑक्टोबरला येऊन पोहोचलेल्या नौकेवर मदत आली नाही. म्हणून मला वाटते की, तिकडे जर बंदुका असल्या तर त्या दुरुस्त करून घ्याव्या. नवीन बंदुका येईपर्यंत ह्या बंदुकांचा आपणांस उपयोग करता येईल.

निजामउल्मुल्कने मराठ्यांविरुद्ध लष्करी हालचाली सुरू केल्याची जी बातमी आपण पाठविली आहे, ती जर खरी असेल तर, ती आनंदाची आहे असे म्हणावे लागेल. आपण ह्याबाबत मला वरचेवर कळवीत जावे. इकडे अशी बातमी आली आहे की, मराठ्यांचे काही सैन्य सिद्दीवर चालून येत आहे. बाजीरावाने मला कळविले आहे की, शाहूराजे ह्यांनी त्यांच्याकडे ही मोहीम पुन्हा सोपविली आहे. त्याने अशी सूचना केली आहे की, सिद्दीने जर त्याला आंग्र्याविरुद्ध मदत केली असती तर, त्याने सिद्दीशी तह केला असता. मी आणि मुंबईच्या गव्हर्नरनी दोघांनी मिळून आंग्र्याविरुद्ध बाजीरावाशी हातमिळवणी केली असती. पण इंग्रजांची मदत बाजीरावाला नको आहे. त्याचा जो एक विश्वासू दूत इकडे आला होता त्याच्याकडे मी हा प्रस्ताव मोठ्या आनंदाने ऐकण्याची इच्छा व्यक्त केली, व मला जे काय करता येणे शक्य आहे



व्ही ५५५८–२४

ते करण्याचे आश्वासन दिले. कारण, तूर्त त्या किनाऱ्यावर मी सैन्य पाठवू शकत नव्हतो. माझी योजना मी उत्तरेकडील सेनापतीला कळविली आहे. माझी अशी समजूत आहे की, सिद्दीचे जलदुर्ग काबीज करणे ही एक अशक्य गोष्ट असल्याचे मराठ्याला (बाजीरावाला) पटले आहे. व म्हणून तो आंग्र्याचे किल्ले काबीज करण्याचे मनसुबे रचीत आहे. परंतु मला असे वाटते की, आंग्र्यासारख्या भयंकर चांच्याचा नाश व्हावा ही जरी माझी इच्छा असली तरी, त्याचे किल्ले मराठ्यांच्या हाती पडलेलेही मला नको आहेत. कारण, मराठे हे आंग्र्याहून बलाढ्य असल्याकारणे, त्यांनी जर आंग्र्यांचे जलदुर्ग घेतले तर, त्यांच्यापासून आम्हाला धोका निर्माण होईल. माझी अशी इच्छा आहे की, आंग्रे व मराठे ह्यांचे युद्ध अवश्य सुरू व्हावे. परंतु ते दीर्घकाल चालून आंग्र्यांचा एकही किल्ला मराठ्यांना घेता येऊ नये. ह्या हेतुने बाजी-रावाला केवळ नाममात्र मदत करण्याचा माझा विचार आहे. कारण आंग्र्यानेही बाजीरावाला कणखर प्रतिकार करू नये असे मला वाटते. व म्हणून बाजी-रावाला ही मदत करणे अगत्याचे आहे. माझे विचार मी उत्तरेकडील सेनापतीला कळविले आहेत, व बाजीरावाशी विचारविनिमय करून त्याच्या मर्यादेत त्याला मदत करण्यास कळविले आहे.

मला असाही संशय येतो की, हा प्रस्ताव आम्हाला सूचविण्यामागे बाजीरावाचा एकादा अंतस्थ हेतु असावा. कदाचित आम्हाला फसविण्याचीही त्याची इच्छा असावी. इंग्रजांनाही त्याने अशीच सूचना केल्याचे कळते. हेतु हा की, आमच्याकडून सिद्दीला मदत होऊ नये, व हलगर्जीपणा झाला तर त्याला सिद्दीचा पराभव करणे सुलभ व्हावे. पण हा डाव हाणून पाडण्या-साठी आम्ही डोळ्यांत तेल घालून जागरूक राहिले पाहिजे. तरी माझी आपणाला सूचना आहे की, सिद्दी जर संकटात सांपडला तर त्याला आपणा-कडून होईल तेवढी मदत करावी. मी उत्तरेकडील सेनापतीलाही असेच लिहिले आहे. आपल्या विश्वासातला एकादा मनुष्य असला तर, त्याच्या-मार्फत आंग्र्यांना ह्या बाबतीत इशारा देण्यास हरकत नाही. त्याला फक्त एवढीच सूचना द्यायची की, बाजीराव त्याच्यावर अचानकपणे हल्ला करण्या-साठी येत आहे. तरी त्याने जागरूक असावे, व सर्व सामर्थ्य एकवटून सिद्दीवर हल्ला करू नये. पण बाजीरावाला आंग्र्यांच्या अंगचोरपणाचा संशय येता कामा नये, हे त्याला सूचविले पाहिजे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ५ नोव्हेंबर १७३४ कौंट द सांदोमिल

(179) CHAUL, No. 2, FLS 17V.

आंग्र्यांमध्ये भाऊबंदकी सुरू असल्याची वार्ता चौलच्या ठाणेदाराने व्हाइसरॉयला कळविली असता, तो त्याला उलटपत्री कळवितो की, शाहूराजे ह्यांनी एका भावाचा पक्ष उचलून धरला तर पोर्तुगिजांनी दुसऱ्या भावाचा पक्ष उचलून धरावा. *तसेच ह्या भाऊबंदकीमुळे आंग्र्यांचे सामर्थ्य कमी होणार म्हणून व्हाइसरॉयने पत्रात समाधान व्यक्त केले आहे.

"चौलच्या ठाण्याचे कॅप्टन कायतानु द सौझ परैरा ह्यांस--

गलबतावर पाठविलेली आपली सर्व पत्रे मिळाली. गेल्या महिन्याच्या २९ ला लिहिलेल्या आपल्या शेवटच्या दोन पत्राचे उत्तर करताना आपल्या प्रयत्नांना यश येऊन दोघां भावांमध्ये कलह निर्माण झाल्याचे पाहून मला आनंद होत आहे. हा कलह चालू राहिला तर आमच्या दृष्टीने तो फायद्याचा आहे. ह्या भाऊबंदकीमध्ये शाहूराजे ह्यांचा कल जरी मानाजी आंग्रे ह्यांच्या बाजूने असला तरी सिद्दीशी त्यांचे सांप्रत युद्ध चालू असता व ह्या युद्धात आंग्र्यांच्या सामर्थ्याची त्यांना आवश्यकता असता ते त्या दोघा भावांमध्ये उघड उघड दोन तट पाडतील असे मला वाटत नाही. माझी अशी इच्छा आहे की, शाहूराजे कुणाची बाजू घेतात ते बघण्यासाठी मानाजी आंग्रे ह्यांनी शाहूराजे ह्यांच्या दरबारात जावे. आणि शाहूराजे ह्यांनी जर आंग्र्यांची दौलत दोघां भावांमध्ये विभागण्याचे ठरविले तर, मात्र आम्हाला धाकट्या भावाची बाजू घेऊन त्याला मदत करणे सोयीच होईल. पण ती मदत आम्ही एका अटीवर करू. त्याने गढी आमच्या हवाली केली पाहिजे. आपण ज्या युद्धाचा प्रस्ताव मला सूचविला आहे ते युद्ध आजच्या परिस्थितीत सुरू करता येईल असे मला वाटत नाही. कारण देशाहून जी नौका इकडे आली आहे, तिच्यावर फारच थोडे सैन्य आले आहे. आणि त्यातील पुष्कळशी माणसे रुग्णालयात आजारी आहेत. माणसे मेलीही आहेत पुष्कळ. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील आरमारावर सैन्य पाठविण्याची आवश्यकता आहे, शिवाय बेटे (तीसवाडी), साष्टी, आणि बार्देश ह्या तीन्ही जिल्ह्यांच्या रक्षणासाठीही सैन्याची आवश्यकता आहे. पण तरीही आपण आपली योजना उत्तरेकडील सेनापतीकडे कळवून त्यांचे मत अजमावावे. मानाजी आंग्रे साताऱ्याला जाईतोपर्यंत आपणाला हे सर्व करता येईल. उत्तरेकडील सेनापतीच्या मताला मी मान देतो हे कदाचित आपणाला माहीत असेलच. ह्या बाबतीत त्यांचे मत काय आहे ते कळल्यावर पुढचा विचार करता येईल. ह्या पत्रासमवेत जे पत्र जात आहे ते उत्तरेकडील सेनापतींना पोहोचते करावे. त्या पत्रात मी आपल्या योजनसंबंधीची माहिती त्यांना दिली आहे. तरी हे पत्र त्यांना ताबडतोब पोहोचते करावे. पण दरम्यान जर सदहू सेनापतींनी एकादा विचार मनात

आणला, विशेषेकरून गढीसंबंधी तर, आपण त्यांचा हुकूम ताबडतोब अंमलात आणावा. मला भरवंसा आहे की, एकादी गोष्ट तडीस जाण्याची शक्यता असल्याशिवाय ते ती गोष्ट हातात घेणार नाहीत.

गलबतांची वसुली आणि आंग्र्यांच्या माणसांची मुक्तता आपण जी केलीत तत्संबंधाने मी आपणाला आरमारावर पाठविलेल्या पत्रात लिहिले आहे. आता मी आपणाला एवढीच सूचना करतो की, मुक्त झालेल्या माणसांनी जर मुक्त होण्यासाठी भरलेल्या रकमेची मागणी केली तर, ती त्यांना परत करावी व पुढे आणखी रक्कम वसूल करू नये. मिठाचा कर योग्य असाच आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १३ डिसेंबर १७३४ कौंट द सांदो मिल

(108) CHAUL, No. 2, FLS. 21V.

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदारास आंग्र्यांच्या संबंधाने लिहितो :—

"चौलचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

आपले दि. १८ चे पत्र घेऊन येणारे गलबत इकडे काल येऊन पोहोचले ते आपल्या पत्राचे उत्तर घेऊन तिकडे रवाना होत आहे.

आंग्र्यांच्या भाऊबंदकीसंबंधाने मी आपणाला माझा दृष्टीकोण कळविलाच आहे. उत्तरेकडील सेनापतीनींही ह्या प्रश्नासंबंधी विचार केला असल्याचे त्यांच्या चालू महिन्याच्या दि. १५ च्या पत्रावरून दिसून येते. ह्या पत्रात त्यांनी जे काय लिहिले आहे ते मला मान्य आहे. आपल्याला मी दि. १३ ला जे पत्र लिहिले आहे, त्या पत्रातील माझी मते सेनापतीच्या मतांशी तंतोतंत जुळती आहेत. मानाजी आंग्रे ह्यांनी आम्हाला गढी परत केली पाहिजे. कारण ती गढी दिवाणाची असल्याने ती आम्हाला त्याला परत करायची आहे. पण ही गढी जर आपल्या हातात आली तर, माझ्या नवीन हुकुमाशिवाय आपण ती दिवाणांना परत करू नये. मानाजी आंग्रे ह्यांनी शाहूराजे ह्यांना भेटण्यासाठी साताऱ्याला जावे म्हणून आपण त्यांना जो सल्ला देणार आहात त्याची वाच्यता न होऊ देण्याची दक्षता घ्यावी व त्या सल्ल्यामागील अंतस्थ हेतूही मानाजीच्या ध्यानी येता कामा नये. त्याला वेगळा पाडण्याचा हा डाव आहे हे त्याला कळून चुकता उपयोगाचे नाही.

ह्या सर्व प्रश्नांच्या बाबतीत जी कळकळ आणि लढाऊ पवित्रा घेतलात त्याबद्दल मला आपले खरोखरच कौतुक करावेसे वाटते. परंतु मी आपणाला

इशारा देऊ इच्छितो की, उत्तरेच्या सेनापतीच्या अपरोक्ष आपण मानाजी व इंग्रज ह्यांना कर्जाऊ पैसे आणि मदत देऊन तहाच्या वाटाघाटी केलेल्या मला आवडणार नाही. कारण हा व्यवहार करण्याचा आपला अधिकार नाही. ह्या गोष्टी उत्तरेकडील सेनापतीच्या अधिकारातील आहेत, म्हणून त्या आपण त्यांच्याकडे सोपवाव्या. मशिदीचे काय करायचे. ती पाडायची की, ठेवायची असे आपण पत्रात विचारता ह्या किंवा अन्य कोणत्याही प्रश्नाचे बाबतीत आपण उत्तरेकडील सेनापतीचा सल्ला घ्यावा, व ते सांगतील त्याप्रमाणे वागावे. दि. १३ ला लिहिलेल्या पत्रात मी आपणाला कळविलेच आहे की, इकडे सैन्य फार थोडे असल्याकारणे मी तिकडे कुमक पाठवू शकत नाही. तीच गोष्ट शस्त्रांचीही आहे. ह्या संबंधी आपण जो व्यवहार केला आहे त्याला मी मंजुरी देऊ शकत नाही. आपण हा व्यवहार करायला नको होता. मानाजी आंग्रे व त्यांची सावत्र आई ह्या दोघांनी मला पत्रे लिहिली असल्याचे आपण पत्रात म्हणता पण ती पत्रे अद्याप माझ्याकडे आलेली नाहीत. आपण माझ्याकडे ज्या दारूगोळ्याची मागणी केली आहे तो दारूगोळा मी पहिली संधी मिळताच पाठवून देईन. पण ज्याअर्थी, त्याला पुष्कळ मागणी आहे, आणि पुरवठा कमी आहे, त्याअर्थी, त्याचा उपयोग आपण मर्यादित स्वरूपात करावा. तसेच ह्या दारूपैकी किती दारू खर्च केली आहे आणि किती दारू शिल्लक आहे, त्याचा हिशेबही मात्र आपण दिला पाहिजे.

माझे असे मत आहे की, मानाजी आंग्रे ह्याना आपण जी मदत केली आहे ती मदत माझ्या मते टाळता आली असती. कारण शाही खजिन्याला पैशाचा असा खर्च करणे परवडत नाही. उत्तरेकडील सेनापतींचे जे पत्र आले आहे, त्यावरून मानाजी आंग्रे ह्यांनी आपल्या भावाची काही भाताची गलबते पकडल्याचे कळून चुकले. त्याचप्रमाणे आपण मला बातमी दिली आहे की, इंग्रजांकडून त्यांना पैशाचे आश्वासन मिळाले असून त्यांना आपणही मदत केली आहे. ह्यावरून मी असा निष्कर्ष काढला आहे की, ज्याअर्थी, इंग्रजांनी त्यांना आर्थिक मदत देण्याचे कबूल केले आहे, त्याअर्थी, त्यांना आणखी मदतीची जरूरी नाही. तरी आपली मदत आपण बंद करावी, व संधी मिळेल त्यावेळी त्यांना दिलेल्या रकमा वसूल कराव्या. त्यांना दिलेल्या रकमांच्या पावत्या घेतल्या आहेत हे आपण मला कळविलेच आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २३ डिसेंबर १७३४ कौंट द सांदो मिल

(181) CHAUL, No. 2, FLS. 23V.

व्हाइसरॉय आंग्र्यांसंबंधी चौलच्या ठाणेदारास पुन्हा लिहितो :—

"चौलचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

आपल्या ३१ डिसेंबरच्या पत्राचे हे उत्तर आहे. ह्या पत्रासमवेत उत्तरेकडील सेनापतीला आपण २४ आणि ३० तारखेला जी पत्रे घातलीत त्यांच्या नकला आल्या आहेत. त्या पत्रांवरून मानाजी आंग्रे ह्यांनी सिद्दी व इंग्रज ह्या दोघांशी सुरू केलेल्या वाटाघाटींची माहिती कळली. त्यावरून आपण म्हणता की, मराठ्यांचे मानाजी आंग्रे ह्याच्याकडील वागणे प्रामाणिकपणाचे नाही. ह्याच कारणावरून मानाजी आंग्रे ह्याचे त्यांच्या भावाशी झालेले भांडण आपण समजत होता तितके आमच्या फायद्याचे नाही, हे मी तेव्हाच ताडले होते.

मानाजी व बाजीराव ह्या दोघांना मी पत्रे पाठवीत आहे. त्या पत्रांच्या नकला मी आपल्या पत्रासमवेत पाठवित आहे. त्याचप्रमाणे आपणाला मी दि. २३ ला जे पत्र पाठविले होते, त्याचीही नक्कल प्रस्तुत पत्रासमवेत पाठवीत आहे. आपल्या पत्राचे ते उत्तर आहे. त्या पत्रात मी म्हटले आहे की, ह्या सर्व गोष्टी उत्तरेकडील सेनापतींना कळवाव्या व त्यांच्या हुकुमाप्रमाणे वागावे. तोच सल्ला मी आपणाला ह्या पत्रानुसार पुन्हा देत आहे. आपण म्हणता की, इकडून जी माणसे तिकडे पाठविण्यात आली आहेत, ती निरूपयोगी आहेत. आपण ज्या प्रकारच्या माणसांची मागणी केली होती ती माणसे पाठविण्यास मला आनंद वाटला असता. परंतु माझा नाईलाज आहे. माझ्या अडचणी मी आपणाला मागच्या पत्रात कळविल्याच आहेत. आपण जे काय मनात आणता ते मी सगळेच पूर्ण करू शकत नाही. माझे दि. २३ डिसेंबरचे पत्र आपणाला मिळालेच असेल. त्या पत्राची नक्कल मी ह्या पत्रासोबत पाठवीत आहे. आपण तोफा ओतण्याचे काम बंद केलेच असेल की, ज्या कामाबद्दल चौल शहराने माझ्याकडे तक्रार केली होती.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १२ जानेवारी १७३५

ह्या टपालात जात असलेले पत्र वसईला त्वरीत रवाना करावे.

कौंट द सांदोमल

(182) CHAUL, No.2, FLS. 26.

व्हाइसरॉय चौलच्या कॅप्टनला पुनः लिहितो—

"चौलचे कॅप्टन ह्यांस—

मानाजी आंग्रे ह्यांच्या दोस्तीसंबंधाने आपला पुरताच भ्रम निरास झाला असेल, असे मी धरून चालतो. ह्या दोस्तीसंबंधाने आपण मनात केवढे मांडे रचले होते.

मानाजी आंग्रे ह्यांची सुरूवातीपासूनची वागणूक दुटप्पीपणाची होती आपला कार्यभाग साधतांच त्यांचे अंतरंग उघडे झाले. ते सुरूवातीपासून आपल्या हितसंबंधांना जपत होते. गरीब बिचाऱ्या दिवाणांची मशीद देखील ते सोडण्यास तयार झाले नाहीत. ही मशीद म्हणजे जुलूम जबरदस्तीचा मूर्तीमंत पुरावा आहे. ह्या भाऊबंदकीतून आपण गढी घेण्याचे मनसुबे रचीत आहात. ह्या विजयातून आपला कोणता फायदा होणार आहे त्याचा आपण विचार केला पाहिजे. आणि त्यात पुन्हा मराठ्यांना दुखवून.

आपल्या कल्पनेप्रमाणे आपण जर गढीवर हल्ला केला तर, ती उध्वस्थ झाली असेल आणि तिचे रक्षण करणारे नेहमीप्रमाणे पळून गेले असतील. अशा परिस्थितीत जर मराठ्यांनी हस्तक्षेप केला तर उत्तरेकडील युद्धाचा भडका उडाल्यावाचून राहाणार नाही.

आपण माझ्याकडे दारूगोळ्याची मागणी केली आहे. माणसेही आपणाला हवी आहेत. कोठारात दारूगोळ्याची जरी कमतरता नसली तरी, तो तिकडे कसा पाठवावा हा एक प्रश्नच आहे. कारण इकडे नौकांची कमतरता आहे. इश्त्रेला ही फ्रिगेट दक्षिणेकडील आरमाराबरोबर गेली आहे. सां लुईज दो पाताशु इकडे आहे. पण तिला देशाला जाणाऱ्या नौकेबरोबर पाठवायची आहे. आणि मी तिकडे माणसेही पाठवू शकत नाही. कारण, मलाच इकडे माणसांची कमतरता आहे. रुग्णालयात बरीच माणसे आजारी आहेत. इकडची परिस्थिती जाणून घेण्याची जबाबदारी आपणावर नाही हे जरी खरे असले तरी, तिच्याकडे आपण दुर्लक्ष करणेही बरोबर नाही. कारण आपण ज्या योजना आखल्या आहेत त्या पार पाडण्यासाठी माणसांची आवश्यकता आहे. आपल्या योजना जरी कितीही उपयुक्त असल्या तरी त्यासंबंधी विचार केल्याशिवाय त्या आपण आखायला नको होत्या. मानाजी आंग्रे व बाजीराव ह्या दोघांना दोन पत्रे पाठवीत आहे. त्यांचा उपयोग आपणाला पुढीलप्रमाणे होऊ शकेल. जर परिस्थिती शांत असली आणि ती मैत्री चालू ठेवण्यास पोषक असली, आणि शत्रू मशीद ताब्यात देण्यास अथवा ती खाली करण्यास तयार नसला तर, आपण फक्त १२ जादेवारीचे तेवढे पत्र पाठवावे. जर परिस्थिती तेढीची असली तर, १६ जानेवारीचे पत्र पाठवावे. ह्या पत्राच्या

नकला आपणाकडे पाठवीत आहे. त्या नजरेखालून घातल्यावर त्यांचा हेतू आपल्या ध्यानी आल्यावाचून राहाणार नाही. ह्याच पत्रांच्या नकला उत्तरेकडील सेनापतीकडेही पाठवीत आहे. त्यांचाही सल्ला आपण अवश्य घ्यावा.

इकडे असलेल्या दुसऱ्या गलबतावर तोफांचे गोळे पाठविण्याचा प्रयत्न करीत आहे. तिकडील घटना मला वारंवार कळवीत जाव्या.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १६ जानेवारी १७३५

(183) CHAUL, No. 2, FLS26.

व्हाइसरॉय हिंदुस्थानातील राजकीय घडामोडींचा आढावा घेऊन पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो.

"महाराज—

मागच्या वर्षी मी महाराजांना सिद्दी व मराठे ह्या दोघांमधील युद्धाचा वृत्तांत कळविला होता. त्यावेळी मराठ्यांच्या फौजा सिद्दीच्या जलदुर्गांना वेढा देऊन बसल्या होत्या. त्यांनी नंतर माघार घेतली होती. पण पुढे मराठ्यांच्या ताज्या दमाच्या फौजांनी खाली उतरून सिद्दीच्या ह्याच ठाण्यावर दुप्पट जोमाने हल्ले चढविले होते. तथापि, ह्या ठाण्याचा बचाव करणाऱ्या सिद्दीच्या सैन्याने मराठ्यांचा कडवा प्रतिकार केला होता. शेवटी मराठे निराश झाले, त्यातच पावसाळाही सुरू झाला. म्हणून मराठ्यांनी दुसऱ्यांदा माघार घेतली. मी ह्या युद्धात तटस्थता स्वीकारली होती. पण सिद्दीला मी आतून मदत करीत होतो. कारण, मराठ्यांसारखा बलाढ्य शेजारी इकडील समुद्रावरील बंदरांचा स्वामी झाल्यास आमच्या हितसंबंधांना त्यांच्यापासून धोका निर्माण झाला असता. काही दिवसांमागे कान्होजी आंग्रे ह्यांचे दोन मुलगे संभाजी व मानाजी ह्या दोघांमध्ये मोठे भांडण होऊन मानाजी आंग्रे हा संभाजीच्या भीतीने आमच्या चौलच्या छावणीत पळून आला. संभाजी आपणांला ठार करील अशी त्याला भीती वाटत होती. ह्या दोघा बंधूमधील कलह आंग्र्यांच्या शत्रूच्या चांगलाच पथ्यावर पडला. कारण, आंग्र्यांचा नाश व्हावा ही त्यांच्या शत्रूंची मनापासून इच्छा आहे. विशेषेकरून संभाजी आंग्रे ह्यांच्याविषयी तर त्याच्या शेजाऱ्यांना भयंकर द्वेष वाटतो. कारण संभाजी जसा शूर आहे तसाच तो क्रूरही आहे. ह्या दोघा भावांमध्ये भांडण होऊन मानाजी आंग्रे हा चौलला पळून आल्याचे कळताच इंग्रज आणि सिद्दी ह्या दोघांनी त्याच्याशी संधान साधून त्याला मदत करण्याचे आश्वासन दिले.

चौलच्या कॅप्टननेही त्यांचे चांगले स्वागत करून त्याला संरक्षण दिले. कारण मानाजी आंग्रे कुलाब्याचा कारभार पाहात होता, तेव्हा त्याचा आणि चौलच्या कॅप्टनचा स्नेह जुळला होता.

इकडे मराठ्यांनीही मानाजीची बाजू उचलून धरली. ह्या भाऊबंदकीत हस्तक्षेप करून त्यांना आंग्र्याच्या राज्यात शिरकाव करायचा आहे, किंवा कुलाब्याचा किल्ला बळकावयाचा आहे. कारण, त्यांना समुद्रावरील एक बंदर हवे आहे. मराठ्यांना मानाजीकडून जी मदत आली ती त्याने चौलच्या दिवाणाच्या गढीत नेऊन ठेवली. ही गढी मानाजीचा भाऊ संभाजी ह्याने सिद्दीचे व मराठ्यांचे युद्ध झाले तेव्हा चौलच्या दिवाणावर हल्ला करून बळकावली होती, व गेले वर्षभर ती त्याच्याकडे होती. ही गढी चौलच्या दिवाणाला परत करावी म्हणून चौलच्या दिवाणाने तिची मानाजीकडे मागणी केली. ह्या गढीच्या बाबतीत मी पूर्वी आंग्र्यांशी बोलणी केली होती. ती चौलच्या दिवाणाला परत मिळावी असे मला वाटत होते, कारण हा दिवाण सुरुवातीपासून पोर्तुगिजांशी इमानी राहिला आहे, व त्याला आमचे संरक्षण मिळत आले आहे. परंतु मानाजीने चौलच्या कॅप्टनच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लावून गढी परत करण्यास नकार दिला. चौलच्या कॅप्टनने मानाजीवर केलेले उपकार विसरून जाऊन तो त्याच्यावर उलटलेला पाहाताच कॅप्टनला त्याचा भयंकर संताप आला व त्याने गढीपासून थोड्याच अंतरावर असलेली मशीद घेण्याचा निर्धार केला. ही गढी निर्जन होती. तिथे चौलच्या कॅप्टनने आपली काही माणसे ठेवली.

चौलच्या कॅप्टनने मशीद ताब्यात घेतलेली पाहून मानाजी आंग्रे भयंकर क्रोधाविष्ट झाला व तो चौलच्या छावणीतून बाहेर पडला. त्याने गढीमध्ये जाऊन मशिदीवर हल्ला करण्याचा निर्णय घेतला. त्याचे हे कृत्य कृतघ्नपणाचे होते यात शंका नाही. कारण ज्याने त्याला आश्रय दिला होता, त्या उपकारकर्त्यावरच तो उलटला होता.

मानाजी असे काहीतरी केल्यावाचून राहाणार नाही हे चौलच्या कॅप्टनला माहीत होते. व म्हणून त्याने हल्ल्यास तोंड देण्याची चांगली तयारी केली होती. त्याच्या अंदाजाप्रमाणे मानाजीने मशिदीवर हल्ला करताच कॅप्टनने तो परतवून लावला. ही बातमी जेव्हा उत्तरेकडील सेनापतीला कळली तेव्हा त्याने वसईची दोन पाले दारूगोळा आणि माणसे भरून चौलला पाठवून दिली. ही कुमक पाठविण्यामागे त्याचा एक हेतू होता आणि तो म्हणजे आंग्र्यांकडून चौलच्या दिवाणाची गढी घेण्याचा.

माझ्या मते चौलच्या कॅप्टनला गढी घेता येईल. परंतु ह्या छोटचा प्रकरणातून मराठे आणि इंग्रज ह्या दोघांमध्ये युद्धाचा भडका उडेल अशी मला भीती वाटते. कारण मराठ्यांनी मानाजीला सैन्याची मदत पाठविण्यास सुरूवात केली आहे, हे तर झालेच, पण मराठे फार प्रबळ आहेत. तेव्हा अशा बलाढ्य शत्रूशी उत्तरेकडील प्रांतासारख्या दूरच्या प्रांतात युद्ध खेळणे आम्हाला परवडायचे नाही. म्हणून मी तिकडे हुकूम पाठविला आहे की, त्यांनी हे प्रकरण आणखी चिघळू न देता विझवून टाकावे. माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, २५ जानेवारी १७३५

(184) LIVRO DAS MONSOES, No. 103, FLS 911.

व्हाइसरॉय चौलच्या कॅप्टनला मराठ्यांशी सबुरीने घेण्याचा पुढील पत्रात सल्ला देतो.

"चौलचे कॅप्टन ह्यांस—

आपण पाठविलेले गलबत काल रात्री इकडे येऊन पोहोचले. त्या गलबतावर आपण मला पाठविलेले गेल्या महिन्याच्या दि. ३० चे पत्र मिळाले. त्या पत्रावरून कळून चुकले की, मानाजी आंग्रे प्रकरणी मी आपणांला सल्ला देऊन जे पत्र पाठविले होते ते आपणाला मिळाले. ह्या बाबतीत त्याचे आपणांला आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. कारण ह्या जगात सगळ्यांची मते सारखी नसतात. विचारा विचारांमध्ये भेद असतो. आणि अनुभवाने पटवून दिले आहे की, एकाद्या छोटचाशा ठिणगीतून मोठा वणवा भडकू शकतो. तो निर्णायक होऊ शकतो.

मला माहीत आहे की, मानाजी आंग्रे प्रकरणी आपण ज्या रीतीने वागला ते वर्तन आपली स्वतःची आणि पोर्तुगीज राष्ट्राची इभ्रत राखण्यासाठी आपला हेतू आपण निश्चितपणे साध्य केला आहे. ह्यात शंका नाही. आपण जे धैर्य, कळकळ आणि जागरूकपणा दाखविला तो प्रशंसनीय आहे. त्याच-प्रमाणे ह्या युद्धात ज्या अधिकाऱ्यांनी आणि सैनिकांनी भाग घेतला त्यांची चिकाटी आणि पराक्रम ही दोन्हीही वाखाणण्यासारखी आहेत. माझ्या वतीने त्या सगळ्यांचे आपण आभार मानावेत. ही गोष्ट नेहमी माझ्या लक्षात राहील व त्यांच्या सुखसोयीत भर घालण्याचा व त्यांची पगारवाढ करण्याचा मी प्रयत्न करीन.

मशीद ताब्यात घेण्याच्या कामी आपला भाग नव्हता हे मला कळले. त्याचप्रमाणे दों. लुईज द बोतेल्यु ह्यांनी ती ताब्यात घेण्याचा जो हुकूम केला तोही वावगा नव्हता. माझ्या मते गढी विकून टाकणे फायद्याचे आहे. कारण, ह्या कृतीतून उत्तरेकडील युद्धाचा भडका उडण्याचा संभव आहे. पण हे युद्ध आम्हांला फायदेशीर होण्याची शक्यता नाही. आणि म्हणून हे प्रकरण एवढ्यावरच थांबावे असे मला वाटते. माझ्या मते चौलच्या दिवाणाची गढी मराठ्यापाशी असली म्हणून आपल्या ठाण्याना धोका आहे असे मानण्याचे कारण नाही. कारण आम्हाला अनुभवाने कळलेच आहे की, मराठ्यांना वेढ्याचे युद्ध अवगत नाही. एकाद्या ठाण्याला वेढा घालून त्याच्यावर हल्ला करून ते घेणे त्यांना जमत नाही. आणि जोपर्यंत त्या ठाण्याचे प्रमुख आपण आहात तोपर्यंत तरी त्याला शत्रूचा मुळीच धोका नाही. अशा परिस्थितीत जर हे प्रकरण सामोपचाराने मिटत असेल तर बाजीरावाचे कानी घातले पाहिजे की, गढीवर त्याचा किंवा मानाजी आंग्रे ह्याचा कोणताच अधिकार नसून चौलचे दिवाण हेच तिचे खरेखुरे मालक आहेत व त्यांनाच ती कायद्याने मिळाली पाहिजे. ह्या संबंधी मी उत्तरेकडील सेनापतींनाही पत्र घालीत आहे. हे पत्र पताशावर पाठवीत आहे. पत्र पाठविण्यासाठीच म्हणून ते ठेवून घेण्यात आले होते. पत्राशिवाय त्याच्यावर दारूची ७० पिंपे, लहान गोळ्यांच्या २० पेट्या, ५०० हातबॉम्स, ४,००० कॅप्स आणि ५० सैनिकांची एक तुकडी पाठवीत आहे. तूर्त आपणाला मी जे काय पाठवू शकतो ते एवढेच. सध्य परिस्थितीत मला ह्याहून अधिक काही पाठविता येत नाही. आपल्या मागणी-प्रमाणे जर मला अधिक काही पाठविता आले असते, तर मला फार आनंद झाला असता. पण आजारापायी आतापर्यंत पुष्कळ सैनिक मृत्युमुखी पडले आहेत आणि बरेच रुग्णालयात आजारी आहेत. मी आंग्रे प्रकरणी तडजोडीचा मार्ग पत्करला त्याचे कारण हे आहे.

पाताशवर आल्कोहोल आणि औषधे पाठवीत आहे. त्या शिबंदीच्या शस्त्रवैद्याने त्याची मागणी केली होती. आंग्रे प्रकरण सामोपचाराने मिटले तर मी पाठविलेले सैनिक आपण परत पाठविल्यास मला हवे आहेत. पण आपणांला जर त्यांची आवश्यकताच असेल तर त्यांना ठेवून घ्यावे. कारण, त्या शिबंदीला विश्रांतीची फार आवश्यकता आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ५ फेब्रुवारी १७३५ कौंट द सांदोमिल

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदाराला तिकडील घडामोडीसंबंधाने पुढील पत्र लिहितो—

"चौलचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

आपले २७ आणि २८ एप्रिलचे पत्र मिळाले. ह्या पत्रांसमवेत आपण कॅप्टन इंचर्ड व उत्तरेकडील सेनापती ह्या दोघांची जी पत्रे पाठविली आहेत तीही मिळाली. बाजीराव व आंग्रे ह्या दोघांशी आपण तडजोड केली असल्याचे आपल्या पत्रावरून कळले. ही तडजोड मला समाधानकारक वाटली नाही. पण त्याला इलाज नाही.

संभाजी आंग्रे ह्यांनी सिद्दीच्या गावेडाकोट ह्या नावाच्या किल्ल्यास वेढा घातला असल्याची जी बातमी आपण मला पाठविली आहे, ती काळजी करण्यासारखी आहे. सिद्दीचे जे पत्र आपण माझ्याकडे पाठविले आहे त्यातही वेढ्याचा उल्लेख आहे. परंतु ह्या पत्रात त्याने संभाजी आंग्रे ह्यांच्या स्वारीबाबत काळजी व्यक्त केल्याचे दिसत नाही. तो म्हणतो की, त्याच्या पूर्वजांप्रमाणे आमच्याशी सलोख्याचे संबंध ठेवण्याचा त्याचा विचार आहे. त्यावरून मी असा तर्क केला की, ज्या वेळी त्याने हे पत्र लिहिले त्यावेळी वेढ्याला सुरुवात झाली नसावी. मी त्याला त्याच्या बंदरात आमची जी गलबते पकडली गेली त्यासंबंधी लिहीत आहे. व माद्राफावालचाही त्यात उल्लेख करीत आहे.

लक्ष्मीबाईंनी दिलेला इशारा हा जरी दुर्लक्षनीय नसला तरी, तो फार विचार करण्यासारखा आहे असे मला वाटत नाही. कारण, ज्यावेळी उत्तरेकडील प्रदेश आमच्या प्रदेशापासून अलग होता, तेव्हा मराठ्यांनी युद्धे करून कोणताच फायदा घेतला नाही. आणि आताही त्यांचा काही फायदा होईल असे मला वाटत नाही. माझा असा अंदाज आहे की, शत्रू आमच्या प्रदेशात शिरेल म्हणून आम्ही चिंता करावी व सिद्दीला आम्ही मदत करू नये म्हणून हा इशारा देण्यात आला असावा.

आपण म्हणता की, मानाजी आंग्रे ह्यांनी तडजोडीच्या कलमाविरुद्ध एक गढी आणि एक गड आपल्या हाती ठेवला आहे. मला असे वाटते की, मशीद पाडण्याचे काम बंद ठेवलेले बरे. ते काम बंद ठेवल्याने आपला बराच खर्च वाचेल. मानाजी आंग्रे ह्यांनी मशीद का पाडीत नाही असे जर विचारले तर, त्यांना उत्तर द्यावे की, त्यांनी टेकडीवरील गड आपल्या हातात ठेवला आहे म्हणून आम्ही मशीद पाडीत नाही. त्यांनी जर गड सोडून दिला तर

आम्ही मशीद पाडू आणि मशीद पाडायची झाल्यास ती तोफखान्याचे सार्जंट मोर किंवा एकादा इंजिनियर त्यांच्या सल्ल्याशिवाय पाडू नये. फार खर्च न करता ती फक्त दारूच्या सहायाने पाडावी. पण आता पावसाळा जवळ आला आहे. त्यामुळे हे काम उन्हाळ्यापर्यंत स्थगित ठेवलेले बरे. त्यावेळी उत्तरेकडील एकाद्या इंजिनियरलाही आणता येईल.

कंपन्यांची यादी व मृत आणि जखमी ह्यांचा आकडा पाहिला. अशा गनिमी हल्ल्यात आणि अविरत गोळीबारात फार थोडी माणसे कामास आली ही माझ्या मते देवाचीच कृपा आहे.

दारूगोळा विकत घेण्यासाठी आपण जो खर्च केला तोही मी पाहिला. माझ्या दृष्टीने हा खर्च फार आहे. विशेषेकरून तोफांच्या दारूवर आणि गोळ्यांवर बराच खर्च करण्यात आला आहे. तोफांसाठी असा भरमसाट खर्च करणे आपल्याला परवडण्यासारखे नाही. तोफांऐवजी फ्रेंच सैनिक तटाच्या भोकातून ज्या बंदुका उडवितात त्या बंदुका वापरणे फायद्याचे असते. पुन्हा त्यांचा नेमही अचूक असतो.

सांप्रत मी आपणाला बंदुकीच्या गोळ्या पाठवू शकत नाही. कारण इकडे त्यांची फार टंचाई आहे. देशाहून पुरवठा येईपर्यंत लोखंडाचे तुकडे पाडून त्यांच्यावर तूर्त गरज भागवावी. मी देशाकडे पुरवठ्याची मागणी केली आहे.

ज्या अधिकाऱ्यांचा आपण पत्रात उल्लेख केला आहे त्यांना मी आभार प्रदर्शित करून पत्रे पाठवीत आहे. ज्यांचा निर्देश पत्रात आलेला नाही, त्या सगळ्यांचे आपण माझ्या वतीने आभार मानावेत. पण ह्या सर्वांमध्ये आपण म्हणजे त्यांचे स्फूर्तिस्थान आहात. आपली स्फूर्ती घेऊन त्या सगळ्यांनी काम केले.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ७ मे १७३५. कौंट द सांदोमिल

(191) CHAUL, No. FLS 31.

व्हाइसरॉय कोकणातील राजकीय घडामोडीसंबंधाने उत्तरेकडील सेनापतीस पुढील पत्र लिहितो.

"उत्तरेकडील सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांस—

दि. ३१ ऑगस्टला इकडून वसईला जाणाऱ्या एका गलबतावर मी आपणांला एक पत्र पाठविले होते. आपणाकडून मला जी पत्रे आली त्यांचे ते उत्तर होते. हे गलबत इकडून तिकडे जायचे होते म्हणून मी ह्यापूर्वी

पत्र लिहिले नव्हते. कारण ह्या गलबताचा प्रवास सुरक्षित होईल अशी माझी कल्पना होती. पण अनुभव उलटा आला. ज्यावेळी ते छोटे गलबत वसईला पोचले असेल असे मी मनात म्हणत होतो, त्यावेळी ते मेलुंडीच्या दोन गलबतांनी पकडल्याची बातमी आली. तथापि, ह्या गलबताच्या मालकाने ह्या शहरातील एका व्यापाऱ्यामार्फत त्याची मुक्तता करून त्याच्यावर पाठविलेली पत्रे वसईला पोहोचती करण्याचा प्रयत्न चालविला आहे. पण त्या दरम्यान मी आपणाला हे पत्र पाठवीत आहे. ठाण्याची तटबंदी झपाट्याने होईल व त्या कामाकडे दुर्लक्ष होणार नाही असे मी धरून चालतो. आपल्या ६ सप्टेंबरच्या पत्रात गोवळकोट किल्ल्याचा वेढा यशस्वी झाल्याची बातमी आहे. मुंबईच्या गव्हर्नरनेही मला ही बातमी कळविली आहे, आणि सिद्दी अब्दुल रहिमानच्या दूतानेही तिचा उल्लेख केला आहे. हा दूत इकडे सिद्दी अब्दुल रहिमानच्या सुभेदारीला मोगल बादशहाने मंजुरी दिल्याची वार्ता मला कळविण्यासाठी व मी माझे आरमार मराठे व आंग्रे ह्यांच्या विरुद्ध लढण्यासाठी सिद्दीच्या मदतीला पाठवावे म्हणून माझ्याकडे मागणी करण्यासाठी आला आहे. आपल्या सैन्याला मराठे व आंग्रे ह्यांच्यावर हल्ला करणे सोपे जावे म्हणून त्यांना मी चौलच्या छावणीत तळ ठोकण्यास परवानगी द्यावी, व चौल येथील गढीवर आणि आजूबाजूच्या खेड्यांवर हल्ला करून ती नष्ट करता यावी म्हणून आपल्या गलबतांना मी चौल नदीतून जाण्यायेण्यास परवानगी द्यावी अशी सिद्दीने माझ्याकडे मागणी केली आहे. त्या मागणीबरोबरच चौल नदीतील एका छोट्या बेटाची तटबंदी करण्याचीही त्याने माझ्याकडे परवानगी मागितली आहे. हे बेट चौलच्या ठाण्यापासून दोन कोसांवर आहे. ते जर सिद्दीच्या हाती आले तर आंग्र्यांच्या बऱ्याच खेड्यांवर त्याला वर्चस्व प्रस्थापित करता येईल. सिद्दीला आमच्या-कडून वीस छोट्या तोफाही हव्या आहेत. ह्या तोफा किलिचखान उल्मुल्क ह्यांनी त्याच्याकडे मागितल्या असल्याने त्या त्याला किलिचखानांना द्यायच्या आहेत. मी ह्या तोफा चौलच्या ठाणेदाराला त्यास विकण्याचा हुकूम करावा अशी त्याची मागणी आहे.

ह्या सर्व मागण्या करीत असता सिद्दीला माद्राफावल पाडण्याच्या आमच्या मागणीची व मराठ्यांशी त्याने युद्ध सुरू केले तेव्हा त्याने आमच्याशी जो करार केला, तो अंमलात आणण्याची आठवण झालेली नाही. मी त्याला लिहीत आहे की, ह्या दोन प्रश्नांचा विचार झाल्याशिवाय मला त्याच्या मागण्यांचा विचार करता येणार नाही.

माद्राफावल पाडून टाकण्याची आम्ही सिद्दीकडे अनेकदा मागणी केली असता ती त्याने अद्याप अंमलात आणलेली नाही. सिद्दीने मला आश्वासन दिले होते की, माझ्या इच्छेप्रमाणे हा प्रश्न सोडविला जाईल.

सिद्दी मला लिहितो की, येत्या उन्हाळ्यात साष्टी बेटावर स्वारी करण्याचा मराठ्यांचा बेत आहे. असाच इशारा मला वरच्या चौलच्या दिवाणाचा भाऊ महमद हैदरखान ह्यानेही दिला आहे. आपल्या मागण्या मी मान्य कराव्या ह्या हेतूने जरी ही बातमी सिद्दी आणि हैदरखान ह्या दोघांनी मला कळविली असली तरी, तिच्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, १ ऑक्टोबर १७३५ कौंट द सांदोमिल

(192) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 32.

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदारास कळवितो की, संभाजी आंग्रे ह्यांनी आपणाकडे मदतीची याचना केली असून चौल नदीतून आपल्या जहाजांना वाहतूक करू देण्याची परवानगीही त्यांनी मागितली आहे.

"हचौलचे कॅप्टन ह्यांस—

ज्या गलबतावर आपली १५ आणि १८ ऑक्टोबरची तीन पत्रे आली, त्याच गलबतावर त्यांचे उत्तरही पाठवित आहे.

फ्रिगट नाझारेथवर मी तोफांचे हजार गोळे पाठविले आहेत. दि. ६ मार्चच्या पत्रात आपण माझ्याकडे ज्या गोळ्यांची मागणी केली होती ते हेच गोळे आहेत. त्याच युद्धनौकेवर मी आपण मागितलेली औषधेही पाठविली आहेत. दारू, काडतुसे आणि बंदुका ह्यांची जी मागणी आपण केली आहे, त्या शक्य झाल्यास मी आरमारावर पाठवून देईन. बंदुकांविषयी मी निश्चित काही सांगू शकत नाही. कारण यंदा देशाहून हत्यारे आली नाहीत. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, आपणाकडे जी नादुरुस्त हत्यारे असतील ती दुरुस्त करून घ्यावीत.

सिद्दी, आंग्रे आणि मराठे ह्यांच्या संबंधी आपण ज्या बातम्या पाठविल्या आहेत, त्या कळल्या. मी आपणाला दोन ऑक्टोबरला जे पत्र लिहिले त्यानंतर इकडे ग्रियेच्या बंदरातून एक नौका आली. त्या नौकेवर संभाजी आंग्रे ह्यांचा एक दूत मला त्यांचे पत्र घेऊन आला होता. ह्या पत्रात त्यांनी माझ्याकडे मदतीची याचना केली आहे. आपण मला ह्या मागणीची बातमी अगोदर दिलीच होती. त्याचप्रमाणे चौल नदीत आपल्या जहाजांना अनिर्बंध वाहतुकीची परवानगी असावी अशीही त्यांनी मागणी केली होती, व आपणाला सरपण, पाणी वगैरे वस्तू पुरविण्याची मागणी केली होती. त्यांना मी उत्तर पाठविले की, त्यांनी दमणच्या व्यापाऱ्यांची जी तीन पाली पकडली होती ती

परत करण्याबद्दल मी त्यांना १७३३ च्या डिसेंबरमध्ये पत्र लिहिले होते. पण ती पाली त्यांनी अद्याप परत केलेली नाहीत. त्याचप्रमाणे त्यांनी चौलच्या दिवाणाची .......... जी गढी अन्यायाने घेतली आहे तीही परत केली पाहिजे. कारण चौलच्या दिवाणाला आमचे नेहमीच संरक्षण मिळत आले आहे. जोपर्यंत ह्या मागण्या त्यांच्याकडून पूर्ण होणार नाहीत, तोपर्यंत त्यांच्या मागण्यांचा माझ्याकडून विचार होणार नाही असे मी त्यांना स्पष्टपणे कळविले आहे.

माझा आपणाला सल्ला आहे की, सिद्दी, आंग्रेबंधू आणि मराठे ह्या सगळ्यांशी वागताना आपण तटस्थतेचे धोरण स्वीकारून जागरूक रहावे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, ३ नोव्हेंबर १७३५ कौंट द सांदोमिल

(195) CHAUL, No. 2, FLS 45.

मानाजी आंग्रे ह्यांच्याकडे असलेली दिवाणाची गढी त्याला परत करण्याचा हुकूम शाहूराजे ह्यांनी मानाजी आंग्रे ह्यांना केला असल्याची वार्ता दिवाणाने व्हाइसरॉयला कळविली असता, त्याने त्याला पुढील उत्तर पाठविले.

" वरच्या चौलचे दिवाण ताजुद्दीन अलीखान ह्यांस—

मानाजी आंग्रे ह्यांना शाहूराजे ह्यांनी आपली वरच्या चौल येथील गढी परत करण्याची आज्ञा केली असल्याची बातमी देऊन आपण मला जी दोन पत्रे लिहिली होती, ती मला मिळाली. ही गढी आपणाला परत मिळावी म्हणून मी केवढी खटपट केली ते आपणाला माहीत आहेच. शेवटी ती आपणाला परत मिळाल्याचे पाहून मला फार आनंद झाला. ह्या गढीसंबंधाने माझा शाहूराजे, मानाजी आंग्रे व संभाजी आंग्रे ह्यांच्याशी पत्रव्यवहार झाला होता. ह्या कामाशिवाय आपली आणखी काही कामे असल्यास मी खटपट करीन. मी चौलच्या ठाणेदारास ह्यासंबंधी लिहीत आहे. विशेषेकरून आपणाकडे व आपल्या बंधूकडे लक्ष देण्याची त्याला सूचना करीत आहे ".

गोवा, १४ नोव्हेंबर १७३५ कौंट द सांदोमिल

(196) CHAUL, No. 2, FSL 50.

व्हाइसरॉय कोकणातील परिस्थितीचा आढावा घेऊन पोर्तुगालला आपल्या राजास लिहितो :

" महाराज,

गेल्या वर्षी चौल येथे मानाजी आंग्रे व मराठे ह्यांच्याशी आमची जी तेढ निर्माण झाली होती, ती आता मिटली आहे. त्यांनी अखेर मशीद

पाडण्यास परवानगी दिली. मशिदीची बांधणी मजबूत असल्याने ती पाडून टाकण्याचे काम मोठे कठीण होते. म्हणून मी ती सवडीने पाडण्याचे ठरविले त्याचे आणखी एक कारण हे की, यदाकदाचित जर गढीवर आम्ही हल्हा करण्याचे ठरविले तर तिचा आम्हाला ह्या कामी उपयोग व्हावा.

मानाजी आंग्रे ह्यांनी कुलाब्याच्या किल्ल्याचा कबजा घेण्यात यश संपादन केले आहे. हा कबजा संभाजी आंग्रे ह्यांच्या सेनाधिकाऱ्यांनी त्यांना दिला मानाजी आंग्रे ह्यांना मराठ्यांचा पाठिंबा होता. त्यामुळेच संभाजी आंग्रे ह्यांना तो किल्ला त्यांच्या हवाली करणे भाग पडले. पण ह्या प्रकरणी रक्तपात फार झाला. जे लोक मानाजी आंग्रे ह्यांना सामील असल्याचा संभाजी आंग्रे ह्यांना संशय आला, त्यांना त्यांनी कंठस्नान घातले. आता संभाजी आंग्रे ह्यांनी तो किल्ला परत घेण्यासाठी प्रयत्न सुरू केले आहेत. त्यांनी माझ्याकडे मदत मागितली आहे. त्यांच्या विनंतीप्रमाणे मी त्यांना मदत करण्याची लालूच दाखविली आहे. ही लालूच दाखविण्यामागे माझा एक अंतस्थ हेतू आहे. आणि तो म्हणजे त्याने आमच्या ज्या नौका बळकावल्या आहेत त्या मदतीच्या बदली परत मिळविणे.

मराठ्यांनी सिद्दीच्या ठाण्यावर हल्ला केला असता सिद्दीने त्यांचा चांगलाच प्रतिकार केला. मराठे व संभाजी आंग्रे ह्यांच्याशी त्याचे अद्याप युद्ध चालू आहे.

त्या भांडणाचा उपयोग मी आमच्या राज्यात शांतता नांदावी म्हणून करीत आहे. काहींदा ते आम्हाला त्रयस्थ म्हणून आपणामध्ये मध्यस्थी करण्याची, तर काहींदा मदत करण्याची विनंती करतात.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, २५ जानेवारी १७३६

LIVRO DAS MONSOES, No. 104, FLS 136.

चौलच्या ठाणेदाराने मानाजी आंग्रे ह्यांच्या भाताच्या आणि लाकडाच्या मिळून सहा होड्या पकडल्याची वार्ता उत्तरेकडील सेनापतीने व्हाइसरॉयला कळविली असता त्याने पुढील पत्र पाठविले.

"चौलचे कॅप्टन ह्यांस—

देशाकडे नौका पाठविण्याच्या मोसमात ज्या गलबतावर आपली पत्रे आली, त्या गलबतावर मी आपणाला निरोप धाडला होता की, आपणाला

त्या पत्रांची पोच न धाडता एकदम त्यांची उत्तरेच रवाना करीत आहे. मी पोच पाठविली नाही, कारण मला सवड नव्हती. आता मी आपणाला कळवीत आहे की, त्या गलबतावर सात पत्रे आली. त्यांतील एक पत्र २८ डिसेंबरचे आणि बाकीची सहा जानेवारीची होती. त्या पत्रांपैकी काही पत्रांची उत्तरे मी पाठविलीच आहेत, आता उरलेल्या पत्रांची पाठवीत आहे.

उत्तरेकडील सेनापतीनी मला कळविले आहे की, आपण मानाजी आंग्रे ह्यांच्या भाताच्या आणि लाकडाच्या मिळून सहा होडचा पकडल्या असून त्या का पकडल्या याचे कारण देण्यासाठी वसईला एक दूत पाठविला आहे.

मला अशीही बातमी कळली आहे की, सिद्दी साततने बाणकोटाचा किल्ला शत्रूची भयंकर हानी करून काबीज केला. ही बातमी ऐकून मला फार आनंद झाला. त्या किल्ल्याच्या रक्षणकर्त्यांनी हल्ली चांचेगिरीचा धंदा सुरू केला होता व त्यामुळे चौल शहरच्या व्यापाराची फार हानी झाली होती.

मला आणखीही एक आनंदाची बातमी कळली आहे की, शाहूराजे ह्यांनी आपल्या चिटणीसाला मानाजी आंग्रे ह्यांना दिवाणाची गढी परत करण्याबद्दल लिहावयास सांगितले आहे. पण मानाजी आंग्रे काहीतरी सबब सांगून ही गढी परत करण्यास नकार तर देणार नाही ना अशी मला भीती वाटते.

त्या ठाण्याचा आपण पाठविलेला नकाशा मी पाहिला. आणि झुडो लोपिश ह्यांनी मला त्याची माहिती दिली, व कोणकोणत्या वस्तूंची जरुरी आहे ते मला विदीत केले. त्यांनी मला जे काय सांगितले ते आपणाशी सल्ला मसलत करूनच सांगितले आहे. त्यांनी ते उत्तरेकडील सेनापतीना कळविले असल्याने ते त्याकडे लक्ष दिल्याशिवाय राहाणार नाहीत. आपण तिकडे ज्युआंव नूमिश ह्यांची गालिया पाठविण्याबद्दल कळविले होते. तेही आपण उत्तरेकडील सेनापतीला कळवावे. म्हणजे तो ह्या संबंधी योग्य तो निर्णय घेईल. मी आपणाला अनेकदा कळविले आहे की, आपण माझ्याकडे ज्या शस्त्रांची मागणी कली आहे, ती शस्त्रे माझ्याकडे नसल्याने मी ती पाठवू शकलो नाही. नादुरुस्त हत्यारांची दुरुस्ती तेथे होऊ शकत नसल्यास ती दुरुस्तीसाठी इकडे पाठवून द्यावी.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ५ फेब्रुवारी १७३६ कौंट द सांदोमिल

(199) CHAUL, No. 2, FLS 56.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला कळवितो की, बाजीराव एका दूरच्या मोहिमेवर जात असल्याची बातमी आपल्याला कळली असून त्याने सांप्रत सिद्दीकडील युद्ध तहकूब ठेवले आहे.

"आपण मला दि. २ जानेवारीला जे पत्र पाठविले, त्या पत्राचे हे उत्तर आहे. त्या पत्रामध्ये आपण तिथल्या परिस्थितीचा आढावा घेतला आहे. आपली कर्तव्ये आपण नियमितपणे आणि तत्परतेने पार पाडीत आहात ह्याबद्दल आपले अभिनंदन केले पाहिजे.

आपल्या पत्रात आपण मानाजी आंग्रे ह्यांच्यासंबंधी जे काय लिहिले आहे ते वाचले. परंतु ह्या चांच्याने मोठ्या नम्रतेने आपले काम करून आपले समाधान केले, ह्याबद्दल आपण त्याचे आभार मानले पाहिजेत.

कल्याणच्या गव्हर्नरला आपण जे काय लिहिलेत आणि त्याने आपणाला जे उत्तर पाठविले ते माझ्या पाहाण्यात आले. हे सर्व आपल्या पद्धतीप्रमाणे अचूक पार पडले आहे. काही व्यवहारी लोकांकडून मला कळले आहे की, बाजीरावाला आमच्याशी युद्ध करणे परवडण्यासारखे नाही. कारण, ज्या नद्यांतून मराठ्यांच्या व्यापाराची वाहतूक होते त्या नद्या युद्धात गुंतल्या तर त्या व्यापाराची हानी होईल. ह्या व्यापारावर यांना जो फायदा मिळतो तो त्यांना मिळणार नाही. देवाने आमच्यावर हे मोठेच उपकार केले आहेत, असे म्हणावे लागेल. कारण आमच्यापाशी सांप्रत सैन्याची कमतरता आहे.

मराठे व सिद्दी ह्या दोघांमधील युद्ध आणि सिद्दीने मराठ्यांकडून बाणकोटचा किल्ला घेतल्याची वार्ता मला चौल थून कळली होती. ही बातमी कळताच सिद्दीने एका नवीन चांच्याचा नाश केल्याबद्दल मला आनंद झाला होता. पण आता असे कळते की, मराठ्यांनी बाणकोटचा किल्ला सिद्दीकडून फिरून घेतला आहे. मला असेही कळले आहे की, बाजीराव एका लांबच्या मोहिमेवर गेला असून सिद्दीच्या दृष्टीने ही गोष्ट फायद्याची आहे. कारण त्याला ह्या युद्धातून सावरता येईल व शत्रूने पुन्हा हल्ला केला तर त्याला तोंड देण्याची तयारी करता येईल.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ८ फेब्रुवारी १७३६ कौंट द सां मिल

(200) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 57V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, मराठ्यांशी मानाचा तह झाला तर तो आपणास हवा आहे.

"उत्तरेकडील सेनापतीस––

आपल्या पत्राचे उत्तर मी ह्या पत्रांचे द्वारा पाठवित आहे. ही पत्रे अनुक्रमे २, ३ आणि ५ व २३ जानेवारीची असून ती फ्रिगेटवर आली. ह्या पत्रांचे उत्तर मला लवकर पाठविता आले नाही. त्याचे कारण हे की, मी मायदेशाला पत्रे पाठविण्याच्या गडबडीत होतो. तिकडे पत्रे घेऊन जाणारी नौका ३० ला निघाली. ती नाव निघाल्यावर दक्षिणेकडे मोहिमेवर निघणाऱ्या आरमाराची तयारी करावी लागली. ते आरमार इकडून ४ ला निघाले.

आपण आपल्या पत्रांत जे काय म्हणता आणि दमणच्या ठाणेदाराचे जे पत्र आपण माझ्याकडे पाठविले आहे, त्यावरून कळून चुकले की, युद्धमान परिस्थिती १४ जानेवारीपर्यंत चालू राहिली. शत्रूची फार हानी झाली व त्याने तहाची मागणी केली. हा तह मानाचा व्हावा अशी माझी इच्छा आहे. तहाच्या बातमीची मी वाट पाहात आहे. हा तह उपयुक्त तर आहेच, पण दिवला जे काय घडत आहे त्या दृष्टीने तो चांगला आहे. आपण म्हणता की वेरावळला एक चांचा उपस्थित झाला असून, त्याचे पारिपत्य करण्यासाठी आरमार पाठविले आहे. ह्या चांच्यासंबंधाने पठाणाने मला लिहिले आहे. त्या पत्राची नक्कल मी आपणाकडे पाठवित आहे. पठाणाला मी उत्तर पाठवीत आहे व तिथल्या चांच्याचा नि:पात करण्यासाठी त्याला मदत करण्याचे आश्वासन देत आहे.

असे कळते की, ह्या चांच्याचा आणि आंग्रे ह्या दोघांचा चांगला संबंध आहे. त्याच्या नि:पाताची योजना यशस्वी व्हावी म्हणून आपण शक्य तो प्रयत्न करावा. ह्यासंबंधी मी दीवच्या किल्लेदारासही लिहीत आहे. मानाजी आंग्रे ह्याची खोड मोडल्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. हा अनुभव त्याला फारच महागात पडेल ह्यात शंका नाही. आणि ज्याअर्थी मराठ्यांनांही दमणमध्ये चांगला धडा मिळाला आहे, त्याअर्थी, त्या प्रांतांत आता शांतता नांदेल आणि आपला राज्यकारभार यशस्वी होईल अशी आशा आहे.

संभाजी आंग्रे ह्यांनी विलायतेहून आलेली इंग्रजांची एक नौका पकडली असल्याची जी वार्ता आपण मला पाठविली आहे, ती मला ग्रियेहूनही कळली

आहे. इथल्या एका हिंदूने ती मला पाठविली. हा हिंदू इकडून तिकडे गेलेल्या संभाजी आंग्रे ह्यांच्या दूतांबरोबर गेला होता. ते ृत इकडे तहाच्या वाटाघाटीसाठी आले होते हे आपणाला माहीत असेलच. तो हिंदु आपल्या पत्रात म्हणतो की, संभाजी आंग्रे ह्यांनी आमच्या ज्या दोन नौका पकडल्या होत्या, त्या त्याने परत करण्याचे ठरविले असून त्या पाठवून ेण्याची तयारी चालू आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ८ फेब्रुवारी १७३६

(201) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 60.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, संभाजी आंग्रे ह्यानी पोर्तुगिजांच्या ज्या नौका १७३० किंवा १७३१ साली पकडल्या होत्या त्या त्यांनी परत केल्या असून दमणची पालेही परत करण्याचे वचन दिले आहे.

"उत्तरेकडील सेनापती दों. लुईज द बोतेल्यू ह्यांस—

वसईहून इकडे आलेल्या व आता तिकडे परत जात असलेल्या ह्या गलबतांवर मी आपणाला हे पत्र पाठविण्याची संधी साधीत आहे. संभाजी आंग्रे ह्यांनी माझ्याशी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या आहेत. ह्या तहाचा उपयोग त्यांच्या हातात असलेल्या प्र ेशात शांतता प्रस्थापित होण्यासाठी होणार आहे. प्रस्तुत तहाची पूर्व तयारी म्हणून त्याने आमच्या दोन नौका मुक्त केल्या आहेत. ह्या नौका त्याने १७३० अथवा १७३१ साली पकडल्या होत्या. ह्या नौकांबरोबरच त्याने ह्या शहरातील व्यापाऱ्यांचे जे कापड खंबायतच्या नौकांवर आपल्या ताब्यात घेतले होते तेही परत केले आहे. ते कापड त्याने प्रस्तुत दोन्ही नौकांवर पाठवून दिले. त्याने मला असेही कळविले आहे की, दमणची जी तीन पाली त्याने पकडली होती, ती परत करण्याचा त्याचा विचार असून ती आणण्यासाठी खलाशी पाठवून द्यावे. ही पाली त्यांनी दोन वर्षांपूर्वी घेतली होती. त्यांची ही सबब खरोखर खरी आहे की काय ते बघण्यासाठी मी पुष्कळ खलाशी तिकडे पाठवून दिले आहेत. ह्या पालींवर जे कापड होते त्याची किंमत त्याने पाठवून द्यायची आहे. मी त्याला कळविले आहे की, त्याने जी इंग्रज नौका पकडली आहे तिच्यावरील कापड त्याने इकडे पाठवून देऊ नये. आणि ज्या इकडच्या व्यापाऱ्यांना मी आंग्र्याशी व्यापार करण्याची परवानगी दिली आहे, त्यांनाही मी इंग्रज नौकेवरील कापड आंग्र्यांकडून खरेदी न करण्याबद्दल बजावले आहे. असाच हुकूम आपण आपल्या प्रांतातील व्यापाऱ्यांनाही करावा.

अशा रीतीने इंग्रज नौकेवरील कापडाची विल्हेवाट लावणे आंग्र्यांना अशक्य झाले की, आंग्रयांकडून ते परत मिळविण्याच्या वाटाघाटी इंग्रजांना करणे सुलभ जाईल. असे कळते की, त्यांनी आपल्या कैद्यांच्या मुक्ततेसंबंधी प्रयत्न सुरू केले आहेत. मीही आंग्रयांना पत्र घालून इंग्रज स्त्री-कैद्यांची मुक्तता करण्याची व मुंबईच्या गव्हर्नरचे त्या नौकेवर विलायतेहून आलेले कापड त्याला परत करण्याची विनंती केली आहे. त्यांना मी कळविले आहे की, त्यांनी जर तसे केले तर मुंबईच्या गव्हर्नरशी त्यांचा तह घडवून आणण्याची माझी खटपट यशस्वी होण्यास मदत होणार आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ५ मार्च १७३६. कौंट द सांदोमिल.

(202) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 68.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, बाजीराव ज्याअर्थी कोकणात येत नाही, त्याअर्थी, शाहूराजे आणि मोगल ह्या दोघांमध्ये गंभीर स्वरूपाचे मतभेद निर्माण झाल्याच्या अफवा उठल्या आहेत.

"उत्तरेकडील सेनापतीस,

ह्याच गलबतावर आलेल्या आपल्या २५ एप्रिलच्या पत्राचे उत्तर मी आपणाला पाठवीत आहे. मी घोड्यावरून पडल्याने मला जी दुखापत झाली होती ती आता बरी आहे. माझ्या प्रकृतीविषयी काळजी व्यक्त केल्याबद्दल मी आपला आभारी आहे. त्या प्रांताच्या राज्यकारभाराची धुरा सतत वाहून देखील आपली प्रकृती निकोप आल्याचे वाचून आनंद झाला. ठाणे येथील बांधकामात तर आपण पुष्कळच लक्ष घातले आहे. पठाणांमुळे वेराळला अपयश आले, ह्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. कारण हे एतद्देशीय लोक सगळीकडे सारखे आहेत.

चौलच्या कॅप्टनने आपणाला मशीद पाडण्यासंबंधीचा जो अहवाल सादर केला आहे, तो महत्त्वाचा नाही हे खरे आहे, कारण, मानाजी आंग्रे ह्यांच्याकडील करारात ती मशीद पाडण्यास विरोध आहे. ह्या बाबतीत चौलच्या कॅप्टनला आपण जे काय लिहिले आहे त्याच्याशी मी सहमत आहे. आता आपण चौलच्या कॅप्टनला माझ्या निर्णयाशिवाय हुकूम करू शकता.

सिद्दीने जे काय घालविले होते, ते तो परत मिळवीत असल्याचे ऐकून आनंद झाला. यापुढे सिद्दीला जरी आमच्या सारखेच दुर्दैवाला तोंड द्यावे

लागत असले, आणि त्याच्या शत्रूनी जरी ह्या संघर्षामध्ये भाग घेतला असला, तरी आपणाला ह्यासंबंधी उदासीन रहायचे आहे. मग बाजीराव कितीही दूर असो. अशा कंड्या ऐकू येत आहेत की, ज्याअर्थी बाजीराव इकडे येत नाही त्याअर्थी, मोगल आणि शाहूराजे ह्या दोघांमध्ये गंभीर स्वरूपाचे मतभेद निर्माण झाले आहेत. असे कळते की, 'बाजीराव सवाई जयसिंग ह्यांच्यासह किलिचखानावर हल्ला करण्यासाठी येणार आहे. किलिचखानाने यंदा दक्षिणेकडे मोहीम करून कर्नाटकाचा राजा, सोंदेचा राजा, सावनुरचा नबाब आणि कित्तुरचा देसाई ह्यांच्याकडून खंडणी वसूल केली.

ठाण्याच्या तटबंदीसंबंधाने आपण जे काय लिहिले आहे ते वाचून समाधान वाटले. आपल्या प्रांतात शांतता नांदत असून सगळीकडे सुबत्ता आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ७ मे १७३६. कौंट द सांदोमिल.

(206) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 74V.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला कळवितो की, मानाजी आंग्रे व चिमाजी अप्पा ह्या दोघांनी सिद्दीवर सतत हल्ला करून त्याचा नाश केला, व त्याला युद्धात ठार केले, असे आपणाला चौलहून कळविण्यात आले आहे.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

आपली सहाही पत्रे मिळाली. आरमारावर पाठवावयाची पत्रे लिहायची होती म्हणून आपल्या पत्रांना विलंब झाला.

सिद्दी विजयी होईल असे आपणाप्रमाणे मलाही वाटले होते. माझ्या मागच्या पत्रात मी हे विचार व्यक्त केले होते. परंतु चौलहून आलेल्या गलबतावर कायतानु द सौझ ह्यांनी मला जे पत्र पाठविले आहे, त्या पत्रात ते म्हणतात की, मानाजी आंग्रे व बाजीरावाचे बंधू चिमणाजीपंत ह्या दोघांनी ३० एप्रिलला सिद्दीवर हल्ला करून त्याचा पूर्ण नाश केला. ह्या लढाईत तो ठार किंवा प्राणांतिक जखमी झाला, ही बातमी वाचून मला फार वाईट वाटले.

कायतानु द सौझ ह्यांनी असा अंदाज व्यक्त केला आहे की, मराठे आणि आंग्रे हे दोघे आता दांड्यावर हल्ला केल्यावाचून राहाणार नाहीत. आणि हा हल्ला झाल्यास दांड्याला त्या दोघांचा प्रतिकार करता येणार नाही.

सदरहू कायतानु द सौझ हे मला असेही कळवितात की, चिमणाजीपंत ह्यांनी मानाजी आंग्रे ह्यांना जी मदत केली, त्याबद्दल बक्षीस म्हणून मानाजी आंग्रे ह्यांनी चिमणाजीपंत ह्यांना उंच चौल येथील गढी अर्पण करण्याचे कबूल केले आहे. ह्या सर्व बातम्या काळजी करण्यासारख्या आहेत, ह्यात शंका नाही.

संभाजी आंग्रे ह्यांचा माझ्याशी पत्रव्यवहार चालू आहे. परंतु इंग्रजांच्या मुक्ततेसंबंधाने त्यांनी मला काही कळविलेले नाही. खलाशी नसल्याने पाली पाठविता येत नाहीत असे त्यांनी मला कळविले होते. मी तिकडे खलाशी पाठविले आहेत. त्यांना इकडून निघाल्यास तीन दिवस झाले.

इंग्रज आणि आंग्रयांचा तह घडवून आणणे ही एक कठीण गोष्ट आहे, असे आपण जे म्हणता ते मला मान्य आहे. तसेच ह्या तहातून आपला कोणताच फायदा होणार नाही असे जे आपले मत आहे तेही मला मान्य आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ८ मे १७३६. कौंट द सांदोमिल.

(206) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 76.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, चिमणाजीअप्पा ह्यांनी सिद्दीवर हल्ला केल्याने आपणाला काळजी वाटत आहे, तरी तिथली परिस्थिती काय आहे ते कळवावे.

"उत्तरेकडील सेनापती दों. लुईज बोतेल्यू ह्यांस—

ज्याअर्थी, आपली पत्रे घेऊन येणारी फतेमारी अद्याप इकडे आलेली नाही, त्याअर्थी, तिकडे काही काळजी करण्यासारखी परिस्थिती नाही असे मी धरून चालतो. काही दिवसांमागे इकडे अशी बातमी पसरली होती की, बाजीरावाच्या बंधूने सिद्दीचे एक ठाणे घेतले आहे. हे ठाणे दाभोळ तर नाही ना अशी मला भीती वाटत होती. परंतु कालांतराने ते खरे नसल्याचे सिद्ध झाले. इकडे आता आणखी एक अफवा पसरली आहे की, सिद्दीने आपले एक ठाणे परत घेतले आहे. पण ह्या दोन्हीही बातम्या खोट्या आहेत असे मला वाटते. तथापि, सिद्दीचा पराभव झाला असेल तर त्याच्या मुलुखाची परिस्थिती कशी काय आहे ते मला जाणून घ्यायचे आहे.

किलिचखानाने आपल्या सैन्याची विभागणी केल्यावर तो भागनगरला राहिला. त्याचे नेहमीचे ठाणे औरंगाबाद हे आहे. ह्या ठाण्यापासून तो

अर्थात बराच दूर आहे. तो आपल्या नेहमीच्या ठाण्यापासून इतका दूर रहायचे कारण काय ते मला जाणून घ्यायचे आहे, व म्हणून मी त्याची चौकशी सुरू केली आहे. येत्या महिन्यात ह्या गुढाचा उलगडा होईल अशी मला आशा आहे".

गोवा, ७ जुलै १७३६. कौंट द सांदोमिल.

(208) LIVRO DE BACAIM, No. 6. FLS86V.

बाजीरावाने, आपणाला आपले बंधू संभाजी आंग्रे ह्यांच्याविरुद्ध मनुष्य बळाची मदत करावी म्हणून, मानाजी आंग्रे ह्यांनी बाजीरावाला २५ हजार रुपये पाठविले आहेत. असे चौलच्या ठाणेदाराने व्हाइसरॉयला कळविल्यावरून तो ठाणेदाराला पुढील पत्र लिहितो—

"चौलचे कॅप्टन कायतानु द सौझ परैरा ह्यांस—

मलंडीच्या कॅप्टनने पकडलेली दोन गलबतें मुक्त करण्याबाबत जे दोन शिपाई पत्रे देऊन आपण ग्रियेला पाठविले होते, ते इकडे यऊन दाखल झाले. त्यांनी मला आपली चालू महिन्याच्या ९ तारखेची दोन पत्रे दिली. त्या पत्रांवरून आपणाला मला जे काय सांगायचे होते ते कळून चुकले.

आपण म्हणता की, बाजीरावाने, आपणाला आपले बंधू मानाजी आंग्रे ह्यांच्याविरुद्ध मनुष्य बळाची मदत करावी म्हणून, मानाजी आंग्रे ह्यांनी त्याच्याकडे २५ हजार रुपये पाठविले आहेत. ही गोष्ट मला असंभवनीय वाटत नाही. परंतु एका गोष्टीचे मला आश्चर्य वाटते ते हे की, मानाजी आंग्रे हे चौल नदीतील नौकायनाला अडथळे आणीत आहेत. चौल नदीतील नौकायनाला आमची परवानगी लागते ह्याची त्यांना विस्मृती पडली की काय नकळे. पण ते जर हे हेतुपुरस्सर करीत असतील तर, त्यांचा हा दिवाळखोरपणाच म्हटला पाहिजे. बाजीरावाकडूनही त्यांना ह्या बाबतीत मदत होण्याचा संभव आहे. त्याचे कारण हे की, बाजीरावाने त्यांना संभाजी आंग्रे व सिद्दी ह्या दोघांविरुद्ध मदत करण्यास सुरुवात केली आहे. सिद्दीला त्यांनी कैचीत पकडले आहे, हे आपणाला माहीत असेलच.

पण माझ्या मते हे सर्व आमच्या बऱ्यासाठी होत आहे. कारण, जो पर्यंत ते एकमेकांशी भांडत राहतील तोपर्यंत आपण सुरक्षित राहू. माझी अशी समजूत आहे की, आपणाला मराठे व आंग्रे । दोघांपासूनही भीती

नाही. आणि आपणाला जर भीती असलीच तर उत्तरेकडील सेनापतीकडून मदत मिळेल. आपण त्यांना मराठे व आंग्रे ह्या दोघांच्या शेजारासंबंधाने लिहिलेच आहे. आणि मला आशा आहे की, ते आपणाला मदत पाठविल्या-वाचून राहणार नाहीत. परंतु हे सर्व चालू असता एक गोष्ट खटकल्याशिवाय राहात नाही, तीही की, एवढे मोठे सैन्य आपल्या शेजारी लवकरच उतरणार आहे हे माहीत असता आपण माझ्याकडे शंभर माणसांची कुमक मागता ही. त्याच बरोबर आपल्या शिबंदीतून माणसे बाहेर काढण्याचीही आपण तयारी केली आहे. ह्या लोकांना हत्यारबंद करून नौकांवर पाठविण्याचा आपला विचार आहे. आणि ह्या नौका व्यापारी जहाजांना संरक्षण देऊन दक्षिणेकडील बंदराकडे पाठविण्याची आपण तयारी करता आहात. ह्या बाबतीत माझा आपणाला सल्ला आहे की, ही वेळ मोहिमेवर जाण्याची नाही. मला एका विश्वसनीय गोटातून बातमी कळली आहे की, मराठे व मानाजी आंग्रे ह्या दोघांवर हल्ला करण्यासाठी सिद्दी, नौकांनी भरलेली काही जहाजे चौल नदीत आणण्याचा, विचार करीत आहे. सिद्दी कदाचित हा अविचार केल्याशिवाय राहाणार नाही. पण त्याला ह्या अविचारापासून आपण परावृत्त करावे. त्याला विरोध करणे आपणाला शक्य आहे. कारण नदीचे मुख इतके अरूंद आहे की, त्या मुखावरील ठाण्याच्या परवानगीशिवाय एका माशीला देखील आत शिरता येणार नाही. ह्या बाबतीत आपण ठाणेदाराला अगोदर इशारा देऊन ठेवावा.

मुंबईहून आलेल्या गलबतावर ही पत्रे पाठवित आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २२ जानेवारी १७३६ कौंट द सांदोमिल

(209) CHAUL, No. 2, FLS 66.

बाजीराव हिंदुस्थानातील मोहीम यशस्वी करून पुण्यास परतला असल्याची बातमी वसईच्या गव्हर्नरने व्हाइसरॉयला कळविली होती. त्याला पाठविलेल्या उत्तरात व्हाइसरॉय म्हणतो की, ती बातमी खरी असावी.

उत्तरेकडील सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांस––

देशाकडील नौका येईल म्हणून आपली पत्रे घेऊन जाणारे गलबत मी थांबवून ठेवले होते. पण ती नौका अखेर न आल्याने पत्रे रवाना करीत आहे.

ठाण्याच्या तटबंदीचे काम समाधानकारकपणे चालू असलेले पाहून आनंद झाला.

आपण मला सिद्दी सातच्या रेवासा येथील यशाची वार्ता कळवून लिहिले होते की, ह्या विजयामुळे सिद्दीना युद्ध चालू ठेवणे शक्य होत आहे. आपला अंदाज खरा ठरला आहे. कारण, सिद्दीनी सबंध पावसाळाभर युद्ध चालू ठेवले.

बाजीराव मोगल दरबारात यश मिळवून आता पुण्याला आला असल्याची जी वार्ता आपण पाठविली आहे ती येथे प्रसृत झालेल्या वार्तेशी जुळती आहे. औरंगाबादेहूनही दिवाण वजारतखान ह्याने पाठविलेल्या पत्रांत प्रस्तुत बातमीचा उल्लेख आहे. दिवाण वजारतखान ह्याने माझ्याकडे नजराणे पाठवून मैत्रीची याचना केली आहे. किलिचखान भागनगरला असून मोगल बादशहा व बाजीराव ह्या दोघांच्या भीतीने त्याने तिकडे राहाणे पसंत केले आहे, असे कळते.

मराठ्यांची सिद्दीवरील मोहीम तूर्त बंद आहे. पण बाजीराव एका मोहिमेसाठी सैन्य गोळा करीत असल्याची बातमी आहे. ही बातमी मी आपणाला मुंबईमार्गे कळविण्याची व्यवस्था केली होती. आता ती पुन्हा इकडून पाठवीत आहे.

मानाजी आंग्रे ह्यांनी मशिदीमध्ये शिबंदी ठेवली असून गढीचीही तटबंदी केली असल्याची चौलच्या कॅप्टनने जी बातमी आपणाला कळविली होती ती मला कळली. परंतु एक गोष्ट मला खटकली ती ही की, त्या कॅप्टनची मला अनेक पत्रे येऊन देखील त्या पत्रांत ह्या बातमीचा उल्लेख नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २ ऑक्टोबर १७३६ कौंट द सांदोमिल

## (210) LIVRO DE BASAIM, No. 6, FLS 91.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला कळवितो की, संभाजी आंग्रे ह्यांनी त्याच्याकडे आपले बंधू मानाजी आंग्रे ह्यांच्याविरुद्ध मदत मागितली होती. परंतु संभाजी आंग्रे ह्यांनी त्याच्या मागण्या पूर्ण न केल्यामुळे त्याने ती मदत संभाजी आंग्रे ह्यांना पाठविली नाही.

" उत्तरेकडील सेनापतीस—

संभाजी आंग्रे ह्यांना मी जे काय लिहिले होते, ते जाणून न घेता किंवा ते आपल्याला कळत नाही, असा बहाणा करून ते आता लोकांना सांगत सुटले आहेत की, त्यांनी माझ्याकडे जी मदत पाठविली होती ती मी त्यांना दिली नाही. मी त्यांना मदत देण्यासंबंधी काही अटी घातल्या होत्या. पण

त्या त्यांनी पूर्ण केल्या नाहीत, त्या नाहीतच, उलट ते लोकांना सांगत सुटले आहेत की, त्यांना मी ज्या गोष्टींचे आश्वासन दिले होते ते आश्वासन मी पाळले नाही. मला आपणास सुचवायचे आहे की, संभाजी आंग्रे ह्यांच्याशी आपण काळजीपूर्वक वागावे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ४ ऑगस्ट १७३६ कौंट द सांदोमिल.

(211) BASAIM, No. 6, FLS 94V.

व्हाइसरॉय चौलच्या कॅप्टनला लिहितो की, बाजीरावाच्या पत्राला आपण उत्तर घातले आहे.

"चौलच्या ठाण्याचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस---

मुंबईहून आलेल्या गलबतावर आपण पाठविलेले पत्र इकडे आले. त्या पत्राचे उत्तर मी ह्या गलबतावर पाठविण्याकरता ठेवले होते. आपली दि. २१ २३, २४ आणि २५ सप्टेंबरची पत्रेही मिळाली. त्या सगळ्यांचे मी आता उत्तर पाठवीत आहे. बाजीरावाच्या पत्राला मी उत्तर पाठवीत आहे. ते पत्र जिकडून आले असेल तिकडून त्याचे उत्तरही रवाना करावे. ह्या पत्रानंतर बाजीरावाचे मला नवीन पत्र आलेले नाही.

आंग्र्याविषयी बाजीरावाचा वाईट ग्रह झाला असल्याच्या ज्या बातम्या इकडे पसरल्या आहेत त्या खोट्या मानायला जागा नाही. कारण, त्या खोट्या असल्याचा पुरावा सापडत नाही. आणि संभाजी आंग्रे ह्यांच्याविषयी आपण ज्या बातम्या पाठविल्या आहेत त्या बातम्या मला इतर गोटातून कळलेल्या बातम्यांशी जुळत्या आहेत.

सिद्दीनी रेवासा येथे जो विजय मिळविला त्याचा वृत्तांत मला कळला आहे. पण त्याची तिकडे फार हानी झाल्याचे जे सुरूवातीला सांगण्यात येत होते तेवढी नुकसानी त्याची झालेली नाही असे आता कळते.

सिद्दी ह्याच्यासारख्या पराक्रमी आणि बहुगुणी योध्द्याचा मृत्यू सर्व सिद्दीना जाणवल्यावाचून राहाणार नाही. सिद्दीसातची जागा भरून काढणारा पराक्रमी आणि निश्चयी वीर सिद्दीमध्ये आहे की काय मला माहीत नाही. सिद्दीनी जर आंग्र्यांची कुरापत काढण्यासाठी चौल नदीत प्रवेश केला असता तर, त्यांना आंग्र्यांची पुष्कळ हानी करता आली असती ह्या आपल्या मताशी मी सहमत आहे. परंतु त्याचे अनिष्ट परिणाम आम्हाला भोगावे लागले असते हेही तेवढेच खरे. कारण, मानाजी आंग्रे ह्यांना मराठ्यांचे संरक्षण असल्याने,

सिद्दीनी आमच्या प्रदेशातून त्यांच्यावर आक्रमण केल्याचे मराठ्यांना कळताच आमच्यावर त्यांचा रोष झाला असता. गढी मराठ्यांनी व्यापिली नाही हे फार चांगले झाले. आणि मराठ्यांनी जर ती व्यापण्याचा निर्णय घेतला तर मानाजी आंग्रे ह्यांना तिचा बचाव करता येणार नाही. आणि मराठ्यांकडून आमच्या उत्तरेकडील प्रांतात आक्रमण होण्याची जर भीती नसती तर, संभाजी आंग्रे ह्यांना आम्ही मदत देऊ शकलो असतो. कारण, असे जर झाले असते तर ह्यामार्गे गढी तिच्या कायदेशीर मालकाकडे देता आली असती. खुद्द संभाजी आंग्रे ह्यांनी देखील असे आश्वासन दिलेले आहे. परंतु वरील भीती-मुळे ह्या मार्गाचा अवलंब करता येत नाही. तथापि, अन्य नवीन मार्ग सूचणार नाहीतच असे सांगता येत नाही. त्या दरम्यान ह्या सर्व लोकांमध्ये दुही माजणे आमच्या फायद्याचे आहे.

त्या ठाण्याचे संरक्षण व सुरक्षितता, ह्यांसाठी मी गेल्या वर्षी काय केले ते आपणाला माहीत आहेच. आणि वेळ आली तर त्या ठाण्यासाठी आणखी मदत केल्यावाचून राहाणार नाही. परंतु आज मी त्या ठाण्याला कितपत मदत करू शकेन ह्याची शंका आहे. कारण, ते देशाहून येणाऱ्या मदतीवर अवलंबून आहे. उत्तरेकडील सेनापतींचेही त्या ठाण्याकडे दुर्लक्ष झालेले नाही. हे मला माहीत आहे. आणि ज्याप्रमाणे त्यांनी मागे मदत केली त्याचप्रमाणे आताही ते मदत करतील अशी मला आशा आहे. आणि जर आपण नेहमीप्रमाणे जागरूक राहिलात आणि काळजी घेतलीत, तर गढी मराठ्यांकडे गेली काय अथवा आंग्र्यांकडे राहिली काय, त्याची आपणाला चिंता करण्याचे कारण राहाणार नाही. कारण मला माहीत आहे की, त्या ठाण्याला कुणीही दीर्घकाल वेढा घालून राहू शकणार नाही. मात्र त्या ठाण्याच्या गव्हर्नरने डोळ्यात तेल घालून जागरूक राहिले पाहिजे.

संभाजी आंग्रे व मुंबईचे गव्हर्नर ह्या दोघांमध्ये संभाजी आंग्रे ह्यांच्या विनंतीवरून मुलाखत घडवून आणण्यासाठी आपण खटपट केली असल्याचे आपल्या पत्रावरून कळले. ही मुलाखत जरी आपण सद्हेतूने घडवून आणली असली तरी, आंग्र्यांमध्ये आणि माझ्यामध्ये काय चालले आहे ते आपण जाणून घेतले नसावे असे मला आपले पत्र वाचल्यानंतर वाटले. आता माझी आपणाला अशी सूचना आहे की, अशा कामाबद्दल आपणाला कुणी बोलला तर मला त्याची माहिती अगोदर द्यावी. म्हणजे सर्व गोष्टी एकाच दिशेने वाट-चाल करावयास लागतील.

देव आपले रक्षण करो, वगैरे". कौंट द सांदोमिल.

(213) CHAUL, No. 2, FLS 68.

व्हाइसरॉय वरच्या चौलच्या दिवाणाला त्याच्या गढीसंबंधाने पुढील पत्र लिहितो.

"वरच्या चौलच दिवाण ताजुद्दिन अलीखान ह्यांस—

आपले पत्र मिळाले. त्या पत्रात आपण शाहूराजे ह्यांच्याकडून मानाजी आंग्रे ह्यांना आपली गढी परत करण्याचा हुकूम आला असल्याचा निरोप बाजीराव प्रधान ह्यांच्याकडून आपणाला आल्याचे पत्रात म्हटले आहे. मानाजी आंग्रे ह्यांनी शाहूराजे ह्यांचा हुकूम अद्याप पाळला नव्हता आणि ज्याअर्थी आपण म्हणता की, बाजीराव हे मला मानाजी आंग्रे व संभाजी आंग्रे ह्या दोघां भावांसंबंधी लिहिणार आहेत, त्याअर्थी, मी त्यांच्या पत्राची वाट पाहात आहे.

बाजीरावाचे पत्र आले तर त्या पत्राचे जे उत्तर मी पाठवीन ते आपणाला उपयोगी पडणारे असेच असेल, आपले जे काय गेले आहे, ते आपणाला परत मिळाले तर मला आनंद होईल. आपण आपली चीजवस्तू मागे टाकून चौल शहरात येऊन राहिला होता. म्हणून आपले जे गेले आहे ते आपणाला परत मिळावे अशी मी इच्छा करतो.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १० ऑक्टोबर १७३६ कोंट द सांदोमिल.

(213) CHAUL, No. 2, FLS 74V.

बाजीराव उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेवर जाणार असल्याची वार्ता व्हाइसरॉयला कळल्यावरून तो उत्तरेकडील सेनापतीस लिहितो—

"उत्तरेकडील सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांस—

गेल्या महिन्याच्या दि. ३० ला इकडे गलबत येऊन पोहोचले. त्या गलबतावर आलेल्या राजा सावा लासेंग (?) ह्याच्या दूताने मला आपली दोन पत्रे दिली. त्यांचे उत्तर मी आता आपणाला पाठवीत आहे. आपले आरोग्य उत्तम असल्याचे वाचून आनंद झाला.

सैबाणच्या हद्दीत झालेल्या दंडेलीकडे आपण विठ्ठलपंत ह्यांचे लक्ष वेधलेत ते चांगले केलेत. आपण ह्या बाबतीत बाजीरावाना लिहिण्याची तसदी घेतल्याने त्याचा परिणाम चांगला झाला. त्यामुळे शांतता प्रस्थापित होण्यास मदत झाली. गत सालाप्रमाणे यंदाही बाजीराव उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेवर निघणार असल्याची वार्ता जी आपण मला पाठविली आहे, ती इकडे

प्रसृत झालेल्या वार्तेशी जुळती आहे. सिद्दी व आंग्रे ह्या दोघांचे युद्ध चालू राहिले तर ते आपल्या फायद्याचे आहे. सिद्दीचे लष्करी सामर्थ्य चांगले असल्याने तो हे युद्ध चालू ठेवू शकेल.

देशाकडील नौका अद्याप आलेल्या नाहीत. ह्या मोसमात त्या येतील असे वाटते. बहुधा त्या मोसांबिकला नांगर टाकून राहिल्या असाव्यात. मुंबईच्या गव्हर्नरने बाजीरावाच्या हेतू बाबत जे आपणाला लिहिले आहे, त्याविषयी मी फारसा विचार केलेला नाही. कारण ह्या बातमीचा विचार आपण केलेलाच आहे.

हिंदु लोकांच्या जातिभेदासंबंधाने आपण बाजीरावाला चांगले उत्तर पाठविलेत. ठाण्याच्या तटबंदीचे काम आपल्या मार्गदर्शनाखाली चांगले चालले असावे असे मला वाटते. ह्या उन्हाळ्यात ते काम पूर्ण होईल अशी आशा बाळगतो. ह्या बांधकामासाठी दर घरामागे एक रुपया पट्टी वसूल करण्याची जरूरी नसल्याचे वाचून आनंद झाला. ही पट्टी वसूल न करण्याबाबत मी त्या शहराच्या सिनेटला लिहित आहे".

गोवा, १ नोव्हेंबर १७३६ कौंट द सांदोमिल.

(215) LIVRO DE BASAIM, No. 6, FLS 107.

मोगल बादशहाच्या एका दिवाणाने गोव्याला आणि गोव्यातील देवालयांना भेट देण्यासाठी गोव्याला येण्याची इच्छा व्यक्त केली असता त्या मागणीस आपण कसा नकार दिला ते व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजास पुढील पत्रात लिहितो :—

"महाराज—

चालू वर्षाच्या एप्रिल महिन्यात मोगल बादशहाच्या एका दिवाणाने गोव्यातील मंदिरांना भेट देण्याची आपली इच्छा आहे तरी गोव्याला येऊ देण्याची आपणाला परवानगी द्यावी, असे मला पत्र लिहिले. हा दिवाण अत्यंत बलाढ्य असून त्याचा दर्जा निजाम उल्मुल्क नंतरचा आहे. मोगल बादशहाचा तो एक मांडलिक आहे. त्याला ह्या राज्यातील मंदिराप्रमाणेच समुद्रही बघायचा होता. त्याचे जर इकडे आगमन झाले तर त्याचे काही अनिष्ट परिणाम उद्भवतील असा विचार करून पावसाळा जवळ आल्याचा व आरमारे अद्याप आली नसल्याची सबब सांगून मी त्याच्या आगमनाचे मार्गात अडथळे आणण्याचा प्रयत्न केला. आरमारे न आल्याची मी सबब सांगितली,

कारण त्याला युद्धनौका बघायच्या होत्या. परंतु त्याने माझे उत्तर पोहोचण्यापूर्वीच आपला प्रवासाचा बेत आखला.

हा प्रस्ताव मी राज्य सल्लागार मंडळासमोर संमतीसाठी ठेवला. त्या ठरावाची एक प्रत मी प्रस्तुत पत्रासमवेत महाराजांना सादर करीत आहे. मोगल दिवाणाने स्वतः होऊन ह्या राज्यास भेट देण्याची इच्छा दर्शविली असता त्याला नकार देता येत नव्हता. कारण, तो एक सम्राटाचा दिवाण होता, हे तर झालेच, परंतु ह्या राज्याचा मित्र असलेल्या राजाचा प्रजाजन होता. आणि दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे एका बलाढ्य सम्राटाचा मांडलिक होता. परंतु हा दिवाण मोठा असून देखील त्याने आपणाबरोबर चाळीस माणसांहून मोठा लवाजमा आणला नाही.

हा दिवाण सौंदेच्या राजाच्या माशेल ह्या नावाच्या खेड्यात येऊन पोहोचला. हे गाव आमच्या कुंभार जुवे बेटासमोरच आहे. त्याचा मुक्काम त्याच खेड्यात असावा असे मला वाटले. तिथून तो दोनदा इकडे आला. मी त्याचे चांगले स्वागत केले. कारण त्याचा दर्जा मोठा असल्याने तसे स्वागत करणे आवश्यक होते.

माशेल येथे येऊन दाखल झाल्यावर त्या दिवाणाने आपल्या आगमनाची बातमी मला कळविली, व मला आपल्या भेटीस बोलविले. पण त्याच्या भेटीस जाणे मला इष्ट वाटले नाही. शेवटी त्या पेचप्रसंगावर मी एक तोडगा काढला. दोघांनीही अर्ध्या वाटेवर नदी किनारी शनिवारी भेटावे असे ठरले. त्या दिवशी देव मातेच्या दर्शनास जाण्याचा माझा प्रघात असल्याने ती संधी साधून दिवाणालाही भेटण्याचे मी ठरविले.

ह्या दिवाणाचे वास्तव्य माशेल गावी असतानाच एके दिवशी नद्यांचे सेनापती आंतोनियु कार्दिम ह्यांच्याकडे एका जासूदाचे आगमन झाले. त्याने माझ्यासाठी निजामल्ल्मुल्क ह्यांचे पत्र आणले होते. तो जासूल आंतोनियु कार्दिम ह्यांच्याशी खंडणी संबंधाने बोलला. त्यांनी पत्राची पोच देऊन त्याची रवानगी केली. व ती वार्ता माझ्या कानी घालण्याची व्यवस्था केली. मी लगेच कुंभारजुवे बेटाच्या रक्षणासाठी तोफा आणि पायदळ रवाना केले, व दिवाणाच्या माणसांची वाट रोखून धरली. दिवाणाने मला पत्र घालून खुलासा केला. त्या आणि निजामल्ल्मुल्कने धाडलेल्या पत्राची एकेक प्रत मी आपणाकडे पाठवीत आहे. पत्रात खंडणीचा उल्लेख नव्हता. पण जासुदाने हा सर्व घोटाळा केला. त्याला कडक शिक्षा केल्याचे मला कळविण्यात आले.

ही घटना महाराजांना विदीत करावी असे मला वाटले. कारण माझ्या हातून घडलेले वर्तन बरोबर असून महाराजांच्या प्रतिष्ठेला साजेसे आहे, अशी माझी समजूत आहे.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, २० डिसेंबर १७३६

(216) LIVRO DAS MONSOES, No. 106, FLS 108.

व्हाइसरॉय पोर्तुगालला आपल्या राजाला लिहिलेल्या पत्रात हिंदुस्थानातील राजकीय परिस्थितीचा आढावा घेऊन शेवटी म्हणतो :—

"महाराज—

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

ह्या राज्याचे शेजारी सांप्रत शांत असून, आमच्याशी ते शांततेने वागत आहेत, ते एकमेकांशीच भांडत आहेत. उदाहरणार्थ दोन आंग्रे बंधूंची भाऊबंदकी चालू आहे. सिद्दी आणि मराठे व सुंदेचा राजा आणि फोंडू सावंत ह्यांचे एकमेकाशी युद्ध चालू आहे. त्यांची ही दुही आमच्या राज्याच्या स्वास्थ्याच्या दृष्टीने फायद्याची आहे. दुसरी गोष्ट अशी की, आपल्यामध्ये मध्यस्थी करण्यासाठी ते काहीदा आम्हाला विनंती करतात. मी हे काम अर्थात नावालाच करतो. कारण त्यांची भांडणे मिटलेली मला नको आहेत. ते एकमेकांविरुद्ध माझ्याकडे मदतीचीही मागणी करतात.

माझ्या बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीला देव उदंड आयुष्य देऊन सुखी करो".

गोवा, २२ डिसेंबर १७३६

(218) LIVRO DAS MONSOES, No. 106, FLS 9.

फोंडू सावंत भोसले व पोर्तुगीज ह्यांच्यामध्ये जो शांततेचा करार १७२६ साली झाला, त्या कराराला १७३६ साली पुढील पुस्ती जोडण्यात आली. फोंडू सावंत भोसले ह्यांनी पोर्तुगीज राज्याच्या प्रजाजनांची काही गलबते आणि परांगी घेतल्याने नंतर त्यांना आपल्याकडून घडलेल्या ह्या कृत्याचा पश्चाताप झाला. व नामदार व्हाइसरॉय कोंट द सांदोमिल ह्यांच्याकडे समझोत्याच्या वाटाघाटी करण्याकरता त्यांनी आपले दूत मान्यवर विश्राम शेणवी ह्यांना त्यांच्याकडे पाठविले. सदहू फोंडू सावंत भोसले ह्यांनी

नामदार व्हाइसरॉय ह्यांना आपल्या दूतामार्फत कळविले की, आपण पकडलेली गलबते आणि होड्या परत करण्यास व इ. स. १७२६ सालचा करार पाळण्यास आपण तयार आहोत. मात्र त्या करारान्वये दरवर्षी दोन अरबी घोडे पोर्तुगिजांना देण्याची अथवा घोडे द्यावयाचे नसल्यास दर घोड्यामागे पाचशे असुर्प्या भरण्याची जी अट आपणावर लादण्यात आली होती त्या अटी-प्रमाणे आपणाकडे जी अकरा वर्षांची बाकी थकली आहे ती आपणाला माफ करण्यात यावी. फोंडू सावंत भोसले ह्यांची कैफियत ऐकून घेतल्यावर त्यांना मागील १० वर्षांची बाकी माफ करण्याचा निर्णय घेतला. सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचे वकील श्री विश्राम शेणवी ह्यांनी एका वर्षाची एक हजार असुर्प्यांची बाकी चुकती करण्याचे व पुढील रक्कम दरवर्षी नियमितपणे भरण्याचे कबूल केले. त्याचप्रमाणे त्यांनी, सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांनी पकडलेल्या नौकांची व त्यांच्यावरील कापडाची किंमत भरण्याचेही कबूल केले. ही किंमत नद्यांचे सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांच्या सल्ल्यानुसार ठरविण्याचे व ती इ. स. १७३७ च्या मार्च महिन्यापर्यंत फेडण्याचे ठरले. भोसल्याचे वकील श्री. विश्राम शेणवी ह्यांनी असेही आश्वासन दिले की, पोर्तुगिजांचा आणि भोसल्यांचा जो २४ ऑगस्ट १७२६ रोजी शांततेचा तह झाला ते यापुढे काटेकोरपणे पाळला जाईल. विशेषेकरून पोर्तुगीज राज्यातील देसाई प्रजाजनांच्या बाबतीत ह्या करारात जी कलमे आहेत ती कडकपणे पाळण्याचे त्यांनी कबूल केले.

श्री. विश्राम शेणवी ह्यांनी असाही हवाला दिला की, सरदेसाई फोंडू सावंत ह्यांनी ह्या राज्याच्या प्रजाजनांची जी रक्कम घेतली आहे, ती त्यांनी फेडली नसल्यास ती फेडण्याची जबाबदारी आपणावर आहे. प्रस्तुत करारामध्ये आणखी एक कलम असे आहे की, सरदेसाई फोंडू सावंत भोसले ह्यांचा मुलगा नागोबा सावंत भोसले ह्यांने ह्या राज्याचे जे प्रजाजन, प्रस्तुत कराराच्या भरवशावर सावंतांच्या राज्यात जातील त्यांना कोणत्याच प्रकारचा उपसर्ग देऊ नये वा त्यांना अटक करून ठेवू नये. तसेच नागोबा सावंत भोसले ह्याने जर ह्या राज्यात शिरून चोरी केली तर, त्याचा जाब फोंडू सावंत भोसले ह्यांना द्यावा लागेल. जर ह्या राज्यातील प्रजाजनांनी सरदेसायांच्या राज्यात शिरून एकादी गैर कायदा गोष्ट केली तर, तिची तक्रार लगेच ह्या राज्याकडे केली जावी. म्हणजे हे राज्य त्या गैरकायदा गोष्टीचा न्याय निवाडा करील.

ही सर्व कलमे फोंडू सावंत भोसले ह्यांचे वकील श्री. विश्राम शेणवी ह्यांनी त्यांना प्राप्त झालेल्या खास अधिकारान्वये मान्य केली आहेत, व राज्य

चिटणिसांच्या समक्ष करारावर सही केली आहे. त्याचप्रमाणे ह्या करारावर नामदार व्हाइसरॉय ह्यांचीही सही आहे.

गोवा, १४ जुलै १७३६.

विश्राम शेणवी ह्यांची मराठी सही कागदाच्या सुरुवातीला व्हाइसरॉय ह्यांची सही.

(219) LIVRO 1° DE PAZES, FLS 369.

फोंडू सावंत भोसले ह्यांनी व्हाइसरॉयला लिहिलेले पत्र :—

"बलाढ्य आणि मोठे राज्य असलेले हिंदुस्थानचे व्हाइसरॉय, नामदार पेद्रु मास्कारेन्यास कौंट द सांदोमिल, हे नेहमी सुखात असावेत.

मी कुडाळ परगण्याचा व इतर प्रांतांचा सरदेसाई फोंडू सावंत भोसले आपणाला अनेक सलाम करीत आहे.

पोर्तुगीज राज्याचा मी एक मित्र असून त्या राज्याशी मी शांततेने वागत आलो आहे. परंतु अलीकडे काहीसा मतभेद निर्माण झाला असावा असे वाटते. तत्संबंधीचा खुलासा करण्यासाठी श्री. विश्राम अनंत ह्यांना आपणाकडे पाठवित आहे. ते आपणाला सर्व काही समजावून सांगतील. तरी आपण ते लक्षपूर्वक ऐकावे अशी विनंती आहे. मैत्री आणि शांतता त्या राज्याशी आहेच, आणि ती नेहमी सारखी चालू राहील.

मागील करारावर सही करण्याचा अधिकार मी सदहू विश्राम ह्यांना दिला आहे. शेवटी चांगल्या मैत्रीची अपेक्षा करून हे पत्र संपवितो.

हे पत्र मी राज्याचा दुभाषी बोगण कामत ह्याने ११ जुलै १७३६ साली भाषांतरित केले".

(220) LIVRO 1° DE PAZES.





व्ही ५५५८–२६अ

पत्र क्र. १

गोव्याचा व्हाइसरॉय वरच्या चौलचे दिवाण ताजुद्दिन अलीखान ह्यास लिहितो की, त्याची गढी त्याला परत मिळावी म्हणून आपले प्रयत्न चालू आहेत.

"उंच चौलचे दिवाण ताजुद्दिन अलीखान ह्यांस--

आपली गढी आपणास परत मिळावी ही माझी इच्छा आहे, हे मी आपणास अनेकवार कळविले आहे. माझा हेतू साध्य होण्याच्या संधीची मी वाट पाहात आहे. आपण माझ्याकडे पत्र लिहिण्याची मागणी केली आहे. माझ्या मते पत्र लिहिण्याची ही वेळ नाही. तथापि, ह्या बाबतीत माझ्याकडून हलगर्जीपणा होणार नाही हे आपण ध्यानात ठेवावे. तसेच ज्या वेळी माझ्या मदतीची आपणाला जरुरी भासेल त्या वेळीही ती मदत देण्याच्या बाबतीत माझ्याकडून कसूर होणार नाही ह्याबद्दल आपण निश्चित असावे.

मानाजी आंग्रे ह्यांनी सिद्दी याकुतखान ह्यांना जो प्रस्ताव सादर केला आहे, तत्संबंधीची आपण पाठविलेली बातमी मला कळली. त्याचप्रमाणे बाजीरावाने आपणाला तत्पूर्वी जी सूचना केली होती, ती आपण मला कळविलीच आहे. त्याच कारणावरून त्याला आणि आपणालाही मला उत्तर पाठवावेसे वाटले नाही.

चौलच्या नवीन कॅप्टनला मी आपली शिफारस केलीच आहे. त्याच्याकडून आपणाला चांगली वागणूक मिळेल अशी आशा बाळगतो".

गोवा, १४ फेब्रुवारी १७३७.

कौंट द सांदीमिल.

A. P. O., TOMO, I VOL. III, PART V, प. क्र. १. पृ. १.

संपादक : A. B. DE BRAGANÇA PEREIRA.

(1) CHAUL, No. 2, FLS 81 V.

पत्र क्र. ३

मराठ्यांच्या वसईवरील स्वारी संबंधाने व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो--

"उत्तरेकडील सेनापती लुईज बोतेल्यु ह्यांस--

चालू माहीच्या दि. ८ ला कारंजा येथून लिहिलेल्या पत्रातील अनपेक्षित बातमी मला आज सकाळी कळली. आपल्यासारखी आसामी त्या खिन्न

रंगभूमीवर असलेली पाहून मन बेचैन होणे साहजिक आहे. जी रंगभूमी की जिथे सगळ्यांनाच दु:ख होणारी शोकांतिका घडली आहे. परंतु ही वेळ दु:ख करीत बसण्याची नाही. संकटाचे निवारण करण्यासाठी सगळ्यांनी ह्या वेळी आपल्या हाताशी असलेल्या साधनानुसार पुढे सरसावून एकमेकांना मदत केली पाहिजे. ज्यांना इकडून तिकडे जाणे शक्य आहे ते मागे राहाणार नाहीत. दोन युद्ध नौका सज्ज होत आहेत, वारे उलटया दिशेने वाहात आहेत, त्यांना तोंड देण्याची तयारी ह्या नौकांवर केली जात आहे. ज्या माणसांना मला तिकडे पाठविणे शक्य आहे, त्यांना मी तिकडे पाठवीत आहे. आपल्या पत्रात आपण अशी भीती व्यक्त केली आहे की, मराठ्यांकडून गोवा बेटे, बार्देश आणि साष्टी ह्या प्रांतावर हल्ला होण्याचा संभव आहे. आपले पत्र मला चौलच्या गव्हर्नरामार्फत मिळाले. त्यांनीही मला लिहिलेल्या पत्रात चौलवर हल्ला होण्याची भीती व्यक्त केली आहे. ते म्हणतात की, ह्या हल्ल्यात चार हजार सैन्य भाग घेणार आहे. त्यांनी माझ्याकडे मदत पाठविण्याची मागणी केली आहे. त्यांच्याकडे दारूगोळ्याची टंचाई आहे. त्यांना मी हे सामान फ्रिग्रेटवर चढवून देणार आहे. दारूची इकडेही कमतरता आहे. इकडील कोठारात दारू नाही. पण ही कमरता माझ्या हलगर्जीपणामुळे झाली नाही, हे आपण लक्षात घ्यावे. इंग्रजांकडून आम्हाला दारूचा पुरवठा होण्याचा संभव आहे. आपणही त्यांच्याकडून ही मदत मिळविण्याचा प्रयत्न करावा.

आपणाला मला कळवायचे आहे की, चौलच्या पाद्री कारभाऱ्याने मला लिहिले होते की, त्या ठाण्यात अन्नाची बेगमीही पुरेशी नाही. ते म्हणतात की, ठाण्याच्या कॅप्टन मोरने धान्याच्या दोनच होड्या तेवढ्या पाठवून दिल्या. मी इकडून धान्य पाठवून देण्याचा प्रयत्न करीत आहे. आमच्या हातात सांप्रत जे काय आहे त्या कामातील सर्व अडचणींचा उल्लेख आपल्या पत्रात आहे. ह्या अडचणींचे आकलन मला माझ्या पापामुळे झाले आहे. मला आपणास कळवायचे आहे की, इतर राष्ट्रांच्या मदतीशिवाय ही कामगिरी पार पडणे कठीण आहे. हा एक प्रसंग असा आहे की, आमच्या हातात जे काय आहे ते करून आम्ही मदतीसाठी आकाशाकडे डोळे लावून त्याची करुणा भाकली पाहिजे. मला असे वाटते की, इंग्रजांनी आम्हाला मदत केली पाहिजे. कारण ह्या प्रकरणी आम्हाला मदत करण्यात त्यांचे हित आहे. आणि इकडे अशी वार्ता पसरली आहे की, त्यांनी बांदोडा आणि वर्सोवा घेतले आहे. मला त्या प्रदेशाची माहिती नसल्याने मी इकडून माझी मते व्यक्त करू शकत नाही. तथापि, नकाशावरून त्या प्रदेशाचा अभ्यास केला असता, मला असे वाटते की,

डोंगरी येथील `कडी आम्ही व्यापिली पाहिजे. कारण कुमक आली तर, शत्रूला ठाण्यातून हुसकून लावता येईल. दुसरी गोष्ट अशी की, ही टेकडी हातात असल्यावर वसई नदीचे प्रवेशद्वार म्हणून तिचा उपयोग करता येईल.

इंग्रजांनी बांदोडा आणि वर्सोवा ही दोन्ही ठाणी व्यापिली नसल्यासही त्या टेकडीचा त्या ठाण्यांच्या संरक्षणासाठी उपयोग करता येईल.

आपण ह्या बाबतीत इंग्रजांशी सल्लामसलत केलीच असेल. त्यांच्यामध्ये असा एकादा मनुष्य असल की, त्याचे मत ग्राह्य आणि उपयुक्त ठरेल. मी आजच मुंबईच्या गव्हर्नरना पत्र लिहून त्यांना ह्या प्रकरणी आमच्या बाजूने त्यांच्या हितासाठी लक्ष घालण्याची विनंती करीत आहे. ह्या प्रश्नाबाबत तूर्त मी एवढेच काय ते सांगू शकतो. मी ह्या बाबतीत अधिक काही लिहू शकत नाही, त्याचे कारण हे की, हे जहाज तिकडे लवकर निघून जात आहे. मला जेवढी म्हणून मदत तिकडे पाठविणे शक्य होईल तेवढी मी पाठविण्याची शिकस्त करीत आहे.

मला आपणास आणखी एक गोष्ट सूचवायची आहे ती ही की, इग्रजांनी वर्सोवा आणि बांदोडा विशेषकरून तुर्भे ही बंदरे व्यापिली तर आपण साष्टी बेटातील सर्व बंदरे व्यापिली पाहिजेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १२ एप्रिल १७३७.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ३, पृ. ३-६

संपादक : VOL. III, PART V.

संपादक : A. B. DE BRAGANÇA PEREIRA.

(3) LIVRO DE BAÇAIM, No. 6, FLS 140.

पत्र क्र. ४

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पुढील पत्रात त्याला मराठ्यां-विरुद्ध चिथावणी देऊन वसईला मदत करण्याची त्याला विनंती करतो.

"मुंबईचे गव्हर्नर ह्यांस—

आपण साष्टी बेटाच्या अगदी जवळ असल्या कारणे त्या बेटाच्या दुर्दैवी भवितव्याची आपणाला माझ्यापेक्षा अधिक माहिती असायला पाहिजे.

मला त्या बेटासंबंधीची ओझरती बातमी उत्तरेकडील सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांनी कारंजाहून पाठविली आहे. त्यांनी तिथपर्यंत माघार घेतली आहे.

मला असे वाटते की, मराठ्यांचा शेजार मुंबई बेटाला उपयुक्त नाही. अशा परिस्थितीत आपण मराठ्यांचा दुष्ट शेजार टाळण्यासाठी त्या बेटाच्या हितसंबंधात जातीने लक्ष घालाल अशी मला आशा आहे. आणि असे जर झाले तर इंग्रजांकडून आमच्या राष्ट्राला यापूर्वी जी मदत झाली आहे, तशी मदत यावेळीही होईल. अशी इच्छा मी व्यक्त केल्यास अप्रस्तुत ठरणार नाही. माझी आपणाला विनंती आहे की, आपण उत्तरेकडील सेनापतीशी सल्लामसलत करून आवश्यक ती उपाययोजना करावी. निदान साष्टी बेटातील बंदरे जरी आपण घेतली तरी, देखील फार मोठे काम होईल. कारण ही बंदरे घेतली असता तिकडे रसद पाठविता येईल व शत्रूला तेथून हुसकून लावता येईल.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

गोवा, १२ एप्रिल १७३७. आपला सेवक,
कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ४, ५, ६, संपादक : A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(4) LIVRO DOSREIS VIZINHOS, No. 9, FLS 3 V.

पत्र क्र. ५

वसईमध्ये पोर्तुगिजांचा मराठ्यांविरुद्ध विजय व्हावा म्हणन व्हाइसरॉय पोर्तुगीज हिंदुस्थानातील सर्व धर्म मंदिरांच्या गुरूंना देवापाशी प्रार्थना करण्याची सूचना करतो.

सर्व धर्म मंदिरांच्या प्रमुखांस---

ज्याअर्थी सर्व कृतीमध्ये विशेषेकरून लष्करी कारवाईमध्ये देवाची मदत मागणे आवश्यक असते, त्याअर्थी, आपण सगळ्यांनी धर्म मंदिरांतून पोर्तुगिजांना उत्तरेकडील प्रांतात आक्रमण करणाऱ्या मराठे शत्रूविरुद्ध विजय मिळावा म्हणून देवाची प्रार्थना करावी.

देव आपणा सगळ्यांचे रक्षण करो ".

पानेली, १५ एप्रिल १७३७. कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ५, पृ. ७, संपादक : A. B. DE BRANGASA PEREIRA.

पत्र क्र. ६

मराठ्यांनी वसईवर हल्ला केल्याची वार्ता व्हाइसरॉय पोर्तुगालला राज्य-सचिवास कळवितो.

"राज्य-सजिव दियोग द मेंदोंसा कोर्तरेआल ह्यांस—

हे पत्र मी आपणाला खुष्कीच्या मार्गे पाठवीत आहे. आपणास कळविण्यास मला वाईट वाटते की, चालू एप्रिल महिन्याच्या ६ तारखेस शत्रू मराठ्यांनी मोठ्या सैन्यासह खुष्कीच्या मार्गे येऊन साष्टी बेटावर हल्ला करून ते काबीज केले. ही दुर्दैवी घटना मोठ्या पातकामुळे घडली आहे.

मी हिंदुस्थानात आल्यावर आपणास कळविल्याप्रमाणे साष्टी बेटाच्या तटबंदीचे काम मी हाती घेतले होते. कारण, ह्या बेटाचे रक्षण म्हणजेच गोवा बेटे व त्यांच्या लगतच्या दोन्ही प्रांताचे रक्षण अशी माझी समजूत होती. परंतु वर सांगितल्याप्रमाणे शत्रू मराठ्यांनी त्या बेटात अचानकपणे सैन्य घुसविले व तिकडे नुकताच बांधण्यात येत असलेला किल्लाही व्यापिला. ह्या किल्ल्याची एक बाजू अद्याप बांधून व्हायची होती.

उत्तरेकडील प्रांताचे सेनापती मला कळवितात की, त्या बेटाच्या नदीकडील टेहेळणीला गाफील ठेवून मराठ्यांनी ह्या बेटात प्रवेश केला. उत्तरेकडील सेनापतींनी मराठ्यांचा प्रतिकार केला नाही. त्याचे कारण हे की, बेटाची तटबंदी अपूर्ण असल्याकारणे ती शत्रूचा प्रतिकार करण्यास असमर्थ होती, हे तर झालेच, परंतु त्या तटबंदीच्या आत वेढा लढविण्यास आवश्यक अशी अन्नाची बेगमीही भरपूर नव्हती. हा दृष्टिकोन केवळ सेनापतींचाच आहे असे नसून त्यांना मदत करणाऱ्या अधिकाऱ्यांचाही आहे. म्हणून सेनापतींनी बेटातून माघार घेतली व कारंजाला जाऊन त्यांनी ही बातमी आम्हाला कळविली.

साष्टी बेटातील बांदोडा हे ठाणे अद्याप आमच्या हाती आहे. तेथे संघाच्या पाद्र्यांचा एक वाडा असून त्याची तटबंदी करण्यात आली आहे. इंग्रजांनी ह्या ठाण्याला कुमक पाठविली आहे. उत्तरेकडील सेनापतींनीही तिकडे साष्टी बेटाचे कॅप्टन मोर सौझ फेररा ह्यांना पाठविले आहे. वर्सोवा ह्या लष्करी ठाण्याकडे त्यांनी चौलचे एक माजी गव्हर्नर कायतानु द सौझ पेरैरा ह्यांना पाठविले आहे. ते एक धडाडीचे अधिकारी आहेत. मला अशी आशा वाटते की, साष्टी बेटातील ही दोन्ही लष्करी ठाणी हातात ठेवली तर

पुरेसे सैन्य गोळा होताच शत्रूची त्या बेटातून हाकलपट्टी करता येईल. ह्या बेटातील शिबंदी फारच थोडी होती. जेमतेम ६९० सैनिक. पण ते सगळेच गोरे नाहीत. इथली मुख्य अडचण ही पैशांची आहे. कारण उत्तरेकडील प्रांताचे धान्याचे कोठार जे साष्टी बेट ते आमच्या हातचे गेले असल्याने उत्पन्नाचे साधन बंद झाले आहे. सध्याच्या उत्पन्नातून खर्च भागत नाही. ही गोष्ट मी आपल्या निदर्शनास मागेच आणली आहे. माझ्यासमोर आता मोठाच पेच उभा राहिला आहे आणि तो म्हणजे माणसांचा पगार कसा घालावा हा. आमच्या सैन्यात जे लोक लढत आहेत ते शिपाई आणि पठाण आहेत. त्यांना जर वेळेवर पगार मिळाला नाही तर ते लगेच नोकरी सोडून निघून जातील. आणि वाईट गोष्ट ही की ते शत्रूला जाऊन मिळतील.

साष्टी बेटावर हल्ला करणाऱ्या शत्रूने वसईचा कसबाही घेतला आहे. त्यांनी मद्रापूर गाठले असून पुढच्या चढाईची तयारी चालविली आहे. ते दिवसा चढाई करीत नसत. कारण दिवसा चढाई केल्यास आमच्या तोफांमुळे त्यांची हानी होत असे. ठाण्यामध्ये माणसे पुष्कळ असून त्यांच्या तटांच्या आश्रयार्थ कसब्यातील बहुतेक रहिवासी गेले आहेत. ज्याअर्थी, गव्हर्नरने रसदीविषयी तक्रार केलेली नाही, त्याअर्थी, त्या भागात पावसाळयात काळजीची परिस्थिती निर्माण होणार नाही असे वाटते. आणि जर हिवाळयापर्यंत वेढा उठला नाही, तर मी इकडून रसद पाठविण्याची व्यवस्था करीन.

मी उत्तरेकडे आता जी कुमक पाठविण्याचे ठरविले आहे त्यात निवडक अशी दोनशे माणसे असून त्यांचे नेतृत्व पेद्रु द मेलु ह्यांच्याकडे आहे. तिकडे गेल्यावर ते पायदळाचे नेतृत्व करणार आहेत. चौलच्या ठाण्यातही तोफांच्या गोळयांची आणि अन्नाच्या बेगमीची टंचाई आहे. माझ्याकडे इकडे अवघे ९० लोक असून त्यातील काही लंगडे आणि अपंग आहेत. दक्षिणेकडील आरमाराचे आगमन झाले तरी, माझ्याकडील सैन्यात वाढ होणार नाही. आणि मे महिन्यात तिकडून (पोर्तुगालहून) येणाऱ्या नौकेवरील माणसांची ह्यात भर पडली तरी देखील ही कुमक फार असणार नाही. इतकेच नव्हे तर, सप्टेंबरमध्ये येणाऱ्या नौकेवरील सैन्यानेही ही कुमक मोठी होणार नाही. इकडे अशा अफवा उठल्या आहेत की, मराठयांनी गोवा बेटावर आणि साष्टी व बार्देश ह्या दोन्ही प्रांतावर स्वारी करण्याचा बेत आखला आहे. कौंट द आल्व्होर ह्यांच्या अमदानीत त्यांनी ह्या तिन्हीवर अशीच स्वारी केली होती. मी आपणाला इथल्या परिस्थितीचे जे वर्णन केले आहे त्यावरून आपणाला इथल्या परिस्थितीचे आकलन होईल अशी आशा आहे. ह्या परिस्थितीतून

मार्ग कसा काढायचा याचा मी विचार करीत आहे. आणि मी आपणाला कळवू इच्छितो की, मी रक्ताचा शेवटचा थेंब सांडेपर्यंत लढेन.

दैवी कृपेची आशा करून मी अशी अपेक्षा करतो की, देशाहून आवश्यक तेवढी कुमक येईल. विशेषेकरून इकडे पैशाची फार जरुरी आहे. पैसा हाताशी असल्यास देशी सैन्य उभारता येईल. आणि हे सैन्य शत्रु सैन्याहून वेगळे असणार नाही. कारण दोन्हीकडील माणसे एकाच देशातील आहेत. ह्या सैन्याचा उपयोग करून शत्रूला त्याने घेतलेल्या प्रदेशातून हाकलून लावता येईल. हा माझा नुसता अंदाज आहे. कारण, शत्रू माहीम, तारापोर आणि दमण ह्या ठाण्यावर हल्ला करणार आहे की काय ते कळलेले नाही. हे सर्व आपणाला लिहीत असताना मला किती दु:ख होत आहे याची आपणच कल्पना करावी. ही गोष्ट आपण महाराजांना विदित करावी म्हणून हे सर्व तपशीलवार लिहीत आहे. कारण ही गोष्ट त्यांना कळलीच पाहिजे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १९ एप्रिल १७३७.

A. P. O., TOMO I, VOL. III PART V.

पत्र क्र. ६, पृ. ७--१०, संपादक--A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(6) LIVRO DAS MONSOES, No. 107, FLS 278.

पत्र क्र. ७

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस कळवितो की, वसईला कुमक पाठविण्याची तयारी करण्यात येत आहे.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस--

आपले दि. ११ एप्रिलचे पत्र इकडे चौलच्या एका गलबतावर आले. त्या पत्राचे उत्तर मी आता आपणाला पाठवीत आहे. बांदोड्याला कुमक पाठविण्यात येत आहे. वर्सोवावर हल्ला झाला नाही हे वाचून आनंद वाटला. कायतानु द सौझ पेरैरा ह्यांच्यासारखे चांगले गव्हर्नर तिकडे आहेतच. देवाने जर मदत केली तर ह्या दोन्ही दरवाजातून आपणाला प्रवेश करता येईल.

ह्या प्रांतातील सर्व व्यवहारी आणि अनुभवी माणसांची मी एक बैठक भरविली व तीत वसईच्या प्रश्नाचा खल केला. आपल्या मदतीला इकडून जे सैन्य जात आहे, त्याचे सेनापती म्हणून मी पेद्रु द मेलु ह्यांची नेमणूक

केली आहे. ते इथून थेट मुंबईला जातील व तिथे मुंबईच्या गव्हर्नरशी सल्लामसलत करून मग पुढे निघतील. आम्ही इंग्रजांवर अवलंबून आहोत हे आपणाला लिहिण्याची काही जरुरी नाही.

सदर्हू पेद्रु द मेलु द कास्त्रु यांची व मुंबईच्या गव्हर्नरची मुलाखत आणि इकडील तज्ञांची चर्चा ह्या दोन्हींचा विचार करून आपण योग्य वाटेल तो निर्णय घ्यावा. ह्या बाबतीत आपण एक गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे ती ही की, शत्रूकडून आपण ज्या कृतीची अपेक्षा करीत होतो, ती त्याच्याकडून झालेली नाही. त्याच्या हलगर्जीपणाचा आपण उपयोग करून घेतला पाहिजे. कारण आम्ही सर्वस्वाला मुकू नये असे जर देवाला वाटत असेल तर, आपण ह्या किंवा त्या साधनांचा उपयोग करून घेतला पाहिजे. मी आपणाला सांगितलेच आहे की, नदीचे प्रवेशद्वार ताब्यात ठेवायचे झाल्यास टेकडीची तटबंदी केली पाहिजे. तज्ञांचे असे मत आहे की, घोडबंदरची तटबंदी करणेही फायद्याचे आहे. कारण ते एक प्रवेशद्वार असे आहे की, तिथून साष्टी बेटात प्रवेश करता येतो. आणि मला असे वाटते की, तिथल्या कोठारात जे भात आहे ते वसईला नेता येईल. पेद्रु गेदिज हे आपल्या पत्रातून धान्य टंचाईचा उल्लेख करीत नाहीत. पण त्यांच्या ठाण्यात ज्या लोकांनी आश्रय घेतला आहे त्यांच्याकडून मात्र आपल्याला फार उपसर्ग होतो अशी त्यांची तक्रार आहे. मला असे वाटते की, ह्या लोकांना तिकडून हलविण्याचा एकादा मार्ग उपलब्ध झाला तर त्यांना कारंजाला हलविलेले बरे. त्याचप्रमाणे ह्या निर्वासितातील हिंदूंना मुंबईला किंवा सिद्दीच्या प्रदेशात पाठवून दिलेले बरे. कारण, आम्ही जे काम हाती घेतले आहे ते किती काळ चालू राहील ते सांगता येत नाही. त्या ठाण्याचा वखारदार मानुएल सोआरित व्हेल्यु हे पारेसिकला मदत करीत होते. त्यांनी मला लिहिले आहे की, शत्रूने अद्याप खिंड रोखून धरलेली नाही. जर ही खिंड आपल्या सैन्याने ताब्यात घेतली असती तर, फार चांगले झाले असते. पण शत्रूने जर ही खिंड ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला तर, सर्व प्रकारचा धोका पत्करून ती लढविली पाहिजे. ह्या खिंडीसंबंधीच्या ज्या बातम्या मला कळल्या आहेत त्यावरून रसद घेऊन जाणाऱ्या होड्यांना दोन युद्धनौकांचे संरक्षण देऊन तिकडे पाठविता येईल असे वाटते. ह्या युद्धनौकांना नदीच्या दोन्ही काठांनी तोफा डागता येतील.

रेइश मागुशच्या किल्ल्याचा पाडाव ही मोठीच हानी आहे. त्या किल्ल्याच्या कॅप्टनला माघारा बोलावून शिक्षा देणे फायद्याचे ठरेल. मला

इकडे राहून सूचना देता येत नाही. वेळही मला होत नाही. आपल्याला जे काय करणे शक्य आहे ते करू या.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १९ एप्रिल १७३७. कौंट द सांदोमिल

पत्र क्र. ७, पृ. १०--११

संपादक : A. B. DE BRAGANA PEREIRA.

LIVRO DE BASAIM, No. 6, FLS 142.

साष्टी बेटातील हिंदूंचा इन्क्विझिशनने छळ केला म्हणून त्यांनी मराठ्यांना तिकडे येण्यास मदत केली व मराठे तिकडेच रहावेत ही त्यांची इच्छा आहे, असे व्हाइसरॉय इन्क्विझिशनच्या कार्यकारी मंडळास कळवितो.

इंन्क्विझिशन (Santo Officio) च्या कार्यकारी मंडळास--

साष्टी बेटाचे गव्हर्नर ज्युआंव द सौझ फेरराज ह्यांनी मला जे पत्र पाठविले त्याची नक्कल मी आपणाला पाठवीत आहे. सदहू ज्युआंव द सौझ ह्यांनी मला कळविले आहे की, त्या बेटातील हिंदूंनी मराठ्यांना ते बेट घेण्यास पुष्कळच मदत केली व ते तेथे रहावेत ही त्यांची इच्छा आहे. आताही ते मराठ्यांना मदत करीत आहेत. ज्युआंव द सौझ फेरराज ह्यांच्या पत्रावरून इन्क्विझिशनच्या कार्यकारी मंडळाच्या ध्यानी येईलच की, ह्या संस्थेकडून हिंदूंचा जो धार्मिक छळ होत आहे, ते त्यांच्या बंडाचे मुख्य कारण आहे. ह्या तक्रारीचा इन्क्विझिशनने गंभीरपणे विचार केला पाहिजे. माझी अशी समजूत आहे की, हिंदूंवर जे निर्बंध लादण्यात आले आहेत ते जर मागे घेण्यात आले तर मराठ्यांना साष्टी बेटातून हाकलून लावण्यासाठी ते स्वतःच पुढाकार घेतील. तरी इन्क्विझिशनच्या कार्यकारी मंडळाने ह्या गोष्टीचा विचार करावा असे मला वाटते. मला असेही कळले आहे की, उत्तरेकडील प्रांतातील सगळेच हिंदू इन्क्विझिशनविरुद्ध खवळले आहेत. आमच्या महाराजांनी दीवमधील हिंदूंना संपूर्ण धार्मिक स्वातंत्र्य दिले आहे, इतकेच नव्हे तर, त्यांच धार्मिक विधी सार्वजनिक ठिकाणी पार पाडण्याची देखील त्यांना परवानगी दिली आहे. उत्तरेकडील प्रांतातील हिंदूंच्या संबंधाने मला असे वाटते की, त्यांचे धार्मिक विधी राजरोस पार पाडण्याची जरी त्यांना परवानगी देता येत नसली त ी त्यांना हे विधी त्यांच्या घरात तरी पार पाडण्याची परवानगी असावी.

आणि त्यांच्यावर लावण्यात आलेल्या निर्बंधांचा जर त्यांच्याकडून भंग झाला तर ह्या गुन्ह्याचा निवाडा करण्याचा अधिकार सरकारी न्यायाधिशाला असावा. तरी ह्या संबंधीचा आपला दृष्टिकोन काय आहे ते मला कळवावे. ह्या प्रश्नाचा विचार कार्यकारी मंडळ चातुर्याने करील अशी आशा आहे.

पानेली, १९ एप्रिल १७३७ कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ८, पृ. १२, संपादक :—A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(8) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 20, FLS 213V.

व्हाइसरॉय, चौलच्या कॅप्टनला मराठयांच्या स्वारीसंबंधाने लिहितो:

"चौलचे कॅप्टन ज्यु आंव द फ्रिअश सार्मेतु ह्यांस—

आज सकाळी चौलच्या ठाण्याचे कॅप्टन ज्यु आंव द फ्रिअश सार्मेतु ह्यांचे दुय्यम त्यांच्या व उत्तरेकडील प्रदेशाच्या सेनापतीच्या पत्रासह इकडे येऊन दाखल झाले. ह्या पत्रातील बातमी निःसंशयपणे शोकजनक आहे. ही सर्व युद्धाची फळे आहेत. ती काहींना फायद्याची तर काहींना हानीची आहेत.

मराठे जर चौलवर चालून आले तर, त्या ठाण्याचे कॅप्टन ज्यु आंव द फ्रिअश सार्मेतु हे त्यांचा कसून प्रतिकार करतील व त्या प्रतिकाराचे विजयात रूपांतर करतील अशी मला आशा वाटते. आणि त्यांना प्रतिकारासाठी कोणत्याच साधनांची कमतरता पडू नये म्हणून इकडून दोन युद्धनौका तिकडे पाठविण्यासाठी तयार करण्यात येत आहेत. ह्या युद्धनौकांवर दारूगोळा, माणसांचा पगार घालण्यासाठी पैसे व भाताचे तीनशे मुडे पाठविण्यात येत आहेत. मी उत्तरेकडील सेनापतीनाही चौलला कुमक पाठविण्याबद्दल कळवित आहे. कॅप्टन ज्यु आंव द फ्रिअश सार्मेतु ह्यांनी ह्यासंबंधी पाद्री कारभारी ह्यांनाही कळवावे. मी तूर्त त्यांना लिहू शकत नाही. कारण, मला सवड नाही, पत्रे घेऊन आलेले दुय्यमही ह्या गलबतावर जाऊ शकत नाहीत. कारण अन्नाची बेगमी अद्याप तयार नाही.

चौलच्या ठाण्यातील सर्व अधिकाऱ्यांनी त्या ठाण्याचे कॅप्टन ज्यु आंव द फ्रिअश सार्मेतु ह्यांचा कित्ता संभाव्य संकटप्रसंगी गिरविला पाहिजे. भंडाऱ्याकडूनही मी इमानीपणाची आणि शौर्याची अपेक्षा करीत आहे.

गोवा, १२ एप्रिल १७३७

**ता. क.**——ह्या गलबतावर उत्तरेकडील सेनापतींना जे पत्र जात आहे ते त्यांना ताबडतोब ह्याच गलबताने अथवा अन्य कोणत्याही सुरक्षित मार्गाने पोहोचते करावे".

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ९, पृ. १३–१४,

संपादक :— A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(9) CHAUL, No. 2. FLS 88.

पत्र क. १०

व्हाइसरॉय, मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या खालील पत्रात मदत पाठविण्याची विनंती करतो.

"मुंबईचे सेनापती ह्यांस——

आपल्या दि. ११ एप्रिलच्या पत्राचे हे उत्तर आहे. आपले पत्र माझ्या हाती पडले, त्याचवेळी ठाण्यातील अनपेक्षित पराभवाची विषण्ण वार्ता कळली. मी इथून दोन नौका आणि एक जासूद तिकडे पाठविला. उत्तरेकडील सेनापती दों लुईज द बोतेल्यु ह्यांना व आपणाला पत्रे लिहिली. माझ्या पत्रातील मजकूर आपण वाचला तर माझ्या राष्ट्राचा मित्र ह्या नात्याने मी आपणाला किती मानतो हे आपल्या ध्यानी येईलच.

ठाण्याच्या दुर्दैवी अपयशाची वार्ता आपण ज्या पोर्तुगीजांकडून ऐकली असेल त्या वार्तावर आपण फार विश्वास ठेवू नये. कारण, अशा किंवा अन्य कोणत्याही प्रसंगी जे लोक लढाईतून पळ काढतात ते आपल्या पलायनाचा दोष अधिकाऱ्यांच्या माथी मारून मोकळे होतात. आपणाला कदाचित माहीत असेलच की, ठाण्याच्या तटबंदीची एक बाजू अजून बांधून व्हायची होती. अशा स्थितीत ती तटबंदी शत्रूसमोर किती टिकाव धरू शकली असती त्याची आपण कल्पना करावी. पुन्हा ह्या तटबंदीच्या आत अन्नाची आणि इतर वस्तूंचीही कमतरता होती. पण तरीही निष्काळजीपणा झाला नसेल असे मी सांगू शकत नाही. माझी अशी समजूत आहे की, नदीमध्ये होडीतून पहारा करणाऱ्या पहारेकऱ्यांनी शत्रूचे आगमन होताच बंदुका झाडून इतरांना इशारा द्यायला हवा होता. पण त्यांनी निष्काळजीपणाने तसे केले नाही. ह्या हलगर्जीपणामुळे मराठ्यांना नदीतून साष्टी बेटावर उतरणे शक्य झाले.

मी ह्या घटनेवर विचार करून लवकरच एक युद्ध नौका, सैन्य आणि रसद भरून तिकडे पाठवित आहे. ह्या सैन्याचे नेतृत्व कॅप्टन पेद्रु द मेलु ह्यांच्याकडे देण्याचे ठरले आहे. ते एक शूर, धाडशी आणि दृढनिश्चयी असे अधिकारी असून धोक्याच्या कामगिरीमध्ये त्यांनी यापूर्वी भाग घेतला आहे. ते इकडून थेट मुंबईला जाऊन आपणाशी सल्ला मसलत करणार आहेत. अशा महत्वाच्या प्रश्नावर आपला सल्ला घेणे आवश्यक आहे अस मला वाटते.

हे पत्र नेणारा जासूद हा एक पायदळातील अधिकारी आहे. तो निश्चयी आणि कणखर आहे. त्याला मी ह्या अनर्थाची बातमी कळविण्याकरता पोर्तुगालला खुष्कीच्या मार्गे पाठवीत आहे. आणि माझी आपणाला विनंती आहे की, त्याला आपण सुरतेची एक पाचशे रुपयांची हुंडी द्यावी. ही रक्कम आपणाला युद्धनौकचे तिकडे आगमन होताच मिळेल. आपल्या मंत्र्यांना आपण त्याची शिफारस करावी व आलेतोपर्यंतचा त्याचा प्रवास सुखकर व्हावा म्हणून त्याची काळजी घेण्याबद्दल त्याना सांगावे.

आपल्या दक्षिणेकडील आरमाराच्या दर्यासारंगाला देण्याकरता जे पत्र आपण माझ्या पत्रासोबत पाठविले आहे ते त्याला देण्याची व्यवस्था मी ते आरमार आग्वादच्या उपसागरात आल्यावर करीत आहे. माझी आपणाला विनंती आहे की, ह्या पत्राबरोबर जी थैली पाठविण्यात येत आहे ती वसईला पोहोचती करावी. त्याचप्रमाणे मला आपणास आणखी एक विनंती करायची आहे. वर्सोवाला माणसांची अथवा दारूगोळ्यांची मदत हवी असल्यास आपण ती करावी.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १९ एप्रिल १७३७

**ता. क.**—वसईला आपण दारूगोळ्याची मदत केल्याशिवाय राहाणार नाही ह्याची मला खात्री आहे. कारण, ह्या फ्रिगेटवर जे धान्य आणि दारू-गोळा पाठविण्यात येत आहे तो चौलसाठी असल्याने त्याच्यामधून वसईला काही पाठविणे शक्य होणार नाही. वसईचे गव्हर्नर आपण पाठवाल, त्या मदतीची किंमत लगेच चुकती करतील.

आपला सेवक

कौंट द सांदोमिल)

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १०, पृ. १४—१६



व्ही ५५५८–२७

संपादक :—A. B. DE BRAGANSA PEREIRA.

पत्र क्र. १२

वर्सोवाच्या कॅप्टनला व्हाइसरॉय पुढील पत्र लिहितो—

"कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

उत्तरेकडील सेनापतीनी आपणाला वर्सोवाचा बचाव करण्यासाठी पाठविले असल्याची बातमी मला कळली, तेव्हा मी सुटकेचा श्वास सोडला. इकडे अशी बातमी पसरली आहे की, शत्रूचा एक हल्ला आपण परतवून लावला आहे. पण आपण जरी कितीही शूर असला तरी, आपणाला सगळीकडे धावपळ करणे अशक्य आहे. म्हणून मी वसईला कुमक घेऊन जात असलेले पेद्रु द मेलु ह्यांना हुकूम केला आहे की, त्यांनी वसईला पोहोचल्यावर आपणास जरूर पडल्यास सैन्याची मदत करावी. जर उत्तरेकडील सेनापतींनी आपणास चाळीस माणसांची कुमक पाठविली नाही, तरच ही कुमक पाठविण्यास मी पेद्रु द मेलु ह्यांना सांगितले आहे. त्यांना मी आपल्या मदतीला दोन लायक अधिकारीही पाठविण्यास बजावले आहे. ते आपणास दारूगोळाही पाठविणार आहेत. मुंबईच्या गव्हर्नरनाही मी आपणास मदत पाठविण्याची विनंती केली आहे. सांप्रत जे काय करणे शक्य आहे ते एवढेच आहे. आणि ज्याअर्थी, ह्या सर्व घटनांचे कारण देव आहे, त्याअर्थी, त्याच्यावर भार टाकून आपण बागले पाहिजे. आपणास त्या सर्व शक्तिमान परमेश्वराने मदत करावी अशी माझी त्याच्यापाशी प्रार्थना आहे.

गोवा, २१ एप्रिल १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १२, पृ. १९

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(12) LIVRO DE BASAIM, No. 6, FLS 146.

पत्र क्र. १३

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहिलेल्या एका पत्रात एक ठाणे मराठ्यांनी घेतल्याबद्दल दु:ख व्यक्त करतो.

"उत्तरेकडील सेनापती दों लुईज द बोतेल्यु ह्यांस—

काल दुपारी चौलहून आलेल्या जहाजावर आलेली आपली दोन पत्रे भोजनाचे वेळी मिळाली. त्यांतील एक पत्र १३ तारखेचे असून दुसरे १४ चे आहे. ह्या दोन्ही पत्रांबरोबर आपण मला कारंजाहून लिहिलेल्या पत्राची नक्कल आहे. आपण कारंजाला सुखरूप येऊन पोहोचल्याचे वाचून आनंद झाला. आपल्या वास्तव्यामुळे त्या ठाण्यात चैतन्य निर्माण होऊन शत्रूचा प्रतिकार करण्यास तिथल्या सैन्याला चेव येईल अशी आशा आहे.

आपण कारंजाला सुखरूप येऊन पोहोचल्याच्या आनंददायक बातमीवर परैराच्या पाडावाने पाणी पडले. अनुभवी लोकांचे असे मत आहे की, शत्रूचा प्रतिकार करण्याचे कल्याणच्या मार्गावरील ते एक बलाढ्य असे ठाणे होते.

शत्रूच्या आतापर्यंतच्या हालचालींवरून तो डोके आणि हृदय घायाळ केल्याचा आव आणीत आहे. माझ्या मते तो कुमक येण्यापूर्वी आणखी काही हल्ले केल्यावाचून राहाणार नाही. मी जी मदत इकडून तिकडे पाठविणार आहे ती बंदरात तयार आहे. येत्या दोन तीन दिवसात तिकडे माणसे पुरवठा आणि दारूगोळा रवाना होणार आहे. मात्र दक्षिणेकडील आरमार लवकर आले पाहिजे. पण एका गोष्टीची मला उत्सुकता वाटत आहे ती, ही की, घोडबंदर येथील धान्याच्या कोठारांचे काय झाले ते मला कळलेले नाही तिथे साठवलेले धान्य आपणाला पावसाळ्यापर्यंत पुरले असते. ते धान्य जर हातचे गेले असेल तर, आपण दमण, माहीम आणि तारापूर येथील ठाणेदारांना तुमच्याकडे समुद्रमार्गे धान्य पाठविण्याबद्दल कळवावे. ह्या ठाण्यांना अद्याप शत्रूकडून काही झळ पोहोचली नसल्याने त्यांना आपणास रसद पाठविणे कठीण जाणार नाही. मला इकडून जेवढी मदत पाठविणे शक्य असेल तेवढी मी पाठवीत राहीन. तज्ञांचा असा सल्ला आहे की, आम्ही शत्रूची साष्टी बेटांमध्ये समुद्रातून कोंडी करावी. परंतु ही योजना यशस्वी होईल असे मला वाटत नाही. मला असा इलाज सुचतो की, शत्रूची रसद तोडण्यासाठी आम्ही कसब्याच्या टोकाला एक बलाढ्य अशी तटबंदी उभारावी. ह्या तटबंदीतील शिबंदीला समुद्रमार्गे रसद पोहोचती करता येईल. ही तटबंदी शत्रूला जमिनीवरूनही विरोध करू शकेल.

इथून तिकडे जी कुमक पाठविण्यात येत आहे तिचे नेतृत्व कॅ. पेद्रु दा मेलु ह्यांच्याकडे देण्यात येत आहे. ते मुंबईला उतरून तिथल्या गव्हर्नरशी ह्या प्रश्नाबाबत चर्चा करतील. त्यांना इथल्या लष्करी तज्ञांचाही सल्ला मिळाला आहे. ह्या लष्करी तज्ञांचे असे मत आहे की, अघशिनी नदीच्या



व्ही ५५५८–२७अ

मुखातील गायीचे बेट शत्रूने कापू नये म्हणून त्याचे रक्षण केले पाहिजे. कारण, हे बेट हातात असल्यास कसब्यातील शत्रूची रसद तोडता येईल.

वर्सोवाविषयी मला फारच काळजी वाटत आहे. कारण, ह्या ठाण्याला पावसाळ्यात मदत करणे कठीण असते. ह्या ठाण्यात दारूगोळा पुरेसा आहे की काय मला माहीत नाही. जर कमतरता असेल तर, मी मुंबईच्या गव्हर्नरला ती पाठविण्याबद्दल लिहीन. मला वाटते सैबाणलाही दारूगोळ्याची टंचाई असावी. परंतु माझा सर्व भार आता देवावर आहे. आकाशाकडे डोळे करून आम्हाला जे काय करणे शक्य आहे ते आम्ही करू या.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २४ एप्रिल १७३७.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १३, पृ. २०--२२

संपादक :--

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(13) LIVRO DE BASAIM, No. 6, FLS 143V.

पत्र क्र. १४

व्हाइसरॉय सिद्दीच्या दाभोळ येथील सुभेदारास लिहितो की, सिद्दीने पोर्तुगिजांना मराठ्यांविरुद्ध मदत करावी.

"दाभोळचे सुभेदार सिद्दी सय्यद ह्यांस--

आल्मादियाच्या मुकादमामार्फत आपण मला जे पत्र पाठविले होते ते मला काल पोहोचते करण्यात आले. त्या पत्राचे उत्तर मी आता पाठवीत आहे. महान सिद्दी याकुतच्या एका सेनापतीकडून मी ह्या सौजन्याची अपेक्षा केली नव्हती. तथापि, आपल्या देशाच्या आणि ह्या राज्याच्या मैत्रीस अनुसरून आपण मला पत्र लिहिलेत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. वाईट बातम्या या झपाट्याने फैलावत असतात, हे आपणाला माहीत आहेच. आपण मला आगामी संकटाचा इशारा अकरा दिवस अगोदर दिला होता. चिमणाजी बल्लाळ यांचे वर्तन दगलबाजीचे आहे. कारण, उत्तरेकडील प्रांताच्या गव्हर्नरचा आणि मराठ्यांचा जो तह झाला त्याचा भंग करण्याचा प्रयत्न त्या प्रांताच्या गव्हर्नरने चुकूनही कधी केला नाही, हे आपण ध्यानात

ठेवावे. परंतु मला अशी आशा वाटते की, ह्याच दगलबाजीतून आम्हाला यश येईल व आम्ही चिमणाजी बल्लाळ ह्यांना धडा शिकवू. मला अशीही आशा आहे की, महान सिद्दी आकुतखान हे आम्हाला आपल्या सैन्यासह मदत करतील. कारण, आमच्या शत्रूने त्यांच्याशीही दगलबाजी केली आहे.

मला जी मदत तिकडे पाठविणे शक्य आहे ती तयार आहे. नौका इथून लवकरच हलणार आहेत. त्या प्रथम मुंबईला जाऊन, तिथून मुंबईच्या गव्हर्नरसह वसईला जातील. मुंबईचे गव्हर्नर हे आमचे दोस्त असून त्यांनाही ह्या युद्धाविषयी आस्था आहे. कुमक घेऊन जाणारे सेनापती त्यांच्याशी ह्या प्रश्नाबाबत सल्ला मसलत करणार आहेत. महान सिद्दी याकुतखान ह्यांनी मुंबई बेटाला मदत केली आहे. ह्या मदतीबद्दल मला त्यांचे कौतुक वाटते अशीच मदत ते आमच्या चौलच्या ठाण्यालाही करतील अशी मी आशा बाळगतो. कारण आता पावसाळा जवळ आला असल्याने, त्या ठाण्याला अन्न पुरविण्याची फार आवश्यकता आहे. शेवटी महान सिद्दी याकुतखान हे आमच्या मैत्रीला आणि त्यांच्या सौजन्याला अनुसरून आम्हाला मदत केल्यावाचून राहाणार नाहीत. अशी आशा व्यक्त करून हे पत्र संपवितो".

गोवा, २४ एप्रिल १७३७.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १४, पृ. २३—२४

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(14) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 7V.

पत्र क्र. १५

मानाजी आंग्रे ह्यांनी गोव्याच्या व्हाइसरॉयकडे एका गुप्त कामगिरीवर आपला एक खास दूत पाठविला होता. तत्संबंधाने व्हाइसरॉय आंग्रे ह्यांना लिहितो :—

"मानाजी आंग्रे ह्यांस—

आपले दि. २५ ऑक्टोबरचे पत्र मागेच मिळाले होते. त्या पत्राचे उत्तर मी लवकर पाठविले नाही, कारण त्या पत्रात म्हटले होते की, हे पत्र घेऊन जाणारे दूत बाजी लकमाजी हे मला भेटून आपले काम मला विदित करणार आहेत. पण ते इकडे आले नाहीत, आणि आपले माझ्याशी काय

काम आहे तेही मला कळले नाही, म्हणून पत्राचे उत्तर पाठविण्यास विलंब लागला. शेवटी एकदाचे ते नुकतेच इकडे आल्याने आपल्या पत्राचे उत्तर आता पाठवीत आहे. आपले माझ्याशी काय काम आहे ते कळले. आपल्या विनंतीचा मी स्वीकार करीत आहे. माझा जबाब सदरहू बाजी लकमाजी हे आपणाला जातीने विदीत करतील. जर पावसाळा जवळ आला नसता तर आपल्या कामास हात घालण्यास हरकत नव्हती. म्हणून वेळेच्या अभावी हे काम पुढे ढकलावे लागत आहे. सांप्रत मला वेळेच्या अभावी दुसऱ्या कामास हात घालण्यास सवड नाही. मी चिमणाजी बल्लाळ ह्यांना त्यांनी आमच्याशी जी दगलबाजी केली त्याबद्दल त्यांना शासन करण्याची तयारी करीत आहे. चिमणाजी बल्लाळ ह्यांनी एकेबाजूनी तहाच्या कराराचे पालन करण्याचा बहाणा करून दुसऱ्या बाजूने उत्तरेकडील प्रांतावर हल्ला चढविला. ह्या दगलबाजीबद्दल देव त्यांना शासन केल्यावाचून राहाणार नाही अशी मला आशा वाटते.

आपल्या कामाबद्दल मला सविस्तर लिहिण्यास सवड नाही. मला आपल्या कामाबद्दल जे काय सांगायचे आहे ते मी बाजी लकमाजी ह्यांना सांगत आहे. ते आपणाला ते विदीत करतीलच. मी आपणाला आश्वासन देतो की, माझ्या हाताशी जी साधने आहेत त्यांच्यासह आपणाला मदत करण्यास मी तयार आहे".

गोवा, २७ एप्रिल १७३७.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र १५, पृ. २४--२५

संपादक :--

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(15) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 8V.

पत्र क्र. १६

गोव्याहून वसईला निघणाऱ्या कुमकेसंबंधाने व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहितो :--

"मुंबईचे गव्हर्नर ह्यांस--

माझ्या मागील पत्रातून मी आपणाला कळविलेच आहे की, उत्तरेकडील प्रांताकडे पाठविण्याची कुमक तयार आहे. ती इकडून उद्या निघणार आहे.

मी आपणाला मागे जी पत्रे पाठविली त्यांच्या नकला ह्या पत्रासोबत पाठवीत आहे. इकडून जी कुमक उत्तरेकडील प्रांतात जात आहे तिचे नेतृत्व पेद्रु द मेलु ह्यांच्याकडे आहे. ते थेट मुंबईला जातील व तिकडे आपणाशी सल्ला-मसलत करून वसईला रवाना होतील. ह्या प्रस्तावाबाबत मला आपणास-अधिक काही सांगायचे नाही. तथापि, मी आपणाला आमच्या दोन्ही देशा-मधील मैत्रीस अनुसरून ह्या संबंधी पुनः आठवण करून देत आहे. आम्ही समायिकपणे काम केले पाहिजे. हे आपण ध्यानात ठेवावे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल.

A. P. O., VOL. III, PART V.

पत्र क्र. १६, पृ. २५

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(16) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 10.

पत्र क्र. १७

वसईला गोव्याहून जी कुमक पाठविण्यात आली तिचे नेतृत्व कमांडंट पेद्रु द मेलु ह्यांच्याकडे देण्यात आले होते. त्यांना व्हाइसरॉयनी पुढील सूचना केल्या :—

वसईला गोव्याहून जो दारूगोळा पाठविण्यात येत आहे तो तिकडे उपसण्यात फार वेळ लागू नये म्हणून तो वाटेत वसईच्या दारूगोळ्याहून वेगळा काढावा. उदाहरणार्थ तोफांचे गोळे वेगळे काढण्याची आवश्यकता आहे. ह्या कामासाठी प्रवासातील दिवसांचा उपयोग करावा. म्हणजे चौलला जाईपर्यंत हे काम पूर्ण होईल.

चौलच्या कॅप्टनला मी जहाजे तयार ठेवण्याबद्दल कळविले आहे. फ्रिगेट तिकडे पोहोचल्यावर त्या ठाण्याला पाठविलेले सामान गलबतात भरून लगेच किनाऱ्यावर नेता येईल. आणि जर फ्रिगेटबरोबर पाठविण्यात आलेल्या सिवारेज त्याच्याबरोबर चौलला पोहोचल्या, तर, त्यांच्यातूनही ही बेगमी आणि दारूगोळा किनाऱ्यावर वाहून नेता येईल.

मुंबईला पोहोचल्यावर त्या बेटाच्या गव्हर्नरकडे माणसे, दारूगोळा आणि इतर सामान, वसईला नेण्यासाठी आवश्यक त्या होड्यांची मागणी करावी.

कारण, पावसाळा आता जवळ आला असल्याने फ्रिगेटला वसईला जाऊन मुंबईला परत येईपर्यंत फार वेळ लागेल, व त्या दरम्यान पावसाळा सुरू झाल्यास त्याला मुंबईला थांबावे लागेल. मुंबई बंदरात होड्या पुष्कळ असतील. विशेषेकरून साष्टी बेटातील होड्यांनी त्या बंदराचा आश्रय घेतला असला पाहिजे. ह्या होड्यांची वाहतूक सुरक्षित असल्याकारणे त्यांना युद्ध नौकांचे संरक्षण द्यावे. इंग्रज युद्धनौका तिथे तयार असतीलच.

मुंबईच्या गव्हर्नरना सांगावे की, जी कुमक मी आता पाठविणार आहे ती फार नाही. कारण दक्षिणेकडील आरमार अद्याप आलेले नाही. त्याचे आगमन बरेच दिवस लांबले आहे. शिवाय एक फ्रिगेट त्रावणकोरच्या किनाऱ्यावर मदतीसाठी गेले आहे. तरी ह्या मदतीने शत्रूच्या आक्रमणाला कितपत पायबंद घालता येईल याचा मुंबईच्या गव्हर्नरशी खल करावा. आपण इकडील लष्करी तज्ञांचा उत्तरेकडील प्रांतासंबंधीचे मत ऐकलेच आहे. आता मुंबईच्या गव्हर्नरचे मत ऐकावे. ह्या सर्व मतांचा उत्तरेकडील सेनापतींना उपयोग होईल व त्याप्रमाणे त्यांना निर्णय घेता येईल.

पावसाळ्यानंतर शत्रूला साष्टी बेटातून व वसईच्या कसब्यातून कसे हुसकून लावता येईल व ह्या मोहिमेसाठी किती सैन्याची आवश्यकता भासेल तेही आपण मुंबईच्या गव्हर्नरना विचारावे. तसेच इंग्रज आणि सिद्दी ह्या दोघांकडून किती सैन्याची मदत होऊ शकेल याचाही आपण अंदाज घ्यावा. ह्या प्रकरणी सिद्दीला आस्था आहे हे मला माहीत आहे. त्याला जर आम्हास सैन्याची मदत करायची असेल तर तो आम्हाला ते कुठे धाडू शकेल त्याचीही चौकशी करावी. लष्करी तज्ञांच्या मते कारंजा अथवा एलिफंटा येथे सैन्य उतरावे व तिथून मोहीम सुरू करावी.

मुंबईच्या गव्हर्नरना आपण असेही विचारावे की, शत्रूला साष्टी बेटातून हुसकून लावणे शक्य झाले नसल्यास त्याची नाकेबंदी करणे शक्य आहे का? ही नाकेबंदी यशस्वी झाली तर साष्टी बेट घेऊन आपला काही फायदा नाही असे वाटल्याने शत्रू कदाचित ते खाली करण्याचा संभव आहे.

मुंबईच्या गव्हर्नरनी वर्सोवा, बांदोडा, सावाज आणि कारंजा ह्या ठाण्यांना दारूगोळ्यांची मदत करावी म्हणून आपण खटपट करावी. मुख्यत्वे वर्सोवाला पावसाळ्यामुळे मदतीची फार आवश्यकता आहे. साष्टीबेट आमच्या हातातून गेले तर, मुंबई बेटाला धोका आहे हे लक्षात घेऊन व पोर्तुगाल आणि इंग्लंड ह्या दोन्ही राष्ट्रांच्या मैत्रीस अनुसरून मुंबईचे गव्हर्नर आम्हाला मदत करतील अशी आशा वाटते.

मुंबईच्या गव्हर्नरच्या कानी घालावे की, ह्या फ्रिगेटवर जो दारूगोळा पाठविण्यात येत आहे तो सर्व ठाण्यांना पुरण्यासारखा नाही, तसेच पावसाळ्यातही त्या ठाण्यांनाही मदत पोहोचती करण्याची शक्यता नाही. तरी त्यांनी प्रस्तुत ठाण्यांना पावसाळ्यांमध्ये दारूगोळ्याची मदत करावी. त्यांना असेही सांगावे की, चौलला दारूगोळ्याची फार आवश्यकता होती म्हणून तिकडे तो अधिक उपसण्यात आला. त्यामुळे वसईच्या दारूगोळ्याची संपूर्ण गरज भागविणे अशक्य होत आहे. ही परिस्थिती लक्षात घेऊन मुंबईच्या गव्हर्नरनी वसईला त्यांच्याकडील दारूची पिंपे विकावी. त्या दारूची किंमत फ्रिगेटवर पाठविण्यात येत आहे. मुंबईच्या गव्हर्नरना असेही आश्वासन द्यावे की, वसईला ते जो दारूगोळा पुरवितील त्याची किंमत नियमितपणे चुकती केली जाईल.

फ्रिगेट पावसाळ्यात मुंबई बंदरात राहाणार आहे हे ठरले असल्याने त्याच्यावर दोरखंड आणि नांगर ह्यांची टंचाई असल्यास मुंबईच्या गव्हर्नरना हे सामान पुरविण्याची विनंती करावी. फ्रिगेटवरील खलाशी, अधिकारी आणि लष्करी माणसे ह्यांनी त्याच्यावरच राहिले पाहिजे.

आपण मुंबईच्या गव्हर्नरना अशी सूचना करावी की, संभाजी आंग्रे ह्यांचा बाजीराव व त्यांचे बंधू ह्या दोघांना विरोध असावा असे मला वाटते. अशा परिस्थितीत माझी इच्छा आहे की, आंग्र्यांशी इंग्रजांनी शत्रुत्व करू नये. त्यांनी आंग्र्यांना मराठ्यांच्या प्रदेशात आक्रमणे करू द्यावी, आणि आंग्र्यांनीही इंग्रजांच्या प्रदेशात शिरून कुरापत काढण्याचे सोडून द्यावे. फ्रिगेटच्या कप्तानाकडे मुंबईच्या गव्हर्नरना देण्यासाठी पाचशे रुपये दिले आहेत. काही दिवसामागे मी त्यांना एका कामासंबंधी लिहिले होते, त्याच कामाबाबतचे हे पैसे आहेत.

मुंबईला पोहोचल्यावर वर्सोवा, बांदोडा, साबाज आणि कारंजा ह्या ठाण्यांच्या प्रमुखांना पत्रे घालून त्यांच्या ठाण्यासंबंधीची माहिती मागवावी आपण मुंबईला असेपर्यंत ह्या सर्व ठाण्यांना मदत करावी. मुख्यत्वे वर्सोवा व साबाज ह्या दोन्ही ठाण्यांना दारूची पिंपे पाठवून द्यावी. मला कळले आहे की, ह्या दोन्ही ठाण्यात दारूची फार तुटवडा आहे. कारंजा आणि साबाज ह्या दोन्ही ठाण्याच्या कॅप्टनना वसईच्या बातम्या मला कळविण्यास सांगावे. आणि मुंबईच्या गव्हर्नरना काही अस्सल बातम्या माहीत असल्या तर त्या सर्व ठाण्यांना कळविण्याची व्यवस्था करण्याची त्यांना विनंती करावी. पावसाळा जवळ आला असल्याने आपण वसईहून येऊन पावसाळ्यात मुंबईला रहावे. पण वसईला गेलेच पाहिजे हे विसरू नये. कारण, वसईला कुमकेची फार जरूरी असून आपण स्वतःही तिकडे जाणे आवश्यक आहे.

मुंबईहून वसईला जाताना वाटेत वर्सोवाला भेट द्यावी म्हणजे तिकडे कोणकोणत्या वस्तूंची टंचाई आहे हे आपणाला कळून चुकेल, व आपल्या आगमनामुळे तिथल्या सैनिकांचे नैतिक धैर्यही द्विगुणित होईल. दोन लायक असे लष्करी अधिकारी तेथे ठेवावे. माझी देवापाशी प्रार्थना आहे की, सदहू कायतानु द सौझ पेरैरा ह्यांना काही होऊ नये. पण दुर्दैवाने ते जर आजारी पडले तर, त्यांची जागा ह्या अधिकाऱ्यांना भरून काढता येईल.

मी उत्तरेकडील सेनापतींना पाणवठ्यावरील टेकडी हाती ठेवण्याबद्दल कळविले आहे. ही टेकडी केवढ्या मोक्याची आहे ते मी त्याना लिहिले आहे. तरी त्यांनी हे काम सर्व साधने एकवटून तडीस न्यावे अशी माझी इच्छा आहे. जर प्रवास जलद झाला, तर आपणाला वसईस रसद पोचवून पावसाळ्यापूर्वी इकडे परतताही येईल. पण ह्या बाबतीत आपण कॅप्टन--मोर आंतोनियुब्रितु द सिल्वा ह्यांचा आणि इतर अधिकाऱ्यांचा सल्ला घ्यावा.

गोवा, २८ एप्रिल १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १७, पृ. २६--३१

संपादक :--

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(17) LIVRO DOS REGIMENTOS E INSTRVCOES, No. 12, FLS 212 V.

पत्र क्र. १८

गोव्याचा मुख्य सचिव कर्नाटकाच्या राजाच्या दरबारातील पोर्तुगीज वकिलास लिहितो की, मराठ्यांनी उत्तरेकडील प्रदेशावर स्वारी करून साष्टी बेट घेतले आहे व ठाणे जिल्ह्यातही त्यांनी प्रवेश केला आहे.

"पेद्रु द आगियार ह्यांस--

आपल्या १० एप्रिलच्या पत्रावरून कळून चुकले की, आपले व मंगलोरच्या गव्हर्नरचे मतैक्य होऊ शकले नाही. परंतु आज अशी परिस्थिती निर्माण झाली आहे, की, आम्हाला फार ताणून धरता येत नाही. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी मला आपणास असेच लिहावयास सांगितले आहे. आपणाला कळलेच असेल, की, मराठ्यांनी उत्तरेकडील प्रांतावर स्वारी करून साष्टी बेट घेतले. दिनांक ६ एप्रिलला त्यांनी ठाण्यात प्रवेश करून तेथे नुकताच बांधण्यात येत असलेला आमचा किल्ला घेतला. लगेच दुसऱ्या दिवशी म्हणजे ७ एप्रिलला

त्यांनी वसईच्या कसब्यात प्रवेश केला. त्यांनी वसईला वेढा घालून त्याच्यावर तोफांचा भडिमार सुरू केला आहे. शत्रू इतका उत्साही आहे की, सबंध प्रांत काबीज करण्याची त्यांची महत्वकांक्षा आहे. अशा परिस्थितीत त्यांच्याशी लढण्याकरता मिळेल ते सैन्य गोळा करणे आम्हाला भाग असल्याने आम्ही आमच्या शेजाऱ्यांशी फटकून वागणे इष्ट नव्हे. आम्ही त्यांच्याशी कोणत्याही परिस्थितीत मैत्रीचे संबंध ठेवले पाहिजेत. विशेषेकरून कर्नाटकाकडील आमचे संबंध ताणले जाणे फार धोक्याचे आहे. कारण, अन्नधान्याच्या बाबतीत आम्ही कर्नाटकावर अवलंबून आहोत. तिथून आयात केलेले धान्य आम्हाला उत्तरेकडील प्रांतात पाठवायचे असते. नामदार व्हाइसरॉय ह्यांनी उत्तरेकडील प्रांतात नुकतीच एक फ्रिगेट भरून कुमक पाठविली आहे.

म्हणून आपणाला असा सल्ला आहे की, आपल्या मनात त्या लोकांविषयी जो प्रतिकूल ग्रह आहे तो मनातल्या मनात ठेवून आपण त्यांच्याशी मैत्रीने वागण्याचे नाटक करावे. कारण, त्या लोकांची आम्हाला फार जरूर आहे. त्यांच्याविषयी अविश्वास न दर्शविण्याबाबत आपण काळजी घ्यावी.

येत्या पावसाळ्यानंतर शत्रूला त्याने जिंकलेल्या प्रदेशातून हुसकून लावण्यासाठी आम्हाला एक मोहीम सुरू करायची आहे. ह्या मोहिमेसाठी आपल्याला पुष्कळ माणसांची जरूरी आहे. म्हणून नामदार व्हाइसरॉय ह्यांची आपणाला सूचना आहे की, तिकडील प्रदेशात आपला ज्या ज्या ठिकाणी परिचय आहे, त्या त्या ठिकाणी आपण माणसे गोळा करण्याचा प्रयत्न करावा. जे लोक भरती होण्यास तयार असतील त्यांची नावे आणि इतर माहिती आपण इकडे पाठवावी. त्याचप्रमाणे ही माणसे कुठल्या बंदरात गोळा होतील आणि केव्हा तेही कळवावे.

नामदार व्हाइसरॉय ह्यांनी अन्नधान्यही पैदा करण्यास सांगितले आहे. सप्टेंबर महिनाअखेर आणि ऑक्टोबर महिन्याच्या सुरूवातीला ते धान्य व्यापाऱ्यांनी इकडे पाठविले पाहिजे. हे धान्य त्यांनी त्यांना गोळा करणे शक्य असेल त्या नौकांनी इकडे पाठवून द्यावे. शक्य झाल्यास आम्ही इकडूनही जहाजे पाठवू.

पत्रोत्तर लवकर करावे.

देव आपले रक्षण करो".

सचिवालय, १ म १७३७

ता. क. आंतोनियु आइक ह्यांनी आपणासाठी एक सांकेतीक भाषा तिकडे ठेवलीय की काय भला माहीत नाही. गुप्त गोष्टी त्या भाषेत त्यांना लिहिण्यासाठी

म्हणून ही सांकेतिक भाषा त्याना कळविण्यात आली होती, आपणाला ती भाषा कळली असती तर, तिचा ह्या पत्रात उपयोग करता आला असता.

लुईज आर्पँनास दान्तश

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. १८, पृ. ३१—३२
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.

पत्र क्र. २०

बाजीरावाचा पराभव झाल्याची वार्ता मुंबईच्या गव्हर्नरने गोव्याच्या व्हाइसरॉयला कळविली असता तो त्यास पुढील उत्तर पाठवितो :—

"मुंबईचे गव्हर्नर ह्यांस—

आपली तिन्ही पत्रे आताच मिळाली. ती अनुक्रमे २२ एप्रिल, १८ एप्रिल आणि ३१ एप्रिलची आहेत. आपण बांदोडाच्या रक्षणात लक्ष घातले आहे, व कारंजा आणि सावाज ह्या दोन्ही ठाण्यांना दारूगोळा पाठविला आहे, ह्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. दारूगोळयाच्या टंचाईमुळे त्या ठाण्यांची स्थिती फार धोक्याची झाली होती, व त्यांच्या भवितव्यासंबंधी मला काळजी वाटू लागली होती. मला आशा आहे की, इकडून कुमक घेऊन जाणारे पेद्रु द मेलु हे तिकडे पोहोचेपर्यंत आपण त्या ठाण्यांना दारूगोळा पुरविल्याशिवाय राहाणार नाही.

बाजीरावाचा पराभव झाल्याची जी वार्ता आपण पाठविलीत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आपणाला वाटते त्याप्रमाणे ह्या पराभवातून आमचा काही फायदा होतो का बघूया. पण मला वाटते की, चिमणाजी पंडीत ह्यांना जरी बाजीरावाच्या मदतीला बोलावण्यात आले असले तरी, ते आपले सैन्य घेऊन तिकडे गेलेले नाहीत. ह्यातून अर्थात काय निष्पन्न होणार आहे ते काळच सांगू शकेल. उत्तरेकडील प्रांतातील प्रजेचा तिथल्या सेनापती वरील विश्वास उडाल्याचे मला कळल्याने मी त्याचे जागी आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची नेमणूक करण्याचे ठरविले आहे. त्यांचा अनुभव आणि पराक्रम तिकडे सुपरिचित असून तिथल्या प्रजेचाही त्यांच्यावर विश्वास आहे.

सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांना तिकडे पाठविण्यास माझ्यापाशी नौका नसल्याने ही कामगिरी पार पाडण्याची विनंती मी आपल्या आरमाराच्या

दर्यासारंगांना केली आहे. त्यांचे नुकतेच ह्या बंदरात आगमन झाले आहे त्यांनी ही कामगिरी पार पाडण्याचे मला वचन दिले आहे. आपण ह्या गोष्टीला मान्यता द्याल अशी आशा आहे. कारण ही गोष्ट आमच्या दोन्हीही राष्ट्रांच्या समायिक हिताची आहे. कॅ. पेद्रु द मेलु हे तिकडे पोहोचलेच असतील. मला इकडन जी मदत पाठविणे शक्य होते ती मी त्यांच्या बरोबर पाठविली आहे. मराठ्यांविरुद्ध इलाज करण्यासंबंधाने पेद्रु द मेलु ह्यांचे आणि आपले खलबत झालेच असेल. आपण जो काय निर्णय घेतला असेल तो त्वरित अमलात आणण्याचा निश्चय आहे.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, ७ मे १७३७

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO ; VOL. III, PART V.
पत्र क्र. २०, पृ. ३४—३५

संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.
(29) BASAIM, No. 6, FLS 149V.

**पत्र क्र. २१**

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापती दों लुईज द बोतेल्यु ह्यांना कळवितो की त्यांना त्यांच्या गव्हर्नरपदाच्या जबाबदारीतून मुक्त करण्यात येत असून त्यांचे जागी गव्हर्नर म्हणून आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची नेमणूक करण्यात येत आहे.

" सेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांस—

मी आपणाकडे उत्तरेकडील प्रांताचा राज्यकारभार सोपविला होता, परंतु अपरिहार्य कारणास्तव आपल्या जागी मला आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची नेमणूक करावी लागत आहे. तरी, त्यांचे तिकडे आगमन झाले की, आपण राज्याची सूत्रे त्यांचे हाती सुपूर्त करून, चांगले जहाज मिळाल्यास आणि वेळ चांगली असल्यास चौलला निघून जावे.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, ७ मे १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMOS, VOL. III. PART V.

पत्र क्र. ३१, पृ. ३५

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(21) BASAIM, No. 6, FLS 149V.

पत्र क्र. ३२

व्हाइसरॉय चौलच्या ठाणेदारास पुढील पत्र लिहितो :—

"कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

आपले गेल्या महिन्याच्या ११ तारखेचे पत्र मिळाले. आपले पत्र मिळण्यापूर्वी मी आपणाला जे पत्र लिहिले होते, त्यांत आपणाविषयी मला वाटत असलेली आदरभावना व्यक्त केली होती, व आपण वर्सोवाच्या रक्षणाची जबाबदारी स्वीकारावी, अशी इच्छा दर्शविली होती. कारण, त्या ठाण्याच रक्षण आपण केल्यावाचून राहाणार नाही हे मला माहीत होते. आणि ह्या कामी वैयक्तिक शौर्याचा उपयोग होणे शक्य नाही. ह्याची जाणीव झाल्याने मी इकडून पेद्रु द मेलु ह्यांना सैन्य देऊन आपल्या मदतीला पाठविले होते. ते मुंबईला जाऊन पोहोचले असतील व त्यांच्याकडे पाठविलेल्या दारूगोळयाची मदत आपणाला मिळालीच असेल, असे गृहीत धरतो. इकडे पसरलेली बातमी जर खरी असेल तर शत्रूची हानी फार झाली असे म्हणावे लागेल.

इंग्रजांकडून आपणाला मदत झाली असल्याचे ऐकून फार आनंद झाला आणि आपणाला त्यांच्या आणखी मदतीची आवश्यकता असल्यास ते ती आपणाला केल्यावाचून राहाणार नाहीत अशी आशा वाटते. कारण, मुंबईच्या गव्हर्नरकडे मी ह्या मदतीची पुष्कळ दिवसांपूर्वी मागणी केली होती.

आपण ज्या खुणेविषयी मला लिहिले आहे, त्याची मला कल्पना झाली. आपणाला यश यावे अशी इच्छा बाळगतो. कारण, ह्या राज्याच्या कल्याणाविषयी मला आस्था वाटते.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ९ मे १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ३२, पृ. ३६

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(22) BASAIM, No. 6, FSL 150.

पत्र क्र. २३

सिद्दीने मराठ्यांविरुद्ध पोर्तुगिजांना मदत देऊ केल्याचे कळताच व्हाइसरॉयने त्याला पुढील पत्र लिहिले—

"मोगल बादशहाच्या आरमाराचे सेनापती सिद्दी याकुतखान ह्यांस—

चौलच्या ठाण्याच्या सेनापतीच्या पत्रावरून मला कळले की, आमच्या उत्तरेकडील प्रांतावर स्वारी करणारा आमच्या दोन्ही राज्यांचा समायिक शत्रू जो मराठा त्याच्यापासून चौलच्या ठाण्याचे रक्षण करण्याकरता आम्हाला मदत देऊ केली आहे. ह्या शत्रूने मागे एकदा आपल्याही ठाण्यावर असेच आकस्मिकपणे आक्रमण केले होते. आपली सदिच्छा आणि आपला उत्साह ह्यांबद्दल मी आपला आभारी आहे. मला माहीत होते की, आपण ह्या राज्याचे मित्र आणि हितचिंतक असल्याकारणे आम्हाला आपणाकडून होईल तितकी मदत केल्यावाचून राहाणार नाही. मला अशीही आशा वाटते की, मराठ्यांना उत्तरेकडील प्रदेशातून हाकलून लावण्यासाठी आपल्या सर्व सैन्यासह आपण आमच्याशी हातमिळवणी केल्यावाचून राहाणार नाही.

मी उत्तरेकडील प्रांताचे गव्हर्नरपद जनरल आंतोनियु कार्दिम फ्रांइश ह्यांच्याकडे दिले असून ते इथून तिकडे काल रवाना झाले आहेत. ते आपले जुने मित्र असल्याकारणे, आपणाला ते ह्या कामी उपयोगी पडल्यावाचून राहाणार नाहीत. आणि मला उमेद आहे की, आमचे जुने मित्र (इंग्रज) तुम्ही आणि आम्ही मिळून तिघे आमच्या दगलबाज समायिक शत्रूवर विजय मिळवू.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, ९ म १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. २३, पृ. ३७

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(23) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 11V.

पत्र क्र. २६

व्हाइसरॉय पाँडिचेरीचे गव्हर्नरला मदत पाठविण्याबद्दल पत्र लिहितो :—

"पाँडिचेरीचे गव्हर्नर ह्यांस—

आपणाला आणि आपल्या सल्लागार मंडळाला उद्देशून मी हे जे पत्र पाठवीत आहे, त्याच्यावरून दगलबाज मराठ्यांपासून आमच्या उत्तरेकडील प्रदेशाची मुक्तता करण्यासाठी आपल्या उदार राष्ट्राकडे मदत मागण्यास मला सबळ कारणे आहेत हे आपल्या ध्यानी आल्यावाचून राहाणर नाही, अशी मला आशा वाटते. मराठ्यांनी आमच्याशी मैत्रीचे ढोंग करून आमच्या प्रदेशावर स्वारी केली. मी आपणाला लिहिलेल्या मागील पत्रात सर्व परिस्थिती विशद केली असल्याने ह्या पत्रात तिची पुनरूक्ति करण्याची आवश्यकता नाही असे मला वाटते. तेव्हा ह्या आणीबाणीच्या प्रसंगी आपणाकडून आम्हाला जेवढी मदत मिळेल तेवढी हवी आहे. आपणाकडून होणारे उपकार मी जन्मभर विसरणार नाही. आमच्या स्वामीनाही मी आपले आभार मानण्याबद्दल कळवीन.

आपण माझे आणखी एक काम केले पाहिजे. मी आपणाकडे ह्या पत्रासोबत जी पत्रे पाठवीत आहे, ती आपण तिथून निघणाऱ्या पहिल्या जहाजावर लिस्बनला राज्यसचिवांकडे पाठविण्याची व्यवस्था केली पाहिजे, किंवा पोर्तुगिजांच्या मालकीच्या एकाद्या बेटावरही जरी ती पोहोचती केलीत तरी चालेल. आणि माझ्या हातून आपली काही सेवा घडायची असल्यास ती करण्यास मला आनंद होईल".

गोवा, २५ मे १७३७

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., VOL. III, PART V.
पत्र क्र. २६, पृ. ३९ ४०

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(23) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 16V.

पत्र क्र. २७

पाँडिचेरीचे गव्हर्नर आणि तिथल्या वरिष्ठ राज्यसभेचे सदस्य ह्यांना उद्देशून व्हाइसरॉयने लिहिलेले पत्र :—

"पाँडिचेरीचे गव्हर्नर आणि वरीष्ठ सभेचे सदस्य ह्यांस—

ह्या राज्यावर शत्रू मराठ्यांनी मागे एकदा स्वारी केली तेव्हा आपणाकडून आम्हाला मदत झाली होती, आणि आपल्या माहे शहरावर हल्ला झाला तेव्हा आपण ह्या शहराकडून मदत मागविली होती, आता आम्हाला आपणाकडून पुन: मदत हवी आहे. मराठ्यांनी आमच्याशी तहाची बतावणी करून आमच्या प्रदेशावर हल्ले चढविण्यास सुरूवात केली आहे. तरी ह्या प्रसंगी आम्हाला आपणाकडून जेवढी मदत मिळेल तेवढी हवी आहे. मी शत्रूला हटविण्यासाठी वेगवेगळ्या ठिकाणांहून सैन्य गोळा केले आहे. आपली मदत मिळाल्यास माझी योजना मला त्वरीत अमलात आणणे शक्य होईल.

ज्याअर्थी, शत्रूने मोठ्या सैन्यानिशी आक्रमण केले आहे, व काही महत्वाची ठाणी त्याच्या हाती पडली आहेत त्याअर्थी, त्याला तिथून हुसकून लावण्यासाठी मोठ्या प्रयत्नाची शिकस्त करणे जरूरीचे आहे. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपणाला आम्हास जेवढी मदत करणे शक्य असेल तेवढी करावी. मदत माणसांची तशीच दारूगोळ्याची आणि हत्यारांचीही हवी आहे. ही मदत मला तातडीने हवी आहे. कारण, गेल्या वर्षी मी देशाहून मदत घेऊन येणाऱ्या ज्या नौकांची वाट पाहात होतो, त्या नौका अद्याप आलेल्या नाहीत, अशा परिस्थितीत शत्रूने आमच्यावर आकस्मिकपणे स्वारी केल्याने आमच्या अडचणीत मोठीच भर पडली आहे. आमच्यापाशी जो सांप्रत पुरवठा आहे, तो आमची योजना अमलात आणण्यास पुरेसा नाही. त्यात पुन: मला अशी भीती वाटते की, येत्या मोसमात ज्या नौका देशाहून यायच्या आहेत त्या आल्या नसल्यास आमच्या अडचणी पुष्कळच वाढणार आहेत. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपण जी मदत आम्हाला पाठविणार आहात ती सप्टेंबर महिन्यापर्यंत पाठवावी. म्हणजे मला उत्तरेकडील प्रदेशातील माझी संकल्पित मोहीम ऑक्टोबर महिन्यात सुरू करणे शक्य होईल.

ह्या मोहिमेचे यश तिच्या शीघ्रतेवर अवलंबून आहे. म्हणून मी आपणाकडे जो हा जासूद पाठवीत आहे, त्याच्याकडे आपण आम्हाला काय मदत पाठविणार आहात ते कळवावे. आपण किती माणसे पाठविणार आहात, ती कोणत्या दर्जाची, त्यांचा मुशाहिरा काय, बंदुका किती, आणि दारूगोळा

किती पाठविणे शक्य होईल, ही सर्व माहिती आम्हाला आगाऊ कळविण्याची, कृपा करावी. आणि ही मदत आपण आपल्या जहाजातून पाठविणार की त्या किनाऱ्यावर वाहतूक करणाऱ्या जहाजांतून पाठविणार तेही कळवावे आपण आम्हाला दोन हजार घडे दारू पाठवावी आणि हा पुरवठा आपण आपल्या माहे बंदरातून जर पाठविला तर तो इकडे लवकर पोहोचू शकेल. कारण, माहे बंदर इकडून जवळ आहे. आणि जर तिकडे जहाजे नसली तर, मी ती इकडून पाठवू शकेन. ह्या संबंधी मी माहेच्या गव्हर्नरना आजच पत्र लिहीत आहे. आम्हाला शिपाईही पुष्कळ हवे आहेत. शिपाई नसल्यास खलाशीही चालतील. कारण, मी ज्या नौका स्वारीवर पाठविण्यासाठी गोळा करीत आहे त्यांच्यावर काम करणारे पुरेसे खलाशी माझ्यापाशी नाहीत.

आपणाकडून आम्हाला जो माल मिळणार आहे त्याची किंमत मला जाणून घ्यायची आहे. तसेच ही रक्कम आपणाला इकडे हवी आहे की, अन्य कुठल्या ठिकाणी हवी आहे, तेही आपण मला ताबडतोब कळविले पाहिजे. शेवटी मी आपणाला पुनः एकदा कळवीत आहे की, आपण आम्हाला जास्तीत जास्त मदत पाठवावी. मदतीबद्दल मी आपला सदैव ऋणी राहीन व माझे स्वामी जे पोर्तुगालचे राजे त्यांनाही आपल्या राजाचे आभार मानण्याबद्दल कळवीन.

देव आपणा सर्वांचे पुष्कळ वर्षे रक्षण करो".

गोवा, २५ मे १७३७

आपला सर्वांचा सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I. VOL. III, PART V.

पत्र क्र. २७, पृ. ४०-४३

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(27) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 15.

पत्र क्र. २८

व्हाइसरॉय माहेच्या गव्हर्नरला कळवितो की, त्याने पाँडिचरीच्या गव्हर्नरकडे आणि राज्य सभेकडे मराठ्यांविरुद्ध मदत मागितली आहे.

"माहेचे गव्हर्नर ह्यांस—

मी पाँडिचेरीच्या गव्हर्नरना आणि वरिष्ठ सभेच्या सदस्यांना विनंती केली आहे की, त्यांनी आम्हाला माणसे, दारूगोळा, त्याचप्रमाणे हत्यारे वगैरे

सर्व प्रकारची मदर करावी. कारण, पावसाळा संपला की; मी मराठे शत्रूंना आमच्या प्रदेशातून हाकलून लावण्यासाठी ठिकठिकाणाहून जी मदत मी गोळा करीत आहे, त्या मदतीत ह्या मदतीची भर पडल्याने आमची योजना लवकर अमलात येऊ शकेल.

मराठ्यांशी आमचा तह झालेला होता. पण त्याचा भंग करून त्यानी आमची बरीच ठाणी घेतली. ज्या बंदरात आपला कारभार चालू आहे ते बंदर ह्या शहरापासून जवळ असल्याकारणे आणि ह्या शहराचे आणि त्याचे मैत्रीचे संबंध असल्याने आम्हाला तिकडून मदत लवकर मिळण्याची मी आशा करतो. मी गेल्या मोसमात देशाहून येणाऱ्या नौकांची वाट पाहात होतो. पण त्या आल्या नाहीत. आणि येत्या मोसमात तरी त्या येतील की काय ह्याची मला शंका वाटते. म्हणून मला सर्व प्रकारची काळजी घ्यावी लागत आहे. तरी आपणाकडे मी जो जासूद पाठवीत आहे त्याच्याकडे आपण आम्हाला किती मदत देऊ शकाल ते कळवावे. आपण जी मदत पाठवाल ती सप्टेंबर महिना अखेर आली पाहिजे. कारण, ऑक्टोबर महिन्यात मला उत्तरेकडील प्रांतात सैन्य पाठवावयाचे आहे. आणि ही मोहीम जितकी झटपट उरकली जाईल तितकी ती अधिक यशस्वी होईल. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपण आम्हाला किती मदत पाठविणार आहात ते ह्या जासुदामार्फत कळवावे. आपण आम्हाला किती माणसे; किती दारू-गोळा आणि किती बंदुका पाठविणार आहात ते मला अगोदर जाणून घ्यायचे आहे. तसेच हा माल आपण आपल्या जहाजांनी ह्या बंदरात पाठविणार आहात की तो आणण्याकरता आम्हाला आमची जहाजे पाठवावी लागणार आहेत तेही कळलेले बरे. त्याचबरोबर मला ह्या मालाची किंमत आणि माणसांचा मुशाहिरा जाणून घ्यायचा असून मालाची किंमत आपणाला त्या शहरी पाहिजे की, आणखी कुठे पाहिजे तेही कळविण्याची कृपा करावी.

हत्यारी लोकांशिवाय मला लष्कराची अथवा खलाशांचीही फार गरज आहे. हे खलाशी मला माझ्या नौकांवर काम करण्यासाठी हवे आहेत. ह्या नौका मी पावसाळ्यात सज्ज करणार आहे. आपण आम्हाला ही मदत पाठवून उपकृत केल्यावाचून राहाणार नाही, ह्याची मला आशा आहे. आपले उपकार मी कधीच विसरणार नाही, इतकेच नव्हे तर, आमच्या महाराजांनाही मी आपल्या महाराजांचे आभार मानावयास लावीन.

माझे आपण आणखी एक काम केले पाहिजे. मी ह्या पत्रासमवेत जी पत्रे पाठवीत आहे ती तिथून युरोपला निघणाऱ्या पहिल्या जहाजावर पाठविण्याची कृपा करावी. ही पत्रे लिस्बन शहरी राज्यसचिवांना पोहोचती



व्ही ५५५८–२८अ

करायची आंहेत. ती लिस्बनला पोहोचती करणे शक्य नसल्यास पोर्तुगालच्या मालकीच्या एकाद्या बेटावर पोहोचती केली तरी चालेल.

माझ्या हातून आपले एकादे काम व्हायचे असल्यास ते करण्यास मला आनंद वाटेल.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २५ मे १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

क्र. २८, पृ. ४२-४३

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(28) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 14.

पत्र क्र. ३०

व्हाइसरॉय सिद्दीला लिहिलेल्या पत्रात त्याने मराठ्यांविरुद्ध पोर्तुगिजांना मदत देऊ केल्याबद्दल त्याचे आभार मानतो.

काल चौलहून आलेल्या गलबतावर आपण २० एप्रिलला लिहिलेले पत्र मिळाले. हे पत्र इतके दिवस कुठे अडकून पडले ते कळण्याचा मार्ग नाही. जवळ जवळ एक महिन्याने ते इकडे आले. ह्या पत्राबरोबर वली अहमद हे का आले नाहीत तेही मला कळत नाही. आपण पत्रात म्हणता की, त्यांना माझ्याशी बोलणी करण्यासाठी व नजराणे अर्पण करण्यासाठी पाठविण्यात येत आहे. ते इकडे पोहोचले नाहीत म्हणून चौलच्या ठाणेदाराने ते पत्र माझ्या-कडे पाठवून दिले.

आपले आरोग्य उत्तम असल्याचे वाचून आनंद झाला. त्याचप्रमाणे माझ्याविषयी आपणाला जे प्रेम वाटते त्याबद्दलही मी आपला आभारी आहे. जुन्या अनुभवावरून ह्या मैत्रीविषयी मी मोठा विश्वास बाळगून आहे. त्यात इमानीपणा आणि सचोटी आहे. आपल्या वाडवडिलांची आणि ह्या राज्याची जी मैत्री होती ती ह्याच गोष्टींवर आधिष्ठित झालेली होती. काही दिवसा-मागे मी आपणाला जे पत्र लिहिले त्यात ह्या गोष्टीचा निर्देश केला आहे. ते पत्र आपणाला एव्हाना मिळालेच असेल.

आमच्या उत्तरेकडील प्रदेशात दगलबाजीने आक्रमण करणाऱ्या मराठे शत्रूविरुद्ध आपण मला जी मदत देऊ केली आहे, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. त्याचप्रमाणे शत्रूने काबीज केलेल्या प्रदेशात त्याने तटबंदी

करून तेथे आपला पाय घट्ट रोवण्यापूर्वीच तिकडे शक्य तितक्या लवकर सैन्य देऊन मोठे आरमार पाठवावे असा जो सल्ला आपण मला दिला आहे त्याबद्दल मी आपला आभारी आहे. परंतु शत्रूने ही दगलबाजी भलत्यावेळी केली आहे. त्याचे कारण हे की, त्या भागात आरमार पाठविण्यास वारा अनुकूल नसल्याने प्रवास कठीण होऊन बसला आहे. दुसरी गोष्ट अशी की, मला विजयाची बातमी कळल्यावर मी माझी बहुतेक सर्व जहाजे दक्षिणेच्या आरमाराबरोबर पाठवून दिली. ते आरमार मोठ्या हालअपेष्टा सहन करून काही दिवसांनी इकडे येऊन पोहोचले. मुख्य त्रास हा विरुद्ध दिशेच्या वाऱ्याचा होता. ह्या कारणामुळे मला आपण जी सूचना केली होती तिचा विचार करणे शक्य झाले नाही. तथापि, ईशकृपेने जी माणसे मी आपल्या माणसांबरोबर पाठविली आहेत की जी सुरतेहून वसईला पोहोचल्याची बातमी मला कळली आहे, ती माणसे पावसाळ्यापर्यंत काहीतरी करू शकतील असे मला वाटते. पावसाळ्यानंतर शत्रूला चांगला धडा शिकविण्याचा मी विचार करीत आहे. आणि प्रभूकृपेने शत्रूला त्याच्या दगलबाजीबद्दल चांगली अद्दल मी घडवू शकेन असे मला वाटते. ह्या शिक्षेत आपलाही वाटा मोठा असेल असे मी धरून चालतो. आमच्या ह्या समायिक शत्रूचा कायमचा नाश व्हावा हीच माझी इच्छा आहे. मला बातमी कळली आहे की, जनरल आंतोनियु कार्दिम फ्रॉइश हे मुंबईला पोहोचले आहेत. आम्हाला ह्या प्रसंगी जे काय करणे शक्य आहे ते आपणाला कळविण्याची सूचना मी त्यांना दिली आहे. आणि ज्याअर्थी, ते आपले मित्र आहेत त्याअर्थी, अंतीम विजय मिळावा म्हणून आपण दोघे सल्ला मसलत करून काय ते ठरवाल अशी मला आशा आहे.

इकडून मी चौलला भाताचे काही कोठिये पाठविले होते. परंतु वारा प्रतिकूल असल्याने काही कोठिये इकडेच अडकून पडले. तरी माझी आपणाला विनंती आहे की, चौलच्या शिबंदीला अन्न टंचाई भासल्यास आपण त्यांना आवश्यक ती रसद पावसाळ्यापर्यंत पुरवावी. पावसाळा संपल्यावर मी चौलला मुबलक रसद पाठविणार आहे. देव आपले रक्षण करो.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, २६ मे १७३७ कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART I.

पत्र क्र. ३०, पृ. ४५—४६

संपादक—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

पत्र क्र. ३१

व्हाइसरॉय चौलच्या किल्लेदारास वसईतील मराठ्यांच्या मोहिमेसंबंधाने लिहितो :—

"पेद्रु द मेलु ह्यांस—

परवा दि. २५ ला आपली पत्रे घेऊन आलेले चौलचे एक गलबत इकडे येऊन पोहोचले. त्यातील एक पत्र आपण चौल येथे दि. १२ ला लिहिलेले असून उरलेली दोन दि. १९ ला मुंबई येथे लिहिलेली आहेत. त्या पत्रावरून कळून चुकते की, आपला प्रवास सुखकर झाला. हवा प्रतिकूल असून देखील आपणाला काही त्रास झाला नाही ह्याबद्दल देवाचे आभार मानले पाहिजेत. मला आशा आहे की, ज्याअर्थी, आपला प्रवास चांगला झाला आहे त्याअर्थी, आपल्या हातून पुढे जी कामगिरी व्हायची आहे तिची ही चांगली सुरुवात आहे. ..............................

..............................................

इंग्रजांची मदत आम्हाला फायद्याची ठरेल. प्रभूकृपेने आम्हाला यश आल्यावाचून राहाणार नाही. आणि ज्याअर्थी, जनरल आंतोनियु कार्दिम फ्रॉइश हे मुंबई येथे दि. २० ला पोहोचले आहेत, त्याअर्थी, त्यांना तिथल्या सर्व घडामोडी कळल्यावाचून राहाणार नाहीत असे मला वाटते. कारण त्यांच्याकडून आम्ही ज्या मदतीची अपेक्षा करीत आहोत, त्यावरून आम्हाला येत्या वर्षीच्या मोहिमेसाठी इतर भागातून किती मदत गोळा करता येईल याची कल्पना होईल. आणि पोर्तुगीज सैन्य वसईला पोहोचले की, त्यांनी मला ह्याबाबतीत सल्ला दिल्यास सोयीचे होईल.

साबाजचा पाडाव ही एक दुर्दैवी घटना आहे. इंग्रजांच्या मदतीने हे अरिष्ट टाळता आले असते. आपण कारंजाला मदत पाठविलीत ते चांगले केलेत. कारण शत्रूचा त्याच्यावर डोळा असणे साहजीक आहे. आणि पुनः आंग्र्यांकडून मराठ्यांना मदत होत आहेच. आपण वर्सोवालाही मदत पाठविलीत ते चांगले केलेत. तिकडे पिण्याचे पाणी भरण्याच्या पिंपांची टंचाई आहे हे कळले. फ्रान्सिश्कु द कुन्य हे ती वसईहून मागवितील असे मला वाटले होते. पावसाळ्यात जर पावसाच्या पाण्याचा उपयोग होऊ शकला नाही तर, त्या ठाण्याला धोका आहे.

फ्रान्सिश्कु द कुन्य हे शिपायांना वाईट वागणूक देतील हे मला माहीत होते. कारण त्यांचा स्वभाव तसाच आहे. आपण त्या दोघांना इकडे पाठविले आहे. ते आपले कर्तव्य पार पाडतील अशी आशा आहे. आणि असे घडावे अशी माझी इच्छा आहे.

चौल, मुंबई, कारंजा आणि बांदोडा येथून मला बातम्या कळविण्याची आपण जी व्यवस्था केलीत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आणि वसई सर्व अडचणींवर मात केल्यावाचून राहाणार नाही ह्याची मला खात्री आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २७ मे १७३७. कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ३१, पृ. ४६—४८

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(31) LIVRO DE BACAIM, No. 6, FLS 157.

पत्र क्र. ३३

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात त्याला मराठ्यांविरुद्ध चिथावणी देतो.

"आपली दोन्ही पत्रे मिळाली. त्यातील पहिले १३ चे असून दुसरे १७ चे आहे. पहिले, ज्या नौकेने मी ज्या अधिकाऱ्यांना इथून पोर्तुगालला पाठविले त्या नौकेने आणले, तर दुसरे, दुसऱ्या एका नौकेवर आले. ह्या नौकेवर मी पेद्रु द मेलु ह्यांना सैन्य देऊन उत्तरेकडील प्रांतात पाठविले होते.

आमच्या उत्तरेकडील प्रांताच्या रक्षणासंबंधाने आपणाला केवढी उत्कंठा वाटते ते आपल्या दोन्ही पत्रांवरून कळून येते. तसेच आपल्या मनात जे काय आहे ते, आपण कृतीत उतरविण्यास असमर्थ आहात हे आपल्या पत्रावरून कळून आले. आपल्या बेटाच्या रक्षणाची जी जबाबदारी आपणावर सोपविण्यात आली आहे, ती आपण पार पाडली पाहिजे, हे जरी खरे असले तरी, शत्रूला आपण आपल्या बेटानजीक थारा देता कामा नये हेही तितकेच खरे आहे. कारण तो जवळ असल्याने आपणाला जेवढी चिंता वाटणार आहे, तेवढी चिंता तो दूर असल्याने वाटणार नाही.

अशा परिस्थितीत मला आशा आहे की, आपण ह्या प्रश्नासंबंधी योग्य तो विचार कराल, आणि आपला विचार ठाम झाला की, आपल्या बेटाच्या रक्षणासाठी आपल्या राज्यात जी साधने आहेत, तीच तेवढी उपयोगात आणण्याचा आपण विचार कराल अशी मी अपेक्षा करतो. आपण आमच्या

उत्तरेकडील प्रांताच्या मालकीच्या गलबतांचा ह्या कामी उपयोग करू नये. जी गलबते की, ज्यांनी आपल्या बेटांचा आश्रय घेतला आहे. कारण, पेद्रु द मेलु ह्यांनी मला कळविले आहे की, ह्या गलबतांचा त्यांनी वाहतुकीसाठी उपयोग करण्याचे ठरविले असता आपण त्यांना तसे करू दिले नाही. वसईच्या रक्षणासाठी व शत्रूविरुद्ध नद्यांतून वाहतूक करण्यासाठी ह्या गलबतांची फार आवश्यकता आहे.

साबाजचा पाडाव माझ्या मनाला फार लागला आहे. कारण, हे ठाणे मोक्याचे आहे, हे तर झालेच, परंतु जी माणसे त्याचा बचाव करीत होती, ती सर्व शूर होती. शत्रूने हे ठाणे कुमक येण्यापूर्वीच काबीज केले.

वर्सोवाच्या बचावाचे श्रम कायतानु द सौझ पेरैरा ह्यांना दिले पाहिजे. दुर्दैवाची गोष्ट ही की, ते जखमी झाल्याने त्यांना माघार घ्यावी लागली. त्यांना आपण जी मदत दिलीत ती फार मोलाची आहे, ह्यात शंका नाही. ह्या मदतीबद्दल मी आपले आभार मानीत आहे. आपल्या मदतीमुळे ते जिवावरच्या संकटातून बचावले ह्याचाच मला आनंद वाटतो.

ज्याअर्थी, आपण पेद्रु द मेलु ह्यांच्याशी उत्तरेकडील प्रांताच्या परिस्थितीबाबत विचार विनिमय केला आहे त्याअर्थी, उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची व आपली ह्या प्रश्नाबाबत मुलाखत होण्याची आवश्यकता नाही. मला बातमी कळली आहे की, जनरल आंतोनियु कार्दिम फ्रॉइश हे चालू महिन्याच्या दि. २० ला मुंबईस पोहोचले.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो.".

गोवा, २८ मे १७३७.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ३३, पृ. ४९
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.
(33) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 13.

पत्र क्र. ३४

गोवा राज्याचा सचिव वाडीच्या सावंतांचे एक कारभारी श्री. पांडुरंग विश्राम शेणवी ह्यांना लिहितो की, मराठ्यांविरुद्ध उत्तरेकडील प्रांतात लढण्यासाठी डिचोली व कुडाळ येथून माणसे येतील अशी आशा आहे.

"पांडुरंग विश्राम शेणवी, डिचोली, ह्यांस—

आपल्या पत्राचे उत्तर आज पाठवीत आहे. उत्तर लवकर पाठविता आले नाही, कारण, मी कामात गुंतलो होतो. त्यामुळे पत्राचे उत्तर लवकर पाठविणे शक्य झाले नाही. आता अनायसे फोंडा येथील किल्ल्यातील लष्करी शिपायांवरून आपणाला लिहिण्याचा योग आला. ते लष्करी सैनिक फोंड्याच्या किल्ल्यात जाऊन इकडे आश्रयार्थ आले. आपल्या पहिल्या पत्राची मी पोच दिली असल्याचे मला आठवत नाही. माझ्याविषयी आपण जे प्रेम दाखविलेत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. यापुढे आमच्या स्नेहाची वृद्धी व्हावी अशी इच्छा आहे.

आपणाला माहीत आहेच की, आमच्या उत्तरेकडील प्रांतात सांप्रत युद्ध चालू आहे. चिमणाजी अप्पा ह्यांनी मराठे व इंग्रज ह्यांच्यामधील तहाचा भंग करून दगलबाजीने आमच्या प्रदेशांत आक्रमण केले. ते आक्रमण हटविण्यासाठी उन्हाळ्याच्या सुरूवातीला एक मोठे आरमार सैन्य भरून तिकडे पाठविण्यात येणार आहे. नामदार व्हाइसरॉय कौंट द सांदोमिल ह्यांनी अनेक भागांतून सैन्य गोळा करण्याची मोहीम सुरू केली आहे. त्यांना आशा आहे की, डिचोली आणि कुडाळहून माणसे आल्यावाचून राहाणार नाहीत. त्याचप्रमाणे आपले सरदेसाई (सावंत) हे आणि आपणही ह्या कामी हातभार लावल्याखेरीज राहाणार नाही. जे लोक कुडाळ आणि डिचोलीहून आमच्या उत्तरेकडील प्रदेशात लढावयास जातील त्यांना ह्या राज्याकडून पगार मिळेल. ह्या लोकांना रेड्डीच्या अथवा दुसऱ्या कुठल्याही बंदरात उत्तरेकडील प्रदेशात जाण्यासाठी जहाजात बसण्याची परवानगी असावी.

देव आपले रक्षण करो."

गोवा, १५ जुलै . १७३७

आफाँस दांताश

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ३७ पृ. ५५

संपादक :— A. B. DE BRAGANCA DEREIRA.

(37) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 26.

पत्र क्रमांक ३८

व्हाइसरॉय माहेच्या गव्हर्नरला पत्र लिहून दारूगोळ्याच्या मदतीची मागणी करतो.

"माहेचे गव्हर्नर मॉसिनॉर व्युनेल ह्यांस—

आपले गेल्या महिन्याच्या १८ तारखेचे पत्र मला मंगलोरमार्गे मिळाले. त्यात मॉ. ................ ह्यांच्या मृत्युचा उल्लेख आहे. ........

...........................................................

एका जंगली आणि दगलबाज शत्रूला शासन करण्यासाठी मी आपणाकडे माणसे, दारूगोळा व शस्त्रे ह्यांची मदत मागितली होती. आपल्याकडून मला ह्या मदतीचे आश्वासन मिळाले ह्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. ह्या वर्षी काही अनपेक्षित घटनांमुळे मला दारूची टंचाई भासत आहे. तरी जी दारू मला आपण मदत म्हणून पाठविणार आहात, त्या दारूशिवाय मला आपण कितीची दारू विकत देऊ शकाल ते मला आपणाकडून जाणून घ्यायचे आहे. आणि आपण मला हे लवकर कळवावे अशी माझी आपणाला विनंती आहे. तसेच ती दारू मला आपण कशी पाठविणार तेही कळवावे. माझ्या पहिल्या पत्रात मी ह्या बाबतीत आपणाला सविस्तर लिहिलेच आहे. आता अधिक काही लिहिण्यासारखे नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, २२ जुलै १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III. PART V.

पत्र क्र. ३८, पृ. ५६

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(38) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 29.

पत्र क्रमांक ४०

व्हाइसरॉय सिद्दीला लिहितो की, उत्तरेकडील प्रदेशातून जे जासूद गोव्याला पाठविण्यात आले होते, त्यांच्यापैकी काहीजण मराठ्यांच्या ताबडीत सांपडले आहेत.

"सिद्दी याकुत खान ह्यांस—

अजूनपर्यंततरी उत्तरेकडील जासुदांचा पत्ता नाही. मला बातमी कळली आहे की, जे काहीजण तिकडून निघाले होते ते मराठ्यांच्या हाताला लागले आहेत. तिकडील परिस्थिती कशी काय आहे ते जाणून घेण्यास मी फार आतुर झालो आहे. तरी आपणाला तिकडील काही माहिती असल्यास

आम्हाला त्वरीत कळवावी. त्याचप्रमाणे आपण मला शिपायी व खलाशी ह्यांची किती मदत पाठवू शकाल तेही जाणून घ्यायचे आहे. मराठयांसारख्या दगलबाज, विश्वासघातकी आणि दुष्ट शत्रूला साष्टी बेटांतून हाकललेच पाहिजे. आपणाकडील तिकडील परिस्थितीचा वृत्तांत कळताच इकडून माणसे पाठविण्याची व्यवस्था करीन. कारण ही मोहीम सुरू करण्याची वेळ आलेली आहे. आणि जर आपण जनरल आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांच्याशी बोलणी केली असली, तर ती कोणत्या प्रकारची आहेत, ते मला जाणून घ्यायचे आहे. आणि मला आशा आहे की, आज आम्ही ज्या परिस्थितीत आहोत त्या परिस्थितीस अनुसरून आपण आमच्याशी वागल्याशिवाय राहाणार नाही. यशदाता परमेश्वर आहे. व त्याच्यावर माझा विश्वास आहे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो."

गोवा, २४ जुलै १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ४० पृ. ५८–५९
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.
(40) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9 FLS 30.

पत्र क्रमांक ४१

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहितो की, उत्तरेकडील प्रांताचा जो मुलुख मराठयांनी घेतला आहे, तो परत घेण्यासाठी मोहीम सुरू करण्याची आपली तयारी चालू आहे.

मुंबईचे सेनापती जॉन हॉर्न ह्यांस—

तेलीचेरी येथून आपणाकडे पत्रे घेऊन चाललेल्या प्रस्तुत जासुदांकडे मी आपणाला निरोप पाठवीत आहे की, मे महिन्यातील शेवटच्या गलबतावर आलेल्या आपल्या पत्राशिवाय मला आपले आणखी पत्र आलेले नाही. त्यामुळे मला अद्याप तिकडील खऱ्या बातम्या कळलेल्या नाहीत. तशा इकडे अनेक अफवा पसरल्या आहेत, व त्यातील काही आनंदाच्याही आहेत. पण त्यावर मी विश्वास ठेवू शकत नाही. फक्त एकाच गोष्टीवर मी विश्वास ठेवू शकतो. आणि ती म्हणजे वाटेत जासूदांना पकडल्याची. तसे नसते तर जासूद इकडे कधीच येऊन पोहोचले असते. त्यांनी मला तिकडील बातम्या वरचेवर कळविण्याचे कबूल केले होते.

येत्या ऑक्टोबर महिन्यात मी उत्तरेकडील प्रदेशात जी लष्करी मोहीम सुरू करण्याचा बेत आखला आहे त्या मोहिमेची तयारी करण्यात मी सांप्रत गुंतलो आहे. मी माझा एकही क्षण वाया दवडीत नाही. ह्या मोहिमेत मला आपली आणि सिद्दीची मदत होणार आहे. सु ाबद्दल मी निश्चित आहे. शिवाय दीव आणि दमण येथील माणसेही मला मदत करणार आहेत. देवाने मला सुयश द्यावे अशी माझी त्याच्यापाशी प्रार्थना आहे. तोपर्यंत मला आपणाकडून मराठ्यांविषयींची आणि बाजीरावाच्या हिंदुस्थानातील विजयाची माहिती जाणून घ्यायची आहे. कारण, इकडे वेगवेगळया प्रकारच्या बातम्या उठत आहेत. कुणी म्हणतात बाजीरावाला जो पराभव भागे खावा लागला त्याचे उट्टे त्याने ह्या वेळी काढले. ह्या विजयाने त्याचा मोठाच फायदा झाला आहे असे लोक बोलतात. आणि मोगल बादशहा ········ ··········काळयाविरुद्ध बाजीरावाला ··············· देऊ केले आहे. आणखी एक अशी बातमी आहे की, बाजीरावाने बादशहाचा जो अपमान केला त्याचा सूड घेण्यासाठी त्याने प्रचंड सैन्य गोळा केले आहे, इतकेच नव्हे, तर किलिचखानाला आपल्या शत्रूचे पारिपत्य करण्याचाही हुकूम त्याने केला आहे. किलिचखानाने ह्या मोहिमेस सुरुवात केल्याचीही बातमी आहे.

ह्या बातम्यांवर माझा विश्वास बसत नसल्याने यांचा खरेखोटेपणा बघण्यासाठी मी माणसे पाठविली आहेत. परंतु ती इकडे लवकर परतण्याची शक्यता नाही. त्यांच्यापूर्वी आपल्या बातम्या लवकर येतील असा मला भरवंसा वाटतो. आणि म्हणून मी आपणाला हे पत्र लिहीत आहे. मी जी मोहीम सुरू करीत आहे, तिजसंबंधीही मला आपला सल्ला हवा आहे. तसेच ह्या मोहिमेत आपण आम्हाला किती माणसांची मदत करणार आहात तेही मला जाणून घ्यायचे आहे. देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो, वगैरे."

गोवा, ६ ऑगस्ट १७३७

ता. क. प्रस्तुत पत्रासोबत जात असलेली पत्रे चौल आणि वसईला पोहोचती करावी अशी विनंति आहे.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ४१, पृ. ५९–६०

संपादक :—

A. B. DE BRAGANC PEREIRA.

(41) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 31.

पत्र क्र. ४२

व्हाइसरॉय पोर्तुगिजांच्या सुरत येथील वकिलाला लिहितो की, मराठयांशी पोर्तुगिजांच्या बाजूने लढण्यासाठी सुरतेहून ५०० माणसे आली आहेत.

"मोझेस तोबिअस ह्यांस--

आपणाला मी जी पत्रें लिहिली होती, त्यांची उत्तरे घेऊन जासूद इकडे येऊन पोहोचले आहेत .......................................
आपल्या त्याच पत्रावरून कळले की, कॅ. मानुएल मेंदिश द लेमुश व दमणच्या ठाण्याचे कॅप्टन ह्यांच्या मार्फत मी आपणाला जी पत्रें पाठविली होती, ती आपणाला मिळाली, त्याचप्रमाणे दीवच्या किल्लेदाराला पोहोचती करण्यासाठी मी आपणाकडे जी पत्रें पाठविली होती, तीही आपणाला मिळाली असून ती आपण त्या सकाळी रवाना केली असल्याचेही कळले. पेद्रु द सिल्वा ह्यांना पाठविलेले पत्र त्यांना सुरक्षितपणे पोहोचवावे अशी इच्छा आहे. तसेच त्या पत्राचे उत्तरही मला सुरक्षितपणे मिळाले पाहिजे.

सुरतेहून जे ५०० शिपाई आले आहेत त्याबद्दल सुरतेच्या नबाबाचे आभार मानले पाहिजेत. कारण त्यांच्याच सदिच्छेने ही माणसे आली आहेत. उत्तरेकडील प्रांतात आणखी माणसांची अथवा सामानाची आवश्यकता असल्यास सुरतेचे नबाब त्याची तरतूद केल्याचून राहाणार नाहीत अशी मला आशा आहे. माझी आपणाला शिफारस आहे की, आपणाला सुरत येथे दारू आणि डचांकडे वस्त्रें खरेदी करता आली तर आपण ती खरेदी करून टाकावी, किंवा त्या बंदरात हा माल मिळत नसल्यास इतर ठिकाणी शंभर खंडी दारू व दोनशे बंदुका खरेदी कराव्या. ह्या बंदुकांपैकी शंभर वसईला आणि शंभर दमणला पाठवाव्या. बाकीच्या वस्तु सुरत बंदरात फिगेटवर पाठविण्यासाठी तयार करून ठेवाव्या, किंवा वसईच्या एखाद्या नौकेवर त्या तिकडे पाठवून द्याव्या. सर्व बाबतीत आपण सुरतेच्या नबाबांची मदत घ्यावी.

आपल्या पत्रातील इतर मुद्यांची उत्तरे मी दुसऱ्या नौकेवर पाठवीन.

..................................................

देव आपले रक्षण करो."

गोवा, १६ ऑगस्ट १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ४३ पृ. ६०–६२
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(42) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 32.

व्हाइसरॉय वसईतील घडामोडी पोर्तुगालला राज्याच्या मुख्य सचिवाला कळवितो :

राज्य सचिव दियोग मेंदिस कोर्त रैआल ह्यास—

माझ्या आदल्या पत्रात लिहिल्याप्रमाणे शत्रूने साष्टी बेटावर स्वारी करून वसईच्या किल्ल्यावर हल्ला केल्यावर पार्सिकचा किल्लाही शत्रूच्या हाती पडला. परंतु ह्या किल्ल्याने शत्रूला चांगलेच तोंड दिले. त्यांतील पाण्याचा सांठा संपल्यामुळे तो शत्रूच्या स्वाधीन करणे भाग पडले. चार बालेकिल्ले असलेल्या सैबाणच्या जलदुर्गानेही शत्रूचा अखेरच्या क्षणापर्यंत प्रतिकार केला. शेवटी दारूगोळा संपल्यामुळे तो शत्रूच्या हातात पडला. ह्या ठाण्याकडे वसईहून दारूगोळा पाठविता आला असता परंतु त्याला शत्रूने वेढा घातल्यामुळे तसे करता आले नाही.

जोपर्यंत वसईचे बंदर उघडे होते, तोपर्यंत मला तिकडच्या बातम्या कळत असत. पण ते बंद झाल्यापासून बातम्या कळेनाशा झाल्या आहेत. वसईहून जे जासूद बातम्या घेऊन माझ्याकडे निघाले होते, ते मराठ्यांच्या हाती पडले. फक्त दमण आणि दीवचे जासूद वेगवेगळया वाटांनी इकडे निघाले म्हणून इकडे येऊन पोहोचले. त्यांच्याकडून कळले की, उत्तरेकडील सेनापतीने आग्वादच्या टेकडीवरून मराठयांना हुसकून लावले. ह्या लढाईत मराठयांची पुष्कळ माणसे कामास आली व त्यांचा सरदार ठार होऊन त्यांचे सूर्यपान आणि तुतारी पोर्तुगिजांच्या हातास लागली. परंतु मनोरा मराठयांच्या हातात पडल्याच्या बातमीने ह्या विजयावर पाणी पडले. हे ठाणे वसईहून कुमक येण्याच्या चार तास अगोदर पडले. त्यामुळे कुमक परत न्यावी लागली. हे ठाणे त्याच्या कॅप्टनने चांगले लढविले नाही, असे जरी गृहीत धरले तरी तारापोर आणि माहीम ह्या जिल्ह्यातील टेकड्या शत्रूच्या हाती पडल्या असून त्या जिल्ह्यात शत्रूचे आक्रमण सुरू झाले आहे.

काहीदा अशाही बातम्या उठत आहेत की, शत्रूने वसईवर हल्ला केला असता तो परतवून लावण्यात आला. ह्या हल्ल्यांत शत्रूची भयंकर प्राणहानी झाली. परंतु ह्या बातम्याना दुजोरा मिळत नाही. आणखी एक बातमी अशी आहे की, शत्रूने भद्रापूरवरील हल्ला सोडून दिला असून तो त्या ठाण्यापासून अर्ध्या कोसावर आहे.

साष्टी बेटावरील बातम्याही खऱ्या नाहीत. पण असे कळते की, वर्सोवाचा किल्ला शत्रूच्या संकटापासून मुक्त झाला आहे. शत्रूने ह्या किल्ल्यावर जो हल्ला केला तो परतवून लावण्यात आला. त्यात शत्रूची मोठीच प्राणहानी झाली. बांदोडाचे रक्षण इंग्रज करीत आहेत. ह्या किल्ल्यावर हल्ला झाला नसावा अशी माझी समजूत आहे. तथापि ठाणे नदीच्या काठावरून सर्व किल्ले शत्रूच्या हाती पडले आहेत. रैईश-मनगुशनचा किल्ला यत्किंचितही प्रतिकार न होता भ्याडपणाने शत्रूच्या हवाली करण्यात आला.

दमणवर हल्ला झालेला नाही. परंतु चोर दरोडेखोरांनी तिकडे धुमाकूळ घातला आहे.

इंग्रज आमचे शेजारी असल्याकारणाने त्यांची आम्हाला सहानुभूति आहे असे मला वाटते आणि म्हणून ते बांदोडाचे रक्षण करीत आहेत. त्यानी आमच्या पैशातून काही दारू वसईला पाठवून दिली आहे. त्यांचे सारे लक्ष त्यांच्या बेटाच्या रक्षणावर केन्द्रित झाले आहे. जोपर्यंत आमची परिस्थिती सुधारत नाही तोपर्यंत त्यांच्याकडून कोणत्याच गोष्टीची अपेक्षा करण्यात अर्थ नाही.

आमच्या उत्तरेकडील प्रदेशात आज परिस्थिती वर वर्णन केल्याप्रमाणे आहे. ह्या प्रदेशांत आजपर्यंत कधीही झाली नाही अशी धामधूम चालू आहे. तीन महिने झाले मी केवळ या प्रदेशाच्या रक्षणासाठीच नव्हे, तर मुक्ततेसाठीही पैसा मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे. आणि मला आपणास कळवायचे आहे, की मला हवा असलेला पैसा अद्याप मिळालेला नाही. पोर्तुगिज शिपायांचीही फार वाण आहे. ते अवघे ४६० आहेत. ह्या वर्षी मी देशाहून कुमकेची वाट पाहात आहे. गेल्यावर्षी आणि मे महिन्यात देखील देशाहून कुमक आली नाही. उत्तरेकडील प्रांताप्रमाणेच ह्या राज्याला देखील शत्रूच्या स्वारीचा धोका आहे. कदाचित आमची दृष्टि दुसरीकडे वळविण्यासाठी त्यांच्याकडून साष्टी आणि बार्देश ह्या दोन्ही प्रांतावर हल्ला होण्याचा संभव आहे. मी पोर्तुगीज सैनिकांची जागा लष्कर आणि शिपाई यानी भरून काढण्याचा विचार करीत आहे. परंतु हे लोक विश्वासू नाहीत. मला सर्वात मोठी चिंता लागून राहिली आहे ती दारूची. ही अडचण महसूल खात्याच्या प्रमुखानी निर्माण केली. मी आपणाला हे गेल्या वर्षीच्या मोसमात कळविलेच आहे, दारूच्या बाबतीत महसूल खात्याच्या प्रमुखाने हलगर्जीपणा केल्याचे कळताच मी रात्रंदिवस ती मिळविण्याचा प्रयत्न करून देखील मला जेवढ्या दारूची आवश्यकता आहे तेवढी दारू अद्याप उपलब्ध झालेली नाही. माझा सर्व भार आता देवावर आहे. तो आम्हाला शिक्षा देणारही आहे आणि आमचे रक्षण करणारही आहे. मला

आपणास सांगावयाचे आहे की, स्वामीनी जर आम्हाला आवश्यक असलेला पैसा पाठविला नाही तर युद्ध चालू राहिले असता तो पैसा इकडे उभारणे शक्य नाही.

अशा खिन्न परिस्थितीत आम्ही लढत आहोत. हितसंबंधित लोक त्यांची शेते उध्वस्त झाल्याने पार भिऊन गेले आहेत, इतके भिऊन गेले आहेत की, त्यानी ह्या युद्धाचे खापर दों. लुईज द बोतेल्यु ह्यांच्या माथी मारले आहे. ते साहजीकच आहे. ज्यावेळी देशात अशी परिस्थिती निर्माण होते तेव्हा त्याचा दोष राज्यकर्त्यांच्या माथी मारला जातो. काही पाद्रयांना मी उत्तरेकडील प्रांतासंबंधी लिहिले असता त्यानी दों लुईज द बोतेल्यु ह्यांची तिथून बदली करण्याचा मला सल्ला दिला. कारण, उपरिनिर्दिष्ट घटनेची बातमी ऐकून लोकांचा अधिकाऱ्यांवरील विश्वास उडाला. ज्याना युद्धास मदत करणे शक्य होते, त्यानी मदत केली नसती, कारण आपला पैसा फुकट जाईल अशी त्यांना भीति वाटली असती. आणि ज्या अर्थी दों लुईज द बोतेल्यु ह्यांच्यासारख्या अव्वल दर्जाच्या अधिकाऱ्याच्या प्रतिष्ठेचा हा प्रश्न होता त्याअर्थी त्यांच्याजागी आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची नेमणूक करण्याचे ठरविले.

मला वाटते आम्ही ज्या परिस्थितीत आहोत ती परिस्थिती आणखी विशद करण्याची जरूरी नाही. ती आपोआप उघड झालेली आहे. आपण ही सर्व परस्थिती महाराजांच्या कानावर घालावी.

देव आपले रक्षण करो."

गोवा, २० ऑगस्ट १७३७

पत्र क्र. ४३, पृ. ६२-६५

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
संपादक
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(43) LIVRO DAS MONSOES, No. 107, FLS 282.

पत्र क्रमांक ४४.

व्हाइसरॉय मुंबईच्या सेनापतीला, मुंबईला स्थानबद्ध असलेले एक फ्रिगेट गोव्यास पाठवून देण्याची विनंती करतो.

" मुंबईचे सेनापती ह्यांस—

मी आपणाला ६ ऑगस्ट रोजी पत्र लिहिले होते. तदनंतरचे हे पत्र आज दुसऱ्या मार्गे पाठवित आहे. कारण, मला आपलेही पत्र नाही आणि

वसईकडीलही नाही. ती पत्रे घेऊन एखादे गलबत येण्याची मी वाट पहात आहे.

गतसालाप्रमाणे यंदा हवामान चांगले असल्यास आपले आरमार ह्या भागात येण्याची शक्यता आहे काय? तसे असल्यास मुंबई बंदरात स्थानबद्ध असलेले नाशारेथ हे फ्रिगेट त्या आरमाराबरोबर पाठवून द्यावे. मी त्या फ्रिगेटचे कॅप्टन लेफ्टनंट ह्यांनाही ह्या संबंधात लिहीत आहे. व त्यांना आपल्या हुकुमाप्रमाणे वागण्याची सूचना देत आहे. आपण ह्या भागात आरमार पाठवीत नसल्यास मला तसे कळवावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २८ ऑगस्ट १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ४४, पृ. ६६ संपादक—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(44) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 33V.

पत्र क्रमांक ४७

व्हाईसरॉय माहेच्या गव्हर्नरला लिहितो की, गोव्याहुन तिकडे एक नौका पाठविण्यात येत आहे, तरी तिच्यावर मदत पाठवावी.

"माहेचे गव्हर्नर मॉ. ब्युनेल, ह्यांस—

आपल्या गेल्या महिन्याच्या ७ तारखेच्या पत्राचे हे उत्तर आहे. ते पत्र मला चालू महिन्याच्या ३ तारखेस मिळाले. चालू परिस्थितीत मी आपणाला जी मदत देऊ केली आहे, त्याबद्दल मी आपला आभारी आहे. आमच्यामधील जुन्या मैत्रीचा हा परिपाक आहे. ही मैत्री योग्य त्या शिष्टाचारानुसार चालू ठेवण्याचा मी प्रयत्न करीन.

लवकरच इकडून एक युद्धनौका तिकडे जात आहे. त्या नौकेवर ह्या पत्रात जात असलेल्या यादीप्रमाणे मदत पाठवाल अशी आशा बाळगतो आणि जर आपण मला दारूची मोठी मदत पाठविलीत तर मी आपला फार आभारी होईल. दारू प्रमाणेच शक्य झाल्यास हत्यारेही पाठविण्याची कृपा करावी. युद्ध नौकेवर मान्यवर फ्रेंच कंपनीच्या मालाची किंमत पाठवित आहे.

पाँडीचेरीची राज्यसभा व तिचा अध्यक्ष ह्यांनी मला पत्र लिहून मदत पाठविण्याची इच्छा दर्शविली त्याबद्दल त्यांचे मला आभार मानले पाहिजेत. त्यांनी आपल्याच नौकेने दारूगोळा इकडे पोहोचता करण्याचे आश्वासन दिले आहे. ही नौका १५ नवम्बर पर्यंत इकडे येऊन पोचणार आहे. त्या नौकेवर जो माल येणार आहे त्याची किंमत इकडेच चुकती केली जाणार आहे. त्यांना हे ज्ञात व्हावे म्हणून आपण ह्या पत्राबरोबर जात असलेले पत्र त्यांना शक्य तितक्या लवकर पोहोचते करावे.

मी पुनः एकदा आपले आभार मानून हे पत्र संपवितो.

देव आपले रक्षण करो."

गोवा, ६ सप्टेंबर १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ४७, पृ. ६८-६९ संपादक—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(47) LIVRO DOS REIS VIZINHOS, FLS 36.

पत्र क्रमांक ४९

व्हॉईसराय वसईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रांत पोर्तुगीज सैन्याने मराठ्यांना एका ठाण्यातून हुसकून लावल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करतो.

उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस—

चौलहून इकडे आलेल्या दोन गलबतांपैकी, एका गलबतावर मी आपणास चालू माहीच्या १२ तारखेस पत्र घातले होते. त्या पत्रात मी म्हटले होते की त्या गलबतावर आपण मला जी पत्रे पाठविली होती ती मला मिळाली. त्याचप्रमाणे त्या शहरातून आपण मला जी पत्रे रवाना केली होती, तीही मिळाली. ती पत्रे अनुक्रमे ३१ मे, २ जून १६ जुलै व चालू महिन्याच्या १, ५ ६ आणि ७ तारखेची आहेत. ह्या सर्व पत्रांची उत्तरे मी दोन मार्गांनी पाठवीत आहे. त्यातील एक मार्ग हा इथून निघणाऱ्या गलबतावरील असून दुसरा चौलकडील आहे.

मुंबईच्या सेनापतीचे आणि आपले जे खलबत झाले होते, त्याची बातमी कळली. त्या वाटाघाटीत जो निर्णय घेण्यात आला, तो मला कळविण्यात आलेल्या निर्णयाशी जुळता आहे.

आपण कारंजाला भेट दिल्याचे वाचून आनंद झाला. त्या ठाण्यात बंदोबस्त चांगला आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. मला आशा आहे की, ह्या ठाण्यावर जर शत्रूने हल्ला करण्याचा प्रयत्न केला तर प्रभुकृपेने तो हल्ला परतवून लावण्यात येईल. त्याबद्दल शत्रूला पश्चाताप झाल्यावाचून राहाणार नाही.

आग्वादच्या टेकडीवर शत्रू तटबंदी उभारीत असता आपण त्याला तिथून हुसकून लावले ही खरोखर कौतुकास्पद गोष्ट आहे. शत्रूने ही तटबंदी जर बांधून पूर्ण केली असती, तर ती आम्हाला फार हानिकारक ठरली असती. त्याबद्दल आम्ही देवाचे आभार मानले पाहिजेत.

आपण पत्रांत जे काय लिहिले आहे, तत्संबंधी मी इंग्रज सेनापतीस लिहीत आहे.

आपण म्हणता की, संभाजी आंग्रे ह्यांना आमच्या पक्षाला येऊन मिळ-ण्याचे पाचारण करण्यात यावे. पण ही गोष्ट इंग्रजांच्या हितसंबंधाना बाधा आणणारी आहे. कारण इंग्रज हे संभाजी आंग्रे ह्यांच्या भावाच्या पक्षाचे आहेत. दुसरी गोष्ट संभाजी आंग्रे ह्यांच्यावर कितपत विश्वास ठेवावा हाही प्रश्न आहे. कारण, त्यांना साताऱ्याहून बोलावणे आले असून ते तिकडे जाण्याचीही तयारी करीत असता त्यांना आमच्या पक्षास येऊन मिळण्यास पाचारण करणे संयुक्तिक ठरणार नाही. मला असे वाटते की संभाजी आंग्रे ह्यांना जे साताऱ्याला बोलाविण्यात येत आहे ते त्या दोघाबंधूमध्ये समझौता घडवून आणून मराठ्यांच्या योजनेला जुंपण्याकरता.

मराठ्यांनी वसईवर आकस्मिकपणे हल्ला चढविला तेव्हा तिथली परिस्थिती मी पाहिली होती. त्या किल्ल्यात पुरवठ्याची जी टंचाई निर्माण झाली ती उद्वेगजनक आहे. आपण तिथला पुरवठा घोडबंदराला हलवायला, जाळायला किंवा नदीत टाकून द्यायला नको होता. परंतु अशा आकस्मिक संकटाने मनुष्य भांबावून जाऊन त्याला काही न सुचणे स्वाभाविक आहे.

आपल्या ५ सप्टेंबरच्या पत्राचे उत्तर करताना मला आपणास पुनः सांगावयाचे आहे की, आग्वादच्या टेकडीवर तटबंदी करणाऱ्या शत्रूला हुसकून लावण्यात आपण जे यश मिळविलेत ते खरोखर कौतुकास्पद आहे. ह्यात शंका नाही. आपल्या विजयाबद्दल मी आपले अभिनंदन करतो व त्याचबरोबर आपले आभारही मानतो. ह्या मोहिमेत ज्यांनी पराक्रम गाजविला त्यांचेही मी अभिनंदन करतो. ज्यांचे वर्तन ह्याच्याविरुद्ध आहे त्यांना लष्करी शिस्तीनुसार शिक्षा व्हावी हे माझे मत आहे.



व्ही ५५५८-२९अ

मनोराच्या पाडावाबद्दल वाईट वाटले. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट ही की, आरमाराच्या कॅप्टनने चकमकीत भाग घेतला व त्यातून तो सहीसलामत बाहेर पडला. मी त्याचे अभिनंदन करतो. त्याने गायीच्या बेटावर हल्ला केला असता तर चांगले झाले असते. बहुधा आपण हा हल्ला केला नाही म्हणून त्याने तो केला नसावा. अथवा पावसाळा सुरू झाल्याने अथवा अन्य कोणत्याही कारणामुळे त्याला ते शक्य झाले नसावे. ज्या सेनाधिकाऱ्याने सांताक्रूझ टेकडी शत्रूच्या हवाली केली म्हणून त्याला आणि मनोराच्या कॅप्टनला कैद करण्याचा हुकूम आपण केलात ते चांगले केलेत. ह्या दोघा अधिकाऱ्यांना शिस्तभंगाबद्दल शिक्षा ही झालीच पाहिजे.

आपण पत्रात लिहिता की, दमणहून भात आणण्यासाठी दीवचे एक गलबत मागविण्यात आले असून व्यापारी पालेही तिकडून मागविली आहेत. त्यांचे रूपांतर युद्ध नौकांमध्ये होणार आहे. त्याचप्रमाणे वसईचे दुरुस्त केलेले पालेही मागविण्यात आले आहेत. ह्या पालासंबंधी मला सांगावयाचे आहे की, ह्या दुर्दैवी अपयशापूर्वी हे पाले दमणला दुरुस्त करण्यात यावे असा हुकूम मी पाठविला होता. मला वाटते हा हुकूम त्या ठाण्यात पोहोचला नसावा. कृपा करून देवाने दमणचे तिथले भाताचे पीक काढीपर्यंत रक्षण करावे अशी माझी त्याच्यापाशी प्रार्थना आहे. आपण ज्या बातम्या पाठविल्या आहेत त्यावरून शत्रूची मजल तिथपर्यंत जाईल असे वाटते. मला इतर ठिकाणाहूनही शत्रूच्या हालचालींची बातमी कळली आहे. त्यांची योजना काय आहे आणि ते ती कशी अमलात आणणार आहेत हेही मला कळले आहे.

सर्व ठाण्याचे सेनाधिकारी बंदुका आणि बॉम्ब्स् ह्यांची जी मागणी करीत आहेत ती बरोबर आहे. आणि त्या प्रांताला बाहेरून शस्त्रास्त्रांची जी मदत येणार आहे त्यातून मी त्यांना शक्य ती हत्यारे आणि दारूगोळा पाठविणार आहे. मी फ्रेंचांकडून ह्या मदतीची वाट पहात असून मोझेस तोबिआस ह्यांनाही मी सुरत येथे परदेशी लोकांकडून त्यांची खरेदी करण्याबद्दल कळविले आहे.

आपण पत्रांत लिहिले आहे की, तारापोर आणि माहीम येथे सैन्य उभारण्यात येत असून तारापोरच्या लष्करी छावणीच्या कॅप्टन मोरची जागा थॉमस परैरा द मेस्कित ह्यांच्याकडे देण्यात आली आहे. आपली ही योजना चांगली आहे. त्याचप्रमाणे असेरीला मदत पाठविण्यासाठी आपण जे काय केलेत तेही कौतुकास्पद आहे. ह्या संबंधी मी आपणाला माझ्या मागच्या पत्रात ज्या सूचना पाठविल्या आहेत त्या आपण लक्षात घ्याव्या.

वसईतील लष्कराच्या रचनेचा जो नकाशा आपण पाठविला आहे तो मीं पाहिला. त्याचप्रमाणे वसईमध्ये असलेल्या निरुपयोगी माणसांची जी यादी वसईच्या गव्हर्नरनी पाठविली आहे तीही मी पाहिली. ह्या लोकांना पोसणे हे एक कठीण काम आहे. म्हणून आपण मला ज्या उपाय योजनेचे आश्वासन दिले आहे ती आपण लागू करावी. त्याचप्रमाणे आपला ज्या युद्धकैद्यांवर आणि हिंदूंवर विश्वास नाही, त्यांना इकडे पाठवून द्यावे. पण जर ह्या लोकांमध्ये ख्रिश्चन असतील, तर त्यांना दीवला पाठवून द्यावे. कारण ते तिकडे वसईसारखेच धोकेबाज होण्याचा संभव आहे. आपण म्हणता त्याप्रमाणे शत्रूचा हेतू तटबंदी उभारण्याचा असावा असे मलाही वाटते. त्यांचे मद्रापूरवरील हल्ले वाढत जाणार आहेत. कारण त्यांना त्या ठाण्यांतील येजा बंद पाडायची आहे, कसबा चांगला ठेवायचा आहे व साष्टी बेटावर आमचे हल्ले होऊ नयेत म्हणून आम्हाला विरोध करायचा आहे. शत्रूच्या चार तोफा काबीज करण्यासाठी, मोडून टाकण्यासाठी, अथवा नष्ट करण्यासाठी आपण अद्याप हल्ला केलेला नाही हे मला कळले. ही मोहीम धोक्याची आणि कठीण आहे असे मला वाटते. आम्हाला चढाईसाठी अथवा बचावासाठी ज्या माणसांची आवश्यकता आहे, ती माणसे त्या हल्ल्यात कामास येण्याचा संभव आहे.

वसईच्या बचावासंबंधी आणि सुरक्षिततेसंबंधी आपण जे काय लिहिले आहे ते आपणाला अवगत असलेल्या लष्करी ज्ञानाला धरूनच आहे. आणि चालू परिस्थितीत त्या ठाण्याच्या बचावाला ती गोष्ट योग्यच आहे. आणि मी असे धरून चालतो की, ज्या चुकांचा अनुभव आंम्हाला येत आहे त्या चुका सुधारण्याचा तो इशारा आहे. केवळ आम्हालाच नव्हे तर, आमच्या मागून येणारांनाही आणि त्या ठाण्यात वाटत होते त्याप्रमाणे बेगमीची टंचाई नसल्याचे ऐकून समाधान वाटले. तथापि ज्या उणीवा तेथे आहेत त्या आपण दूर कराल अशी आशा आहे.

समुद्रावरील आणि जमिनीवरील कॅप्टन म्हणून आपण लुईज येरिकिजा द मौत इ मेलु ह्यांची नेमणूक करण्याचा जो निर्णय घेतला आहे तो योग्य असाच आहे. ह्या पावसाळ्यात शत्रूने वर्सोवावर जे हल्ले चढविले, तेव्हा सदरहु लुईज येरिकिज इ मोत ह्यानी जी चिकाटी, दृढनिश्चय आणि शिस्त दाखविली, त्यावरून ते ह्या अधिकारास पात्र आहेत ह्यांत शंका नाही. पण ह्या बाबतीत मला एक गोष्ट आपल्या निदर्शनास आणावयाची आहे ती ही की ही नेमणूक आपण आपल्या अधिकाराबाहेर केली आहे. कारण, आपणाला फक्त त्या प्रांतातील नौकांवरील कप्तानाची नेमणूक करण्याचा तेवढा अधिकार आहे. जमिनीवरील आणि समुद्रावरील कॅप्टनची नेमणूक करण्याचा अधिकार हा राजाचा आहे.

मलादेखील महाराजांच्या परवानगीशिवाय अशा नेमणुका करता येत नाहीत. नौकांवरील कप्तानपदाच्या त्या जागा रिकाम्या असतील त्या भरून काढण्याचा मला अधिकार आहे. परंतु आपण ही नेमणूक करून बसलात म्हणून मी सदर्हू लुईज येंरिकिज ह्याना त्या अधिकारावर काम करण्याची खास परवानगी काढली आहे. आता त्यांना त्यांचे जागेवर राहून त्यानी किल्ल्याचे रक्षण आजपावेतो ज्या शौर्याने केले तसेच रक्षण त्यांना यापुढे आणि मोठ्या संकटप्रसंगीही करता येईल. कारण, आपल्या १६ जुलैच्या पत्रात आपण म्हटलेच आहे की, शत्रूचे आतापर्यंत झालेले हल्ले विशेष तीव्र स्वरूपाचे नाहीत.

गुन्हेगारांना शासन करण्याची आणि चांगले काम करणाराना बक्षिसे देण्याची आपली जी इच्छा आहे तिला माझी संमती आहे. कारण, देवाची देखील हीच रीत असते. तो जगाचे नियंत्रण ह्याच तत्वाने करतो. परंतु माझी आपणाला एक सूचना आहे की, एखाद्यावर गुन्हा शाबीत करण्यापूर्वी त्याची मोठी परीक्षा घ्यावी. कारण, ज्यांच्या हातून गुन्हा घडला नसेल अशांना शिक्षा होणे बरोबर नाही. विशेषेकरून प्रसिद्ध माणसांचे बाबतीत तरी आपण ह्या गोष्टीचे पालन केले पाहिजे.

आपण पत्रात ज्या बातमीचा उल्लेख केला आहे ती बांदोड्याची बातमी वाचून आनंद झाला. हा विजय जरी लहान असला तरीदेखील त्याने उत्तेजन मिळत असते. विशेषेकरून आमच्या दीडशे सैनिकांनी शत्रूच्या आठशे सैनिकांवर जो विजय मिळविला तो निखालस उपेक्षणीय नाही. कारंजाच्या कॅप्टनसंबंधी आपण काहीही कळविले नाही. परंतु त्यांच्याविषयी मला ज्या बातम्या कळल्या आहेत, त्यावरून त्यानी आपल्या ठाण्याच्या रक्षणाची जी काळजी घेतली आहे त्याबद्दल ते कौतुकास पात्र आहेत. त्यांनी केवळ आपल्याच ठाण्याचे रक्षण केले आहे असे नव्हे, तर बेटाचेही रक्षण केले आहे. आणि पुनः आपल्या मर्यादित साधनातून साबाजलाही मदत पाठविली आहे. त्यांची ही कामगिरी माझ्या ध्यानात पक्की राहिली असून ती पारितोषिक देऊन गौरव करण्याच्या योग्यतेची आहे. आणि तो मी केल्यावाचून रहाणार नाही. शत्रूने जर त्यांच्यावर पुन्हा हल्ला चढविला तर तो परतवून लावण्याच्या कामी देव त्याना मदत केल्यावाचून रहाणार नाही. मला फक्त एकाच गोष्टीची काळजी वाटते आणि ती ही की, त्याना रसद कशी पाठवावयाची. त्यानी मला लिहिले आहे की, त्यांच्यापाशी जी रसद आहे, ती ऑक्टोबरपर्यंत पुरेल. मी इकडून जी रसद पाठविणार आहे, ती वेळीच पोहोचली नसल्यास आपणाला ज्या ठाण्यातून जी मदत मिळेल त्यातील थोडी मदत आपण कारंजाला पाठवावी.

आपण मला लिहिता की, माहीम आणि तारापोर येथून गलबतांनी आणि मांशुआँनी रसद आणण्याचा आपला विचार आहे. ह्या नौका कारंजाहून येणार आहेत असे आपण म्हणता. ह्या नौकांवर ले. क. इंजिनियर हे सदहूं ठाण्याची पहाणी करण्यासाठी जाणार आहेत व असेरीला ही ठाणी कितपत मदत करू शकतील याचा विचार करणार आहेत. मला आशा आहे की, आपण जो निर्णय घ्याल तो विचारपूर्वक घ्याल.

वसईमध्ये औषधांची फार टंचाई आहे असे आपण लिहिले आहे. औषधे मी तिकडे लवकरात लवकर पाठवीत आहे. दारूगोळा आरमारावर पाठविला जाणार आहे. इकडे थोडा दारूगोळा तयार असून माहेच्या फ्रेंचांनी थोडा पाठवून देण्याचे आश्वासन दिले आहे. त्यांनी मला मोठ्या आनंदाने मदत करण्याची इच्छा दर्शविली आहे.

आपण ज्या धर्मोपदेशकाविरुद्ध इलाज केलात ते चांगले केलेत. ह्या भिक्षूला आंग्र्यांकडे जाऊन त्यांच्याशी गुप्त खलबत करण्याचे कोणतेच कारण नव्हते. ही नसती उठाठेव करायला त्याला कुणी सांगितले होते?

मी आपणाला कळविलेच आहे की, आग्वादच्या टेकडीवरील चकमकीत ज्यानी बहाद्दरी गाजविली त्या सगळयांचे आपण माझ्यावतीने अभिनंदन करावे. आता आपण लिहिता की, मातिन्यु द सिल्वैरा द मिनेझिश यानी स्वत: आणि आपल्या गलबतासह प्रत्येक प्रसंगी काळजीपूर्वक काम केले. त्यानी ही जी कामगिरी पार पाडली त्याबद्दल मी त्याना वैयक्तिक पत्र घालून त्यांचे आभार मानीत आहे. आपण ज्या माणसांची नेमणूक केली आहे त्यानी माझ्याकडे ह्या शहरी येण्याची परवानगी मागितली आहे. ह्या बाबतीत मी अद्याप कोणताच निर्णय घेतलेला नाही.

आपण म्हणता की, अहमदजी तांडेल ह्यानी देऊ केलेल्या माणसांना इकडे कसे आणावे हा आपणासमोर प्रश्न आहे. हा प्रश्न पैशांचा असल्याने आपण त्यामुळे व्यग्र होणे सहाजिक आहे. आता आपणाला आठवण झाली की दीवच्या वखारीत आंतोनियु लोबु ह्यांच्या सोळा हजार असुर्प्या पडून आहेत. तेव्हा ह्या कामी त्या पैशाचा उपयोग करता येईल. आपणाला मला सांगावयाचे आहे की, पैशांच्या काळजीने मीही हैराण झालो आहे. मी इकडे अनेक कारणांनी आजारी पडत असून त्यातील मुख्य कारण हे पैशांच्या अडचणीचे आहे. मी पैसा उभारण्यासाठी रात्रं-दिवस काम करीत आहे. मी दीवचा पैसा इकडे मागविला होता. ह्या पैशातून मला सहायक सेनेतील लोकांसाठी नव्हे, तर पगारी शिपायांसाठी गणवेश शिवावयाचे होते. कारण ह्या माणसांसाठी कपडे

अजिबात नाहीत. ते जवळ जवळ नग्नच आहेत असे म्हटले तरी चालेल. पण आता मला असे वाटते की, ही रक्कम आपण उचलावी व उपरिनिर्दिष्ट माणसांच्या खर्चासाठी तिचा उपयोग करावा. मी ह्या बाबतीत दीवच्या किल्लेदारास आणि वखारदारास लिहित आहे. कारण माझे पत्र गेल्याशिवाय ते दोघे ही रक्कम आपणाला देणार नाहीत. ठाण्याचे कारभारी खंडोजी मानकर व गणेश भट या दोघांशी वाटाघाटी कशा कराव्यात या संबंधी सल्ला मस्लत करण्यासाठी आपण ज्यु आंव द सौझ फेरदार ह्यांना बोलावून घेण्यात येत आहे असे लिहिले आहे. ज्या अर्थी ह्या लोकांशी कसे वागावे ते आपणाला माहीत आहे, आणि त्यांच्या स्वभावाची आपणाला चांगली पारख आहे, त्याअर्थी आपण जे काय कराल ते अचूक कराल ह्यांत शंका नाही. ह्या लोकांशी ज्यांचा संबंध येतो त्यांना फसविण्यात हे लोक पटाईत असतात. म्हणून आपणाला इशारा द्यावासा वाटतो. मुंबईच्या गव्हर्नरना आपण जे उत्तर पाठविलेत ते बरोबर आहे. ठाण्यावर दोन बाजूंनी हल्ला करण्याची योजना मला नेहमीच पसंत पडत आली आहे. पण आपण जे नकाशे पाठविले आहेत त्याप्रमाणे आपली माणसे ह्या कामगिरीसाठी मुंबईला तयार आहेत की काय ते मला माहीत नाही. जर सुरत आणि दीव येथून आपणाला कुमक आली तर आपण ही कामगिरी पार पाडल्यावाचून राहाणार नाही ह्याची मला खात्री वाटते.

आपल्या ६ सप्टेंबरच्या पत्रात आपण असेरीच्या मदतीसंबंधी लिहिले आहे. जर शत्रुने हे ठाणे जिंकले तर ते पुनः घेणे फार अवघड जाणार आहे. म्हणून ही मोहीम काळजीपूर्वक आखली पाहिजे. कुमक तर नष्ट होता कामा नयेच, पण टेकडी देखील हातची जाता कामा नये. ज्या कॅप्टनच्या हातून हलगर्जीपणा झाला त्याला इशारा दिला पाहिजे, की, त्याच्या हातून यापुढे अशी चूक होता कामा नये. जर हे मळभ दूर करण्यात देवाने आम्हाला मदत केली तर पोर्तुगीज पूर्वी जसे होते, तसेच आताही राहतील. बाळकृष्ण ह्यांच्या अहवालावरून पाद्री द सिल्व्ह ह्यानी पाद्री एंत्राद ह्यांना लिहिलेल्या पत्रावरून बाजीरावाच्या हिंदुस्थानातील यशासंबंधीची जी बातमी आपण दिली आहे तिच्यावर माझा विश्वास बसतो. बाजीरावाने बादशहाचा जो अपमान केला त्याचा बदला घेण्यासाठी जर किलिचखान व त्याचा धनि बादशहा हे दोघे बाजीरावाविरुद्ध हत्यार उपसत असतील तर ती आनंदाची गोष्ट आहे. असे जर झाले, तर देवाची आमच्यावर मोठीच कृपा झाली असे म्हणावे लागेल. किलीचखानाला इकडे पाचारण करण्याची आपली जी कल्पना आहे ती मला पसंत आहे. परंतु गेल्या दोन वर्षांमागे तो तिकडे जो फेरफटका करून गेला त्यावरून आपल्या पत्राला त्याच्याकडून अनुकूल

उत्तर येईल असे मला वाटत नाही. म्हणून मला असे वाटते की, त्याला लिहिण्याऐवजी वजारतखानालाच लिहिणे अधिक फायद्याचे आहे. कारण आपणाला माहीत आहेच, की वजिरखानाचा आम्ही जो आदर सत्कार केला त्यामुळे तो आमच्यावर फार खूष होता, व त्याने या परामर्षाबद्दल आमचे आभारही मानले होते. इतकेच नव्हे तर आपल्या मुलुखाला गेल्यावर त्याने मला एक पत्रही धाडले होते. तरी आपण वजारतखान ह्याला एक पत्र धाडावे, व बादशहा आणि किलिचखान ह्या दोघांचा समझौता झाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करावे. मला आशा आहे की, आपले पत्र मिळाल्यावर वजारतखानाला आनंद झाल्यावाचून राहाणार नाही.

चालू महिन्याच्या आपल्या ५ तारखेच्या पत्रासह आपण दमण, तारापोर, आणि असेरी येथून लिहिलेली जी पत्रे पाठविली आहेत ती मी पाहिली.

दमणविषयी बोलायचे झाल्यास सुरत येथे बंदुका नसल्याचे वाचून फार वाईट वाटले. मी मोझेस तोबिआम ह्यांना ह्या बाबतीत लिहिले होते. परंतु त्या ठाण्याची गरज भागविण्यासाठी मला आरमारावर जेवढी हत्यारे पाठविता येतील तेवढी पाठवीत आहे. मी असे ऐकले आहे की, त्या ठाण्याच्या रक्षणामध्ये तिथल्या घरांचा अडथळा होत आहे. रेक्टर ज्योआकी दियज ह्याचे देखील हेच मत आहे. ह्या बाबतीत काय योग्य आहे ते आपण ठरवावे. कारण, पाद्री फिलिप द व्हालादारिज ह्यांचे असे मत आहे की, शत्रूचे सामर्थ्य खास उपेक्षणीय नाही. माझ्यामते पाद्रीच्या मताकडे दुर्लक्ष करणे योग्य होणार नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे."

गोवा, २० सप्टेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMOI, VOL. III, PART V.

पत्र. क्र. ४९, पृ. ७०-८३

संपादक—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(49) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS I.

वसईच्या गव्हर्नरने व्हाईसरॉयला मराठ्यांचा एक जोरदार हल्ला परतवून लावल्याचे कळविले होते, त्याला त्याने पुढील उत्तर लिहिले.

उत्तरेकडील प्रदेशाचे सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस---

ह्या गलबताला निरोप देत असताच आपली चालू माहीच्या १८ आणि २० तारखेची दोन पत्रे मिळाली. त्या पत्रात आपण शत्रूचा दुसरा जोरदार हल्ला परतवून लावण्यात यश मिळाल्याची जी बातमी दिली आहे ती वाचून फार आनंद झाला. ह्या यशाबद्दल मी आपले अभिनंदन करतो, व त्याच बरोबर आपले आभारही मानतो. आपल्या शेवटच्या दोन्ही पत्रांचे उत्तर मी दुसऱ्या गलबतावर पाठवित आहे. हे गलबत तकडे लवकरच रवाना होईल.

देव आपले रक्षण करो."

गोवा, २३ सप्टेंबर १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ५१ पृ. ८४-८५.

संपादक,

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(57) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 17.

पत्र क्रमांक ५२

व्हाइसरॉय चौलच्या कॅप्टनला लिहितो की, त्या ठाण्या लगतची माळराने माणसे पाठवून जाळून टाकावी.

"चौलचे कॅप्टन ज्यु आंव द फ्रियश सामेंतु ह्यांस---

इथून चौलला परतलेल्या पहिल्या गलबतावर मी कॅप्टन ज्युआंव द फ्रियस ह्यांना पत्रद्वारे कळविले की, त्या गलबतावर पाठविण्यात आलेली त्यांची पत्रे मिळाली. त्या सर्व पत्रांचे उत्तर मी ह्या गलबतावर पाठवीत आहे. मी कॅ. ज्युआंव द. फ्रियस याना कळविले आहे की, चौलला पाठवावयाची मदत तयार करण्यात येत आहे. त्याना मी असेही कळविले आहे, की, आजूबाजूची सर्व माळराने जाळून टाकावी. हे काम मजूरांकडून अथवा इतर कोणत्याही माणसाकडून करून घेता येईल. ह्या लोकांना ते काम भिकाऱ्यांच्या मिषाने अथवा लांबच्या प्रवासास जाण्याच्या मिषाने करता येईल. ज्या वेळी वारा जोराने वहात असतो तेव्हा माळांना आग लावून दिली तर ते अल्पावधीतच भस्मसात होऊन जातील. हे काम अनेक माणसांकडून करून घेण्यात यावे. त्याना ह्या कामावर वेगवेगळ्या ठिकाणी पाठवावे. पण त्याना एकमेकांना

त्याची माहिती असू नये. त्या सूचनांची मी ह्या पत्रातही पुनरुत्पत्ति करीत असून कॅ. फ्रियश ह्यांच्या पत्राचा जबाब देत आहे.

कॅ. फ्रियश ह्यानी पावसाळ्यात बातम्या पाठविण्याची काळजी घेतली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पत्रांची ने आण करणारे जासूद पकडले गेल्याने तिकडील बातम्या कळणे मुष्किल झाले आहे. पण मला वाटते ते जासूद पकडले गेले ते कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांच्या हलगर्जीपणामुळेच. त्यानी जर जासुदांना खासगी पत्रांचा गठ्ठा बरोबर नेण्याची परवानगी दिली नसती तर ते जासूद पकडले गेले नसते. मला ती बातमी इकडे कळली. ती सर्व पत्रे शत्रूंच्या हाती पडल्याने त्याना आमच्या बऱ्याच गोष्टी कळल्या असाव्या. काही माणसे अशी असतात की, त्यांना पत्रात काय लिहिले आहे याचा पत्ता नसतो. आणि म्हणून अशी पत्रे शत्रूच्या हातात पडली की, त्याना सर्व गोष्टी कळून चुकतात.

आता जल वाहतूक सुरू झाली असल्याने उत्तरेकडील सेनापतींनी तिकडील सर्व बातम्या आम्हाला कळविल्या आहेत. कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांनी ज्या बातम्या आपल्या पत्रात लिहिल्या आहेत, त्या बातम्या उत्तरेकडील सेनापतींनी पाठविलेल्या बातम्याशी जुळल्या आहेत.

चौलच्या किल्ल्यावर शत्रूचा हल्ला होण्याचा संभव आहे ह्यात शंका नाही. परंतु सर्व प्रकारची काळजी घेतली असता वसईमध्ये शत्रूची जशी दाणादाण उडाली तशी दाणादाण त्यांची चौल येथेही उडण्याचा संभव आहे. कारण शत्रूचे हल्ल्यांचा जोर किती असतो, ते आता कळून चुकले आहे. खिंडार पाडण्यासाठी तोफांचा कसा उपयोग करायचा ते मराठ्यांना कळत नाही. तथापि, असे जरी असले तरी शत्रूचा कोणत्यावेळी हल्ला होईल त्याचा नेम नसल्याने नेहमी जागरूक राहिले पाहिजे. त्याचप्रमाणे माणसे थकून न जाण्याचीही काळजी घेतली पाहिजे. बुरूजांवर दिवे जय्यत तयार ठेवावे, व अंधाऱ्या रात्री ते पेटवावे. तसे केल्याने शत्रूच्या हालचाली ताबडतोब दृष्टोत्पत्तीस येतील. बालेकिल्ल्यांमध्ये आणि तटांवर हात बाँब्ज आणि दारूने भरलेली भांडी तयार ठेवावी, बाँब्ज खलास झाले तर, ते लवकर हाती येण्याची शक्यता नसते. ह्याच्या उलट दारूची भांडी केव्हाही तयार करता येतात. बालेकिल्ल्यामध्ये छोट्या तोफाही मांडून ठेवण्यात याव्या. कारण, ह्या तोफा हल्ला करणाऱ्या शत्रूची फार हानी करू शकतात. आणि शेवटी, कॅ. ज्युआंव द फ्रियज ह्यांचा पराक्रम, जागरूकता आणि काळजी ह्यावर माझा अधिक विश्वास आहे. शत्रूने हल्ला केला तर त्याला जबरदस्त शिक्षा व्हावी ह्या तयारीने नेहमी त्यांनी असावे. मोरसच्या किल्ल्यापासूनदेखील मी ह्याच

गोष्टींची अपेक्षा करीत आहे. त्या किल्ल्याच्या कॅप्टननेही काळजी घेतली पाहिजे. आणि ज्याअर्थी, ह्या दोन्ही किल्ल्यांवर कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांचे नियंत्रण आहे, त्याअर्थी, त्यांना त्यांची काळजी घेण्याबाबत अधिक काही लिहिण्याची आवश्यकता नाही. अवचितगडच्या किल्लेदाराने मोरस किल्ल्यावर केलेला हल्ला परतवून लावण्यासाठी कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांनी भर पावसाळ्यात दोन गलबतांचे युद्धनौकांमध्ये रूपांतर केले ह्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांनी ज्या दोन गलबतांपैकी एका गलबताचे कप्तानपद कॅ. दोमिंगुश पेरैरा ह्यांच्याकडे दिले की, जे गलबत इकडून तिकडे परतत आहे, त्या गलबताच्या कप्तानाकडून शिस्तभंगाचा एक मोठाच प्रमाद घडला आहे. त्यांनी मेलुंदीच्या आरमाराला भिवून संभाजी आंग्रे ह्यांच्याकडे परवाना मागितला. पण आंग्र्यांकडून परवाना मिळेल की नाही ह्याचा संभ्रमं पडल्याने त्याने आंग्र्यांच्या दोन शिपायांना आपल्या गलबतावरून प्रवास करू दिला. कॅ. दोमिंगुश पेरैरा ह्यांच्याकडून हा जो प्रमाद घडला त्याबद्दल त्यांना इकडेच शिक्षा करण्याचा माझा विचार होता. पण त्यांनी असा खुलासा केला की, आपल्या आज्ञापत्रकात असे वागण्याची आपण मुभा दिली आहे. परंतु आपल आज्ञापत्रक नजरेखालून घातले असता त्यात ह्या परवानगीचा उल्लेख तर नाहीच, परंतु मेलुंदीची जहाजे वाटेत भेटली आणि त्यांनी जर कुरापत काढली तर, त्यांना आपल्या मगदुराप्रमाणे तोंड द्यावे असे त्या आज्ञापत्रकात म्हटले आहे.

कॅ. दोमिंगुश पेरैरा ह्यांच्या हातून ही जी चूक घडली त्याबद्दल त्यांना कडक शासन केले पाहिजे. मी त्यांना इकडे शिक्षा दिली नाही, कारण ते त्यांच्या ठाण्यातून गैरहजर असू नयेत असे मला वाटले. त्यांना तिकडेच शिक्षा देणे योग्य ठरेल.

ज्या फ्रिगेटवर मी चौलला पैसे आणि रसद पाठविणार आहे त्याच्यावर मी शक्य झाल्यास माणसांची कुमक पाठविण्यासाठी प्रयत्न करीन. त्यासाठी मी देशाहून ह्या मोसमात येणाऱ्या नौकांची वाट पाहात आहे. येत्या उन्हाळ्यात इकडे आणि उत्तरेकडील प्रदेशात इतक्या नौकांची आवश्यकता आहे की, चौलच्या व्यापाऱ्यांनी आपल्या व्यापारी जहाजांना संरक्षण देण्यासाठी ज्या दोन युद्धनौकांची मदत मागितली आहे त्या युद्धनौका तिकडे पाठविता येतील की काय ह्याची शंका आहे.

कॅ. ज्युआंव द फ्रियश हे मला कळवितात की, बाजीरावाने मानाजी आंग्रे ह्यांच्या राज्यातील माळरानांचे काळजीपूर्वक रक्षण करण्याचा हुकूम धाडला आहे. त्या हुकूमावरून ते माळ जाळून टाकण्याची माझी आज्ञा

किती बरोबर आहे हे आपल्या ध्यानी येईलच. आणि ह्या कामासाठी जर कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांना खर्च करणे शक्य होत नसेल तर, त्यांनी हा खर्च वखारीला करावयास सांगावे.

मांय दे देऊश (देवमाता) ह्या बुरूजाजवळ असलेली संघाच्या पाद्रयांची गच्चीची घरे पाडून टाकली पाहिजेत, असे जर कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांना वाटत असेल तर त्यांनी तत्संबंधाने उत्तरेकडील सेनापतींना लिहावे. कारण, अशा स्वरूपाचे निर्णय घेण्याचा अधिकार हा त्यांचा आहे.

कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांनी आपल्या ठाण्यातील कंपन्यांसाठी ज्या हत्यारांची मागणी केली आहे, त्या हत्यारांची यादी मी पाहिली. गेल्या मे महिन्यात पाठविलेल्या बंदुका नादुरूस्त झाल्या असल्याचे त्यांनी लिहिले आहे. ते वाचून उद्वेग वाटल्याशिवाय राहिला नाही. मी देशाहून हत्यारांची मागणी केली असून ही हत्यारे घेऊन येणारी नौका ह्या मोसमात येण्याची मी वाट पाहात आहे. मला फ्रेंचांनीही हत्यारे पाठविण्याचे कबूल केले आहे, व त्या हत्यारांचीही मी वाट पाहात आहे. आणि जे फ्रिगेट चौलला जाणार आहे, त्याच्यावर मला जी हत्यारे पाठविणे शक्य होईल ती मी पाठवीन. परंतु त्या ठाण्यात हत्यारे दुरूस्त करणारे अधिकारी नसणे ही गोष्ट चांगली नव्हे. तरी असे अधिकारी त्या ठाण्यात आहेत की नाही ते कॅ. ज्युआंव द फ्रियश ह्यांनी मला त्वरित कळवावे".

गोवा, २५ सप्टेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., VOL. III, PART V.
पत्र क्र. ५२, पृ. ८५—९०
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(52) LIVRO DE BASAIM.

पत्र क्र. ५३

व्हाइसरॉय माहेच्या गव्हर्नरला दारूगोळा पाठविण्याची विनंती खालील पत्रात करतो.

"माहेचे गव्हर्नर ब्युनेल ह्यांस—

आपले २१ ऑगस्टचे पत्र मला चालू माहीच्या २३ ला मिळाले. हे पत्र ज्या जासुदाने आणले त्या जासुदाकडे त्याचे उत्तर दिले नाही. कारण

फ्रिगेट लवकर निघाल्याने पत्र लिहिण्यास सवड झाली नाही. तथापि, ह्या फ्रिगेटचे कॅ. ब्रितु फ्रैद ह्यांना मी आपणाला माझे आभार कळविण्यास सांगितले आहे.

पाँडिचेरी--राज्यसभेच्या सदस्यांनी मला दारूगोळा पाठविण्याचे वचन दिले आहे. आपणाला जो दारूगोळा पाठविणे शक्य असेल तो पाठवून द्यावा. आपण तो त्वरित पाठविला तर मला तो योग्यवेळी मिळेल. मी पाँडिचेरीच्या गव्हर्नरनाही ह्या संबंधाने नुकतेच लिहिले आहे.

मोसांबिकेला असलेला एक फ्रेंच नागरिक पाँडिचेरीला जाण्यासाठी गोवा बंदरात आला होता. तो इकडून एका छोटया नौकेने तिकडे रवाना झाला. त्याच्याकडे मी पाँडिचेरीच्या गव्हर्नरना एक पत्र दिले आहे. त्या फ्रेंच गृहस्थाकडे मी आपणाला देण्यासाठी पत्र दिले नाही. कारण, आपले पत्र मी ह्या फ्रिगेटवर पाठविण्याचे ठरविले होते.

मी पाँडिचेरीच्या गव्हर्नरकडे त्याचप्रमाणे आपणाकडेही ज्या शस्त्रांची आणि दारूगोळचाची मागणी केली आहे, त्याची एक यादी मी फ्रिगेटच्या कॅप्टनबरोबर पाठविली आहे. ह्या यादीतील दारूगोळा व हत्यारे ह्यांच्या-शिवाय आपण मला आणखी काही वस्तू पाठवू शकल्यास मी आपला आभारी होईन. त्या वस्तूंची यादीही पाठविली आहे.

फ्रिगेटच्या कॅप्टनकडे मालाचे पैसे पाठविले आहेत. माझी अशी समजूत आहे की, ही रक्कम मालाची किंमत फेडण्यास बस होईल. आणि जर पैसे कमी पडले तर पाँडिचेरीची नौका इकडे येणार आहे तिच्यावर मी उरलेली रक्कम पाठवून देईन. पैसे कमी पडतील असे मला वाटते त्याचे कारण हे की, मंगळूरला थोडा माल खरेदी केला असून तेथे माणसांची भरतीही केली आहे. त्या मालाची किंमत भरण्यासाठी व माणसांचा मुशाहिरा घालण्यासाठी पैसे लागणार आहेत.

आपण मला माणसे पुरविण्याची जी इच्छा दर्शविली आहे, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. सांप्रत मला माणसांची कमतरता भासेल असे वाटत नाही. कारण, गेल्या मोसमात देशाहून जी नौका कुमक घेऊन यायची होती ती आली आहे. आणि ह्या मोसमातील नौकेचीही मी वाट पाहात आहे. शिवाय वेगवेगळचा ठिकाणीही मी माणसांची भरती सुरू केली आहे. आपण मला जी माणसे देऊ केली आहेत, त्यांचा उपयोग मला नंतर होईल.

पाँडिचेरीच्या गव्हर्नरचे आभार मानूनही मी त्यांना पत्र घातले आहे. कारण, त्यांनीही मला माणसे पुरविण्याचे आश्वासन दिले आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो, वगैरे".

गोवा, २८ सप्टेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ५३, पृ. ९०—९९
संपादक :—
A. B DE BRAGANSA PEREIRA.

पत्र क्र. ५४

पोर्तुगिजांच्या वसईला जाणाऱ्या एका अधिकाऱ्याला मुंबईच्या इंग्रजांकडून वसईपर्यंतच्या वाहतुकीला सहकार्य मिळाले नाही, म्हणून गोव्याचा व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात रोष व्यक्त करतो.

"मुंबईचे गव्हर्नर जॉन हॉर्न ह्यांस—

आपली दोन्ही पत्रे मिळाली. त्यातील एक १६ ऑगस्टचे असून ते मला सप्टेंबरमध्ये मिळाले. दुसरे पत्र त्याच महिन्याच्या १९ तारखेचे आहे. आपल्या पत्राचे उत्तर करताना मला सांगायचे आहे की, मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु ह्यांनी मला लिहिलेल्या पत्रात अशी तक्रार केली आहे की, त्यांना वसईला जाताना आपणाकडून वाहतुकीचे सहकार्य मिळाले नाही. ही तक्रार निराधार असती तर फार चांगले झाले असते असे मला वाटते. कारण, आमच्या दोन्ही राष्ट्रांची मैत्री फार पुरातन असून अशा आणीबाणीच्या वेळी त्यांनी जर एकमेकांशी सहकार्य केले नाही तर ती गोष्ट अन्याय म्हटली पाहिजे. वसईचा प्रश्न हा आमच्याप्रमाणेच तुमच्याही जिव्हाळ्याचा आहे. आपण मला मदतीचे आश्वासन दिले होते. त्याविषयी मला गैरविश्वास दाखविता येत नाही. मला आशा आहे की, ज्या ज्या वेळी मला मदतीची जरूरी भासेल त्या त्या वेळी आपण ती आम्हाला केल्यावाचून राहाणार नाही.

आपणाला युरोपातून तीन नौका मिळाल्याचे ऐकून फार आनंद झाला. आपण ज्या चौथ्या नौकेची वाट पाहात आहात ती लौकरच येईल अशी आशा आहे. गेल्या वर्षी मला देशाहून मदत आली नाही. ती ह्या वर्षीच्या सप्टेंबर महिन्यात आली. त्यामुळे यंदाच्या मोसमातील मदत लौकर येण्याची आशा नाही.

शत्रूने ८ जुलैला वसईच्या किल्ल्याच्या तटास शिडचा लावण्याचे धाडस केले. परंतु त्यांचा हा प्रयत्न हाणून पाडण्यात आला. मला आशा आहे की, ह्या दोन्ही प्रयत्नात त्यांना जो मार खावा लागला त्यावरून ते पुनः हा प्रयत्न करण्याच्या भानगडीत पडणार नाहीत. मी उत्तरेकडील प्रदेशात कुमक धाडण्याचा जो निश्चय केला आहे तो शक्य तितक्या लवकर अमलात आणण्याचा माझा विचार आहे. परंतु मला असे कळले आहे की, शत्रूने आमचे लक्ष दुसरीकडे वळविण्यासाठी इकडे सैन्य धाडण्याचा निर्णय घेतला आहे. सरदेसाई फोंडू सावंत व सोंदेचा राजा हे दोघे मराठ्यांचा प्रतिकार करण्यास असमर्थ आहेत.

किलिचखानाचे सैन्य मराठ्यांवर चालून येत असल्याची जी वार्ता आपण पत्रातून कळविली आहे ती इकडेही पसरली आहे. मोगलांनी चंडी-चंदरवाड घेतल्याचेही वृत्त आहे. परंतु ह्या बातम्या फार लांबून येत आसल्याकारणे त्यांच्यावर कितपत विश्वास ठेवावा हा प्रश्नच आहे. किलिचखान व बादशहा ह्या दोघांचा समेट झाला असल्याचीही बातमी आहे. कदाचित किलिचखानाला .......... भीती .......... वसई येथून मला उत्तरेकडील सेनापतीने कळविले आहे की, बांदोडा येथील इंग्रज अधिकारी आपले हुकूम मानण्यास टाळाटाळ करतात. त्या ठाण्याचे आधिपत्य कॅप्टन मोर ज्युआंव द सौझ पेरैरा ह्यांच्याकडे आहे. आपणाला कदाचित ही गोष्ट माहीत नसेल. तेव्हा आता ती कळल्यावर यापुढे असे होऊ न देण्याची दक्षता घ्यावी, अशी विनंती आहे. बांदोडा हे ठाणे माझे स्वामी पोर्तुगालचे राजे ह्यांच्या मालकीचे असन, तिथला कारभार तिथल्याच अधिकाऱ्यांनी चालविला पाहिजे. फ्रिगेटची रवानगी केल्याबद्दल मी आपला फार फार आभारी आहे. मला त्याची इकडे फार जरूरी असल्याने ते इकडे लवकर पोहोचेल अशी आशा आहे.

आपणाला ज्या गोष्टीत आनंद वाटेल ती गोष्ट करण्यास मी सदैव तत्पर असेन.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

गोवा, ६ ऑक्टोबर १७३७.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART .
पत्र क्र. ५३, पृ. ९२—९४
संपादक :—

पत्र क्र. ५५

व्हाइसरॉय पोर्तुगालला राज्यसचिवाला लिहिलेल्या पत्रात वसईतील परिस्थितीचा आढावा घेतो :—

"राज्य सचिव आंतोनियु गेदिश पेरैरा, ह्यांस—

ज्या जासुदाकडे मी आपणाला हे पत्र पाठवित आहे, तो एप्रिल महिन्यात राज्यसचिव दियोग द मेंदोंस ह्यांना पत्रे घेऊन गेला होता. ती पत्रे तो आताही नेत आहे. पत्रे पाठविण्याचा हेतु हा की, महाराजांना आमच्या उत्तरेकडील प्रदेशातील दुर्दैवी अपयशाची बातमी कळावी. ह्या जासुदाला तिकडे निघण्यास विलंब लागला, कारण, सुरत आणि पर्शिया ह्यांच्या दरम्यानची वाहतूक, तो निघाला तेव्हा थांबलेली होती. आणि बसरा हे आपोच्या वाटेवर असल्याने आणि हा रस्ता वाळवंटातून जात असल्याने त्या दिवसात त्याला तिकडे निघणारा आणखी कुणी सोबती भेटला नाही. आता तो इंग्लंडला जाण्याचा विचार करीत आहे. मुंबईहून ता. १ ला एक जहाज तिकडे निघत आहे. त्याच्या वर जाण्याची सूचना मी त्याला केली आहे.

दियोग द मेंदोंस ह्यांना पाठविण्यात आलेली पत्रे ज्यावेळी जासुदाकडे देण्यात आली तेव्हापासून उत्तरेकडील प्रांतातील परिस्थितीत विशेष फरक नाही. शत्रूने साष्टी बेट घेतले आहे. ठाण्याची तटबंदी त्याच्या हातात आहे, आणि साबाज, मनोरा, पारिसिक गार्यीचे बेट त्याचप्रमाणे सांमरिया आणि जुदनगड ही सर्व ठाणी त्याने घेतली असून असेरीला त्याने वेढा घातला आहे. असेरीला कुमक पाठविण्याचा विचार होता. परंतु शत्रूने आकस्मिकपणे साष्टीबेट आणि वसईचा कसबा घेतल्याने उपरिनिर्दिष्ट ठाणी आणि गड आम्हाला गमवावे लागले. ह्या सर्व ठाण्यांना आम्ही मदत पाठवू शकलो नाही, कारण साधनांचा अभाव होता. त्यातच नद्यांच्या काठावर शत्रूचा ताबा होता. आणि मला कळले आहे की, काही ठाण्यांच्या सेनापतींनी आपले कर्तव्य नीट पार पाडले नाही. उदाहरणार्थ मनोराच्या कॅप्टनने जर ते ठाणे आणखी चार तास लढविले असते तर, त्याला कुमक आली असती. ह्या ठाण्याला आलेली कुमक शत्रूच्या अगदी जवळून गेली. शत्रूच्या तोफांच्या भडिमारातून तिला जावे लागले. ह्या मोहिमेत उत्तरेकडील पोर्तुगिज आरमाराचे कॅप्टन—मोर आंतोनियु ब्रितु द सिल्वा ह्यांनी मोठाच पराक्रम गाजविला. मनोराला ते स्वतः कुमक घेऊन गेले होते.

साबाजच्या कॅप्टनने आपले कर्तव्य चांगले बजावले. ठाण्यात पाण्याची टंचाई निर्माण झाली म्हणून त्याला शरणागती पत्करावी लागली. ह्या



व्ही ५५५८–३०

ठाण्याला बाहेरून जे पाणी येत होते ते शत्रूने तोडून टाकले. शत्रूने वसईच्या तटास दोनदा शिड्या भिडविण्याचा प्रयत्न केला. शत्रूसैनिकांची चिकाटी आणि जोम वाखाणण्यासारखा होता. परंतु त्यांचे दोन्हीही हल्ले हाणून पाडण्यात आले. दुसऱ्या हल्ल्यात शत्रूच्या नऊ हजार सैनिकांनी भाग घेतला होता. ह्या हल्ल्यात त्यांची अतोनात हानी झाली. वर्सोवा आणि बांदोडा ह्या दोन्ही ठाण्यावरही शत्रूने तीव्र हल्ले चढविले. वर्सोवा हे साष्टी बेटातील ठाणे अद्याप आमच्या हातात आहे. बांदोडाचे रक्षण इंग्रज करीत आहेत. हे ठाणे त्यांच्या बेटापासून अगदी जवळ असल्याकारणे, त्याचा बचाव सुलभतेने करणे शक्य होते. त्यात पुनः ह्या ठाण्याचे रक्षण करण्यात त्यांना आस्था वाटते. तथापि, त्या ठाण्यात ते सैनिकांपेक्षा व्यापारी म्हणूनच अधिक शोभतात. आणि आम्हाला संशय येतो की, शत्रूला ते युद्धसाहित्य पुरवीत असावेत. आणि मला वाटते की, साष्टी बेटातून शत्रूला हाकलून लावण्यासाठी आमचे सैन्य जर तिकडे गेले नाही तर' इंग्रज शत्रूशी तडजोड केल्यावाचून राहाणार नाहीत. सगळीकडे अशी वदंता पसरली आहे की, शत्रू एक मोठे सैन्य घेऊन गोव्यावर स्वारी करण्यासाठी येत आहे. साष्टी आणि बार्देश ह्या दोन्ही प्रांतानजीक रस्ते दुरुस्त करण्याचा व अन्नधान्याचा साठा करून ठेवण्याचा इशारा देण्यात आला आहे. गेल्या उन्हाळ्यात शत्रूने दिल्लीपर्यंत मजल मारण्याचा पण केला होता. तो पण त्यांनी खरा करून त्या राजधानी-वर अचानकपणे हल्ला करताच बादशहाला आपल्या स्वतःच्या आणि आपल्या कुटुंबियांच्या रक्षणासाठी आपल्या गुलामांचा आणि कुटुंबियांचा उपयोग करावा लागला. आता त्यांनी आमचा उत्तरेकडील प्रांताचा जो मुलुख बळकावला आहे तो पचविण्यासाठी गोव्यावर स्वारी करण्याचा बेत आखला आहे.

शत्रूचे सामर्थ्य पन्नास वर्षांपूर्वी व्हाइसरॉय कौंट द आल्व्होर ह्यांच्या अमदानीत जेवढे होते तेवढेच आजही आहे. त्यावेळीही मराठ्यांनी उत्तरे-कडील प्रांतावर आणि गोव्यावर दोन्हीही ठिकाणी स्वारी केली होती, व साष्टी आणि बार्देश हे दोन्ही प्रांत जिंकले होते. आज आमची स्थिती फारच वाईट आहे. आमच्यापाशी सैन्य भरपूर नाही हे तर झालेच पण युद्ध-साहित्याचाही तुटवडा आहे. त्यामुळे शत्रूला आमच्यावर हल्ला करणे सुलभ होईल.

ह्या युद्धात आम्हाला पुष्कळ खर्च करावा लागेल. त्यासाठी मी सांप्रत पैशांच्या शोधात आहे. फिरंगी सैनिकांचाही तुटवडा आहे. त्यांची जागा ज्यांना लष्कर म्हणतात त्या देशी सैनिकांनी भरून काढावी लागत आहे.

हे भाडोत्री शिपाई भरपूर मुशाहिरा दिल्याखेरीज मन लावून काम करीत नाहीत. त्यांच्यासाठी पुष्कळ पैसा खर्च करावा लागतो.

साष्टी, बार्देश आणि बेटे येथे एक दशांश कर वसूल करण्यास सुरूवात झाली आहे. हे उत्पन्न आणि कर्ज उभारून गोळा केलेला पैसा ह्यांच्या मदतीने काही कामांना हात घालण्यास प्रारंभ झाला आहे. त्यात पुनः इगर्जीकडून कर्ज म्हणून घेण्यात आलेल्या चांदीतून नाणी पाडण्यात येत आहेत. परंतु ह्या पैशातून फारच थोड्या अडचणींचे निवारण होत आहे. आणि जर इकडे युद्धाचा वणवा पसरला तर साष्टी आणि बार्देश प्रांतातील उघड्या प्रदेशाचे रक्षण करणे अशक्य होईल. त्याचा परिणाम केवळ दशांश उत्पन्न कमी होण्यात होईल इतकेच नव्हे तर, महत्वाच्या समजल्या जाणाऱ्या शाही उत्पन्नावरही त्याचा परिणाम होईल.

दि. १८ सप्टेंबरला ह्या बंदरात सां पेद्रु द आल्कांतारा हे जहाज येऊन दाखल झाले. हे जहाज गेल्या मोसमात इकडे आले नव्हते. ते मोसांबिकला जवळ जवळ दहा महिने राहिले. तिथे त्याने कुमक म्हणून आणलेल्या माणसांपैकी बरीच माणसे उतरविली. इकडे ते फक्त सत्तावन्न सैनिकांसह आले. ह्या सैनिकांशिवाय त्याच्यावर काही खलाशीही आले आहेत. पण ते फार थोडे आहेत.

दि. ३० सप्टेंबरला माद्र द देऊश (देव माता) ही नौका इकडे येऊन पोहोचली. ती दोनशे चौऱ्याहत्तर सैनिक घेऊन आली आहे. त्यांच्यामध्ये काही अधिकारी आहेत. एकविस खलाशी ह्या नौकेवर आले आहेत. त्यांच्यामध्ये गोलंदाज, हुजरे वगैरेंचा अंतर्भाव होतो. ह्या दोन्ही नौकांवर आलेले सैनिक आणि इथे असलेले सैनिक मिळून सातशे एक्याणव्व सैनिक होतात. त्यात एक्याणव्व देशी सैनिक आणि गोलंदाज आहेत. ह्या सर्व सैनिकांना आणि खलाशांना उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील आरमाराचे, उत्तरेकडील प्रांताचे आणि ह्या राज्यातील बेटे, व साष्टी आणि बार्देश ह्या दोन्ही प्रांताचे रक्षण करायचे आहे. कारण, ह्या सर्व प्रदेशाच्या रक्षणाची जबाबदारी सहाय्यक सैन्यावर टाकता येत नाही.

उत्तरेकडील प्रदेशाचे गव्हर्नर आंतोनियु कार्दिम व वसईचे गव्हर्नर ह्या दोघांकडून मला आलेल्या पत्रांवरून असे कळते की, त्या ठाण्यात सांप्रत ५१५ पोर्तुगीज सैनिक आणि स्थानिक ख्रिश्चन आहेत. त्याशिवाय दीव, सुरत, गोगा आणि सिद्दीच्या मुलुखांतून लष्करी शिपाई आणण्यात आले आहेत. ह्या शिपायांना संरक्षणाच्या कामाला जुंपता येईल. पण मुख्य अडचण

आहे ती पैशाची. हा पैसा त्या शहरातील इगर्जीतील चांदी आटवून पाडण्यात येत आहे. आणि इथून जी कुमक पाठविण्याची मी तयारी करीत आहे, ती फारच थोडी आहे.

दारू व हत्यारे ह्यांचा तुटवडा फारच मोठा आहे. मला फ्रेंचांकडे युद्धसामग्रीची चौकशी करावी लागली. परंतु त्यांच्याकडे आणि इतर ठिकाणीही मला मुबलक युद्धसामग्री मिळाली नाही. फ्रेंचांकडून अवघ्या तीनशे बंदुका मिळाल्या. हत्यारे नसल्याने मला अनेक सहाय्यक सैनिकांना कमी करावे लागले. तटांचे रक्षण करणाऱ्या संघाच्या पाद्रयांना आणि भिक्षूंना मला हत्यारे पुरविणे अशक्य आहे.

आपण आणि कार्डिनल द मोता ह्या दोघांनी मला कळविले होते की माद्री द देऊश ह्या नौकेवर दोन हजार बंदुका पाठविण्यात येत आहेत. परंतु त्या नौकेवर प्रत्यक्षात विसाहून अधिक बंदुका आल्या नाहीत. आणि इंग्रजांकडूनही मदतीच्या बाबतीत नकार आल्याने ही महत्वाची टंचाई कशी भरून काढावी हा माझ्यासमोर मोठा प्रश्न उभा आहे. मी फ्रेंचांना त्यांच्या मदतीत वाढ करण्याची विनंती केली असून त्यांनी ह्या विनंतीकडे लक्ष देऊन मदतीत वाढ करण्याचे आश्वासन दिले आहे. ती मदत आणण्यासाठी मी पैसे देऊन एक फ्रिगेट काही दिवसांपूर्वी पाँडिचेरीला रवाना केले आहे. आपण महाराजांच्या निदर्शनास आणावे की, पाँडिचेरीची राज्यसभा आणि तिथले गव्हर्नर आणि माहेचे गव्हर्नर आणि राज्यसभा ह्यांचे महाराजांनी आभार मानणे आवश्यक आहे. नद्यांच्या रक्षणासाठी उपयुक्त असलेल्या लहान नौकांवरील लहान माऱ्याच्या तोफांचाही तुटवडा आहे. इकडे इंजिनियर्सही नाहीत. तीच गोष्ट गोलंदाज, खलाशी वगैरेचीही आहे. युद्ध नौकांवर तर ह्या लोकांची फारच टंचाई आहे. अशा परिस्थितीत अरबांनी जर आमची कुरापत काढली असती तर, आमच्यासमोर गंभीर प्रसंग उभा राहिला असता.

ह्या सर्व अडचणी आपण महाराजांच्या कानी घालाव्या म्हणजे त्यांना ह्या राज्याच्या रक्षणासंबंधी आवश्यक तो निर्णय घेता येईल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ८ आक्टोबर १७३७.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ५५, पृ. ९५—१००

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(55) LIVRO DAS MONSOES, No. 107, FLS 286.

पत्र क्रमांक ५८

व्हाइसरॉय बाजीरावाचे मेहुणे कृष्टाजीराव ह्यांना लिहिलेल्या खालील पत्रांत मराठ्यांविषयी तक्रार करतो :—

मोगल बादशहाच्या चास्सा (?) ह्या प्रांतातील सहाय्यक, श्री. कृष्टाजीराव महादेव (हे बाजीरावाचे मेहुणे. पूर्वी कल्याणचे सुभेदार होते. परंतु बाजीरावाशी त्यांचे न पटल्याने त्यांनी कल्याणची सुभेदारी सोडून बादशहाची नोकरी धरली). ह्यास—

आपले पत्र मिळाले. आपण म्हणता की, शत्रूने उत्तरेकडील प्रदेशात जी दलगबाजी केली ती आपणाला पसंत नाही. आपणाकडून मी ह्याच गोष्टीची अपेक्षा करीत होतो. आपण मोठ्या चातुर्याने वागलात ह्यात शंका नाही. आपणाविषयी मला पुष्कळ माहिती आहे. मला कळले आहे की, आपण कल्याणचे सुभेदार होता, तेव्हा आमच्याशी युद्ध टाळण्याचा आपण नेहमी प्रयत्न केला. आपला नेहमी शांततेकडे कल होता, व एकदा तह झाल्यावर तो मोडण्याची आपली चाल नव्हती. आपण जी शुभेच्छा व्यक्त केलीत त्याबद्दल मी आपला आभारी आहे.

आपण लिहिता की, आपला पक्ष मोगल बादशहाचा आहे व शत्रूला शासन करण्याचा बादशहाने निर्धार केला आहे. आपण पुढे म्हणता की, शत्रूचे दमन करण्याच्या कामी आमच्याशी सहकार्य करण्यास आपण तयार आहात. आपण जर आपल्या दोस्ताशी आणि निजामलमुलुकशी संधान साधले तर शत्रूला शरण आणण्यास फार सायास पडणार नाहीत. आपले पत्र मिळण्यापूर्वी मी ज्या मोहिमा सुरू केल्या होत्या त्या मी तशाच चालू ठेवीन. आमची दोन्ही आरमारे लवकरच उत्तरेकडे निघणार आहेत.

हे पत्र मी म्हाबद पै ह्यांच्याकडे पाठवीत आहे. ते आपणास सर्व काही समजाऊन सांगतील. आपण जर आमच्या आणि आपल्या समायिक शत्रूविरुद्ध आमच्याशी हातमिळवणी केलीत तर मला फार आनंद होईल."

गोवा, ३१ आक्टोबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ५८, पृ. १०२—१०३
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(58) LIVRO DAS MONCOES, No. 107 FLS 290.

पत्र क्रमांक ६०

मराठ्यांनी पोर्तुगिजांचे एक बेट घेण्याचा प्रयत्न केला असता पोर्तुगिजांनी तो प्रयत्न हाणून पाडल्याचे, उत्तरेकडील प्रदेशाच्या गव्हर्नरने व्हाइसरॉयला कळविले होते. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर लिहिले.

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्राइश ह्यांस—

नाझरेथ ह्या फ्रिगेटवर आलेल्या आपल्या पत्राचे उत्तर लिहीत असतानाच एका नौकेवर काल आपली १६, १७ आणि २१ ऑक्टोबरला लिहिलेली पत्रे आली. त्या पत्राचे उत्तर मी आता करीत आहे.

शत्रूने अग्निबेट घेण्याचा १५ ऑक्टोबरला केलेला प्रयत्न अयशस्वी झाल्याचे वाचून आनंद झाला. शत्रूला त्या बेटावर पाय लावू न देता माघार पिटाळून लावल्याबद्दल मी आपले अभिनंदन करतो. ह्या चकमकीत शत्रूची फार हानी झाली असे आपण म्हणता, ही गोष्ट खरोखर कौतुकास्पद आहे. आपण शत्रूच्या हानीचा मृत व जखमी—आंकडा दुसऱ्या पत्री कळविण्याचे कबूल केले आहे. ह्या पत्राची एक नक्कल आपण मला दुसऱ्या मार्गाने पाठविली आहे असे म्हणता, पण ती मला अद्याप मिळालेली नाही.

शत्रूकडून घेतलेल्या गलबतांचे रूपांतर आपण युद्ध नौकांत करता आहात ही चांगली गोष्ट आहे. जी गलबते बंदराबाहेर जाण्याच्या स्थितीत असतील त्यांचा फारच उपयोग होईल. कारण, आम्हाला चांचा मानाजी आंग्रे ह्याला व गायींच्या बेटावरील व्यापाराला विरोध करायचा आहे.

सिद्दी याकुतखान ह्यांना आपण जे उत्तर पाठविलेत ते मी पाहिले. त्यांच्या ज्या काही मागण्या आहेत, त्याबाबतीत आपण संदिग्ध भूमिका पाळणे सोयीचे आहे असे मला वाटते. नंतर त्या मागण्या मान्य करण्याचा अथवा न करण्याचा अधिकार माझा आहे, असे सांगून आपणाला जबाबदारीतून मुक्त होता येईल :

परंतु रघुनाथ ह्यांनी संभाजी आंग्रे ह्यांच्यावर राजापूर येथे मिळविलेल्या विजयाची जी बातमी आपण मला कळविली आहे, ती इथे मिळालेल्या बातमीशी जुळती आहे. फोंडू सावंत ह्यांना फितविण्याचा प्रयत्न करण्यात आल्याचेही मला कळले. परंतु फोंडू सावंत हे आमच्याशी एकनिष्ठ असून त्यांच्या बेईमानपणाविषयी संशय घेण्यास अद्याप जागा नाही. त्यांना माहीत आहेच की, त्यांच्या राज्यातून जर सैन्य आले तर मालमत्तेची फार हानी होईल. त्यामुळे ते आपली हानी करून घेतील असे मला वाटत नाही. ते हे संकट टाळू शकतील असे मला वाटते. मात्र त्यांना करुणा भाकूनच हे संकट टाळता

येईल. शत्रूला त्या प्रांतातील सैन्यासाठी दरमहा एक लक्ष रुपये खर्च करावे लागतात असे आपण म्हणता. ही बातमी फार महत्त्वाची आहे. कारण एवढा खर्च करण्याची कल्पना शत्रूला न मानवल्याने तो युद्ध बंद करील अशी आशा बाळगण्यास जागा आहे. आपणाला जो तहाचा प्रस्ताव सुचविण्यात आल्याचे आपण म्हणता त्यावरून माझा हा कयास आहे. परंतु शत्रूने जो मुलुख जिंकला आहे तो त्याने खाली केल्याशिवाय तहाचा प्रस्ताव मान्य करणे अशक्य आहे. आपण हा प्रस्ताव फेटाळून लावलात ते चांगले केलेत. माझी अशी भ्रामक समजूत नाही, की, मोगलांनी स्वारी केल्याशिवाय शत्रू तहास उभा राहील. केवळ आमच्या चिवट प्रतिकारामुळे तो नामोहरम होण्याचा संभव आहे.

आपणाकडे पाठवायची मदत का लांबली आणि दक्षिणेकडून येण्याच्या मदतीपूर्वी तिकडे काय जाणार आहे ते मी आपणाला दुसऱ्या पत्री लिहीन. दक्षिणेकडील मदत येण्यास विलंब झाला त्यामुळेच तिकडील स्वारी लांबणीवर पडली. परंतु मी आपणाला आश्वासन देतो की, एकदा ही लांबलेली मदत तिकडे गेली, की, त्याच्या लागोपाठ जाणारी मदत पुन: लांबणीवर पडणार नाही.

शत्रूच्या मनात आग्वादच्या टेकडीवर तटबंदी करून मोठे सामर्थ्य प्राप्त करून घ्यावयाचे आहे, हा जो आपला अंदाज आहे तो बरोबर आहे असे मला वाटते. पण त्यासाठी त्याला त्या ठाण्याभोवतालचा वेढा आवळावा लागेल आणि म्हणून मला असे वाटते, की, आपण शत्रूचा हा बेत हाणून पाडण्याचा प्रयत्न करावा. आपण बातमी दिली आहे की, मानाजी आंग्रे ह्याच्या गलबतांनी एक व्यापारी पाले पकडले. हे पाले गहू घेऊन वसईकडे चालले होते आपली दुसरी बातमी अशी आहे की, सदर्हू मानाजी आंग्रे ह्याची दोन पाली गायीच्या बेटानजीक असून त्याच्या नऊ माशुआ, कोळंभ, माहीम व शिरगाव ह्या ठाण्याच्या किनाऱ्यावर गस्त घालीत आहेत. असे जर असेल तर ह्या चांच्याला पिटाळून लावले पाहिजे, व त्यासाठी हाताशी असलेल्या सर्व नौका सशस्त्र केल्या पाहिजेत. मला इकडील स्वारी लांबणीवर टाकावी लागत आहे, पण त्यामुळे मी फार बेचैन झालो आहे. ही स्वारी लांबणीवर पडण्याचे मुख्य कारण म्हणजे दक्षिणेकडील तांदूळ होय. तो अद्यापि इकडे आलेला नाही. पावसाळ्याच्या सुरुवातीपूर्वी तो इकडे पाठविण्याची शिफारस करण्यात आली होती.

त्या प्रांतातील ठाण्यांच्या सेनाप्रमुखांनी आपणाला जी पत्रे लिहिली आहेत त्यावरून त्या ठाण्यांच्या परिस्थितीचे आकलन झाले. असेरीविषयी

तारापूरचे कॅप्टन थॉमस पेरैरा मेश्कित ह्यांनी जे काय लिहिले आहे त्यावरून मला असे वाटते की, त्या ठाण्याला मदत पाठविणे कठीण जाणार नाही. शत्रूने ह्या वेढ्यासाठी हजारापेक्षा अधिक माणसे वापरलेली नाहीत. आणि त्यांची विभागणी सबंध वर्तुळामध्ये अनेक वाटांमध्ये झालेली आहे. तेव्हा अशा विभागल्या गेलेल्या शत्रूवर हल्ला करण्यास फार कठीण जाणार नाही. आणि ज्याअर्थी ह्या ठाण्याला मदत करण्याची हमी आपण घेतली आहे, त्याअर्थी, आपण ह्या कामासाठी सर्व प्रकारच्या मार्गाचा अवलंब कराल व काम अचूक पार पाडाल अशी मी आशा बाळगतो. सुरतेहून आलेल्या सत्तर लष्करी शिपायांच्या पगाराविषयी आपण जे काय लिहिले आहे त्याविषयी मला सांगायचे आहे की, हा पगार फारच जास्त आहे. पण ज्याअर्थी, ह्या शिपायांनी बातेलांवर हल्ला करणाऱ्या मानाजी आंग्रे ह्यांच्या दारा गलबतांचा निधड्या छातीने प्रतिकार केला, त्याअर्थी, पुढे देखील ते असाच पराक्रम गाजवितील व त्यांचा ठरलेला पगार घेण्यास ते पात्र ठरतील अशी आशा आहे.

दमणचे पाले वसईला घेऊन जाण्याचा जो निर्णय आपण घेतला आहे तो सोयीस्कर आहे. कारण, मी सांगितल्याप्रमाणे तिकडे युद्ध नौकांची फार कमतरता आहे. परंतु दमणच्या कॅप्टनचे असे म्हणणे आहे की, त्यालाही तिकडे त्याची फार आवश्यकता आहे. पण माझा ह्यावर असा तोडगा आहे की, ज्याला त्याची प्रथम जरूरी आहे त्याने त्याचा प्रथम उपयोग करावा. शिवाय मी तिकडे लवकरच काही युद्धनौका पाठवीत आहेच. ह्या नौका तिकडे गेल्या की, आपणाला दमणचे पाले दमणला पाठविता येईल. आणि ह्या पालाच्या दुरुस्तीचे काम आपण ॲडमीनिस्ट्रेटर दों. आगोस्तिन्यु येंरिकिज ह्यांच्याकडे जे सोपविले आहे, त्याला माझी मान्यता आहे. कारण त्यांचा प्रामाणिकपणा, निःस्वार्थीपणा आणि तत्परता ह्या गुणांचे आपण जे वर्णन केले आहे, त्यावरून त्यांच्या संबंधीची साक्ष पटते.

कारंजाच्या कॅप्टनकडून त्या ठाण्याच्या रंक्षणाकडे दुर्लक्ष झालेले नाही. त्यांच्या हालचालीविषयी मला चांगली माहिती मिळाली आहे.

नबाब अब्दुल आजीजखान ह्यांनी सहा हजार घोडेस्वारांची आणि पंधरा, हजार पायदळाची जी मदत देऊ केली आहे त्याबद्दल मला असे वाटते की त्यांच्या शर्तीवरून ही मदत स्वीकारणे अशक्य होईल. आपण मला कळविलेच आहे की, नबाबांनी पाच लक्ष रुपयांची मागणी केली आहे. आपण त्यांना जे उत्तर पाठविलेत ते बरोबर आहे.

शाहूराजे व त्यांचा चुलत बंधू ह्या दोघांमध्ये बेबनाव सुरू झाल्याच्या ज्या बातम्या आपणाला मिळाल्या आहेत, त्या बातम्या जर खऱ्या असतील, तर त्या आम्हाला फायदेशीर ठरतील असे मला वाटते. परंतु मला अनेक लोकांकडून साताऱ्याच्या ज्या बातम्या कळल्या आहेत, त्यावरून आमच्या योजनांना चालना मिळेल असे मला वाटत नाही. आणि इकडे सैन्य पाठविण्याच्या बाबतीत फक्त किलिचखानाच्या स्वारीमुळेच काय तो व्यत्यय येईल. पण अशी बातमी आहे की, शाहूराजे व किलिचखान ह्या दोघांमध्ये तहाच्या वाटाघाटी सुरू झाल्या आहेत. आणि जर मराठ्यांवर किलिचखानाने स्वारी केली नाही, तर चालू परिस्थितीत आम्ही मराठ्यांना बेचैन करू शकणार नाही.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २ नवंबर १७३७.

कोंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ६०, पृ. १०४––१०९

संपादक :––

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(60) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 21V.

नाणी पाडण्यासाठी चर्चमधील चांदी घेण्यास हरकत नाही, असे व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस––

बांदोडा येथून आलेल्या गलबतावर आपली दोन पत्रे आली आहेत. त्यातील एक पत्र १८ सप्टेंबरचे असून दुसरे २० सप्टेंबरचे आहे. नाझरेथ ह्या नौकेवर आणखी सहा पत्रे आली. ती ८ ऑक्टोबरला लिहिलेली आहेत. त्या सर्व पत्रांचे उत्तर मी ह्या पत्राचे, द्वारा देत असून ते देशाहून इकडे आलेल्या फ्रिगेटवर पाठवीत आहे. १५ सप्टेंबरला केलेला हल्ला परतवून लावण्यात आपण जी बहादूरी गाजविलीत त्याबद्दल मी आपले अभिनंदन केले असून आपले आभारही मानले आहेत. आपल्या ह्या विजयाची बातमी मला ज्युआंव द सौझ फेररश ह्यांनी दिनांक १९ सप्टेंबरला लिहिलेल्या पत्रात कळविली होती. इतर गोटातूनही मला ही बातमी कळली.

आपण मुंबईच्या गव्हर्नरशी ज्या वाटाघाटी केल्या त्या मी मंजूर केल्याचे आपणाला अज्युडंट माथिअश सिमाँएश ह्यांना पाठविलेल्या त्यांच्या पत्रांच्या उत्तरावरून कळालेच असेल. ह्या वाटाघाटीविषयी त्यांनी मला लिहिले इतकेच नव्हे तर एका वजनदार इंग्रज गृहस्थालाही माझ्याकडे पाठवून दिले. हा इंग्रज गृहस्थ आपल्या मायदेशाला जाताना इकडे थोडा वेळ मला भेटण्यासाठी थांबला होता. शत्रूला हाकलून लावण्यासाठी आमच्या सैन्याशी सहकार्य करण्यास इंग्रज तयार आहेत असे कळले. युद्ध खर्चासाठी पैसा गोळा करण्याकरता आपण नगरपालिकेची वरिष्ठसभा व धर्मोपदेशकांची जी सभा बोलाविलीत व नाणी पाडण्यासाठी इगर्जीतील चांदी मागितलीत त्याला माझी मान्यता आहे. नाणी पाडण्यासाठी मी आपणाला ज्या मुद्रा पाठविल्या त्या आपणाला मिळाल्या असतीलच. महसूल खात्याच्या प्रमुखाला आणखी मुद्रा नौकेवर पाठविण्यासाठी तयार ठेवण्याची आज्ञा केली आहे. ठाण्याचे किल्लेदार खंडोजी मानकर ह्यांच्याशी आपण ज्या वाघाटी सुरू केल्या आहेत त्यावर आपला भरंवसा नाही असे आपण म्हणता. कारण ही माणसे ढोंगी असतात असे आपले मत आहे. पण किलिचखान त्यांच्यावर चालून येत असल्याची बातमी जर खरी ठरली, तर त्यांना आमच्याशी वाटाघाटी करण्यास सबळ कारण मिळेल. नबाब अद्बुल अजीजखान ह्यांनी आपणाला सहा हजार घोडेस्वारांची आणि १५ हजार पायदळाची जी मदत देऊ केली आहे ती माझ्या मते खास दुर्लक्ष करण्यासारखी नाही. आपण ह्या नबाबाचे आभार मानून त्याने देऊ केलेली मदत स्वीकारण्याची इच्छा दर्शविलीत आणि त्याच्या शर्ती काय आहेत याची चौकशी केलीत हे चांगले केलेत. ह्या नबाबावर विश्वास ठेवायचा की नाही ते नंतर बघता येईल.

त्या प्रांतातील ठाण्यांच्या सेनाप्रमुखानी आपणाला जी पत्रे लिहिली आहेत त्यांवरून त्या ठाण्यांच्या परिस्थितीचे आकलन झाले. ह्या ठाण्यांना मदत पाठविण्याची व्यवस्था मी केली आहे. तत्संबंधी मी आपणाला दुसऱ्या पत्री लिहीन. त्याशिवाय दक्षिणेकडूनही मदत येण्याची मी वाट पाहात आहे.

सध्यस्थिती लक्षात घेता आणि मुंबईच्या गव्हर्नरने जी मदत आपणाला करण्याचे आश्वासन दिले आहे, त्याचा विचार करता, इंग्रजांचा मराठ्यांशी जो व्यापार चालू आहे तो बंद न करण्याचा जो हुकूम आपण कारंजाच्या कॅप्टनला दिला आहे तो मला पसंत आहे. फक्त मराठ्यांच्या प्रदेशांत दारूगोळा जातो की काय याचाच तेवढा तपास करावा.

मुंबईच्या गव्हर्नरने आम्हाला वेळोवेळी कळविलेच आहे की, त्यांनी मराठ्यांना दारूगोळा पुरविण्याचे बंद केले आहे.

महसूल खात्याच्या कौंसिलच्या बैठकीत उत्तरेकडील प्रांतातील युद्धाच्या खर्चासंबंधींचे अनेक ठराव पसार करण्यात आले आहेत.

मेश्र द कांपु पेडु द मेलु हे आपल्या हुद्यावर पुनः रुजू झाल्याचे वाचून आनंद झाला. १५ सप्टेंबरच्या हल्ल्यात त्यांना जी जखम झाली तिच्यापासून त्यांना धोका पोहोचू नये अशी इच्छा आहे.

आणीबाणीच्या प्रसंगी ज्या अधिकाऱ्यांच्या हातून वीरोचित कृत्ये घडतात त्यांना बक्षिसे देण्यात मला खरोखर आनंद वाटेल. १५ सप्टेंबरच्या हल्ल्यात ज्या अधिकाऱ्यांनी बहादुरी गाजविली त्यांना बक्षिसे देण्यास माझी संमती आहे. शत्रूलादेखील अशा पराक्रमी अधिकाऱ्यांविषयी आदर वाटतो. युद्ध फार लांबत ठेवणे धोक्याचे आहे असा विचार करून व आपण काबीज केलेला मुलुख आपल्या हातीं राहील की नाहीं ह्यासंबंधी संभ्रम निर्माण होऊन, शत्रूने वसईच्या किल्ल्यास शिड्या लावल्या हा जो अंदाज आपण केला आहे तो साधार आहे असे मला वाटते.

त्या प्रांताचा कारभार बघण्यासाटीं आपण इकडून निघालात, तेव्हा आपण माझा निरोप घेताना जे विचार व्यक्त केले होते ते वरील दृष्टि-कोनाशी जुळते आहेत.

आपण म्हणाला होता की, युद्ध रेंगाळत चालले तर ते आमच्या फायद्याचे आहे. ह्या लांबत चाललेल्या युद्धासाठीं शत्रूला भयंकर खर्च करावा लागत असल्याकारणे त्याला ते परवडणार नाहीं. व म्हणून तो स्वतः होऊन तहाचा प्रस्ताव मांडील. परंतु आपला हा दृष्टिकोन मान्य नसणारे काही लोक आमच्यामध्ये आहेत. त्यांचे असे मत आहे कीं, दीर्घकाल चालू राहणाऱ्या युद्धाचे अनिष्ट परिणाम आम्हांलाही भोगावे लागणार आहेत, म्हणून आम्ही शत्रूला आमच्या प्रदेशातून हुसकून लावण्याचा एक दांडगा प्रयत्न केला पाहिजे.

मी आपणाला कुमक पाठवीत आहे व आणखीही पाठवीन. आपण तिचा उपयोग चातुर्याने करावा. आपण शत्रूच्या अगदीं जवळ असल्याने आपणाला सर्व परिस्थितीची पूर्ण कल्पना आहे. तारापूर आणि माहीम ह्या दोन्ही ठाण्यांच्या सेनाप्रमुखांनी ज्या गोष्टींची मागणी केली आहे, व त्या गोष्टींची जी यादी आपण मला सादर केली आहे, आणि लेफ्टनंट कर्नल इंजिनियर ह्यांनी जो अहवाल मला सादर केला आहे, त्यावरून त्या दोघांना काय हवे आहे याची मला कल्पना झाली आहे. ह्या ठाण्यांना मी जे काय पाठवीत आहे त्यातून आपणास त्यांना मदत करता येईल. माहे येथील फ्रेंचांकडून

मला जी मदत आली आहे आणि पाँडिचेरीहून मी ज्या जास्तीत जास्त मदतीची वाट पाहत आहे, त्यातूनच ही मदत पाठविली जाणार आहे.

आग्वादची टेकडी किती महत्त्वाची आहे, ते आपणाला माहीत आहेच. म्हणून ती शत्रूच्या हाती पडू न देण्याची शिकस्त आपण कराल अशी आशा आहे.

आपणाला पाठविलेल्या दुसऱ्या पत्रात मी पैसा, पुरवठा आणि दारूगोळा ह्यासंबंधी सविस्तर लिहिले असल्याने ह्या पत्रात तत्संबंधाने अधिक काही लिहीत नाही.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २ नोव्हेंबर १७३७

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ६१, पृ. १०९—११४

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(61) BASAIM, No. 9, FLS 18V.

पत्र क्र. ६२

व्हाइसरॉय उत्तरेकडील प्रांताच्या गव्हर्नरला लिहितो की, तांदूळ आणण्याकरता दक्षिणेकडे नौका पाठविल्या आहेत.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

त्या प्रांताकडे ऑक्टोबर महिन्यात मदत पाठविण्याचा निश्चय करून आणि अन्नाची बेगमी व दारूगोळा ह्यांची तिकडे फार आवश्यकता आहे हे लक्षात घेऊन पावसाळ्याच्या सुरुवातीला मी तांदूळाच्या वीस हजार गोण्या खरेदी करण्याचा हुकूम केला. हा तांदूळ सप्टेंबरमध्ये तयार असायला हवा होता. ह्या व्यापाऱ्यांनी हा सौदा मान्य केला, त्यांनी हा माल सप्टेंबरमध्ये आमच्या ताब्यात देण्याचे कबूल केले होते. त्याशिवाय पेद्रु आगियार ह्यांनाही मी सप्टेंबर महिन्यापर्यंत तांदळाच्या आणखी गोणींचा सौदा पटविण्यास सांगितले होते. त्यांनी मला उत्तर पाठविले की, हा तांदूळ नेण्याकरता

आमच्याकडील नौका पाठविण्यात याव्या. त्याप्रमाणे आम्ही तो तांदूळ आणण्याची तयारी करून तिकडे नौका पाठवून दिल्या. त्याचप्रमाणे रोझारियु हे फ्रिगेट फ्रेंचांनी कबूल केलेली मदत आणण्यासाठी माहेला पाठवून दिले. फ्रेंचांनी शस्त्रे व दारूगोळा ह्यांची मदत देण्याचे आश्वासन दिले असून ह्या वस्तूंची तिकडे फार टंचाई आहे. हे फ्रिगेट माल घेऊन मंगळूरला परतले तेव्हा त्याला कळले की, तांदूळ जहाजावर भरलेला नाही. इतकेच नव्हे तर, तो बंदरातही तयार नाही. त्याचे कारण हे की, तुफान पर्जन्यवृष्टीमुळे तांदूळ बंदरात आणण्यास अडथळा आला. हा तांदूळ ज्या खेड्यातून किनाऱ्यावर यायचा होता ती खेडी दूरची होती. ही वार्ता जेव्हा फ्रिगेटच्या कप्तानाला कळली तेव्हा त्याने मंगळूर बंदरातील आमच्या वखारदारास तांदूळ बंदरात आणून ठेवण्याचा हुकूम करून तो आपली नौका घेऊन इकडे आला. त्याने येताना काही शिपाई आणले. हे शिपाई कर्नाटकाच्या बंदरात त्याने आपल्या नौकेवर घेतले. ह्या शिपायांना त्या बंदरात फार दिवस ठेवणे इष्ट नव्हते कारण, त्यांची भरती करणारे वखारदार पेद्रु द आगियार ह्यांच्यात आणि त्या शिपायांत तेढ निर्माण झाली होती.

फ्रिगेट रोझारयुचे आगमन होण्यापूर्वीच तांदूळ तयार नसल्याची वार्ता मला खुष्कीच्या मार्गे कळली. तो तांदूळ मिळाला नसल्यास उत्तरेकडील प्रांतात सुरू करण्याची स्वारी लांबणीवर पडेल ह्या भीतीने मी जमविता येईल तितका तांदूळ जमवून ह्या नौकेवर पाठवून दिला. ही नौका लवकरच मायदेशाला परतणार असल्याने तिच्यावर पाठविण्यात आलेली कुमक उपसली की तिने आपल्या प्रवासाची तयारी करण्यासाठी लगेच इकडे परतायचे आहे.

पैसा जमविण्यासाठी मला इकडे ज्या अडचणी येत आहेत त्यांचा तपशील मी आपणाला लिहू शकत नाही. दशांश वसुली अद्याप झालेली नाही. आणि इगर्जीतून चांदीही फार थोडी आली. त्याचा परिणाम असा झाला की, मी आपणाला जी रक्कम पाठविण्याचे कबूल केले होते ती अद्याप तयार नाही. फ्रेंचांकडून दारूगोळा आणि हत्यारे खरेदी करण्यास आणि तांदूळ जमविण्यास एक लक्ष असुर्प्या खर्च झाल्या. आता ह्या नौकेवर फक्त एक लक्ष असुर्प्या पाठवीत आहे. त्यातील थोडी रक्कम चौलला पाठवून द्यावी.

मी जे शिपाई आपणाला पाठविण्याचे कबूल केले आहे ते सुमारे ५०० असतील असा माझा अंदाज आहे. त्यांच्याबरोबर पोर्तुगीज सैनिकांच्या काही कंपन्या तिकडे पाठविण्याचा माझा विचार होता. परंतु हे सैनिक फारच थोडे असल्याने व काहीजण इस्पितळात आजारी असल्याने ह्या राज्याच्या अनेक कोस लांब सरहद्दीच्या रक्षणाकडे दुर्लक्ष करून मी ह्या सैनिकांना तिकडे पाठवू

शकत नाही. परंतु तिकडील सैन्यटंचाई लक्षात घेऊन मी शंभर किंवा मिळतील तेवढे गोरे सैनिक तिकडे पाठवीत आहे.

चौल आणि कारंजा ह्या दोन्ही ठाण्यांच्या सेनाप्रमुखांनी मला अन्न-पुरवठा आणि इतर वस्तू पाठविण्याबद्दल कळविले आहे. म्हणून ह्या युद्ध-नौकेवर तांदळाच्या ज्या पाच हजार गोण्या जात आहेत, त्यापैकी दोन हजार गोण्या कारंजासाठी आहेत. त्याचप्रमाणे जो दारूगोळा पाठविला आहे त्यातील थोडा भाग कारंजासाठी असून बाकीचा इतर ठाण्यांना विभागून द्यावा.

औषधांच्या दोन पेटचा पाठविल्या आहेत. त्यातील एक चौलला आणि दुसरी कारंजाला आहे. वसईहून औषधांची मागणी आल्याचे मला आठवत नाही. तथापि, तिकडे औषधांची आवश्यकता असल्यास दोन्ही पेटचांतील थोडी थोडी औषधे काढून घेऊन उरलेली औषधे कारंजा व चौल ह्या दोन्ही ठाण्यांकडे पाठवून द्यावी.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ४ नोव्हेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ६२, पृ. ११४—११७

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(62) BASAIM, No. 7, FLS 24.

पत्र क्र. ६३

उत्तरेकडील प्रांतातील दोन लष्करी अधिकारी फरारी झाल्याची बातमी कळताच गोव्याचे व्हाइसरॉय हे उत्तरेकडील सेनापतीला लिहितात.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

इकडे अशी बातमी पसरली आहे की, सोपाराच्या टेहेळणी पथकाचे कमांडंट ज्युआंव पाशेकु द सौझ व त्या पथकातील एक अधिकारी लुईज लोपिज कायतानु हे दोघे शत्रूचे आगमन होण्यापूर्वी काही तास अगोदर गायींच्या बेटावर जाऊन राहिले होते. पण तिथूनही त्या दोघांनी पोबारा

केला. त्या दोघांना बडतर्फ करण्याची जी शिक्षा आपण दिली आहे ती अगदीच सौम्य आहे. त्याहूनही कडक शिक्षा त्यांना दिली पाहिजे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, ४ नोव्हेंबर १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ६३, पृ. ११७—१८०

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

पत्र क्र. ६५

वसईच्या वखारदाराची वागणूक उपमर्दकारक असल्याचे व्हाइसरॉयला कळले असता त्याने वसईच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहिले.

" उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉंइश ह्यांस—

ह्या गलबतावर आलेली आपली दोन्ही पत्रे मिळाली. त्यापैकी एक चालू महिन्याच्या ७ तारखेचे असून दुसऱ्यावर तारीख नाही. त्या पत्रात त्या ठाण्याचा वखारदार फ्रान्सिश्कु शव्हियेर ह्यांच्या उपमर्दकारक वर्तनाचा उल्लेख आहे. प्रस्तुत पत्राबरोबर जे कागदपत्र आहेत त्यात सदहु वखारदाराच्या उर्मटपणाबद्दल अनेक तक्रारी आहेत. त्या प्रश्नाबाबत मला योग्य ते मार्गदर्शन व्हावे म्हणून मी महसूल खात्याच्या सल्लागार मंडळाची बैठक भरवीत आहे. ही बैठक गलबत आल्यापासून भरविण्यात आली नव्हती. कारण, ह्या मंडळाचे सदस्य खेडयात दशांश कर लादण्यात गुंतले आहेत. ह्याच कारणामुळे आपल्या पत्रांची उत्तरे पाठविण्यासही विलंब झाला.

चालू माहीच्या ७ तारखेच्या पत्रात आपण कोळमच्या बुरूजांच्या अवस्थेचे वर्णन केले आहे, व त्या बुरूजांची पहाणी करण्यासाठी ज्या अधिकाऱ्यांना आपण तिकडे पाठविले होते, त्यांचाही अहवाल सोबत पाठविला आहे. ह्या बुरूजाचे रक्षण करणे अत्यंत आवश्यक आहे. कारण त्यांचा बचाव झाला नाही तर, माहीमला धोका आहे. म्हणून आपण तिकडे मदत पाठविण्याची दक्षता घेतलीत ते चांगले केलेत. तिकडे इकडून मदत पाठविण्याचे लांबणीवर पडल्याने मी फार बेचैन होऊन गेलो आहे. दक्षिणेकडून तांदुळ घेऊन येणारी जहाजे अद्याप आलेली नाहीत. त्यांची मी वाट पाहात आहे. पाँडिचेरीहूनही दारूगोळा आणि हत्यारे घेऊन येणारी नौका अद्याप आलेली नाही. ही मदत

मला फ्रेंचांनी देऊ केली होती. त्यांनी मला कळविले होते की, चालू माहीच्या १५ तारखेपर्यंत ती नौका इकडे पोहोचणार आहे. पण ती अद्याप आलेली नाही.

किलिचखान मराठ्यांवर चालून येत असल्याची वार्ता मी अनेकांच्या तोंडातून ऐकली आहे. आणि ज्या परिस्थितीत ती बातमी इकडे पसरली आहे, तिच्यावरून ती खरी असावी असे मला वाटते. परंतु सिद्दीने आपणाला जी बातमी कळविली तिच्याशी मात्र इकडील बातम्या जुळत नाहीत. त्याने त्या प्रांतातील जिल्ह्यांवर पाच हजार पायदळ आणि दोन हजार घोडेस्वार ह्यांच्यासह हल्ला करण्याचे ठरविले आहे, असे आपण जे म्हणता ते मला पटत नाही. मात्र मराठ्यांवर किलिचखानाचा हल्ला होणार असल्याची जी बातमी पसरली आहे ती मला विश्वासार्ह वाटते.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १९ नोव्हेंबर १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ६५, पृ. १२०—१२२
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(65) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 36V.

पत्र क्र. ६६

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, राजा सवाई जयसिंग ह्यांच्यामार्फत बाजीरावाशी तह घडवून आणण्याचा आपला प्रयत्न चालू आहे.

" उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

राजा सवाई जयसिंग ह्यांनी आपणाकडे पाद्री मानुएल फिगेरेदु ह्यांना पाठवून देण्याबद्दल मला कळविले होते. कारण, सदर्हू पाद्री फिगेरेदु ह्यांच्याविषयी राजा सवाई जयसिंग ह्यांना आदर वाटतो. त्याचप्रमाणे दोन गणित तज्ञांनाही त्यांनी आपणाकडे पाठवून देण्याबद्दल लिहिले होते. हे गणिततज्ञ लिस्बनहून येण्याची मी वाट पाहात होतो. ते ह्या मोसमात येऊन दाखल झाले तेव्हा मला वाटले की ते योग्य वेळी येत आहेत. कारण त्यांना राजा सवाई जयसिंग ह्यांच्याकडे पाठविले असता त्यांना आनंद होईल व त्यांच्यामार्फत बाजीरावाशी तहाचा करार करून घेता येईल अशी मला आशा वाटत

होती. बाजीराव व सवाई जयसिंग ह्या दोघांचे संबंध चांगले आहेत असे मला सांगण्यात आले होते. परंतु पाद्रचाने सवाईजयसिंगाकडे पाठविण्याचा बेत आखीत असता त्या मार्गात धर्माप्रमाणेच प्रवासाचेही धोके आल्याने त्यांचा प्रवास पुढे ढकलणे भाग पडले. ह्या संबंधी मी महाराजा सवाई जयसिंग ह्यांना लिहीत असून त्यांना एक नजराणाही पाठवीत आहे. हा नजराणा म्हणजे महाराजांनी मला अर्पण केलेल्या नजराण्याची पुर्नभेट आहे. तो सुरत येथे पाठविला जाणार असून तो नेण्याची व्यवस्था करण्याबद्दल महाराजांना कळविण्यात आले आहे. कारण प्रवास धोक्याचा असल्याने तो तिकडे पाठविता येत नाही.

पाद्री फिगेरेदु ह्यांनी पेद्रु द सिल्वा ह्यांना लिहिले आहे की, आपण महाराजा सवाई जयसिंग ह्यांना तहाचा प्रश्न पुढे करण्याबद्दल प्रवृत्त करणार आहोत. पत्रे आणि नजराणा सुरतेला नेण्याची कामगिरी मी पाद्री फिगेरेदु ह्यांचा पुतण्या सेकंड लेफ्टनंट लुईज आंतोनियु ह्यांच्याकडे सोपविली आहे. कारण, तो त्या प्रदेशात पाद्री फिगेरेदु ह्यांच्याबरोबर होता, व तो प्रदेश त्याच्या परिचयाचा आहे. त्याच्याकडे मी जे पत्र देत आहे, त्याची एक प्रत आपणाकडे पाठवीत आहे. त्या पत्राच्या संदर्भात आपण ह्या प्रश्नावर त्याला आपणास हवे असल्यास आणखी हुकूम द्यावेत. ह्या विषयी तूर्त मला ह्या-शिवाय आणखी काही लिहायचे नाही.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, ६ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ६६, पृ. १२२—१२३
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(66) BASAIM, No. 7, FLS 44.

पत्र क्र. ६७

बाजीराव व पोर्तुगीज ह्या दोघांमध्ये समेट घडवून आणावा अशी विनंती व्हाइसरॉय महाराजा सवाई जयसिंग ह्यांना पुढील पत्रात करतो.

“हिंदुस्थानातील राजामध्ये सर्वात बलाढ्य आणि विद्याप्रेमी राजा व मोगल बादशहाशी इमानी असलेला राजा की, देव त्याच्यावर आपल्या दैवी अनुग्रहाचा वर्षाव करो.

आपले पत्र मिळाले, फार आनंद झाला. आपल्या पत्राविषयी मला केवढी उत्कंठा वाटते ते आपणाला लिहिण्याची आवश्यकता नाही. मराठ्यांशी आमचे जे युद्ध चालू आहे, त्याकडे आपले लक्ष असून ह्या बाबतीत आपणाला न लिहिता सर्व काही माहीत आहे असे मी गृहीत धरतो.

बाजीराव हा ह्या युद्धाचा मुख्य सूत्रधार आहे. त्याचा आणि आमचा तह व्हावा म्हणून, मध्यस्थ ह्या नात्याने बाजीरावापाशी शद्ब टाकावा व आपल्या वजनाचा उपयोग करावा, अशी माझी आपणाला विनंती आहे. गणिततज्ञ पाद्र्यांना आपणाकडे पाठवायचे आहे. परंतु प्रवासाच्या मार्गात धोके असल्यामुळे ते इकडे अडकून पडले आहेत. पाद्री मान्युएल फिगेरेदु हे देखील तिकडे जाऊ शकत नाहीत. आपणाकडे जाण्याची त्यांची फार फार इच्छा आहे. सांप्रत ते आजारी आहेत. युद्ध समाप्त होऊन रस्ते बिनधोक झाले की, त्यांना तिकडे ताबडतोब पाठवून देईन. आपल्या सेवेस मीं सदैव तत्पर आहे. मी माझी खरीखुरी मैत्री आपल्या निदर्शनास आणीन.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो”.

गोवा, ७ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., VOL. III, PART V.

पत्र क्र. ६७, पृ. १२३—१२४

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

पत्र क्र. ६८

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला पाठविलेल्या पत्रात काही सूचना करतो :—

“उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॅइश, ह्यांस—

दक्षिणेकडील तांदूळ इकडे आणण्याच्या कामी फारच विलंब लागला. मी आपणाला ४ नोव्हेंबरला जे पत्र लिहिले त्यात सर्व अडचणी तपशीलवार

लिहिल्या आहेत. शेवटी एकदाचा हा तांदूळ घेऊन येणारी गलबते काल ह्या बंदराला लागली. त्यांना प्रवासात फ्रिगेट रोझारियुचा पहारा होता. हा तांदूळ इकडे लवकर येऊ शकला नाही म्हणून तिकडे मदत लवकर जाऊ शकली नाही.

तिकडे पाठवीत असलेली मदत मोठी नाही. त्याची कारण आपणाला माझ्या ४ नंबरच्या पत्रात सापडतील. तिकडे शंभर पोर्तुगीज सैनिकांहून अधिक सैनिक पाठविण्याची इच्छा असून देखील मी ते पाठवू शकत नाही. कारण, इकडेही शत्रूच्या आक्रमणाचा धोका आहे. पुन: आजारापायीही सैनिकांची संख्या दिवसें-दिवस कमी होत चालली आहे. जर मार्च महिन्यापर्यंत इकडे शांतता नांदली तर मी एकाद्या जहाजावर अधिक सैनिक पाठवीन. त्या दरम्यान तिकडे आपणाला माणसांची कमतरता भासणार नाही अशी मला आशा आहे. कारण, शिपायांची जी तुकडी तिकडे जात आहे, तिचा उपयोग आपणाला आपल्या हाताशी असलेल्या सैनिकांसह आपली उद्दिष्टे पार पाडण्यासाठी करता येईल. शिपायांप्रमाणेच नौकांचाही आपणाला उपयोग होईल.

ह्या आरमाराचा उपयोग व्यापारी जहाजांच्या रक्षणासाठी होत आहे. त्यांनी आपला व्यापार चौल येथे करायचा आहे. आरमाराधिपतीला मी हुकूम केला आहे की, त्याने व्यापारी जहाजांना चौल येथे ठेवून, लढाऊ नौकांसह थेट वसईला जाऊन तेथे सैनिक आणि रसद उतरावी. नंतर त्याने चौलला माघारी येऊन व्यापारी जहाजांना व आपण सांगाल त्या नौकांना घेऊन जावे.

आरमारामध्ये फ्रिगेट रोझारियुचा अंतर्भाव झाला आहे. त्याच्यावर असलेला माल त्याने वसईला उतरल्यावर दीवला जावे, अशी त्याला सूचना करण्यात आली आहे, कारण, त्याच्यावर दीवलाही मदत पाठविण्यात आली आहे. दीवला मदत उपसल्यावर त्याने मग वसईला येऊन आपली पत्रे घ्यावी व इकडे प्रयाण करावे. त्याने इकडे २५ जानेवारीपर्यंत आले पाहिजे. कारण, त्याला पुन: त्या प्रांताकडे लगेच पाठविण्याचा माझा विचार आहे. त्यावेळी मी वर उल्लेख केलेले पोतगीज सैनिक त्याच्यावर पाठविणार आहे.

व्यापारी नौकांचे इकडे आगमन होईपर्यंत तिकडे आपल्या हुकुमाखाली ज्या युद्धनौका राहाणार आहेत त्यात सांमिगेल ही एक पताश असेल. ही युद्धनौका त्याच किनाऱ्यावरील आहे. त्याशिवाय नवीन पताश आणि भोसल्यांकडून घेतलेले गालियोत अथवा पाले आणि तीन लागी ह्यांचे मिळून हे आरमार बनलेले आहे. ह्या युद्धनौकांपैकी सांमिगेल ही पताश आणि तीन



व्ही ५५५८–३१अ

गाली त्या प्रांताच्या किनाऱ्यावर पावसाळ्यात राहाणार आहेत. बाकीच्या युद्धनौकांनी इकडे परतायचे आहे.

व्यापारी नौकांनी दमणचाही व्यापार करावा, व पताश कापितानिया हिने एकट्यानेच किंवा आणखी काही नौकांसह सुरतेला जाऊन तेथे सेकंड लेफ्टनंट लुईज आंतोनियु फिगेरेदु ह्याला त्याच्याबरोबर महाराजा सवाई जयसिंग ह्यांना पाठविण्यात आलेल्या नजराण्यासह सोडावे. ह्यासंबंधी आपणाला दुसऱ्या एका पत्रात वेगळे लिहिले आहे.

ज्याअर्थी, व्यापारी जहाजांना इकडे आणण्यास दमण येथे काही माल मिळणार नाही, त्याअर्थी, त्यांनी दमणचे भात भरून ते मुंबईला आणून उपसावे. आपण कमांडंटला दमणचे भात वसईला आणण्याबाबत दमणचे गव्हर्नर फिलिप द व्हालादारिज ह्यांना प्रवृत्त करावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ८ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III. PART V.

पत्र क्र. ६८, पृ. १२४—१२७

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(68) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 40V.

पत्र क्र. ६९

व्हाइसरॉय वसईच्या सेनापतीला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, माहीम येथील हिंदूंनी जर दंगल केली असेल तर, इतरांना धडा मिळावा म्हणून त्यांना शिक्षा झाली पाहिजे.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

ज्या गलबतावर आपले ७ नोव्हेंबरचे पत्र आले त्याच गलबतावर त्याचे उत्तर पाठविले. आता एका नौकेवर आलेल्या आपल्या १५ नोव्हेंबरच्या पत्राचे उत्तर पाठवीत आहे. आपल्या पत्राबरोबरच माहीम व असेरी ह्या ठाण्यांच्या कॅप्टनची व दीवच्या किल्लेदाराचेही पत्र आले. ह्या सर्व पत्रांवरून ठाण्याच्या परिस्थितीचे आकलन झाले. माहीम येथील ज्या हिंदुंनी दंगल केली ते हिंदू शिक्षेस पात्र आहेत. इतरांना धडा मिळावा म्हणून गुन्हेगारांना शिक्षा झाली पाहिजे.

वसईला गव्हाने भरलेल्या नौका आल्याचे आपण ज मला कळविले आहे ते वाचून आनंद झाला. गोगाहून येणारे सैन्य असेरीच्या मदतीसाठी उतरावे असे आपणाला वाटते. परंतु ही महत्त्वाची योजना सांप्रत तहकूब ठेवली पाहिजे. मला असे वाटते की, हे सैन्य गुप्तपणे उतरविण्यात यावे. कारण शत्रूला जर आम्ही सैन्य उतरविल्याची बातमी कळली तर तो तिथे आपले सैन्य आणील. त्याने तसे करू नये म्हणून हे सैन्य गुप्तपणे उतरविले पाहिजे. दीवच्या किल्लेदाराने सद्यःपरिस्थितीत झटपट हालचाल करून जी मदत गोळा केली त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. आपण वर्सोवा येथे तलाव बांधण्यास सुरुवात केलीत ते चांगले केलेत. हा तलाव अत्यंत उपयुक्त होईल ह्यात शंका नाही. बांदोडा येथील तलाव दुरुस्त झाला तर बरे होईल.

मोगल सैन्य चाल करून येत असल्याची बातमी जर खरी असेल तर आनंद आहे. परंतु सुरतेहून आलेल्या बातमीशी ही बातमी जुळत नाही. आणि म्हणून मला त्या बातमीविषयी शंका वाटते. आरमार पाठविण्यास विलंब का झाला त्याची कारणे मी आपणाला मागच्या पत्रात कळविली असल्याने ह्या पत्रात तत्संबंधाने अधिक काही लिहिण्याची इच्छा नाही.

वसईची वखार आणि तिचा वखारदार ह्यांच्याविषयी आपल्या ज्या तक्रारी आहेत, त्यांची चौकशी महसूल खात्याचे प्रमुख आंतोनियु कार्नेस द आल्कांतारा हे करणार आहेत, व वखारीची तपासणीही तेच करणार आहेत.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ९ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ६९, पृ. १२८—१२९

संपादक :— पत्र क्र. ६९,१२८-१२९

A. B DE BRAGANSA PEREIRA.
(69) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 42V.

७०

इंग्रजांच्या गलबतांनी गोवा शहरातील व्यापाऱ्यांचे एक गलबत पकडून त्याच्यावरील तांदूळ सक्तीने उतरून घेतला, अशी तक्रार व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पुढील पत्रात करतो.

"मुंबईचे सेनापती जॉन हॉर्न ह्यांस--

पुष्कळ दिवस झाले, आपले पत्र नाही. मात्र आपली जहाजे अधूनमधून ह्या बंदराला लागून जातात. ह्या जहाजांपकी जी जहाजे दक्षिणेकडे गेली त्यांनी ह्या शहरातील दोन व्यापाऱ्यांचा तांदूळ सक्तीने उतरून घेतला असल्याचे कळले. हा तांदूळ ते व्यापारी एका नौकेने सरकारासाठी आणीत होते. त्या व्यापाऱ्यांनी मला जो अर्ज केला आहे, त्याची नक्कल प्रस्तुत पत्रासमवेत आपणाकडे पाठवीत आहे. ह्या अर्जात म्हटले आहे की, हे गलबत संभाजी आंग्रे ह्यांच्या युद्ध नौकांनी पकडले होते. पण त्यांनी ते सोडून दिले. नंतर त आपल्या नौकांनी पकडले व त्याच्यावरील एक हजार एकशेवीस गोणी तांदूळ काढून घेतला. तरी आपण ह्या तांदळाचा हिशेब घ्यावा व तो एकाद्या सुरक्षित ठिकाणी ठेवून देण्याचा हुकूम करावा. म्हणजे त्या व्यापाऱ्यांना अथवा त्यांच्या प्र.तनिधींना तो तिथून घेता येईल.

किलिचखान मराठ्यांच्या सैन्यावर चालून येत असून मराठ्यांच्या सैन्याशी त्याच्या सैन्याची चकमक उडाल्याची बातमी आहे. ही बातमी अनेक ठिकाणी प्रसृत झाली असल्याने तिच्याविषयी शंका घेता येत नाही. परंतु ह्या कारणामुळे शत्रूसैन्याची नजर जरी दुसरीकडे वळली असली तरी शत्रूने हा प्रांत काबीज करण्याची योजना सोडून दिलेली नाही. मी शत्रूसैन्याला तोंड देण्यासाठी इकडून मला जितके सैन्य पाठविणे शक्य होते तितके पाठविले आहे.

मला बालाघाटहून कळले आहे की, गोवा बेटाला लागून असलेल्या शत्रूच्या प्रदेशात सैन्याची जमवाजमव चालू असून हे सैन्य गोवा बेटावर कधी हल्ला करील याचा नेम नाही. पण, तरीही मी मला जमविता येईल तितके सैन्य जमवून उत्तरेकडील प्रदेशात पाठवून देत आहे. पण मला असे वाटते की, मोगल सैन्य शत्रूवर जे चालून येत आहे, त्या संधीचा जर आपण उपयोग करून घेतला नाही तर, अशी संधी पुन: कधी येणार नाही. तरी ही परिस्थिती लक्षात घेऊन मला असे वाटते की, आपण ह्या प्रकरणी लक्ष घालून आम्हाला मदत करावी. आपणाला विलायतेहून जी मदत आली आहे, तिच्यासह आपण आम्हाला मदत करू शकाल. आपले सैन्य जर आमच्या उत्तरेकडील सैन्याला मिळाले तर आमच्या पक्षात पुष्कळच सुधारणा होऊ शकेल. माझ्या कानावर वारंवार बातम्या येत आहेत की, आपले प्रजाजन मराठ्यांच्या ताब्यात असलेल्या गायीच्या बेटात व्यापार करीत आहेत. ह्या व्यापारामुळे शत्रूचा चांगलाच फायदा होत आहे व त्याचा उपयोग तो आमच्या

विरुद्ध करीत आहे. तरी ह्या प्रकरणी लक्ष घालून आपण हा व्यापार बंद पाडाल अशी आशा बाळगतो.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २१ डिसेंबर १७३७.

आपला सेवक,

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७०, पृ. १३०—१३१

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(70) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 56.

पत्र क्र. ७१

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, बाजीरावाचे मेहुणे व्यंकटराव हे एक हजार घोडेस्वार व दोन हजार पायदळ ह्यांच्यासह गोव्यावर चाल करून येत असल्याची बातमी आपणाला कळली आहे.

" उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस—

आरमारावर मी आपणास निरोप पाठविला होता की, इकडे जे भाडोत्री सैन्य आहे ते मी तिकडे शार रूअ ह्या युद्धनौकेवर पाठवून देईन. हे सैन्य आणि तिकडे जे सैन्य आहे ते मिळून आपणाला नवीन चढाई सुरू करण्यास बस हीईल. कारण, शत्रूचे जे सैन्य तिकडे लढत आहे ते फार नाही हे तर झालेच. परंतु मोगल सैन्यही शत्रूवर चाल करून येत असल्याची बातमी असल्याने तिकडील शत्रूसैन्यास कुमक येण्याचा संभव नाही. मी आपणाला मागे जो निरोप पाठविला होता तो आता पूर्ण करीत आहे. असे कळते की, बाजीरावाचे मेहुणे व्यंकटराव हे एक हजार घोडेस्वार आणि दोन हजार पायदळासह इकडे चालून येत आहेत. तसेच सरदार रामराव हे देखील कित्तुरपासून दोन मैलांवरून दोन हजार घोडेस्वार आणि काही पायदळासह इकडे निघाले आहेत. परंतु ह्या बातम्या मिळून देखील मी आपणाला मदत पाठवीत आहे. आपल्या चालू महिन्याच्या ५ आणि ७ तारखेच्या पत्रातील काही मुद्यांची उत्तरे मी आता देत आहे. इतर मुद्यांची उत्तरे नंतर सवडीन विचार करून देईन.

कृष्ण रामराव हे वरील चौल येथे आले असल्याचे आपण म्हणता. त्यांच्या प्रस्तावाशिवाय मी ह्या प्रश्नासंबंधी काहीच सांगू शकत नाही. परंतु माझा असा अंदाज आहे की, हा प्रस्ताव आपल्या कल्पनेप्रमाणे असू शकेल. मला जरी ह्या आशियाटिक लोकांच्या स्वभावाचा फारसा अनुभव नसला तरी, त्यांच्या स्वभावाची पारख आहे. मी मागच्या एका पत्रात आपणाला लिहिले होते की, चौल येथील आणि इतर ठाण्यांतील तटांपासून शंभर कदमावर असलेली घरे पाडून टाकावी. हे पत्र आल्यावर चौल येथील काही लोकांनी मला कळविले आहे की, तिथली घरे इतकी कच्ची आहेत की, ती केव्हाही पाडता येतील. त्यांचे असे म्हणणे आहे की, ज्यावेळी आणीबाणीची परिस्थिती निर्माण होईल तेव्हा आपण ती घरे पाडू. आपणाला तिकडील माहिती माझ्यापेक्षा अधिक असल्याकारणे आपण काय ते ठरवावे.

कोळंब आणि शिरगाव येथील जमीनदारांनी मदतीचा आणि दारूगोळ्यांचा खर्च भरला असता तर बरे झाले असते. कारण, ह्याच मदतीने आणि दारूगोळ्याने तिथल्या किल्ल्यांचे रक्षण केले जात आहे. परंतु संघाच्या पाद्रयांमुळे हा निर्णय अमलात येईल असे मला वाटत नाही. दुसरी महत्वाची गोष्ट ही की, आमचे स्वामी हे त्या खेडयांचे धनी असल्याकारणे साहजिकच त्या खेडयांच्या रक्षणाची जबाबदारी त्यांच्यावर पडते. म्हणून त्या खेडयांचे रक्षण सरकारी खजिन्यांतील पैशांतून झाले पाहिजे.

आपण पाठविलेले कैदी इकडे येऊन पोहोचले.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २२ डिसेंबर १७३७

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७१, पृ. १३२—१३५

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(71) BASAIM, No. 7, FLS 46.

पत्र क्र. ७२

व्हाइसरॉय खालील पत्रात चौलच्या कॅप्टनला काही सूचना करतो.

"चौलच्या ठाण्याचे कॅप्टन कायतानु द सौझ पेरैरा ह्यांस—

ह्या गलबतावर पाठविलेली आपली ८ पत्रे मिळाली. त्यातील काही मी पाठविलेल्या पत्रांची उत्तरे आहेत. त्या सर्व पत्रांचे उत्तर मी आता ह्या

पत्राचेद्वारा देत आहे. शत्रूच्या हल्ल्यांना परिणामकारक तोंड देण्याचा एकच उपाय आहे. आणि तो म्हणजे जागरूक राहणे. शत्रूच्या हल्ल्यांची आपल्या पत्रात आपण कल्पना दिलीच आहे. आपल्या कारकिर्दीत आपणाही दक्षता नेहमीच घेतली आहे, हे आपल्या शेजाऱ्यांना माहीत आहेच. पण तरीही काळजी घेतलेली बरी. आपणाला मिळालेल्या माहितीवरून पूर्व उपाययोजना म्हणून बाजीरावाच्या समजल्या जाणाऱ्या ज्या लोकांना आपण अटक केलीत त्या अटकेला माझी मान्यता आहे. पण आपण ज्याअर्थी म्हणता की, ह्या माणसांचा गुन्हा सिद्ध करणे कठीण आहे, त्याअर्थी, त्यांना शासन करणे हे देखील कठीण आहे. तथापि, मला वाटते की, ह्या माणसांना तूर्त तुरुंगातच ठेवावे, व त्यांच्या गुन्ह्यावर प्रकाश पडतो की काय ते बघावे. नंतर त्यांना तुरुंगात ठेवायचे की सोडून द्यायचे ते ठरविता येईल.

आपण मला कळविता की, संभाजी आंग्रे व इंग्रज ह्यांच्यामध्ये काही करार झाले आहेत. त्याचा परिणाम अपेक्षेहून वेगळा झाला. मुंबईच्या गव्हर्नरने आभार मानून मला पत्र लिहिले आहे. ते पत्र मिळाल्यावर मला मोठा आनंद झाला. संभाजी आंग्रे हेही जर ह्या कराराने खूष झाले तर मला आनंद होईल. दोघांही वादी प्रतिवादींना खूष करणे हाच मध्यस्थीचा खरा हेतू असतो. पुष्कळ दिवस झाले सिद्दीचे पत्र नाही. आपण पत्रात म्हणता की, मराठ्यांना शरण जाण्याइतकी त्याची स्थिती फार शोचनीय झाली आहे. परंतु ही बातमी मला आणखी कुणाकडूनही कळलेली नाही, आपण ज्या ह्या बातम्या कळविता त्यावर काळच प्रकाश टाकू शकेल.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २२ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७२, पृ. १३५—१३६

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(72) CHAUL, N 2, FLS 74V.

पत्र क्र. ७३

वसईच्या गव्हर्नरने व्हाइसरॉयला वसईला सैन्याची कुमक पाठविण्याची विनंती केली होती, त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर धाडले.

"पेद्रु द मेलु ह्यांस—

आपले चालू माहीच्या ८ तारखेचे पत्र पावले. हे पत्र शाररूअवर आले तर, इतर पत्रे दुसऱ्या मार्गाने गलबतावर आली. त्या सर्व पत्रांचे उत्तर मी ह्या पत्रांतून देत आहे व ते शार रूअवरच रवाना करीत आहे.

आपल्या चालू माहीच्या ४ तारखेच्या पत्रात आपण ज्या अडचणी मांडल्या आहेत, त्यांचे मला चांगले आकलन झाले. माझ्यापाशी किती सैन्य होते, ते आपणाला माहीत होते. दुसरी गोष्ट अशी की, शत्रूची मोहीम केवळ त्या प्रांतापुरतीच नव्हे तर, इकडेही व्यापक होणार असल्याच्या बातम्या येत होत्या. अशा परिस्थितीत ह्या बेटाच्या रक्षणासाठी माझ्या हाताखाली अवघी दोनशे माणसे उरली होती. त्यांना ह्या नौकेवर पाठवून देत आहे. कालच मला कित्तुर येथून संघाचे पाद्री गोंसालु पिंतु ह्यांचे पत्र आले आहे. त्यांनी मला इशारा दिला आहे की, सरदार हे अडीच हजार घोडदळ आणि तितकेच पायदळ घेऊन कित्तुर संस्थानच्या शेजारून इकडे निघाले आहेत. हीच वार्ता मला तिकडून आलेल्या बार्देशमधील काही लोकांनी कळविली. ह्या बातमीत म्हटले आहे की, बाजीरावाचा मेहुणा व्यंकटराव हा एक मोठे सैन्य घेऊन कोल्हापूरहून इकडे निघाला आहे. ह्याच बातम्या मला कुंभारजुवे आणि साष्टी येथूनही कळविण्यात आल्या. ह्या बातम्या जर खऱ्या असल्या तर परिस्थिती फार चिंताजनक आहे असे म्हणणे क्रमप्राप्त आहे. तसे इकडे संघाचे पाद्री आणि भिक्षु पुष्कळ आहेत. ते ह्या राज्याच्या रक्षणाची धुरा वाहू शकतील. परंतु ह्या लोकांत आणि लष्करात कृती आणि कामाचे सातत्य ह्या बाबतीत मोठाच फरक आहे. ह्या राज्याचे सर्व वजन माझ्या संघावर पार्ले पडले आहे ह्याची मला विस्मृती पडलेली नाही. कारण, हा सर्व मुलुख आमच्या स्वामीच्या मालकीचा असून त्यांनी त्याच्या रक्षणाची जबाबदारी माझ्यावर सोपविली आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २२ डिसेंबर १७३७.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७३, पृ. १३७—१३८

संपादक :—

A. B DE BRAGANSA PEREIRA

(73) BASAIM, No. 7, FLS 48V

पत्र क्रमांक ७४

गोवा राज्याचा सचिव सोंदेच्या राजाच्या दिवाणाला मराठ्यांच्या संभाव्य स्वारीसंबंधाने काही सूचना करतो.

"अण्णाजी पंडित ह्यांस—

आपले चालू महिन्याच्या २० तारखेचे पत्र मिळाले. आपले आरोग्य उत्तम असल्याचे वाचून आनंद झाला. आपल्या पत्राचे उत्तर लवकर पाठविण्याचा विचार केला. ह्या पत्रात ..........................
मराठ्यांचे एक मोठे सैन्य कोकणात उतरण्यासाठी घाटावर गोळा झाले असल्याची बातमी आपणाला लागली आहे असे आपण म्हणता. ह्या शत्रूला तोंड देण्यासाठी ....................................
ही बातमी आणि आपले पत्र नामदार व्हाइसरॉय ह्यांना सादर करण्यात आले. त्यांनी कुमक पाठविण्याचे ठरविले आहे. तत्पूर्वी प्राथमिक उपयायोजना म्हणून आपण वळवईनदीत आणि इतर ठिकाणी आपल्या ज्या नौका आहेत त्या आमच्या हद्दीत आणून ठेवाव्यात. शत्रूने बालाघाटपर्यंत माघार घेतली की, ह्या नौका आपणाला आपल्या मुलुखात परत नेता येतील. आपल्या नौका जर शत्रूच्या हातात पडल्या तर तो त्यांचा आपणाविरूद्ध उपयोग करील म्हणून मी आपणाला ही काळजी घेण्याची सूचना करीत आहे.

शत्रू आल्याचे कळले की, नामदार गव्हर्नरसाहेब आपणाला यत्किंचितही विलंब न लावता दारूगोळा पाठवितील व राज्याच्या रक्षणालाही हातभार लावतील.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २४ डिसेंबर १७३७

लुईज आफाँस दानाश

A P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७४, पृ. १३८—१३९

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(74) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 56V.

पत्र क्रमांक ७५

मराठ्यांच्या स्वारीला तोंड देण्यासाठी व्हाइसरॉयने पोर्तुगिजांच्या अंकित असलेल्या मुलुखात एकदशांश कर गोळा करण्याचा एक हुकूम काढला होता. तो पुढीलप्रमाणे आहे.

हुकूम :—

ह्या राज्याचे आणि मराठ्यांचे युद्ध पेटले असून त्याने आमच्या उत्तरेकडील प्रांताचा बराच मोठा भाग आणि किल्ले काबीज केले आहेत. ह्या युद्धाच्या खर्चासाठी इगर्जीतील चांदीचा मोठा भाग सरकारजमा करण्यात आला असून सर्व मालमत्तेवर एकदशांश कर लादण्यात आला आहे. हा सर्व खटाटोप ह्या राज्याचे रक्षण करण्यासाठी असून आमचे स्वामी पोर्तुगालचे राजे ह्यांनी दयावंत होऊन तिथून कुमक पाठवीपर्यंत युद्धाचा हा अफाट खर्च चालू राहाणार आहे. म्हणून महसूल खात्याचे प्रमुख मान्युएल सोअरिज द व्हेल्यु ह्यांना देशाकडील व्यापाऱ्यांकडून त्यांच्या सां पेद्रु द आल्कांतारा व माद्र द देऊश ह्या नौकांमार्फत इ. स. १७३६ व इ. स. १७३७ ह्या दोन मोसमातील व्यापाराबाबत दोन लक्ष असुर्प्या वसूल करण्याचा अधिकार देण्यात येत आहे. प्रस्तुत नौकांनी ही रक्कम भरल्याशिवाय ह्या शहरातील व्यापाऱ्यांना त्या नौकांवर आपला माल पाठविता येणार नाही.

पानेली, २६ डिसेंबर १७३७.

कौंट व्हाइसरॉय ह्यांची सही.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७५, पृ. १४०

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(57) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 23, FLS 19.

व्हाइसरॉय वसई प्रांतातील परिस्थितीचा आढावा पोर्तुगालला आपल्या राजास लिहिलेल्या पत्रात घेतो—

" महाराज—

महाराजांच्या ह्या राज्याच्या रक्षणाची जबाबदारी मी पत्करली आहे. ठाणे येथे नवीन तटबंदी उभारून मी त्याच्या रक्षणाची व्यवस्था केली होती. परंतु माझ्या दुर्दैवाने मराठ्यांनी ह्या बेटावर गेल्या वर्षीच्या सात एप्रिलला रात्रीच्या वेळी अचानकपणे हल्ला चढविला व सां जेरोनिमु हा किल्ला काबीज केला. हा किल्ला कसा पडला, शत्रूचा प्रतिकार करणे अशक्य झाल्याने, की त्या किल्ल्याच्या कॅप्टनच्या दुबळेपणाने ते अद्याप कळलेले नाही. तथापि ह्या किल्ल्याचा कॅप्टन त्याच्या हाताखालच्या सर्व शिबंदीसह ठार झाला. शत्रूने त्याचवेळी वसईचा कसबाही घेतला. हा कसबा घेतल्याने वसई नदीच्या

दोन्हीही काठांवर त्याचे नियंत्रण आले. त्यामुळे वसईच्या गव्हर्नरला साष्टी बेटास कुमक पाठविता आली नाही.

सेनापती दों लुईज बौतल्यु हे त्या बेटात होते. पण त्यांना शत्रूचा प्रतिकार करणे अशक्य झाल्याने त्यांनी ठाण्याच्या नवीन तटबंदीचा आश्रय घेतला. परंतु ह्या तटबंदीचा एक भाग बांधून व्हावयाचा होता, व त्यामुळे त्या तटबंदीची ती बाजू उघडी होती. दुसरी गोष्ट त्या तटबंदीचे रक्षण करणाऱ्या शिबंदीला रसद पोहोचती करणेही अशक्य होते. म्हणून सर्व अधिकाऱ्यांच्या सल्लामसलतीने तिथल्या शिबंदीने कारंजा बेटावर माघार घ्यावी असे ठरले. त्यांनी रेइश मागुंश किल्ल्याच्या रक्षणाची चांगली तयारी केली व वर्सोवाला सैन्य पाठविले. ह्या ठाण्यातील शिबंदीचे नेतृत्व कायतानु द सौझ पेरैरा ह्यांच्याकडे सुपूर्त करण्यात आले होते. त्यांनी ह्या ठाण्याच्या रक्षणाची कामगिरी उत्कृष्टपणे बजावली. त्यांनी शत्रूचे दोन हल्ले परतवून लावले. पण दुसऱ्या हल्ल्यात ते प्राणांतिक जखमी झाले.

बांदोडा येथे कॅ. ज्युआंव द सौझ फेरराज ह्यांना पाठविण्यात आले. ह्या ठाण्याच्या रक्षणाचे कामी इंग्रजांनी पोर्तुगिजांशी चांगले सहकार्य केले. कारंजाहून सेनापती वसईला गेले. शत्रूने त्या ठाण्याला वेढा घातला होता. त्याने मद्रापूर हे ठाणे काबीज केले व तेथे तो खंदक खणून राहिला. त्या ठाण्यात सैन्य फारसे नसल्याने शत्रूला तेथे विशेष प्रतिकार झाला नाही. माणसांची कमतरता आणि शत्रूने व्यापिलेल्या प्रदेशाचा अडथळा ह्यामुळे शत्रूला सैबाण व पारेसिक ह्या ठाण्यांना व साबाजच्या किल्ल्यास वेढा घालणे शक्य झाले. सबाजला कारंजाहून मदत पाठविण्यात आली. परंतु पाण्याच्या टंचाईमुळे ते ठाणे शत्रूच्या हाती पडले. रेइश मागुश ह्या किल्ल्याला कुमक पाठविण्यात आली. परंतु ह्या किल्ल्याच्या कॅप्टनने शत्रूचा यत्किंचितही प्रतिकार न करता शरणागती पत्करली. ह्या अपयशाची वार्ता मला एप्रिल महिन्याच्या १२ तारखेस कळली. त्यावेळी दक्षिणेकडील आरमाराचे आगमन झाले नव्हते, आणि माझ्या हाताशी तर फक्त एक फ्रिगेट तेवढी होती. उत्तरेकडील आरमारला संरक्षण देणारे फ्रिगेट प्रवास करण्याच्या स्थितीत नव्हते. म्हणून माझ्या हाताशी असलेल्या आरमारावर २४० सैनिक पाठवून दिले.

मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु आणि लेप्टनंट कर्नल ज्युआंव बार्बेझाइ बाररूज ह्या दोघांना सेनाधिकारी म्हणून पाठवून दिले. त्यांच्याबरोबर इथल्या कोठारात जो थोडाफार दारूगोळा होता, तोही पाठवून दिला. ह्या बाबतीत महसूल खात्याचे प्रमुख आंतोनियु कार्नेस ह्यांनी मोठाच हलगर्जीपणा केला. त्यांनी १७३६ साली इकडे अवघी ऐंशी पिंपे दारू ठेवली. हे मी महाराजांना गेल्या मोसमात लिहिलेल्या पत्रात कळविलेच आहे.

ह्या आकस्मिक घटनेमुळे साष्टी बेटात आणि वसईच्या कसब्यात ज्यांची मालमत्ता आहे आणि इस्टेट होती ते गर्भगळीत झाले व त्यांनी उत्तरेकडील प्रदेशाचे सरसेनापती दों. लुईज द बोतेल्यु ह्यांना काढून टाकून त्यांच्या जागी दुसऱ्या गव्हर्नरची नेमणूक करण्याची विनंती राज्य सल्लागार मंडळाच्या सदस्यांमार्फत केली. कारण त्यांचा दों. लुईज द बोतेल्यु ह्यांच्यावरील विश्वास उडाला होता. त्यांचे असे मत होते की, नवीन सेनापतीची नेमणूक केल्या-शिवाय ह्या राज्याचे प्रजाजन युद्धखर्चाचा भार उचलणार नाहीत. त्यांचे हे माझ्यावर दडपणच होते. परंतु वैयक्तिक प्रश्नाकडे दुर्लक्ष करून सामुहिक हितासाठी मी आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांची उत्तरेकडील प्रांताचे गव्हर्नर म्हणून नेमणूक केली. आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांना उत्तरेकडील प्रांताची चांगली माहिती आहे. शिवाय शत्रूमध्येही ते सुपरिचित आहेत. मी फ्रिगेटची रवानगी एप्रिल महिन्यात केली. ती वेळ पावसाळा सुरू होण्याची होती. त्यामुळे इतर नौका तिकडे पाठविणे कठीण झाले. दुसरी गोष्ट अशी की, तिकडे रसद पाठविण्यासाठी माझ्या हाताशी नौकाही नव्हत्या. साष्टी बेट शत्रूच्या हाती पडल्याने तिथले अन्नधान्याचे साठे नष्ट झाले होते, अथवा शत्रूच्या हाती पडले होते. त्यामुळे तिकडे रसद पाठविणे अशक्य झाले होते.

शत्रूला उत्तरेकडील प्रांतातून कसा हुसकून लावावा यासंबंधी मी विचार करू लागलो. त्या प्रांताचा चांगला परिचय असलेल्या तज्ञाशीही मी ह्या बाबतीत विचारविनिमय केला. शेवटी असे ठरले की, तिकडे जर युरोपियन आणि देशी मिळून चार हजार सैन्य पाठविले तर शत्रूला तिकडून हाकलून लावणे शक्य होईल. मला वाटते ह्या कामी आम्हाला इंग्रजांकडूनही मदत होईल. कारण, उत्तरेकडील प्रांताचे रक्षण हे त्यांच्याही हिताचे आहे. तदनंतर मी शिपाई आणि लष्कर ह्यांचे एक सैन्य गोळा करण्याचे हुकूम सोडले. दीव आणि सुरत येथून माणसे यायची होती, व सिद्दीकडेही माणसांची मागणी करण्यात आली होती. सिद्दी हा आमचा मित्र असून मराठ्यांचा शत्रू आहे. ह्या स्वारीवर जाण्यासाठी आवश्यक त्या नौका गोळा करण्यात येऊ लागल्या. साष्टी बेटातील धान्याची कोठारे शत्रूच्या हातात पडली होती व दमणहूनही रसद मिळण्याची शक्यता नव्हती. म्हणून इकडून धान्य नेण्याचे ठरले, व ह्या राज्यातील धान्याच्या व्यापाऱ्यांकडे पंचवीस हजार तांदळांच्या गोणींची मागणी केली.

अशा स्थितीत पावसाळा निघून गेला. युद्धाचा खर्च भागविण्यासाठी मी राज्यसभा बोलावून प्रजेवर जादा कर लादण्याचा ठराव मंजूर करून घेतला. इगर्जीकडून आणि हिंदु व्यापाऱ्यांकडून त्यांच्यापाशी असलेली सोने-

चांदी मागून घेतली. ह्या पैशांतून जो खर्च करण्यात आला त्याचा हिशोब महसूल खात्याचे प्रमुख आपणाला सादर करणार आहेत.

सप्टेंबर महिन्यात मी मायदेशाहून कुमक येण्याची वाट पाहात होतो. पण ती फारच अल्प आली. ते अवघे तीनशे तीस सैनिक होते. ते आणि गोवा बेटातील लष्करी ठाण्यात असलेले सैनिक मिळून एकूण सातशे नव्वद भरले. त्यांच्यामध्ये नव्वद आजारी सैनिक आणि बरेच देशी सैनिक होते. ह्याचवेळी मला वरचेवर बातम्या मिळू लागल्या की, शत्रू गोवा बेटे व साष्टी आणि बार्देश ह्या प्रांतांवर हल्ला करण्याचा बेत आखीत आहे. हा प्रश्न मी राज्यसभेसमोर ठेवला व इकडे गोरे सैनिक किती ठेवायचे यासंबंधीचे मत व्यक्त करण्याची तिला विनंती केली. ह्या संबंधी जो निर्णय घेण्यात आला त्याची एक प्रत मी आपणाकडे पाठवीत आहे.

शेवटी दक्षिणेकडून उत्तरेकडील प्रांतांत पाठवायच्या तांदळांच्या पंचवीस हजार गोणी आल्यावर मी ही रसद आणि सहाशे शिपाई आणि लष्कर तिकडे पाठवून दिले. शिवाय दारूगोळा आणि युद्धाचे इतर सामानही पाठवून दिले. ह्या स्वारीसाठी मला फ्रेंचाकडूनही मदत झाली. त्यांनी आम्हाला ऐंशी हजार असुर्प्यांची युद्ध सामग्री व दोनशे शिपाई दोन नावामध्ये भरून पाठवून देऊ केले. हे सैन्य मी स्वीकारण्याचे ठरविले, कारण त्याचा खर्च आम्हाला करण्याची आवश्यकता नव्हती.

ह्याचवेळी अशी बातमी उठली कीं, मोगलांचे सैन्य मराठ्यांवर चाल करून येत आहे. उत्तरेकडील सेनापतीने मला कळविले की, ही संधी आपण दवडता कामा नये. कारण शत्रूचे जे सैन्य साष्टी बेटात आणि वसईच्या कसब्यात होते, त्याला त्यांनी कुमक पाठविली नव्हती. त्यांच्या मते साष्टी बेटावर स्वारी करण्यास पाचशे सैनिक बस होते. मी राज्य सल्लागार मंडळाची बैठक पुन: भरविली. तीत असे ठरले की, कोणत्याही परिस्थितीत उत्तरेकडील प्रांताला कुमक ही पाठविलीच पाहिजे. त्या ठरावाप्रमाणे मी उत्तरेकडील प्रांताला आणखी दोनशे सैनिकांची कुमक पाठविली. युद्धनौकांवरील चारशे सैनिक आणि हे शंभर सैनिक मिळून पाचशे सैनिक भरत होते.

ते सैनिक पाठविल्यावर इकडे ग्रॅनेडियर्सच्या एका कंपनीशिवाय आणखी एकही पगारी शिबंदी उरली नाहीं. त्यांच्यात फक्त माझ्या गार्डांचा आणि दक्षिणेकडील आरमारावरील सैनिकांचा समावेश होत होता. परंतु काल उत्तरेकडील सेनापतीकडून मला जे पत्र आले आहे, त्यावरून तिकडे जी चढाई सुरू करण्याचे ठरले होते, ती तो सुरू करील असे मला वाटत नाही. आणि त्याने ती सुरू करण्याचा निर्णय घ्यावा असेही मला वाटत नाही. कारण,

त्या प्रांतातील आणि ह्या बेटातील धोके मला माहीत आहेत. इंग्रजांनी आमचे सैन्य अपुरे आहे असे पाहून आपल्याच बेटांच्या रक्षणावर लक्ष केंद्रित केले आहे. त्यांनी तटस्थतेचे धोरण स्वीकारले आहे. ते शत्रूला दारूगोळा विकत आहेत, व त्यांच्याकडून तांदूळ घेत आहेत. त्यांनी अशा रीतीने व्यापार न करता जर केवळ तटस्थता स्वीकारली असती तर आम्हाला काळजी करायचे कारण नव्हते. त्यांना आम्ही खलिते पाठवून मराठ्यांशी व्यापार बंद करण्याची विनंती केली, पण त्याचा काही उपयोग होत नाही.

सांप्रत आम्ही बचावाची लढाई खेळत आहोत. देशाहून कुमक आली की, चढाई सुरू करणार आहोत. युद्ध लांबल्याने खर्च वाढत आहे, व तो भागविणे कठीण झाले आहे. एक दशांश कराच्या उत्पन्नातून देखील खर्चाची तोंड मिळवणी होत नाही.

उत्तरेकडील सेनापतीने मला कळविले आहे की, इकडून निघालेली कुमक तिकडे पोहोचल्यावर त्यांनी मेश्त्र द कांपु द मेलु व लेप्टनंट कर्नल ज्युआंव बार्बोझ द बारूज ह्या दोघांना शंभर ग्रॅनेडियर्स व इतर सैनिक देऊन माहीम व शिरगाव ह्या दोन्ही किल्ल्याचे वेढे उठविण्यास पाठविले. पेद्रु द मेलु ह्यांनी मोठा पराक्रम गाजवून ही कामगिरी पार पाडली. त्यांनी शत्रूची बरीच हानी केली. ते असेरीच्या गडाच्या मदतीलाही जाण्यास तयार होते. सांतामारिआ, सांताक्रुझ, जुदन हे किल्ले आणि गायींची बेटे व मनोरा हे ठाणे शत्रूच्या हातात पडले आहे. ह्या किल्ल्यांच्या रक्षणकर्त्यांनी फारसा कणखरपणा दाखविला नाही, अशी माझी समजूत आहे.

महाराज, ह्या राज्याची स्थिती सांप्रत वर वर्णन केल्याप्रमाणे आहे. शत्रूने वसईच्या तटाला दोनदा शिड्या लावण्याचे धाडस केले. त्याची संख्या खास दुर्लक्ष करण्यासारखी नाही. त्यामुळे आम्हाला ह्या राज्याच्या संरक्षणाच्या प्रश्नाकडे वेगळ्या दृष्टिकोनातून बघावे लागत आहे. कारण शत्रूने आज जो निर्धार केला आहे, तो जर त्याने अन्य कोणत्याही वेळी केला असता तर आज त्याने जे काय साध्य केले आहे, ते तो त्यावेळीही साध्य केल्याशिवाय राहिला नसता ह्याबद्दल मला शंका वाटत नाही.

माझ्य बलाढ्य आणि श्रेष्ठ स्वामीचे देव रक्षण करो".

गोवा, २५ जानेवारी १७३८,

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ७८, पृ. १४५—१५१

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(78) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 107, FLS 214 and 224.

पत्र क्र. ८१

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला पाठविलेल्या पत्रात लिहितो की, बाजीरावाने नर्मदा नदी ओलांडली असता मोगल सैन्याने त्याचा पराभव केल्याची बातमी आपणाला लागली आहे.

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस--

आपली गेल्या महिन्याच्या १४ आणि १५ तारखेची पत्रे समुद्रावरील कॅप्टन झुजे पेरैरा ह्यानी आणून दिली. ह्या पत्रात आपण माहीम आणि तारापोर येथील विजयाची जी बातमी दिली आहे ती वाचून फार आनंद झाला. ह्या यशाबद्दल मी आपले अभिनंदन करीत आहे. ह्या यशाचे मानकरी मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु, कापितांव मोर आंतोनियु ब्रितु द सिल्वा व लेप्टनंट कर्नल ज्युआंव बार्बोझ ह्या तिघांना त्यांचे अभिनंदन करून वेगळी पत्रे लिहीत नाही. कारण, हे पत्र मी घाईने लिहीत आहे. त्या तिघांचे आपण माझ्यावतीने अभिनंदन करावे. ह्या अभिनंदनाला ते खरोखरच पात्र आहेत ह्यात शंका नाही. आणि मला आशा आहे की, असेरीच्या मदतीला जाऊन आपण ह्या क्षणापर्यंत आणखी अभिनंदने मिळविण्याची कामगिरी पार पाडली असेल.

आमचा विजय व्हावा अशी इच्छा बाळगणाऱ्या एका व्यक्तीला मी औरंगाबादला पाठविले होते. त्याने मला कळविले आहे की, बाजीरावाने एका मोठ्या सैन्यासह नर्मदा ओलांडली असता, मोगल सैन्याने त्याचा पराभव केल्याने त्याला नर्मदेच्या अलीकडे यावे लागले. त्याने काशीहून व्यंकटराव ह्यांना आपल्या मदतीला कुमक घेऊन बोलाविले.

बाजीरावाच्या पराभवाची बातमी आणणाऱ्या व्यक्तीचे असे म्हणणे आहे की, ही कुमक मिळाल्याने बाजीराव मोगल सैन्याचा पाठलाग करीत आहे, व ह्या सैन्याला कोंडीत पकडून त्याचा निःपात करण्याचा त्याला आत्मविश्वास वाटत आहे. असे जर असेल तर ही संधी आम्हाला हालचाल करण्यास फार नामी आहे. मी मुंबईच्या गव्हर्नरला लिहीत आहे की, ठाण्यावर हल्ला करण्यासाठी त्याने आपल्या सर्व सैन्यासह आमच्या सैन्याला येऊन मिळावे. मला असे वाटते की, एकेबाजूने ठाण्यावर हल्ला करीत असता दुसऱ्या बाजूने छोट्या तुकड्यानी नद्यांच्या काठावरील किल्ल्यांवर हल्ले चढवावेत. मला अशी आशा वाटते की, ही योजना जर यशस्वी झाली तर, शत्रूला साष्टी बेट आणि वसईचा कसबा आपल्या हातात ठेवणे शक्य होणार नाही.

ही मोहीम व्यवहार्य आहे असे जर आपणाला वाटले तर, ती अमलात आणतेवेळी फार काळजी घेतली पाहिजे. शत्रूची नजर दुसरीकडे वळविण्याकरता गायीच्या बेटांवर हल्ला करण्याचा बहाणा केला पाहिजे. शत्रूला जेव्हा हे कळेल तेव्हा तो आपले सर्व सामर्थ्य ह्या बेटांच्या रक्षणावर केंद्रित करील, व त्यामुळे साष्टी बेटांच्या रक्षणाकडे त्याचे दुर्लक्ष होईल.

ही मोहीम यशस्वी व्हायची झाल्यास इंग्रजांचे आम्हाला सहकार्य लाभले पाहिजे. म्हणून आपण एकादा वजनदार मनुष्य मुंबईच्या गव्हर्नरकडे सल्लामसलतीसाठी पाठवून द्यावा.

बाजीरावाच्या संभाव्य यशापयशाचा विचार करून ही योजना अमलात आणण्याचा मी निर्णय घेऊ इच्छितो. जर बाजीराव विजयी झाला तर, मग त्याच्याशी लढणे कुणालाच शक्य होणार नाही. आणि तो जर पराभूत झाला तर त्याचे माघार घेणारे सैन्य इकडे साष्टी बेटात येऊन तळ ठोकून राहाण्याचा संभव आहे. ह्या दोन्ही प्रसंगी आम्हाला साष्टी बेट घेणे अशक्य होईल, म्हणून तत्पूर्वीच आम्हीं ते घेतले पाहिजे.

माझा निर्णय आपणाला लवकर कळावा म्हणून हे पत्र लिहीत आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो, वगैरे ".

गोवा, ६ फेब्रुवारी १७३८.

ता. क. ज्यावेळी शारसअ इकडे पोहोचेल तेव्हा आपणाला पाठविण्यासाठी माझ्या हाताशी २ लक्ष असुर्प्या असतील. त्याचप्रमाणे ही नौका तिकडे रसद नेऊ शकेल की काय तेही मी पाहात आहे.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ८१, पृ. १५९—१६१

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(81) BASAIM, No. 7, FLS 52.

पत्र क्र. ८२

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीस लिहितो की, आंग्र्यांचा आणि पोर्तुगिजांचा सलोखा असता आंग्र्यांनी पोर्तुगिजांची एक नौका पकडावी ही विसंगत गोष्ट आहे.

" उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस--

फ्रान्सिस्कन पाद्रयांनी भाड्याने आणलेल्या गलबतावर पाठविलेले आपले चालू महिन्याच्या १० तारखेचे पत्र मिळाले. त्या पत्राचे उत्तर मी आता आपणाला पाठवीत आहे, व आपले अभिनंदनही करीत आहे. आपण पत्रात लिहिले आहे की, माहीम आणि शिरगाव ह्या दोन ठाण्यांना मदत पोहोचविल्या-वर आपण असेरीला मदत पोहोचविण्याची कामगिरी यशस्वीरीत्या पार पाडलीत. ह्या कामी आपणाला मेश्त्र द कांपु व पेद्रु द मेलु ह्या दोघां अधिकाऱ्यांची मदत झाली. आपण ही कामगिरी यशस्वी केलीत खरी, परंतु आपण आजारी पडल्याने मला आपली काळजी वाटू लागली आहे. तथापि, मला आशा आहे की, ही कामगिरी यशस्वी व्हावी म्हणून देवाने आम्हाला मदत केली, त्याचप्रमाणे तो आपला आजारही बरा करील मी ह्या नौकेवर इकडून औषधे पाठवीत आहे. खाटा महसूल खात्याचे प्रमुख पाठविणार आहेत. त्यांच्याकडे मी आपण पाठविलेली यादी देत आहे.

माहीम आणि असेरी ह्या दोन्हीही ठाण्यांच्या कॅप्टननी आपल्या ठाण्या-तील पुरवठ्याविषयी काळजी घ्यावी. कारण, ह्या दोन्ही ठाण्यांना शत्रूचा फिरून वेढा पडलेला दिसायला नको आहे. ज्या अधिकाऱ्यांची आपण नेमणूक केली आहे, ती नेमणूक मी मंजूर करीत आहे. तारापोर मनोरा आणि सांमारियागड येथील कंपन्यांतील शिपायांत आपण जी वाढ केली आहे तिला सल्लागार मंडळाने मान्यता दिली आहे. मी वखारदाराला त्या मान्यते-प्रमाणे हा हुकूम अंमलात आणण्याची आज्ञा देत आहे. जनरल मार्तीन्यु द सिल्व्हैरा ह्यांना जे व्यापक अधिकार देण्यात आले आहेत त्यासंबंधी सल्लागार मंडळाचे मत अजमावले असता ते महाराजांच्या हुकूमांच्या विरूद्ध असल्याचे ध्वनित झाले.

ग्रियेंच्या आंग्र्यांचा आणि आमचा सलोखा असता त्यांनी आमची पताश पकडावी ही विसंगत गोष्ट आहे. परंतु ही घटना रात्रीच्या वेळी घडली असल्याने ती गैरसमजुतीमुळे घडली असावी असे वाटते. ही नौका ते आम्हाला लवकर परत करतील अशी आशा करूया. कारण मला कळले आहे की, ही नौका त्याच स्थितीत आहे. कदाचित ते ह्या प्रकरणी आमच्या खलित्याची वाट पहात असावेत. मी त्यांना ह्या बाबतीत खलिता पाठविलाच आहे.

इंग्रजांनी बांदोडा येथील खर्चाची रक्कम म्हणून संघाच्या पाद्रयांना चाळीस हजार असुर्प्यांची एक हुंडी दिली होती. तिचा रक्कम मी फेडली आहे. आणि मला वाटते की, बांदोडा येथील शिबंदी बदलणे कठीण जाणार नाही, आणि आपण पैशाच्या अभावी तसा निर्णय घेऊ नये. शारसआं ह्या



व्ही ५५५८–३२अ

नौकेवर दोन लक्ष असुर्प्या पाठवीत आहे. जो अहवाल पाठवीत आहे त्यावरून उत्तरेकडील प्रांताकडे मी काय काय पाठविले ते आपणाला कळून येईलच. त्यात दारूगोळ्याप्रमाणेच पैसेही आहेत. एक दशांश कर लादण्याचे काम पूर्ण झाले आहे.

माझी अशी समजूत आहे की, सिद्दीची माणसे तिकडे आली आहेत. कारण, आपले पत्र घेऊन आलेल्या गलबताने, काही गलबते उत्तरेकडे जाताना पाहिली होती. गलबतावरील माणसांनी असा अंदाज केला की ती गलबते सिद्दीचीच असावीत. असे घडावे अशी देवापाशी प्रार्थना आहे. ही मदत माद्राफावेलकडे जाणारीही असण्याची शक्यता आहे.

दीवच्या किल्लेदारांचे खलिते मिळाले. त्या ठाण्यात फारच थोडी माणसे आहेत ह्याची मला कल्पना आहे, व त्याबद्दल मला काळजी वाटणे साहजीक आहे. सेकंड लेप्टनंट लुईज आंतोनियु ह्याने मला कळविले आहे की, त्याने सुरतेला जाऊ नये असे मत आपण व्यक्त केले. आणि म्हणून त्याने आपणाबरोबर जो नजराणा नेला होता तो शाररूअवर परत आला. आपण हा निर्णय घेतल्याचे पाहून मला फार दुःख झाले. कारण एकीकडे नजराणा इकडे परत येत असता तिकडे पत्रें राजाकडे रवाना होण्याचा संभव आहे. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, आपण सेकंड लेप्टनंट लुईज आंतोनियु ह्यांना त्यांचा सुरतेपर्यंतचा प्रवास चालू करण्यास परवानगी द्यावी. म्हणजे त्यांच्याकडे मी जी कामगिरी सोपविली आहे ती त्यांना पार पाडता येईल.

ह्या शाररूअवर पाठविण्यात येत असलेल्या दोन लक्ष असुर्प्यांचा विनियोग कसा करायचा तत्संबंधीचे पत्र दुसऱ्या मार्गाने पाठविण्यात येत आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २१ फेब्रुवारी १७३८.

कोंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V

पत्र क्र. ८२, पृ. १६१--१६४

संपादक :--

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(82) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 57V.

पत्र क्र. ८४

चिमाजीअप्पा हे बारा हजार सैन्य घेऊन वसईवर चालून येत असल्याची वार्ता मुंबईच्या गव्हर्नरने वसईच्या गव्हर्नरला कळविली असता त्याने त्याला पुढील उत्तर धाडले.

"मुंबईचे गव्हर्नर जॉन हॉर्न ह्यांस—

ह्या सिबारवर आलेल्या आपल्या २७ फेब्रुवारीच्या पत्राचे उत्तर मी त्याच्यावरच पाठवीत आहे. हे पत्र मी घाईत लिहीत आहे ........... ........... आपल्या २० सप्टेंबर व १४ जूनच्या पत्रांचा उल्लेख करीत नाही ...........................................

...........................................

आपण पत्रात उल्लेख केल्याप्रमाणे मोगल बादशहा व बाजीराव ह्या दोघांच्या सैन्याचा समावेश करारामध्ये होतो की काय, अशी मला भीती वाटत होती. तत्संबंधीच्या बातम्या इकडे पसरल्या होत्या. ज्याअर्थी, आपणाला बातमी मिळाली आहे की, चिमाजीअप्पा हे बारा हजार सैन्य घेऊन येत असून आमच्या उत्तरेकडील हद्दीपासून ते जरासे दूर आहेत, त्यावरून मला असे वाटते की, सदर्हू तहामध्ये एकादी नवीन घटना किंवा ............ विलंब ....... तिकडून मिळालेल्या बातम्यावरून कुमक येत असावी.

मला माहीत आहे की, ठाण्याची मोहीम सुरू करायची झाल्यास अनुभवी सैन्याची आवश्यकता आहे. पण आपण ज्या तहाचा उल्लेख केला आहे त्याची मला भीती वाटली, व नशीबाची परीक्षा बघण्याचा विचार डोक्यात शिरला. कारण, शत्रूला कुमक आल्यावर हा प्रयत्न कदाचित अयशस्वी होण्याची शक्यता आहे. आणि ठाणे जर डोंगरीप्रमाणे वसईच्या जवळ असते तर, त्या बंदरात जे काय घडले ते तेथेही घडले असते. मग आपण म्हणता त्याप्रमाणे त्याची तटबंदी .................... होवो. उत्तरेकडील सेनापती ह्या प्रकरणी काही तरी खटपट करतील अशी आशा आहे. कारण, त्याची उपयुक्तता मोठी असल्याने, यशाची आशा बाळगून प्रयत्न करणे आवश्यक आहे.

मराठ्यांना दारूगोळा विकायचा नाही असा हुकूम आपण इंग्रज व्यापाऱ्यांना उद्देशून जो काढला आहे त्याकडे माझें लक्ष वेधले आहे. परंतु मला असे कळले आहे की, हा हुकूम इंग्रज व्यापारी धाब्यावर बसवून मराठ्यांशी व्यापार करीत आहेत. मला असेही कळले आहे की, मराठ्यांनी साष्टी बेटाची जी लुटालुट केली ती त्यांनी मुंबई बेटात नेऊन विकली. हे वर्तन

आमच्या वर्तनाच्या विरुद्ध आहे. ज्यावेळी आंग्र्यांनी आपली युरोपची नौका पकडली, तेव्हा तिच्यावरील मालापैकी, एकही वस्तू विकत घ्यायची नाही असा हुकूम मी काढला होता. आणि ज्याअर्थी, ह्या बंदरात आपले एक आरमार उभे आहे, व ते मुंबईसाठी भरपूर खाद्यवस्तू आणि पुरवठा मुंबईला घेऊन चालले आहे, त्याअर्थी, आपण मराठ्यांकडून अन्नधान्य आणि इतर वस्तू घेणार नाही अशी मला आशा आहे.

आपल्या सेवेस तत्पर असलेला ".

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो.

गोवा, १३ मार्च १७३८.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ८४, पृ. १६५—१६७
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(84) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 67.

पत्र क्र. ८५

व्हाइसरॉय पोर्तुगालला राज्यसचिवाला गोव्यातील आणि वसईतील घडामोडींचा अहवाल सादर करतो.

राज्य सचिव आंतोनियु गेदिश पेरैरा ह्यांस—

इकडून बसऱ्याला निघत असलेल्या एका फ्रेंच नौकेवर मी आपणाला हे पत्र पाठवीत आहे. ह्या नौकेचा कप्तान म्हणतो की, ह्या नौकेवर यूरोपसाठी जी पत्रे पाठविण्यात येत आहेत ती बसऱ्याहून जमिनीमार्गे पाठविण्यात येतील.

दि. ३१ जानेवारीस इकडून तिकडे निघालेल्या नौकेने बंदर सोडल्यावर ह्या राज्यात ज्या घडामोडी झाल्या त्यांचा सविस्तर वृत्तांत मी आपणाला आता सादर करीत आहे.

मी आपणाला कळविल्याप्रमाणे आसेरीला मदत पाठविण्याचे काम यशस्वीपणे पार पडले. शत्रूशी आमच्या विशेष चकमकी झाल्या नाहीत. शत्रूने माहीम आणि शिरगाव येथील विजय पाहून वेढा उठवून मनोरचा किल्ला सोडला. त्याने त्याच्या तटबंद्या पाडल्या व जे लाकूड-सामान होते ते जाळून टाकले.

मला असे वाटते की, हे ठाणे त्याला कमी महत्वाचे वाटल्याने त्याने ते सोडले असावे. कारण त्याच किल्ल्याच्या नदीकाठी .............. ......................गडाची मालकी त्याच्याकडे ............ किंवा आम्ही आपणावर हल्ला करू अशीही त्याला भीती वाटली असावी. .................. विशेषेकरून गायीच्या बेटातील त्याच्या तोंडी .................. असेरी, शिरगाव व माहीम ह्या ठाण्यांच्या मदतीला पाठविलेले सैन्य तारापोरहून वसईला आणल्यावर उत्तरेकडील सेनापतींनी त्या सैन्याचा उपयोग दुसरीकडे करण्याचे ठरविले. त्यांनी आग्वादच्या टेकडीवर चुना आणि दगड ह्यांच्यापासून तटबंदी उभारणाऱ्या शत्रूला तिथून हाकलून लावण्यात मोठे यश संपादन केले. ही टेकडी साष्टी बेटाच्या प्रवेश द्वारावर असून दक्षिणेच्या बाजूने ते वसईचे बंदर बनते. ह्या मोहिमेत शत्रूची जबरदस्त हानी झाल्याचे मला कळविण्यात आले आहे.

मोगल सैन्य चालून आल्याने मराठ्यांचे लक्ष उत्तरेकडील प्रांतावरून दुसरीकडे वळले. गेल्यावर्षी मराठ्यांनी मोगल बादशहाला त्याच्या राजधानी-पर्यंत म्हणजे दिल्ली शहराच्या वेशीपर्यंत जाऊन शह दिला होता. त्याचा वचपा मोगल बादशहाने आता काढला. प्रचंड मोगल सैन्य मराठ्यांवर चालून आल्याने, मराठ्यांना आपल्या उत्तरेकडील प्रांतातील सैन्याला कुमक पाठविणे अशक्य झाले. आणि जर ठाण्याचा किल्ला घेण्यासाठी इंग्रजांनी आपले सैन्य पाठवून आमच्या सैन्याशी सहकार्य केले असते तर, ही कामगिरी सहज फत्ते झाली असती. परंतु इंग्रजांच्या सेनापतीला ह्या कामगिरीसाठी प्रवृत्त करून देखील त्याने बेफिकीरपणा दाखविला. आता मला भीती वाटते की, शत्रू ................................. समझौता करून .......... आपले लक्ष उत्तरेकडील प्रांतावर केंद्रीत करील. तत्संबंधीच्या बातम्या प्रसृत होत आहेत. आमचा उत्तरेकडील सेनापती ज्या-वेळी आग्वादच्या तटबंदीवर हल्ला करण्याची तयारी करीत होता, तेव्हा आमचे लक्ष विचलित करण्यासाठी शत्रूने तारापोरवर हल्ला चढविला. परंतु हा हल्ला परतवून लावण्यात आला. शत्रूची अतोनात हानी होऊन त्याने माघार घेतली.

एकीकडे मोगल आणि मराठे ह्यांचा समझौता झाल्याची बातमी येत असता दुसरीकडे सौंदेचा राजा व संभाजी आंग्रे ह्या दोघांची मैत्री जुळली असून सोंदेच्या राजाने संभाजी आंग्रे ह्यांना कारखाना उघडण्यासाठी आपल्या राज्यात जागा दिली असल्याची बातमी आहे. आंग्र्यांच्या नौकांसाठी सोंदेच्या राजाच्या हद्दीत निवाऱ्यासाठी जागा देण्यात येणार आहे ............. हे एक

उत्कृष्ट बंदर असून ते गोवा शहराच्या दक्षिणेस बारा कोसावर आहे. ही बातमी जरी खरी असेल तर ती चिंताजनक आहे असे म्हणावे लागेल. आणखी अशी एक बातमी आहे की, सोंदे राजाने संभाजी आंग्रे ह्यांना. गोवा बेट घेण्यासाठी सर्व प्रकारची मदत देण्याचे कबूल केले आहे. हे शहर घेण्याची संभाजी आंग्रे यांची महत्वकांक्षा फार दिवसांची आहे. ह्या वार्तेने मला फारच काळजी उत्पन्न झाली आहे. .....................

..................................................

फेब्रुवारी महिन्यात मी .............. फ्रिगेटवर माणसे व दारूगोळा ह्यांची उत्तरेकडील प्रांतात मदत पाठविली.

असेरीच्या मदतीला गेलेले सैन्य तारापोरला उतरल्यावर एक प्रचंड वादळ सुरू झाले. ह्या बंदराला नैसर्गिक संरक्षण नसल्याने त्याला वादळाचा मोठाच तडाखा बसला. फ्रिगेटचा प्रवास सुरू झाला नव्हता, व तिच्यावरील दारूगोळाही उतरविण्यात आला नव्हता. शेवटी बंदरात उतरविण्यात आलेली ग्रॅनेडियर्सची कंपनी नौकेवर पुन: चढवावी लागली. ह्या फ्रिगेटने इकडे अशी बातमी आणली की, वादळामध्ये उत्तरेकडील प्रांताच्या मालकीचा एक पाताशु फार लांब गेला. शत्रूने त्याच्यावर हल्ला करून तो पकडला. .......... संभाजी आंग्रे ह्यांच्या ............... पालांनी आणि नऊ गलबतांनी .................. संभाजी आंग्रे ह्यांचे आणि आमचे संबंध सलोख्याचे असता त्यांनी आमची नौका पकडावी ही आश्चर्याची गोष्ट आहे पण नंतर त्यांनी खुलासा केला की, आमचा पाताशु त्यांच्या युद्ध कैद्यांना इंग्रजांचा असावा असे वाटल्याने त्यांनी तो पकडला. ह्या लोकांची वागण्याची ही पद्धत आहे. त्यांच्यावर कुणीच कधी विश्वास ठेवू नये.

स्वामीच्या इकडील राज्याची स्थिती सांप्रत वर वर्णन केल्याप्रमाणे आहे. आपण ही स्थिती त्यांना विदित करावी. ......(..........

..................................................

देव आपले रक्षण करो".

गोवा, १५ मार्च १७३८.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ८५, पृ. १६७—१७०
संपादक :—
A. B DE BRAGANSA PEREIRA.
(85) LIVRO DAS MONSOES, No. 108, FLS 136

उत्तरेकडील सेनापतीने मराठ्यांना एका ठाण्यातून हुसकून लावल्याबद्दल व्हाइसरॉय त्याचे अभिनंदन करतो.

"उत्तरेकडील सेनापती आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस--

चाल महिन्याच्या ४ तारखेस मुंबईहून लिहिलेल्या पत्रावरून कळले की आपण शत्रूला डोंगरी येथील त्याच्या नवीन तटबंदीतून हाकलून लावण्यात यश मिळविले. आपल्या ह्या विजयाबद्दल मी आपले अभिनंदन करतो व त्याचबरोबर आपलेही आभार मानतो.

मुंबईच्या गव्हर्नरच्या चालू माहीच्या १३ तारखेच्या पत्रावरून कळून येते की, मराठे आणि मोगल ह्या दोघांचा तह झाला असन चिमणाजी हे तेरा हजार सैन्यासह साष्टी बेटात उतरले आहेत. आपल्या शिबंद्यांना कुमक घेऊन ते आले अ हेत. ह्या पत्रात म्हटले आहे की, १२ तारखेपासून मुंबईत तोफांचा आणि बंदुकांचा आवाज ऐकू येत आहे. त्या आवाजावरून चिमणाजीच्या चढाईस सुरुवात झाली असावी असा अंदाज मुंबईच्या गव्हर्नरनी व्यक्त केला आहे. ही गोलंदाजी डोंगरी येथे सुरू असावी असे त्यांचे म्हणणे आहे. ह्या चढाईचा अधिकृत निकाल अद्याप कळलेला नाही. पण पत्र घेऊन आलेल्या इंग्रज अधिकाऱ्याने सांगितले की, ह्या हल्ल्यात शत्रूचे सातशे सैनिक गारद झाल्याचे आपण ऐकले आहे. परंतु आपणाकडून पत्र आल्यावाचून वस्तुस्थिती काय आहे ते कळणे शक्य नाही. बरेच दिवस झाले आपले पत्र नाही.

मला असे वाटते की, शत्रूला एवढी मोठी कुमक आली असल्यास आपणाला ठाण्यावर हल्ला करणे शक्य होणार नाही. तसे असल्यास तिकडील अनावश्यक सैन्य इकडे आरमारावर पाठवून द्यावे. आपणाला कदाचित माहीत असेलच की, ह्या बेटांना शत्रूच्या स्वारीपासून धोका आहे. त्यामुळे त्यांच्या रक्षणासाठी सैन्याची अत्यंत गरज आहे. आणि ज्याअर्थी, ठाण्याचा किल्ला परत घेण्याची आशा आता मावळली आहे. त्याअर्थी, आम्हाला बचावाचे युद्ध खेळण्यापलीकडे दुसरे काही करणे शक्य नाही. तरी ह्या युद्धासाठी आवश्यक असेल तेवढेच सैन्य तिकडे ठेवून उरलेले इकडे पाठवून द्यावे. वर लिहिल्याप्रमाणे आरमाराची इकडे रवानगी करीत असता त्याचे नेतृत्व दर्या सारंग लुईस व्हियैरा मातोझु ह्यांच्याकडे द्यावे. ह्या आरमारी तुकडी शारसअशिवाय इकडून तिकडे गेलेल्या तीन गाल्यांचा समावेश व्हावा. इकडे छोट्या नौकांचीही कमतरता आहे, म्हणून तिकडील मुबलक छोट्या नौका इकडे पाठवून द्याव्या.

मी आपणाला कळविलेच आहे की, फ्रिगेट रोझारियुवरील शिबंदी उतरविण्यात आली की ती नौका दीवला पाठवून द्यावी व तिकडील चार व्यापारी पालांना इकडे पाठवून द्यावे. दमणचे कॅप्टन फिलीप द व्हाला दारिज ह्यांना मी ह्याच पत्राबरोबर एक पत्र पाठवीत आहे. हे पत्र आपण त्यांच्याकडे शक्य तितक्या लवकर पोहोचते करावे. ते त्यांना लवकर मिळाले पाहिजे हे ध्यानी असू द्यावे. कारण, त्यांना इकडे पाठवायची पाली तयार केली पाहिजेत, किंवा भाड्याने अथवा विकत घेतली पाहिजेत. इकडून तिकडे पाठविलेले लष्कर पावसाळ्यात तिकडे ठेवून घेणे उपयोगाचे नाही, असे जर आपणाला वाटले तर, ते लष्कर दमणच्या पालांवर इकडे पाठवून द्यावे. कारण, ह्या लष्करावर विनाकारण फार खर्च होतो. मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु ह्यांनी औषधोपचारासाठी इकडे येण्याची परवानगी मागितली आहे. ती परवानगी मी त्यांना देत आहे. त्यांनी आरमारावर अथवा फ्रिगेटवर इकडे यावे. ले. क. इंजिनिअर झुजे लोपिज द सा ह्यांनाही उपचाराची जरूरी आहे. तरी त्यांनीही इकडे यावे.

मला अशी बातमी कळली आहे की, वसई येथे निरूपयोगी माणसे विशेषेकरून स्त्रिया पुष्कळ आहेत. ह्या माणसांना पोसण्यासाठी पुष्कळ खर्च येतो हे तर झालेच परंतु त्यांच्या गर्दीमुळे रोगांचाही प्रादुर्भाव होत आहे. तरी माझी आपणाला सूचना आहे की, ह्या लोकांना वसईतून बाहेर काढून आपणाला जे ठिकाण सोयीचे वाटेल तिथे नेऊन ठेवावे.

निरूपयोगी स्त्रियांना बाहेर काढताना महत्त्वाच्या कुटुंबातील माणसांचा विचार करणे आवश्यक आहे. जर ह्या कुटुंबातील स्त्रियांना वसईबाहेर निघण्याची इच्छा असेल व त्यांना ह्या राजधानीत यावेसे वाटत असेल तर, त्यांच्या प्रवासाची व्यवस्था करावी.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, १७ मार्च १७३८.

कौंट द सांदोमिल

A P O, TOMO I, VOL III, PART V

पत्र क्र. ८६, पृ. १७०—१७२

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(86) BASAIM, No 7, FLS 64

पत्र क्रमांक ८७

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहितो की, मराठ्यांना कुमक आल्याने ठाण्यावर हल्ला करणे आता अशक्य झाले आहे.

"मुंबईचे गव्हर्नर ह्यांस--

आपल्या चालू माहीच्या १३ तारखेच्या पत्राचे हे उत्तर आहे. आपल्या पत्रात मराठे व मोगल ह्यांच्यामधील तहाचा उल्लेख आहे. पण आपण कळविल्याप्रमाणे मराठ्यांच्या इकडच्या सैन्याला कुमक येण्यापूर्वीच जर ठाण्यावरील स्वारी झाली असती तर, ती फत्ते झाली असती. पण आता कुमक आली असल्याने ही स्वारी अशक्य आहे. आता बचावाची लढाई खेळण्यापलीकडे दुसरा इलाज नाही. ज्यावेळी येत्या मोसमातील कुमक देशाहून येईल, तेव्हा आजच्यापेक्षा त्यावेळचे चित्र वेगळे असेल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १७ मे १७३

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ८७, पृ. १७३

संपादक :--

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(87) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 68.

पत्र क्रमांक ९०

वसई प्रांतातील एका लष्करी अधिकाऱ्याचे त्याने लढाईत गाजविलेल्या पराक्रमाबद्दल अभिनंदन करून व्हाइसरॉय पुढील पत्र लिहितो :--

"मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु ह्यांस---

नुकत्याच इकडे आलेल्या गलबतावर पाठविलेले आपले गेल्या महिन्याच्या २२ तारखेचे पत्र मिळाले. ह्याच पत्राबरोबर दुसऱ्या मार्गाने पाठविलेले आपले १४ फेब्रुवारीचेही पत्र मिळाले. ह्या शेवटच्या पत्राचे उत्तर मी आपणाला पाठविलेच आहे. आपण डोंगरीच्या लढाईत जो पराक्रम गाजविला त्याबद्दल आपले आभार मानावे तितके थोडेच आहेत. आपल्या पराक्रमामुळे पोर्तुगिजांचा लष्करी दर्जा निःसंशयपण वाढला आहे.

आपल्या १४ फेब्रुवारीच्या पत्राला मी जे उत्तर पाठविले आहे, त्यात म्हटले आहे की, आपण औषधोपचारासाठी ह्या राजधानीत येण्याची जी परवानगी मागितली आहे ती देण्यात येत आहे. परंतु उत्तरेकडील प्रांताचे गव्हर्नर आंतोनियु कादिम फ्रॉइश ह्यांनी आपल्या अधिकारपदाचा राजीनामा दिल्याने देशहितासाठी ती जागा आपण भूषवावी ही माझी इच्छा असून तत्संबंधीचा हुकूम ह्या पत्रासोबत जात आहे.

त्या प्रांताला रसद पाठविण्याची व्यवस्था मी पावसाळा सुरू होण्यापूर्वी करीत आहे. हा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा असल्याने त्याच्याकडे प्रथम लक्ष दिले पाहिजे. दशांश कराची वसुली किती झाली आहे, त्याची चौकशी त्या प्रांताला ऑक्टोबरपर्यंत लागणारा पुरवठा एका फ्रिगेटवर पाठवीत आहे. त्याचबरोबर इतर वस्तही तिकडे पाठविण्याची व्यवस्था करीत आहे.

ह्या प्रश्नासंबंधी मी आंतोनियु कादिम फ्रॉइश ह्यांना पाठविलेल्या पत्राची नक्कल आपणाकडे पाठवीत आहे. तरी ह्या पत्रात ज्या काय सूचना आहेत त्या अमलात आणण्याचा आपण शक्य तो प्रयत्न करावा.

आपल्या पत्रात आपण ज्याअर्थी म्हटले आहे की, डोंगरीचे रक्षण केले पाहिजे, त्याअर्थी, हा प्रश्न मी आपल्या इच्छेवर सोपवीत आहे. तथापि, असे जरी असले तरी विरुद्ध मताचाही आपण विचार केला पाहिजे. कारण, त्या ठाण्याची संपूर्ण तटबंदी झाली नसल्याने शत्रूपासून तिला धोका आहे. शत्रूच्या हल्ल्याचा जर जोर झाला तर, तिथल्या शिबंदीला तिथून माघार घेणे कठीण होईल. आज आमच्यासमोर प्रश्न आहे तो साष्टी बेट परत कसे घेता येईल हा. परंतु तरीही मी डोंगरीचा प्रश्न आपल्या इच्छेवर सोपवीत आहे. मात्र आपण वसईच्या रक्षणकर्त्याचाही विचार कराल अशी मला आशा आहे. तिथल्या शिबंदीतील माणसे दिवसेंदिवस रोगराईमुळे कमी होत आहेत.

सिद्दीने आम्हाला जी भाडोत्री माणसे लढण्यासाठी देऊ केली होती, त्यांचा मुशाहिरा म्हणून जनरल आंतोनियु कादिम फ्रॉइश ह्यांनी सिद्दीकडे वीस हजार असुर्प्या पाठविल्या होत्या. परंतु सिद्दीने अद्याप माणसे पाठविली नाहीत. तरी ह्या बाबतीत सिद्दीचा काय विचार आहे ते आपण जाणून घ्यावे. मी असे ऐकतो की, आंतोनियु ब्रितु द सिल्वा ह्यांनी सिद्दीचे जे एक पाले घेतले होते, त्याची नुकसानभरपाई म्हणून त्या वीस हजार असुर्प्या ठेवून घेण्याचा त्याचा विचार आहे. जनरल आंतोनियु कादिम फ्रॉइश ह्यांनी मला कळविले होते की, मराठे युद्धकैद्यांना इकडे पाठवून देण्याचा आपला विचार आहे. परंतु इथली कारागृहे फारशी सुरक्षित नसल्याने त्या युद्धकैद्यांना इकडे पाठविणे इष्ट नाही असे माझे मत आहे. तरी हा प्रश्न आपण आपल्या

मर्जीप्रमाणे सोडवावा, किंवा त्या युद्धकैद्यांकडून पैसे घेऊन अथवा आमच्या युद्धकैद्यांच्या बदली त्यांना सोडून द्यावे. पण त्यांच्या सरदारांची मात्र मुक्तता करू नये. कारण, त्यांचा आम्हाला तहासाठी उपयोग होईल.

इकडून ज्या दोन लक्ष असुर्प्या तिकडे पाठविण्यात आल्या त्यातील काही रक्कम चौलला पाठविलीत की काय कळले नाही. कारण, त्या ठाण्याच्या गव्हर्नरने मला कळविले आहे की, तिकडे पैशाची फार टंचाई आहे. आणि जर दमणहून काही अन्नपुरवठा आला तर चौलचा हिस्सा चौलला त्वरित पाठवून द्यावा.

देव आपले रक्षण करो".

नवीन गोवा, २ एप्रिल १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ९०, पृ. १७६—१७९

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(90) BASAIM, No 7, FLS 67V

पत्र क्रमांक ९१

वसई प्रांताच्या मावळत्या गव्हर्नरने आपली अधिकारसूत्रे खाली ठेवण्याची इच्छा दर्शविली होती. त्याला व्हाइसरॉयने पुढील उत्तर पाठविले :

"जनरल आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस—

आपण तिकडून इकडे पाठविलेल्या व आता इकडून तिकडे रवाना झालेल्या गलबतावर पाठविलेली आपली सातही पत्रे मिळाली. ती अनुक्रमे गेल्या महिन्याच्या ११, १८, २१ आणि २२ तारखेची आहेत. डोंगरी येथील विजयाची बातमी मला उशीरा मिळाली. तत्पूर्वी ती वार्ता इकडे पसरली होती. ह्या विजयाबद्दल मी आपले अभिनंदन करतो, व त्याचबरोबर आपले आभारही मानतो. ह्या यशाने आमच्या लष्करी लौकिकात मोठीच भर पडली आहे. ज्याअर्थी, मी इकडून पाठवीत असलेली व पाठविण्याचे आश्वासन देत असलेली साधने आपणाला समाधानकारक वाटत नाहीत, त्याअर्थी, आपण आपल्या ता. २१ च्या पत्रात अधिकारसूत्रे खाली ठेवण्याची जी इच्छा व्यक्त केली आहे, तिला मंजुरी देणे मला इष्ट वाटतं. कारण साधनाची टंचाई असलेल्या अधिकारावर राहाण्याचा आग्रह धरणे मला इष्ट वाटत नाही. म्हणून मी आपल्याजागी मेश्त्र द कांपु पेद्रु द मेलु ह्यांची नेमणूक करीत आहे. तरी आपली अधिकारसूत्रे आपण त्यांच्याकडे सुपूर्त करावी.

आपल्या ता. २२ च्या पत्रावरून एक गोष्ट माझ्या लक्षात आली आहे ती ही की, ठाण्याचा किल्ला मराठ्यांच्या हातात असल्यामुळे त्या प्रदेशातून मराठ्यांना हाकलणे अशक्य झाले आहे. असे जर असेल तर, मला आपणास विचारायचे आहे की, ठाण्याचा किल्ला मराठ्यांच्या हाती असल्याने जर त्या प्रदेशाची मुक्तता होऊ शकत नाही, तर मग तो किल्ला पोर्तुगिजांनी घेतला तर काय होईल ? मला आशा आहे की, तो किल्ला घेण्याचे भाग्य ह्या राज्याला लाभल्यावाचून राहाणार नाही. आणि तसे जर झाले तर ज्या तटबंदीला आपण दुर्दैवी म्हणता ती तटबंदी सुदैवी ठरल्यावाचून राहाणार नाही. ही तटबंदी सबंद साष्टी बेटापर्यंत जाईल व ते बेट सुरक्षित करील. आणि सदहू तटबंदी उभारण्यामागील हेतू देखील तोच आहे ".

गोवा, २ एप्रिल १७३८.

कौंट द सांदोमिल

A P. O, TOMO I, VOL III, PART V
पत्र क्र. ९१, पृ. १७९—१८०
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(91) BASAIM, No. 7, FLS 70V.

पत्र क्रमांक ९२

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, मोगल आणि मराठे ह्या दोघांचे युद्ध सुरू झाल्याची बातमी जर खरी असेल तर देव आपल्या मदतीला धावून आला असे म्हणावे लागेल.

"उत्तरेकडील सेनापती पेद्रु द मेलु ह्यांस—

मी आजारी असतानाच गलबतावर आपली पत्रे आली. गेल्या चार पाच दिवसांपासून प्रकृती बरी आहे, पण मी अंथरूणात पडून आहे. तरीही मी आपल्या आणि इतर काही महत्त्वाच्या पत्रांची उत्तरे करीत आहे.

त्या प्रांताचे गव्हर्नरपद स्वीकारल्याबद्दल मी आपला आभारी आहे. हा अधिकार स्वीकारताना आपण आपल्या काही अडचणी दाखविल्या आहेत. परंतु ह्या अडचणींवर आपण मात केल्याशिवाय राहाणार नाही अशी आशा आहे. विशेषेकरून आरोग्याच्या अडचणीवर.

आपणाकडे मी आपल्या नेमणुकीसंबंधीच्या ह्या राज्याचा जो हुकूम पाठविला त्याचे कारण हे की, आपले स्थान मला सुरक्षित करायचे होते.

आपली नेमणूक मला नेहमीसारख्या नेमणुकीसारखी करायची नव्हती. परंतु आपणाला ज्याअर्थी नेमणुकीची ही पद्धत आवडत नाही, त्याअर्थी प्रस्तुत पत्रासमवेत आपल्या इच्छेप्रमाणे कलमे पाठवीत आहे.

आपणाला तिकडे खर्चासाठी १२ हजार असुर्प्या मंजूर करण्यास मला आनंद वाटला असता. परंतु महसूल खात्याच्या प्रमुखाला वसईच्या वखारदाराकडून पत्र आले आहे की, आरमाराने दमणहून पुष्कळ भात आणले आहे. आणि इकडून जो तांदूळ पाठविण्यात आला तो अद्याप संपलेला नाही. ह्याचा अर्थ असा की, उत्तरेकडील प्रांताला तूर्त अन्नाच्या मदतीची आवश्यकता नाही. दुसरी गोष्ट अशी की, दक्षिणेकडील आरमाराने तांदूळ आमच्या अपेक्षेपेक्षा फारच कमी आणला. आणि मला अशी भीती वाटते की, त्याच्यावर जो तांदूळ आला आहे तो ह्या राज्याला पुरणार नाही. परंतु समाधानाची गोष्ट ही की, उत्तरेकडील प्रांताला आता अन्नाच्या बेगमीची आवश्यकता नाही. आणि म्हणून फ्रिगेटवर तांदूळ न पाठविता इतर वस्तू पाठविण्यात येत आहेत. आपण ज्या वस्तूंची यादी पाठविली होती, त्याच त्या वस्तू आहेत. ह्या वस्तूंबरोबरच फ्रिगेटवर एक लक्ष चाळीस हजार असुर्प्याही पाठविण्यात येत आहेत. जी रक्कम गोळा करणे शक्य झाले ती एवढीच रक्कम आहे. माझ्या मते ही रक्कम पूर्ण नाही. मला आशा आहे की, तिथली वखार आपल्या पैशाचा भरणा नियमितपणे करीत राहील. आणि असे जर झाले तर, येत्या उन्हाळ्यात नवीन मदत पाठविता येईल.

महसूल खात्याच्या प्रमुखाने जो हिशोब सादर केला आहे, त्यावरून असे वाटते की, चौलच्या ठाण्यांत अन्नाच्या बेगमीची आणि पगार घालण्यास पैशांचीही टंचाई नाही. पण हा हिशोब बरोबर आहे की काय ह्याची मला शंका वाटते. कारण, आपण म्हणता की, इथून ज्या दोन लक्ष असुर्प्या पाठविण्यात आल्या, त्यातील चौलला काहीच पाठविण्यात आले नाही. आणि अन्न साठ्याचा हिशोब असाच चुकीचा असावा असा मला संशय येतो. तरी त्या ठाण्यातील परिस्थिती काय आहे याची चौकशी करावी. तिकडे जर पैशांची टंचाई असली, तर इकडून जी रक्कम तिकडे पाठविण्यात येत आहे, त्यातील थोडे पैसे त्याला द्यावे. आणि अन्नाची टंचाई असल्यास अन्नही धाडावे.

त्या प्रांताच्या परिस्थितीसंबंधाने आपण पाठविलेले निवेदन मिळाले. पण त्या निवेदनापूर्वी मला त्या प्रांताची माहिती मिळाली होती. आमचा सगळा भार आता प्रभुकृपेवर आणि आमच्या चिकाटीवर आहे. आणि मराठे व मोगल ह्यांचे युद्ध सुरू झाल्याची दिल्लीतील पाद्र्यांनी पाठविलेली

बातमी जर खरी असेल, तर देव ह्या मार्गाने आम्हाला मदत करीत आहे असे म्हणावे लागेल.

आपल्या ४ आणि ८ डिसेंबरच्या पत्रातील मुद्यांसंबंधी मला पुनः एकदा सांगायचे आहे की, इकडे सैन्याची आवश्यकता असून देखील मी पगारी सैनिकांची एकही तुकडी ठेवलेली नाही.

डोंगरीचे ठाणे हातात ठेवण्यासाठी आपण जी कारणे दिली आहेत, ती पटण्यासारखी आहेत. आपण ह्या ठाण्याची तटबंदी करण्याचा जो निर्णय घेतला आहे तो कौतुकास्पद आहे. ह्या ठाण्याच्या संरक्षणाची कामगिरी आपण कायतानु द सौझ पेरैरा ह्यांच्याकडे सोपविली असावी असे मी गृहीत धरतो. माझ्या मते ह्या कामगिरीसाठी ते लायक आहेत.

मराठे आणि इंग्रज ह्यांच्यामधील व्यवहारासंबंधी मुंबईच्या गव्हर्नरने आपणाला ज्या कैफियती सादर केल्या आहेत त्याची बातमी कळली. त्याच-प्रमाणे चिमाजीअप्पा तहाला अनुकूल असल्याचेही कळले. आपण ह्या प्रकरणी अधिक लक्ष घालून तहाच्या अटींचा अंदाज घ्यावा. चिमाजीअप्पाने आमचा जो मुलूख घेतला आहे, तो आम्हास परत करण्यास जर तो तयार असला, तर त्याचा तहाचा हेतु कळकळीचा असून आमच्यावर त्याचा परिणाम होईल हे आपण ध्वनित करण्यास हरकत नाही.

फिलीप द व्हालादारिज ह्यांनी शत्रू त्यांच्या हद्दीत शिरला असता, त्याला पिटाळून लावण्यात यश मिळविल्याचे कळले. त्यांच्या ह्या विजयाने शत्रूच्या नवीन आक्रमणाला पायबंद बसल्यावाचून राहाणार नाही, अशी मला आशा वाटते.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, २५ एप्रिल १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्रमांक ९२, पृ. १८१—१८५.

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(92) BACAIM, No. 7. FLS 76V.

पत्र क्रमांक ९४

व्हाइसरॉय वसई प्रांताचे गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, सिद्दीने लढण्यासाठी माणसे देतो म्हणून त्यांच्या मुशाहिऱ्याबाबत ज्या वीस हजार असुर्प्या घेतल्या होत्या, त्या त्याने परत केलेल्या नाहीत.

"उत्तरेकडील सेनापती पेद्रु द मेलु ह्यांस––

चालू माहीच्या ४ तारखेस आरमाराचे ह्या बंदरात आगमन झाले. ते बारा दिवस प्रवास करीत होते. वाटेत त्याने चाच्यांच्या काही नौका घेतल्या व काही बुडविल्या. वाऱ्याने जरा त्रास दिला. परंतु ज्या वाऱ्यामुळे हा त्रास झाला त्या वाऱ्याचा नाझरेथ ह्या फ्रिगेटला चांगला उपयोग झाला. माझा असा अंदाज आहे की, आरमाराचे इकडे आगमन होण्यापूर्वीच फ्रिगेट वसई बंदराला लागेल, व तिकडून इकडे निघेल.

आरमारावर आलेली पाच पत्रे मला मिळाली. ती अनुक्रमे १७, १८, २१ आणि २२ एप्रिलची असून त्या सर्व पत्रांचे उत्तर मी आता करीत आहे. मी आजारातून नुकताच उठलो आहे, त्यामुळे पत्रे बघण्यास आणि त्यांचे उत्तर लिहिण्यास फार त्रास पडतात.

मावळते गव्हर्नर आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांना सिद्दीने लिहिलेले पत्र व त्या पत्राला आपण पाठविलेले उत्तर ह्याची बातमी कळली. सांप्रतच्या परिस्थितीत आमच्यासंबंधी सिद्दीचे धोरण काय आहे, याचाही अंदाज आपण केल्याचे कळले. आमचा पक्ष धरला तर मराठे आपणाला कैचीत पकडतील ही जी भीती इंग्रजांना वाटते तीच भीती सिद्दीलाही वाटत असावी. परंतु आश्चर्याची गोष्ट ही की, सिद्दीच्या पत्रात आमच्याकडून त्याला ज्या वीस हजार असुर्प्या मिळाल्या आहेत त्यांचा अजिबात उल्लेख नाही. आपण म्हणता त्याप्रमाणे थोड्याशा माणासांसाठी की ज्या माणसांची मदत तो आम्हाला पाठविणार आहे––वीस हजार असुर्प्या फार आहेत. पुनः पावसाळ्यात ही मदत निरुपयोगी आहे हे आपले म्हणणे खरे आहे. आपण त्याला जे उत्तर पाठविण्याचा निर्णय घेतलात तो मला पसंत आहे. पावसाळ्यानंतर ती मदत स्वीकारणे सोयीचे होईल. मराठे युद्ध कैद्यांना इकडे न पाठविण्याचे जे कारण आपण दिले आहे ते समर्पक आहे. इकडे पाठविण्यात आलेल्या एकतीस युद्ध कैद्यांपैकी एकजण मरण पावला.

आपल्या १८ एप्रिलच्या पत्रात आपण म्हणता की, चढाईचे युद्ध साधनांची कमतरता व वाईट हवामान ह्यामुळे खेळता येत नाही. मावळत्या गव्हर्नरना मी लिहिले होते की, सध्यस्थितीत आम्हाला फक्त बचावाचे युद्ध खेळणे भाग आहे. आणि ह्या बचावात्मक युद्धासाठी त्या प्रांतात असलेल्या सर्व पाय-



व्ही ५५५८–३३

दळाची आवश्यकता आहे असे आपण जे म्हणता ते पटण्यासारखे आहे. कारण, रोगराईच्या प्रादुर्भावामुळे माणसे कमी होत चालली आहेत. इकडे माणसांची फार कमतरता आहे. एकादी तातडीची कामगिरी देखील मला सैन्याच्या अभावी हाती घेता येत नाही. त्यात पुन: हिवाळ्यानंतर नौकायनाच्या राखणीसाठीही सैन्याची जरूरी आहे.

आपण जे शिपाई इकडे पाठवून दिले आहेत, त्यांच्याबाबत मला आपणास, कळवायचे आहे की, जे शिपाई आपणाला आवश्यक वाटतील त्यांनाच इकडे पाठवून द्यावे.

मराठ्यांचा आणि इंग्रजांचा व्यापार बंद पडला तर, मराठे वठणीवर येतील ही जी आपली विचारसरणी आहे ती मला मान्य आहे. परंतु इंग्रज व्यापाऱ्यांनी त्यांच्या पूर्वीच्या गव्हर्नरकडे जो निषेध व्यक्त केला आणि मलाही जी निषेधपर पत्रे लिहिली, ती जर आपल्या अवलोकनात आली, तर हा व्यापार त्यांनी आमच्या इच्छेविरुद्ध का चालू ठेवला आहे ते आपल्या ध्यानी येईल. तरीही आपल्या इच्छेप्रमाणे उपाय योजना करता येण्यासारखी आहे, व ती करणेही आमच्या हिताचे आहे. परंतु ह्या मोहिमेसाठी ज्या नौकांची आवश्यकता आहे, त्या आपल्यापाशी नाहीत हे आपणच कबूल केले आहे. दुसरी गोष्ट इंग्रजांच्या विरोधाचाही आपण विचार केला पाहिजे. पण हा हुकूम काढावा अशी जर आपली इच्छा असेल तर तो काढण्यास मी कमी करणार नाही. मला माहीत आहे की, शत्रूची जर समुद्रावरून कोंडी केली तर तो वठणीवर आल्यावाचून राहाणार नाही. कारण, ह्या कोंडीमुळे त्याची पुष्कळच हानी होईल. कॅप्टन फ्रान्सिस्कु कुएल्यु द मेलु ह्यांनी वसईचे एक पाले पकडून नेत असता त्यांच्या तावडीतून सोडविण्याची जी बहादुरी गाजविली त्याबद्दल आपल्या शिफारशीवरून मी सदर्हू कॅप्टनना पत्र लिहून त्यांचे अभिनंदन करीत आहे. पण ह्या कॅप्टनची गोष्ट आल्यावर मला आणखी एका अधिकाऱ्याच्या पत्राची आठवण होत आहे. आणि हे अधिकारी म्हणजे कॅ. फेलिसियू झुजे हे होत. त्यांना मी जे अभिनंदनपर पत्र घातले होते ते त्यांना तिकडे मिळाले नसल्याची त्यांनी तक्रार केली आहे. ह्या अधिकाऱ्याने प्रस्तुत युद्धात मोठाच पराक्रम गाजविला आहे. विशेषेकरून कोळमला कुमक पाठविताना त्याने जे धैर्य दाखविले ते खरोखर वाखाणण्यासारखे आहे.

चिमाजीचा डोंगरीवर हल्ला करण्याचा विचार असल्याची बातमी ऐकून मी बेचैन झालो आहे. आपण म्हणता की, आरमार तिकडे परतल्यावर हा हल्ला करण्याचा त्याचा विचार असल्याची बातमी आपणास लागली आहे. पण ज्याअर्थी ह्या हल्ल्याचा सुगावा आपणास लागला आहे, आणि डोंगरीचे रक्षणकर्ते ह्या हल्ल्यांना आता रूळले आहेत, त्याअर्थी, मला आशा आहे की,

शत्रू जबरदस्त हानी सोसून माघार घेईल अथवा ह्या हल्ल्याचा बेत तो सोडून देईल. ज्याअर्थी, गलबत तिकडून आलेले नाही त्याअर्थी, माझा हा कयास खरा ठरेल अशी मला आशा वाटते.

शत्रूने भद्रापूरवर हल्ले करू नयेत म्हणून त्याला हुसकून लावण्याची कामगिरी विचारार्ह आहे. परंतु आपण म्हणता की, ह्या कामगिरीच्या मार्गात फार मोठ्या अडचणी आहेत व ही कामगिरी अयशस्वी झाली तर, त्याचे परिणाम फार वाईट होतील असे आपणाला वाटते. म्हणून माझे असे मत आहे की, असे धोके पत्करण्यापूर्वी तूर्त आम्ही बचावात्मक युद्ध खेळणे आमच्या हिताचे आहे. मला असे वाटते की, शत्रूवर चढाई करण्यापूर्वी त्याच्या कार्यात अडथळे आणण्याची मोहीम अधिक फायद्याची ठरेल. उदाहरणार्थ शत्रूने नवीन बांधकाम काढले असता त्याच्यावर दगडांच्या मोर्टर्स डागाव्या. ह्यामुळे दारूचीही बचत होईल आणि शत्रूची हानी होईल. ह्या कामी मोठ्या तोफांचा उपयोग करण्याऐवजी मोर्टर्स तोफा उपयोगात आणणे सोयीचे आहे. कारण त्यांना दारू कमी लागते.

देव आपले रक्षण करो ".

गोवा, १० मे १७३८.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ९४, पृ. १८७—१९४
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.
(94) BASAIM, No. 7, FLS 80.

पत्र क्र. ९६

वसई प्रांताच्या गव्हर्नरने व्हाइसरॉयला लिहिले होते की, मुंबईच्या गव्हर्नरच्या मध्यस्थीने मराठ्यांशी तहाच्या वाटाघाटी सुरू कराव्या असे आपणाला वाटते. त्या पत्रास व्हाइसरॉयने पुढील उत्तर धाडले :

" उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

आपले ७ मेचे पत्र मिळाले. त्या पत्रात आपण म्हणता की, ह्या पावसाळ्यात मराठ्यांशी मुंबई-गव्हर्नरच्या मध्यस्थीने तहाच्या वाटाघाटी करणे सोयीचे होईल. आपले हे विचार इतके साधार आहेत की, त्यांना मान्यता दिल्याशिवाय मला गत्यंतर नाही. ह्या बाबतीत मी मुंबईच्या गव्हर्नरला लिहीत आहे. त्याची एक प्रत आपणाकडे रवाना होत आहे. तरी अंतिम



व्ही ५५५८–३३अ

हेतू साध्य व्हावा म्हणून आपण हे काम अक्कलहुषारीने चालवावे. मात्र मी आपणाला सूचना देत आहे की, आपण तहाचे वचन न देण्याची काळजी घ्यावी. ह्या वाटाघाटी सुरू करण्याचा आमचा मुख्य हेतू हा काळ काढण्याचा आहे. कारण सांप्रतच्या परिस्थितीत शत्रूकडून फायदेशीर अशा अपेक्षा करण्यात अर्थ नाही. मला आशा आहे की, हे काम आपण अत्यंत काळजी-पूर्वक आणि अक्कलहुषारीने पार पाडाल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, १५ मे १७३८. कौंट द सांदोमिल.

A P O, TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ९६, पृ. ९६
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA.
(96) BASAIM, No. 7, FLS 84.

व्हाइसरॉय उत्तरेकडील सेनापतीला लिहितो की, गोव्याहून वसईकडे गेलेले एक गलबत आंग्र्यांच्या युद्ध नौकांनी पकडले असल्याची बातमी आपणाला कळली आहे.

"उत्तरेकडील सेनापती पेद्रु द मेलु ह्यांस—

आज चौलच्या गलवताची रवानगी करीत असता, तिकडून आलेल्या व कुणी ज्युआंव आंतोनियु निरांद नामक कप्तान असलेल्या त्या शहरच्या गलबताने अशी बातमी आणली की, थोड्याच दिवसामागे इकडून चौलचे जे गलबत तिकडे गेले ते मेलुंदीच्या युद्ध नौकांनी पकडले. ह्या गलबतावर मी आपल्या फ्रिगेटवर पाठविलेल्या पत्राचे उत्तर पाठविले होते. ही बातमी ऐकून मला फार वाईट वाटले. कारण, आपण औषधांची जी यादी पाठविली होती, त्या यादीप्रमाणे मी त्या गलबतावर औषधे पाठविली होती. पत्रे गायब झाल्याबद्दल मला वाईट वाटले नाही. कारण, त्यांच्या नकला मी चौलच्या दुसऱ्या एका गलबतावर दुसऱ्या मार्गे पाठवून दिल्या होत्या. ते जहाज तिकडे पोहोचलेच असेल.

ह्या पत्रासमवेत दीवचे जे पत्र जात आहे, ते तिकडे त्वरित पाठवून द्यावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ३० मे १७३८.

ता. क. हे पत्र लिहून झाल्यावर मेलुंदीहून आलेल्या एका कैद्याकडे चौकशी केली असता त्याने गलबत पकडले गेल्याचे सांगितले. परंतु तो म्हणाला की, ते मुंबईचे होते. वसईची दोन्ही आणि चौलचे मिळून तिन्ही गलबते सुरक्षित निघून गेल्याचे त्याच्याकडून कळले. ते ऐकताच मला समाधान वाटले. ती तिन्ही गलबते तिकडे पोहोचली असतीलच.

कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ९९, पृ. २००—२०१
संपादक :—
A B DE BRAGANCA PEREIRA
(98) BASAIM, No 7, FSL 92V;

पत्र क्र. १००

व्हाइसरॉयला मानाजी आंग्रे ह्यांची पस्तीस गलबते मुंबई बेटातून ठाण्याला मराठ्यांचे सैन्य वसईला आणण्यासाठी जात असल्याची बातमी कळताच त्याने मुंबईच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहिले :—

"मुंबईचे सेनापती जॉन हॉर्न ह्यांस—

मी तापाने आजारी असून त्याची पुनरुक्ति होण्याची ही तिसरी खेप आहे. त्यामुळे मी आपल्या पत्राचे उत्तर पाठवू शकलो नाही. परंतु हे पत्र मला आजारी स्थितीत लिहावे लागत आहे. त्याला तसेच एक गंभीर कारण घडले आहे.

मला विश्वसनीय बातमी कळली आहे की, मानाजी आंग्रे ह्यांच्या पस्तीस गलबतांना मुंबई बेटातून ठाण्याला जाण्याची परवानगी आपण दिली आहे. ही गलबते ठाण्याला मराठ्यांचे सैन्य आणण्यासाठी जात आहेत. ते सैन्य कारंजावर हल्ला करण्यासाठी निघणार होते. परंतु कारंजावर हल्ला होणार असल्याचा सुगावा त्या किल्ल्याच्या कॅप्टनला लागल्याने त्याने त्या हल्ल्यास तोंड देण्याची कडेकोट तयारी केल्याचे कळताच ही गलबते गायीच्या बेटाना रसद पोहोचविण्याकरता ठाण्याच्या बंदरात गेली व तिथून मुंबई बंदरातून माघारी परतली. ह्या घटनेबद्दल मला आपणाकडे निषेध करायचा

आहे. आपल्या हातून तटस्थतेचा भंग झाला आहे हे मला आपल्या निदर्शनास आणायचे आहे. मराठ्यांच्या लष्करासाठी रसद घेऊन जाणारे एक बलाढ्य आरमार आपल्या बेटातून गेले असल्याने आपल्या तटस्थतेचा हा उघड उघड भंग आहे. आपण ह्या प्रकरणी गंभीरपणे विचार करून पोर्तुगाल व इंग्लंड ह्या दोन्ही राष्ट्रांमधील दोस्तीस अनुसरून योग्य ते धोरण स्वीकाराल अशी आशा वाटते.

अशा दगलबाज, मुजोर पण बलाढ्य शेजाऱ्यांची बाजू बळकट होण्यासारखा फायदा त्यांना अशा रीतीने मिळावा ही आम्हा दोघांनाही हानिकारक गोष्ट आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ३२ मे १७३८.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल.

A. P. O., TOMO I, VOL III, PART V;
पत्र क्र. १००, पृ. २०१—२०२
संपादक :—
A. B. DE BRAGANCA PEREIRA
(100) LIVRO DOS REIS VIZINHOS, No 9, FLS 74;

पत्र क्र. १०१

चिमाजीअप्पा हे आपल्या सैन्याचे अधिपत्य दुसऱ्या एका सरदाराकडे देऊन पावसाळ्यात पुण्यास जाण्याचा विचार करीत असल्याची बातमी व्हाइसरॉयला कळताच त्याने वसईच्या गव्हर्नरला खालील पत्र लिहिले :—

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

चौलच्या गलबतावर पाठविलेले आपले पत्र मिळाले. हे पत्र गायब झाल्याची आपली समजूत झाल्याने आपण आम्हाला तत्संबंधीचा इशारा दिला होता पण ते जहाज अखेर इकडे येऊन पोहोचले व आरमाराची आणि फ्रिगेटची वाट पहात इकडे थांबले. ह्याच गलबताबरोबर चौलचे आणखी एक जहाज, इकडून तिकडे निघाले होते. माझी अशी समजूत आहे की आपण ज्या ठरावांची वाट पाहात होता ते ह्या दोन्ही गलबतावर दोन मार्गांनी

पाठविलेले सर्व ठराव आणि आपल्या पत्रांची उत्तरे आपणाला मिळालीच असतील.

चिमणाजीअप्पा हे आपल्या सैन्याचे आधिपत्य दुसऱ्या एका सरदाराचे हाती सुपूर्त करून पावसाळ्यासाठी पुण्याला जाण्याचा विचार करीत आहेत ही जी बातमी आपण पाठविलीत ती मिळाली.

कारंजावर हल्ला करण्याचा त्यांचा विचार होता, पण आपण जागरूक राहून हल्ल्यास तोंड देण्याची कडेकोट तयारी केल्याने त्यांनी हल्ल्याचा विचार सोडून दिला, हे कळले. ह्या हल्ल्यासाठी सैन्य वाहून नेण्यास ठाण्याला गोळा झालेले व नंतर तेथून रसद घेऊन गायीच्या बेटात गेलेले प्रचंड आरमार इंग्रजांनी आपल्या पाण्यातून जाऊ येऊ दिले ही खरोखर विलक्षण गोष्ट आहे. हे आरमार आमची नुकसानी करण्याच्या मोहिमेवर निघाले होते. माझी अशी समजूत आहे की, आपण मुंबईच्या गव्हर्नरना पत्र लिहून ह्या घटनेचा निषेध केलाच असेल. मीही त्यांना ह्या प्रकरणी लिहीत आहे. ज्याअर्थी, शत्रूला वसईवर आणि डोंगरीवर हल्ला करणे अवघड वाटले, त्याअर्थी, तो हा खर्चिक अनुभव दुसऱ्यांदा घेण्याच्या भानगडीत पडणार नाही, अशी मला आशा वाटते. शत्रूने नवीन तटबंदीची कामे थांबवावी म्हणून आपण त्रयस्था-मार्फत प्रयत्न चालविले असल्याचे कळले. परंतु माझे असे मत आहे की, ह्या वाटाघाटींनी ते काम ते बंद ठेवणार नाहीत. तथापि, आपण शत्रूच्या एखाद्या ठाण्यावर उदाहरणार्थ घोडबंदरवर अथवा मद्रापूरवर हल्ला करण्याची हूल उठविलीत व त्या हल्ल्याच्या तयारीचा बहाणा केलात, तर शत्रू तटबंदीचे काम सोडून देऊन त्या ठाण्यांच्या रक्षणाच्या तयारीस लागेल. मला वाटते की शत्रूला हैराण करायच्या ह्या संभाव्य स्वारीच्या हालचाली चालू पावसाळ्यात सुरू करता येतील.

शत्रुप्रदेशात जाळपोळीसारखी घातपाती कृत्ये घडवून आणूनही शत्रूची दमछाक करता येईल. मात्र ह्या कामासाठी अशा खेड्यांची निवड केली पाहिजे की, तेथे आमच्या मुलकी लोकांना शत्रूची हत्यारी माणसे भेटता कामा नयेत. ही कृत्ये वर्सोवा, बांदोडा व डोंगरी ह्या ठाण्याच्या बाजूने शत्रुप्रदेशात करता येतील. अशा कृत्यांनी जर खेडूतामध्ये दहशत माजविली, तर ते आपली खेडी सोडून पळून जातील व त्यामुळे शेते ओस पडून शत्रूची हानी होईल.

डोंगरीच्या तटबंदीचे काम आपण झपाट्याने पुरे करीत आणल्याचे ऐकून आपले कौतुक वाटले. हे काम ठरलेल्या अवधीत पूर्ण होईल अशी आशा आहे. आपण छोट्या ठाण्यांना अन्नाची बेगमी आणि पैसा ह्यांचेद्वारा

मदत केली असल्याचेही कळले. ही मदत त्यांना ऑक्टोबर महिन्यापर्यंत पुरेल. आपणास त्यांना दारूगोळ्याचीही मदत पोहोचती करता येईल.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ३१ मे १७३८.

ता. क. ह्या पत्रासोबत मुंबईच्या गव्हर्नरना पाठविलेल्या पत्राची नक्कल आपल्या पहाणीसाठी पाठवीत आहे.

कौंट द सांदोमिल

पत्र क्र. १०१, पृ. २०२—२०५

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

पत्र क्र. १०३

व्हाइसरॉय वसई प्रांताच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की मुंबईच्या गव्हर्नरने पोर्तुगीज व मराठे ह्यांच्यामधील संभाव्य तहाच्या करारातील ज्या अटी सुचविल्या आहेत त्या पोर्तुगिजांना मान्य होण्यासारख्या नाहीत.

"उत्तरेकडी सेनापती पेद्रु द मेलु ह्यांस—

चालू माहीच्या २६ ला आपले २८ जूनचे पत्र घेऊन आलेला जासूद इकडे येऊन पोहोचला. काही दिवसांमागे त्याच महिन्याच्या १४ तारखेस लिहिलेले आपले पत्र मिळाले होते.

मुंबईच्या गव्हर्नरच्या पत्रांच्या ज्या नकला आपण माझ्याकडे पाठविल्या आहेत, त्यांच्यावरून त्यांनी मराठ्यांना तहाचा प्रस्ताव सुचविल्याचे व चिमणाजी-आप्पा ह्यांना लिहिलेल्या पत्रात तहाच्या अटी सादर केल्याचे कळन आले. ह्या अटी आम्हाला मान्य होण्यासारख्या नाहीत हे तर झालेच, परंतु त्या शत्रूची मुजोरीही वाढविणाऱ्या आहेत. त्या आम्हाला अपमानास्पद असून शत्रूचा मान वाढविणाऱ्या आहेत. माझे तर असे मत आहे की, ह्या अटी पत्करून मराठ्यांशी तह करण्याऐवजी त्यांच्याशी लढणे परवडले. त्यांनी आमचा जो प्रदेश गिळंकृत केला आहे, तो प्रथम खाली केला पाहिजे, तरच त्यांच्यांशी आम्हाला तहाच्या वाटाघाटी करता येतील.

राजा सवाई जयसिंग ह्यांच्या जयपूर येथील राजधानीतून पाद्री द सिल्वा ह्यांनी मला कळविले आहे की, बाजीरावाचा आणि मोगलांचा तह झाला असून तो बाजीरावाला फायदेशीर आहे. ही बातमी ह्या प्रदेशाबाबत इकडे

पसरलेल्या बातम्याशी जुळते आहे की काय ते आपण बघावे. सुरतेहून मला मोझेस तोबिअस ह्यांनी कळविले आहे की, तहेमास कुलीखान (नादिरशहा) ह्याने हिंदुस्थानवर स्वारी करून मोगलांचा बराच मुलुख जिंकल्यामुळे बादशहा सांप्रत घोर चिंतेत आहे. इकडे साताऱ्याहून आलेल्या लोकांकडून कळते की, बाजीरावाचे पुण्यास आगमन झाले आहे. त्याच्या मातोश्रीचे निधन झाल्याने त्याला माघारा परतण्याची घाई करावी लागली.

डोंग्री येथील बांधकाम लवकर आटोपल्याचे ऐकून आनंद झाला. आपण ह्या कामावर जातीने देखरेख केलीत म्हणून ते लवकर आटोपले. आणि बेटातील खेडी शत्रूच्या विरोधास न जुमानता वसविण्यात आल्याचे ऐकून आनंद वाटला.

असेरीच्या कॅप्टनने आपल्या हुकुमाविरुद्ध तिथून प्रयाण केल्याचे वाचून मला धक्काच बसला. ह्या वार्तेवर क्षणभर माझा विश्वासच बसला नाही. आणि जर आपण ह्या गोष्टीचा पत्रात उल्लेख केला नसता, तर ह्या गोष्टीवर माझा खचित विश्वास बसला नसता. दुसरी गोष्ट अशी की दिवस पावसाळ्याचे असल्याने, सदहू अधिकाऱ्याच्या गैरवर्तनामुळे जी हानी झाली आहे ती भरून निघणे फार कठीण आहे. योग्य संधी येताच आपण असेरीच्या गडावर एकाद्या विश्वासू अधिकाऱ्याला पाठवावे व सदहू गडाच्या माजी कॅप्टनला तारापोर येथून बाहेर न पडण्याची ताकीद द्यावी. त्याला तिकडे कैद्याप्रमाणेच ठेवावे. माझ्या मते असेरीच्या गडावर एकाद्या अधिकाऱ्याला पाठविण्यास फारशी अडचण पडणार नाही. त्या गडावर जाणाऱ्या सर्व वाटा शत्रू बंद करू शकेल असे मला वाटत नाही. एकादा मनुष्य वर सहज जाऊ शकेल.

आपण चौलहून जे गलबत इकडे पाठविण्याचा हुकूम केला होता, ते इकडून जूनच्या पहिल्या आठवड्यात ३१ मेची पत्रे घेऊन निघाले. परंतु समुद्र एवढा खवळलेला होता की, दोन दिवसांच्या प्रवासानंतर ते माघारा परतले. त्याला सबंध पावसाळा इकडेच काढावा लागला. त्याच्यावर मी जी पत्रे पाठविली होती ती आता पुनः पाठवित नाही. जासुदांना उगीच भारा नको.

दारूच्या भडक्याने किल्ल्याचा बुरुज उडणे व किल्ल्यात शत्रूचे गुप्तहेर असल्याचा संशय येणे ह्या घटना काळजी करण्यासारख्या आहेत. मला आशा आहे की, कॅ. पेद्रु लाउरेयानु हे बुरुजाचा ढासळलेला भाग दुरुस्त करतील, व किल्ल्यातील शत्रूच्या हस्तकांविरुद्ध उपाययोजना करतील. मी सदहू

कॅ. लाउरेयानु ह्यांच्याविषयी चांगले ऐकले आहे. आणि आपणही ह्या प्रकरणी लक्ष घातल्याशिवाय राहाणार नाही ह्याची मला खात्री वाटते.

तिथली अन्नाची बेगमी फक्त २० ऑक्टोबरपर्यंत पुरेल असे जे आपण लिहिता ते काळजी करण्यासारखे आहे. कारण, इकडे पाऊस उशीरा सुरू झाला आहे. जुलै महिन्यात तर पाऊस सतत २० दिवसपर्यंत नव्हता. आणि आता तो इतक्या जोरात सुरू झाला आहे की, तो सप्टेंबर ऑक्टोबरपर्यंत चालू राहील की काय अशी भीती वाटू लागली आहे. त्यामुळे त्या दिवसांत तिकडे नौका पाठविणे शक्य होणार नाही. तथापि, असे जरी असले तरी आपणाला हवी असलेली रसद मी योग्य त्या वेळी पाठविण्याची शिकस्त करीन आणि ईशकृपेने जर दमणमध्ये पीक चांगले आले, तर तिथले धान्य तिकडील सर्व ठाण्यांना पुरेल. आणि मग इकडून तिकडे धान्य पाठविण्याची आवश्यकता उरणार नाही. आणि पावसाळ्याच्या उत्तरार्धात वाहतूक सुरू झाली की, दमणच्या बंदरातून तिकडे थोडी रसद पाठविता येईल. तरी आपण दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांना ह्या बाबतीत लिहावे.

मी आपणाला जूनच्या सुरुवातीला इकडे अडकून पडलेल्या गलबतावर जी पत्रे पाठविली होती त्यात शत्रूप्रदेशात माणसे पाठवून घातपाती कृत्ये सुरू करण्याबद्दल सूचना केली होती. ही मोहीम यशस्वी झाली तर खेडुतांनी आपली गावे सोडून पळ काढला असता. माझ्या मते ज्या भागात शत्रूच्या हत्यारी लोकांचा विशेष बंदोबस्त नसेल त्या भागातच ह्या हालचाली सुरू कराव्यात.

देशाहून आम्हाला कुमक येणार आहे. परंतु ह्या कुमकेशिवाय आम्हाला काही शिपायांच्या तुकडयाही लागतील. माझ्या मते सुरतेचे शिपाई चांगले आहेत. म्हणून मी सुरतेच्या नबाबाला लिहीत आहे की, पावसाळ्यानंतर त्याला शक्य होतील तितकी माणसे गोळा करून ठेवावी. त्याचप्रमाणे मी दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांनाही लिहीत आहे की, त्यांनी आपल्या जिल्ह्यात दुब लोकांची भरती करून सुरतेच्या माणसात त्यांची भर घालता येणे शक्य आहे का बघावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, ३० जुलै १७३८.

कौंट द सांदोमिल

ता. क. आपण जो जासूद इकडे पाठविला त्याला मी वीस असुर्प्या देण्याचा हुकूम केला आहे. तरी ही रक्कम त्याच्या मुशाहिऱ्यातून कमी करावी.

A. P. O., TOMO I, VOL, III, PART V
पत्र क्र. १०३, पृ. २०७—२१३
संपादक :—
A. B. DE BRAGAN A PEREIRA

वसई प्रांतात मराठ्यांशी लढण्याकरता सुरतेत सैन्य भरती करण्याची विनंती व्हाइसरॉय सुरतेच्या नबाबाला पुढील पत्रात करतो—

"सुरतेचे नबाब ह्यांस—

आमच्या उत्तरेकडील प्रदेशाचे भूतपूर्व गव्हर्नर जनरल दों. लुईज बोतेल्यु ह्यांनी मला कळविले होते की, गेल्या वर्षी आपणाकडून त्यांना आपल्या सदिच्छेने मराठ्यांविरुद्ध लढण्याकरता माणसांची चांगली मदत झाली. त्याबद्दल मी आपला फार आभारी अहे. आमच्या दोन्ही देशांतील हे सहकार्य उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावे अशी आशा बाळगतो. आता आपणाला पुनः विनंती करण्यात येत आहे की, आमचे सभायिक शत्रू जे मराठे त्यांच्याशी लढण्याकरता आम्हांला पावसाळ्यानंतर काही सैनिकांची आवश्यकता आहे. पोर्तुगालहून मी सैन्याच्या आगमनाची वाट पाहात आहे. पण ह्या सैन्याला सहायक आगमनाची वाट पाहात आहे. पण ह्या सैन्याला सहायक अथवा पूरक सैन्याची आवश्यकता आहे. तरी आपणाला विनंती आहे की, आपल्या राज्यात अशी माणसे असल्यास त्यांची भरती करावी. ह्या माणसांना पावसाळा संपल्यावर व नौकांची समुद्रावरील वाहतूक सुरू झाल्यावर नौका पाठवून नेण्याची व्यवस्था करीन. त्या संबंधीच्या वाटाघाटी आपणाशी करण्याची सूचना मी आमचे सुरत येथील प्रतिनिधी मोझेस तोबिआज ह्यांना केली आहे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, ३१ जुलै १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V
पत्र क्र. १०४, पृ. २१२—२१३
संपादक :—
A. B. DE BRAGAN A PEREIRA.
(104) LIVRO DOS RE IS VIZINHOS, No. 9, FLS 79V.

पत्र क्र. १०८

व्हाइसरॉय महसूल खात्याच्या प्रमुखाला वसई प्रांतात सुरू करायच्या लष्करी मोहिमेसाठी नौका तयार करण्याबद्दल पत्र लिहितो :—

"महसूल खात्याचे व्हेदोर आंतोनियु कानैरु द आल्कासोव्हा ह्यांस—

गेल्या गुरुवारी मी आपणाला सांगितले होते की, नौका शक्य तितक्या लवकर तयार केल्या पाहिजेत, कारण ह्या वर्षी त्यांना मोहिमेवर पाठवायचे आहे. ह्या गोष्टीची आपणाला पुनः आठवण करून द्यावी असे वाटले म्हणून हे पत्र पाठवीत आहे.

पहिली गोष्ट ही की, मोहीम शक्य तितक्या लवकर सुरू केली पाहिजे म्हणून आम्ही सगळ्यांनी तिला हातभार लावला पाहिजे. दुसरी गोष्ट, येत्या मोसमात इकडे नवीन व्हाइसरॉय येण्याचा संभव आहे. आणि तो जर आला तर आमची मोहिमेची तयारी नसलेली पाहून त्याला आश्चर्य वाटेल. म्हणून त्याच्या आगमनापूर्वी हे काम झाले पाहिजे.

अशा परिस्थितीत माझी आपणाला सूचना आहे की, येत्या २४ तारखेपर्यंत मोहिमेवर जायच्या नौका तयार करून ठेवाव्या. कारण, देशाहून येणाऱ्या नौकांवर जे सैन्य येणार आहे ते ह्या नौकांवर उत्तरेकडे रवाना केले जाणार आहे. त्याचप्रमाणे तोफा, दारूगोळा आणि इतर युद्धसामग्रीही तयार करून ठेवावी. हेतू हा की, नवीन व्हाइसरॉयना जे काय तिकडे पाठवायचे असेल ते त्यांनी लवकर पाठवावे. आणि नवीन व्हाइसरॉयचे जर आगमन झाले नाही तर आम्हांला ही मोहीम सुरू करणे क्रमप्राप्तच आहे.

देव आपले रक्षण करो".

पानेली, १५ सप्टेंबर १७३८.

ता. क. आंजेदिवहून बातमी आली आहे की, सहा पाली आणि तीन गलबते एका महत्त्वाच्या मोहिमेवर निघाली असल्याची दिसली. मला आणखीही बातमी कळली आहे की, भोसले हे रेडी बंदरातून आपली सर्व गलबते दुसरीकडे पाठवीत आहेत.

ह्या बातम्यांवरून मला असे वाटते की, मोसांबिक आणि देशाहून जी जहाजे येणार आहेत त्यांना संरक्षण देण्यासाठी म्हणून त्यांच्या सामोरा एक फ्रिगेट पाठविलेले बरे.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. १०८, पृ. २१५—२१६.
संपादक :— A. B. DE BRAGAN A PEREIRA.
(113) LIVRO DAS BARTAS, EORDENS PORTARIAS,No. 23, FLS 149.

पत्र क्र. ११३

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, मराठ्यांनी तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी गोव्याला एक वकील पाठविला होता, पण त्याने अधिकारपत्रे आणली नव्हती म्हणून ह्या वाटाघाटी होऊ शकल्या नाहीत.

"मुंबईचे सेनापती जॉन हॉर्न ह्यास--

आपल्या चालू माहीच्या ६ तारखेच्या पत्राचे हे उत्तर आहे. आपल्या पत्रात आपण माझ्यावर जे आरोप केले आहेत त्यांचे उत्तर मी आपणाला इथून लवरकच उत्तरेकडे निघणाऱ्या आरमारावर पाठविणार आहे. मी गेल्या एप्रिल महिन्यापासून बारंवार आजारी पडत असल्याने कामाच्या बाबतीत माझ्या हातून हयगय होत आहे. तहाच्या वाटाघाटी करण्यासाठी आलेल्या मराठ्यांच्या वकिलाने संपूर्ण अधिकार आणले नव्हते. पण त्याबद्दल मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. अर्थात तहाच्या वाटाघाटी करण्याची विनंती त्याने स्वतःच केली होती. पण हा त्याचा नुसता बहाणा होता. कारण आम्ही उत्तरेकडील प्रांतात लवकरच जी चढाई करण्याचे योजिले आहे ती चढाई लांबणीवर पडावी म्हणून मराठ्यांनी तहाच्या वाटाघाटी करण्याचा हा बहाणा केला होता.

अशा परिस्थितीत मला एकच मार्ग सुरक्षित वाटतो आणि तो म्हणजे मराठ्यांच्या वकिलाचे काहीच न ऐकणे. मग तो वाटाघाटी करण्याचे संपूर्ण अधिकार आणो वा न आणो. कारण, मराठे आज ज्या स्थितीत आहेत, त्या स्थितीत त्यांच्याकडून कशाचीच अपेक्षा करण्यात अर्थ नाही. म्हणून मला वाटते हा प्रश्न शस्त्रबलावर सोडविलेला बरा.

मेलुंडीच्या किनाऱ्यावर आपली जी नौका बुडाली त्याची बातमी आम्ही आपणाला दिली नाही असा आपला आमच्यावर आरोप आहे. पण ही बातमी आम्हांला माहीत नव्हती. आपले खलाशी जेव्हा इकडे आले, तेव्हाच त्यांच्याकडून आम्हांला ही बातमी कळली. आपणाला ही बातमी लवकर कळली नाही, कारण समुद्र खवळलेला होता. जहाजावरचे जे खलाशी इकडे आले, त्यांच्यासाठी आम्हांला जे काय करणे शक्य होते ते आम्ही केले. आपण ह्या खलाशांना जिकडे पाठवा म्हणून सांगाल तिकडे पाठवू. विलायतेहून यायच्या नौका अद्याप आल्या नाहीत म्हणून आपण बेचैन असल्याचे ऐकून वाईट वाटले. आमच्या युरोपहून आलेल्या नौका मोसांबिकला थांबल्या नाहीत म्हणून त्या इकडे लवकर येऊन पोहोचल्या.

आपण तहाच्या प्रश्नाबाबत जी शुभेच्छा पाठविलीत त्याबद्दल मी आपला आभारी आहे. माझ्याही शुभेच्छा मी आपणाला पाठवीत आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, १९ ऑक्टोबर १७३८.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ११३, पृ. २२१—२२२

संपादक :—

A. B. DE BRAGAN A PEREIRA.

(113) LIVRO DOS REIS VIZINHOS FLS 84.

वसई प्रांतात लढण्यासाठी चौलला आलेली भाडोत्री माणसे परत गेल्याचे कळताच व्हाइसरॉयने वसईच्या गव्हर्नरला पुढील पत्र लिहिले.

"उत्तरेकडील सेनापती पेद्रु द मेलु ह्यांस——

१० सप्टेंबरच्या पत्रात मी आपणाला कळविले आहे की, ज्या गलबतावर ते पत्र आले, त्या गलबतावर आलेल्या सर्व पत्रांचे उत्तर करण्यास मला सवड झाली नाही. आता दुसऱ्या गलबतावर जी पत्रे आली त्यांचे उत्तर पाठवीत आहे. ते गलबत इकडे ११ तारखेला येऊन पोहोचले. आपल्या दोन सप्टेंबरच्या पत्रात आपण म्हणता की, मुंबईला जहाजांवरील माणसे मिळणे कठीण झाले आहे. जो मुशाहिरा त्यांना देण्याचे ठरले होते, तो मुशाहिरा देण्यास महसूल खात्याचे प्रमुख तयार नाहीत. ह्या बातमीचे मला विशेष वाटले नाही. पण चौलला आलेली लष्करी माणसे तिथून पळून मुंबईला गेल्याचे वाचून फार वाईट वाटले. तथापि, त्याच पत्रात ज्याअर्थी, आपण म्हटले आहे की, मुंबईच्या गव्हर्नरशी ह्याबाबत आपण बोलला आणि आपल्या ऑक्टोबरच्या पत्रात आपण म्हटले आहे की, पाली प्रवासास निघाली आहेत, त्यावरून मला कळून चुकले की, आपल्या अडचणी दूर झाल्या आहेत.

आपल्या दोन सप्टेंबरच्या पत्रात आपण मराठ्यांनी पावसाळ्यात काय केले आणि काय केले नाही त्याचा आढावा घेतला आहे. त्यावरून कळून चुकले की, मराठ्यांनी फक्त दांडा आणि कटाळ ह्या दोन टेकड्यांची तेवढी

तटबंदी केली. त्यावरून काबीज केलेला मुलूख बळकट करण्याची त्यांची चिकाटी केवढी मोठी आहे त्याची कल्पना होते. ते आमच्याशी संथगती युद्ध खेळत आहेत. आमच्या सर्व ठाण्यांची त्यांनी कोंडी केली आहे. ह्या कोंडी-मुळे आम्ही ही ठाणी आमच्या हातात फार दिवस ठेवू शकणार नाही अशी त्यांची समजूत आहे.

त्यांनी आमच्याशी सुरू केलेल्या वाटाघाटी हा एक बनाव होता हे आता स्पष्ट झाले आहे. हिंदुस्थानातील आपली परिस्थिती सुधारेपर्यंत त्यांना काळ काढायचा होता. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, आम्ही त्यांच्या प्रदेशात माणसे पाठवून घातपाती कृत्ये केली पाहिजेत व त्यांना अस्वस्थ करून सोडले पाहिजे. आपण म्हणता की, आपण घोडबंदर आणि भद्रापूर येथे गुप्तपणे माणसे पाठवून त्यांची बरीच नुकसानी केली. ह्या हल्ल्यात शत्रूची ५०० हून अधिक माणसे कामास आली असावीत असा आपला अंदाज आहे.

माझ्या ७ सप्टेंबरच्या पत्रात आपण म्हटले आहे की, इंग्रजांनी आमचा आणि मराठ्यांचा तह घडवून आणण्यासाठी पुढाकार घेतला असून ह्या वाटाघाटीत भाग घेण्यासाठी आपल्याला पाचारण केले आहे. पण ह्या बाबतीत माझा असा ग्रह झाला आहे की, ह्या वाटाघाटीत काही अर्थ नाही. आम्हाला फसविण्याचा त्यांचा हा डाव आहे. आणि इंग्रजांच्या प्रामाणिकपणाचाही मला संशय येतो. कारण मराठ्यांशी त्यांचा व्यापार चालू आहे हे तर झालेच, परंतु त्यांच्याशी त्यांचे संबंधही फार घनिष्ट आहेत.

इंग्रजांना आपल्या स्वार्थापलीकडे दुसरे काही दिसत नाही. त्यांची एक नौका मेलुंडीच्या किनाऱ्यावर फुटली. मुंबईच्या गव्हर्नरने त्याबाबत मला लिहिले व त्या नौकेचा अवशेष शोधण्यासाठी पाच युद्ध नौका रवाना केल्या. त्या परवा इकडे येऊन पोहोचल्या. परंतु मुंबईच्या गव्हर्नरच्या पत्रात मराठ्यांचे आणि आमचे जे युद्ध चालू आहे व युरोपातून त्याला जी कुमक आली आहे तत्संबंधी चुकून देखील उल्लेख नाही. त्यावरून मी असा निष्कर्ष काढला आहे की, आमच्या हितसंबंधाची त्यांना यत्किंचितही आस्था नाही. तरीही हे गलबत तिकडे पोहोचल्यावर मुंबईच्या गव्हर्नरला निरोप कळवावा की, देशाहून कुमक घेऊन नौका आल्याचे आपल्याला प्रस्तुत गलबतावर कळविण्यात आले आहे. आणि ज्याअर्थी, इंग्लंडच्या नौकांवरही मदत भरपूर आली आहे त्याअर्थी, ही मदत आणि ती मदत आमचे उद्दिष्ट पार पाडण्यास बस होईल.

मुंबईच्या गव्हर्नरकडून निरोपाला उत्तर काय येते ते आपण बघावे व आपला ग्रह काय करून घ्यायचा तो घ्यावा.

देशाहून ज्या प्रकारची मदत आली आहे आणि मी तिकड जी मदत पाठविली आहे त्याचा उल्लेख मुंबईच्या गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रात करू नये. जोपर्यंत इंग्रज मराठ्यांशी लढण्याकरता आमच्याशी एकजूट करणार नाहीत तोपर्यंत त्यांना खरी गोष्ट सांगता कामा नये. आणि सांगितली तर अति-शयोक्ति करून सांगावी. त्या प्रांताला आवश्यक असलेल्या वस्तूंची जी यादी आपण पाठविलीत ती मी महसूल खात्याच्या प्रमुखाकडे पाठविली असून त्या-वस्तू तिकडे त्वरीत पाठवून देण्याची आज्ञा त्यांना केली आहे.

पुरवठ्याविषयी बोलायच झाल्यास आपणाला माहीत आहेच की इकडे पुरवठा फारच कमी आहे अशा परिस्थितीत दुसऱ्याला कसे पोसायचे हा प्रश्न आहे. तरीही मी चार हजार गोणी तांदूळ मागविला असून तो दक्षिणेकडील आरमारावर येणार आहे. तो तांदूळ आला की, चौलची गरज भागविण्यात येईल.

आपण मला शिपाई न पाठविण्याबद्दल लिहिले आहे. कारण त्यांच्या हातून मोठे काम होत नाही हे तर झालेच, परंतु त्यांच्यावर खचही फार करावा लागतो. ह्या बाबतीत मी आपणाशी सहमत आहे. गेल्या वर्षीच्या उन्हाळ्यातील अनुभवावरून मी मनात ठरवून टाकले आहे की, ह्या माणसांवर आणखी खर्च करायचा नाही. परंतु आम्ही जरी कितीही निर्णय घेतले तरी पैशाच्या अभावी ते व्यवहारात उतरणे कठीण आहे. आमच्यासमोरील आजची खरी अडचण ही पैशाची आहे. ह्या अडचणीचे निवारण करणारा एकही मार्ग मला तूर्त दिसत नाही.

एक दशांश वसुली फारच थोडी झाली आणि ती लोकांच्या इच्छेविरुद्ध. ह्या राज्यात सगळीकडे जे भयंकर स्वरूपाचे दारिद्य पसरले आहे, त्यामुळे कर वसुली होणे व नवीन कर लादणे कठीण जात आहे. शिपायांऐवजी एक हजार सहायक सैन्य पाठविलेत तर बरे होईल असे आपण म्हणता. परंतु पैशाअभावी मला हे स्वयंसेवक देखील गोळा करणे कठीण होत आहे. त्यांचा पगार कसा घालावा हा मुख्य प्रश्न आहे. कुणी स्वखुशीने लष्करी नोकरी करणार नाही. त्यानी स्वखुषीने लष्करी नोकरी करावी म्हणून मी गेल्या वर्षापासून प्रयत्न सुरू केले. पण ते सर्व अयशस्वी झाले. आणि त्यांच्यावर मला सक्तीही करता येत नाही. कारण, त्यांना मी तसे केले जाणार नाही असे वचन दिल आहे.

आपण म्हणता की, सिद्दी याकुतखान मरण पावल्याचे कळताच मराठ्यांचे दोन हजार सैन्य त्याच्या राज्यात घुसले. त्यांच्या ह्या झटपट हालचालीवरून माझ्या कल्पनेला दुजोरा मिळतो की, त्यांना समुद्रावर असे एक

बंदर हवे आहे की, ते त्यांना समुद्रावरही बलाढ्य करील. आणि म्हणून त्यांना मोरर (?) चा जलदुर्ग आकस्मिक हल्ला करून घ्यायचा होता. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, ह्या किल्ल्याच्या रक्षणाबाबत आपण अधिक काळजी घ्यावी. ह्या जलदुर्गाचे कॅप्टन पेद्रु लौरियानु ह्यांनी माझ्याकडे त्या दुर्गाचा जो नकाशा पाठविला आहे तो नजरेखालून घातल्यावर मला वाटू लागले की, त्याच्या रक्षणासाठी अधिक माणसांची आवश्यकता आहे. त्याचप्रमाणे ह्या जलदुर्गाच्या तटबंदीची जी पडझड झाली आहे, त्याची त्वरित डागडुजी झाली पाहिजे. मी इकडून तिकडे जो नवीन इंजिनिअर पाठविला आहे, तो त्याची पहाणी करीलच. त्या जलदुर्गाच्या रक्षणासाठी माणसांची जी गरज आहे ती मी माझ्या हाताशी असलेल्या माणसातून भागवू शकत नाही. तथापि, मी ह्या बेटात आणि साष्टी व बार्देश जिल्ह्यात लष्कर भरती करीत आहे. ह्या माणसांतून मी मोररच्या जलदुर्गाला कुमक पाठवीन. आपल्या ३ सप्टेंबरच्या पत्रात आपण म्हणता की, खजिन्यात ज्या पन्नास हजार असुर्प्या होत्या त्यातील जवळजवळ पंधरा हजार असुर्प्या बांदोडाचे रक्षण करणाऱ्या इंग्रज लोकांचा चार महिन्याचा पगार घालण्यात खर्च झाल्या आणखी खर्च केल्यास ही रक्कम सप्टेंबरपर्यंत पुरेल असे आपण म्हणता. ह्या बाबतीत मला आपणास सांगायचे आहे की, इकडे पैशाची फार अडचण असल्याने आहे तो पैसा काटकसरीने खर्च केला पाहिजे. माझ्या मते बांदोडाच्या रक्षणासाठी इंग्रज माणसांऐवजी आमची माणसे ठेवता येतील. त्यामुळे आम्हाला ह्या ठाण्यांच्या सुरक्षितेचीही हमी मिळेल. म्हणून इंग्रज शिबंदी परत पाठवून देणे सोयीचे होईल. मुंबईच्या गव्हर्नरमार्फत चालू असलेल्या तहाच्या वाटाघाटीसंबंधाने आमचा अपेक्षाभंग झाला असल्याने मी ह्या बाबतीत आपणाला अधिक काही लिहू शकत नाही. वसंत ऋतूतील चढाईसंबंधी इकडे जो काय विचारविनिमय झाला तो आपणाला ह्याच पत्रातून कळवीत आहे युद्ध कैद्यांची अदलाबदल करण्यास हरकत नाही. मात्र जो मराठा सरदार युद्धकैदी आहे त्याची मुक्तता करू नये.

मोगल आणि इराणी ह्यांच्यामधील युद्ध आणि मोगलांनी मराठ्यांना आपल्या मदतीसाठी केलेले पाचारण ह्या बातम्या मला मिळालेल्या बातम्यांशी जुळत्या आहेत. पण मला असे कळले आहे की, बाजीराव इराण्यांना मोगलांविरुद्ध मदत करण्यास तयार झाला आहे. मला ह्याबद्दल बिलकूल आश्चर्य वाटत नाही. कारण, मराठ्यांचा तो स्वभावच आहे. जिकडे पारडे अधिक जड असते तिकडे त्यांचा कल असतो. संभाजी राजे मरण पावल्यामुळे त्यांचे राज्य घेण्यासाठी बाजीराव २५ हजार सैन्यासह त्या राज्यावर चालून येत

असल्याची जी बातमी आपण पाठविली आहे तिला मी दुजोरा देऊ शकत नाही. कारण, ही बातमी जर खरी असती तर, ती आपणापेक्षा मला लवकर कळली असती. कारण आम्ही संभाजीच्या राज्याला आपणापेक्षा जवळ आहोत. असेरीच्या कॅप्टनने मनोराच्या कॅप्टनविरुद्ध जी कारवाई केली ती जरी यशस्वी झाली असली (असे मला असेरीच्या आणि खुद्द दमणच्याही कॅप्टनने कळविले आहे) तरी मला आपणास सांगायचे आहे की, ही कारवाई योग्य झाली नाही. कारण, सदर्हू कॅप्टनने तरी आपल्या हुकुमाविरुद्ध करायला नको होती. कारण ही कारवाई जर यशस्वी झाली असती, तर ती फार मारक झाली असती.

दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांनी चालू महिन्याच्या सुरूवातीला लिहिलेल्या पत्रात त्यांच्या हद्दीतील दुबळ्या लढाऊ लोकांविषयी जे लिहिले आहे ते आपल्या उत्तरासारखेच आहे. त्यांचे असे म्हणणे आहे की, ह्या लोकांना त्यांच्या खेड्याबाहेर लढता येत नाही. परंतु हे लढाऊ लोक जरी उपलब्ध झाले असले, तरी पैशाच्या अभावी आम्ही त्यांना आमच्या नोकरीस ठेवून घेऊ शकत नाही. सुरतेच्या शिपायांसंबंधीही असेच घडले. मी सुरतेच्या नबाबांना ही सैन्य भरती रद्द करण्याबद्दल लिहीत आहे. दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांनी चालू महिन्याच्या सुरूवातीला लिहिलेल्या पत्रावरून कळून येते की, त्यांनी माहीमला थोडे अन्नधान्य पाठविले असून वसईलाही थोडा गहू आणि इतर खाद्यवस्तू पाठविल्या आहेत. इकडून पाठविण्यात आलेला गहू तिकडे पोहोचताच अन्नटंचाई कमी होणार आहे हे जरी खरे असले, तरी आपण लिहिता त्याप्रमाणे देवाने आम्हाला मदत केली. नसल्यास आम्हाला निव्वळ दमणच्या मदतीवर अवलंबून रहावे लागेल. म्हणून धान्याचा साठा करून ठेवलेला बरा. कारण हा प्रश्न केवळ एकाच ठाण्याचा नसून अनेक ठाण्यांचा आहे. आपण माझ्याकडे ज्या युद्ध नौकांची मागणी केली आहे, त्यापैकी मी तिकडे तीन पाली, तीन गाली आणि एक फ्रिगेट पाठवित आहे. ह्या युद्ध नौकांचा उपयोग आपण आपल्या सोयीप्रमाणे करावा. या युद्धनौका सबंध वसंत ऋतुत आपल्या दिमतीला राहाणार आहेत.

आपल्या चालू माहीच्या ७ तारखेच्या पत्रावरून कळून येते की, पत्रात आपण ज्या गोष्टींचा उहापोह केला आहे, त्यासंबंधीच्या सर्व अडचणीचा आपण विचार केला आहे. आणि ज्याअर्थी, आपण ह्या बाबतीत जागरूक आहात त्याअर्थी, आपणाला ह्या संबंधी अधिक काही लिहिण्याची आवश्यकता नाही.

आपण लिहिता की, बाजीराव शाहूराजे ह्यांच्याविरुद्ध बंड करून उठलेल्या उदाजी सावंताविरुद्ध चालून गेला आहे. बहुधा ही घटना संभाजीराजे

ह्यांच्या मृत्युमुळे घडली असावी. शाहूराजे व सावंत ह्या दोघांचे वाकडे होते. शाहूराजे ह्यांनी सावंताचा सतत तीन वर्षे पिच्छा पुरविला. पण ते त्यांचे काहीच करू शकले नाहीत, असे आम्हाला इकडे कळले आहे. आता बाजीराव सामंतावर चालून गेला आहे असे आपण लिहिता. पण ही वार्ता अद्याप इकडे आलेली नाही. मी आपल्या सर्व पत्रांचे उत्तर पाठविले आहे. मी जी मदत आपणाला पाठविणार आहे, त्याची आपणाला आगाऊ जाणीव करून देण्यासाठी, म्हणून हे गलबत तिकडे रवाना करीत आहे. मदतीमध्ये एक फ्रिगेट, तीन पाली व तीन गाली ह्यांचा अंतर्भाव होत आहे. फ्रिगेटवर दीडशे सैनिक असून प्रत्येक पालावर पंचेचाळीस आणि प्रत्येक गालियावर पंचवीस सैनिक जात आहेत. त्याशिवाय देशाहून आलेल्या सैनिकांपैकी साठ ग्रॅनेडियर्सची एक कंपनी मिळून एकूण तीनशे नव्वद सैनिक तिकडे पाठवीत आहे. सांपेद्रु द आल्कांतारा हे फ्रिगेटही तिकडे जात आहे. त्याच्यावर तांदूळ आणि इतर जिन्नस जात आहेत. ह्या फ्रिगेटने वसईला पोहोचल्यावर त्याच्यावरील सर्व माल उतरून दीव दमणला जायचे आहे.

पत्रासमवेत मी सल्लागार मंडळाच्या बैठकीसमोर जो ठराव मांडला होता, त्यावर व्यक्त करण्यात आलेल्या मतांची एक नक्कल पाठविण्यात येत आहे. ही नक्कल नजरेखालून घातल्यावर आपणाला पुढे कोणते पाऊल टाकायचे आहे त्याची कल्पना येईल. आम्हाला रेंगाळत चाललेले युद्ध जरी मारक असले तरी एकदम हल्ला करून झटपट निकाल लावण्याचे युद्धही धोक्याचे आहे.

युद्ध सुरू झाल्यावर मी लिस्बनला जी पत्रे लिहिली त्यातील एकही पत्र तिकडे पोहोचलेले नाही. आणि मुंबईच्या गव्हर्नरनी दि. १३ एप्रिल १७३७ रोजी पाठविलेल्या बातम्या जरी महाराजांना सादर करण्यात आल्या, तरी ठाण्यावरील हल्ल्यासंबंधीची जी कल्पना महाराजांना व्हायला हवी होती ती त्यांना झालेली नाही हे त्यांच्या पत्रावरून दिसून येते. कारण ते लिहितात की, मराठ्यांना साष्टी बेटातून हुसकून लावणे कठीण नाही. हे मत अर्थातच बरोबर नाही. आणि ह्या चुकीच्या कल्पनेमुळेच मी ज्या मोठ्या मदतीची देशाहून वाट पाहात होतो, ती मदत त्यांनी पाठविली नाही. नेहमीच्या मदतीपेक्षा त्यांनी फक्त एक फ्रिगेट जास्त पाठविले एवढेच. सांप्रत आपणाला जे काय लिहायचे होते ते एवढेच.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २० ऑक्टोबर १७३८.

कौंट द सांदोमिल

ता. क. आपणाला मी जी माझी मते कळविली आहेत त्यात माझे आणखी एक मत असे आहे की, रेइशचा जलदुर्ग, घोडबंदर आणि घोडमल ही ठाणी कशाही रीतीने घेतली पाहिजेत व त्यांची तटबंदी केली पाहिजे.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ११४, पृ. २२२—२३४

संपादक—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(114) LIVRO DE BASAIM, No. 7, FLS 101.

पत्र क्र. ११५

पोर्तुगिजांच्या सुरत येथील प्रतिनिधीने सुरतेमध्ये पोर्तुगिजांसाठी मराठ्यांशी लढण्याकरता सैन्य भरती सुरू केली होती. गोव्याच्या व्हाइसरॉयने त्याला तत्संबंधाने पुढील पत्र लिहिले.

"पोर्तुगीज राष्ट्राचे सुरत येथील प्रतिनिधी मोझेस तोबिअस ह्यांस—

मी वसंत ऋतूत उत्तरेकडील प्रांतात जी मोहीम करणार आहे, त्या मोहिमेसाठी मला लागणारे सैन्य सुरतेहून आणण्यासाठी आपण सर्व प्रकारचे प्रयत्न केल्याशिवाय राहणार नाही हे मला आपल्या पत्रावरून कळून चुकले. परंतु मला देशाहून कुमक आल्याने आणि त्या मोहिमेला यंदा अधिक माणसांची जरूरी नसल्याने मी सुरतेच्या नबाबांना त्यांचे आभार मानून पत्र लिहीत आहे. आणि मी आपणाला कळवीत आहे की, आपल्या खटपटीचा दुसऱ्या प्रसंगी उपयोग होईल.

आपण मला कळविता की, मस्कत येथे अरब आणि इराणी ह्यांच्या मध्ये जे काय घडले त्याची अस्सल माहिती सुरतेला येत्या ऑक्टोबरमध्ये येण्याची शक्यता आहे. ती बातमी आपण आम्हांला सवडीने पाठवावी. पण त्याचबरोबर इराण आणि मोगल बादशहा ह्या दोघांमधील युद्ध कुठपर्यंत आले आहे तेही कळवावे. ह्या बातम्या आपण पाठविल्या याबद्दल मी आपला आभारी आहे. आणि त्याचबरोबर तहमास कुलीखान (नादिरशाहा) ह्यांचे पत्र आणि त्यांचे उत्तर ह्या दोन्हींचे भाषांतर पाठविल्याबद्दलही मी आपले आभार मानीत आहे.

बाजीरावाचे पुण्यात आगमन झाल्याची वार्ता इकडे आली आहे. त्याचप्रमाणे आपण लिहिल्याप्रमाणे मोगल बादशहाने बाजीरावाकडे इराण्यांच्या

विरुद्ध मदत मागितल्याचीही वार्ता इकडे आली आहे. बाजीराव बहुधा इराण्यांची बाजू घेईल असा अंदाज इकडे व्यक्त केला जात आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २४ ऑक्टोबर १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. ११५, पृ. २३४—२३६

संपादक :—

A B DE BRAGANSA PEREIRA.

(115) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 87.

पत्र क्र. ११६

व्हाइसरॉय सुरतेच्या नबाबाचे आभार मानून पुढील पत्र लिहितो—

"सुरतेचे नबाब ह्यांस—

माझे ३१ जुलैचे पत्र आपणाला मिळालेच असेल. गेल्या वर्षी आमच्या उत्तरेकडील प्रांतात लढण्यासाठी सुरत शहरी स्वयंसेवक उभारण्यास आपण परवानगी दिलीत याबद्दल आपले आभार मी प्रस्तुत पत्रात मानले आहेत. ह्या वर्षीच्या वसंत ऋतूत उत्तरेकडील प्रांतात जी मोहीम सुरू करणार आहे, तिच्यासाठी सुरत शहरी स्वयंसेवक उभारण्याची परवानगी मी आपणाकडे मागितली होती. परंतु देशाहून मदत आल्यावर मला वाटले की माझ्या वासंतिक लष्करी मोहिमेसाठी मला देशाहून आलेल्या माणसांशिवाय अधिक माणसांची आवश्यकता नाही. म्हणून आपणाला मी हे पत्र लिहीत आहे मला आशा आहे की, आपण ही सवलत मला दुसऱ्या प्रसंगी दिल्यावाचून. राहणार नाही. कारण, आम्हा दोघांचे हितसंबंध एकमेकांशी निगडित आहेत. आम्ही आमच्या समायिक शत्रूविरुद्ध एकजूट केली पाहिजे. आमच्या शत्रूने वसईत जे युद्ध दगलबाजीने सुरू केले आहे ते शेवटपर्यंत लढविण्याचा माझा निर्धार आहे.

आपल्या दैवी अनुग्रहाने देव आपणावर प्रकाश पाडो".

गोवा, २५ ऑक्टोबर १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V

पत्र क्र. ११६, पृ. २३६—२३७

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(115) LIVRO DOS REIS VIZINHOS, No 9, FLS 87

पत्र क्र. ११९

मराठे चौलवर हल्ला करण्याचा बेत करीत असल्याची बातमी उत्तरेकडील सेनापतीने व्हाइसरॉयला कळविली असता त्याने पुढील उत्तर पाठविले.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस—

चौल व मोरस ह्या दोन्ही ठाण्यांवर हल्ला करण्याची तयारी मराठे करीत असल्याची बातमी आपण मला कळविल्यावरून मला आपणास इशारा द्यायचा आहे की, ह्या दोन्ही किल्ल्यांच्या रक्षणाची काळजी आम्ही घेतली पाहिजे. ह्या दोन्ही ठाण्यांतील सैनिकांची जी यादी मला पुरविण्यात आली आहे तिच्यावरून तिकडे माणसांची कमतरता असल्याचे दिसून येते. म्हणून दीवला पाठवायच्या कुमकेतून मी तीस माणसे निवडून तिकडे पाठवीत आहे मी चौलच्या कॅप्टनलाही आज्ञा करीत आहे की, त्याने त्याच्या किल्ल्यातील एक उत्कृष्ट तुकडी मोरसला पाठवून द्यावी. त्याला माहीत असेलच की, चौलचे भवितव्य मोरसवर अवलंबून आहे आणि आपणालाही माझी सूचना आहे की, तिकडे सैन्य पाठविणे शक्य असल्यास जरूर पाठवावे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २७ ऑक्टोबर १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. ११९, पृ. २३८—२३९
संपादक—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(119) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 88

पत्र क्र. १२१

व्हाइसरॉय मुंबईच्या गव्हर्नरला लिहितो की, इंग्रज युद्धनौकांनी आंग्र्यांची म्हणून जी जहाजे घेतली आहेत ती त्याने ज्यांची त्यांना त्या जहाजांवरील मालासह परत केली पाहिजेत.

"मुंबईचे गव्हर्नर जॉन हॉर्न ह्यांस—

आपल्या युद्धनौकांनी ह्या बंदरात आणून दिलेल्या आपल्या चालू माहीच्या ६ तारखेचे पत्र मिळाले व त्याचे उत्तर त्याच युद्धनौकांवर रवाना केले. आपण बांदीडांच्या रक्षणार्थ जे पैसे खर्च केलेत त्याची आणि हुंडीची

रक्कम मिळाल्याची बातमी कळताच मला फार आनंद झाला. आपल्या आरमाराने आंग्र्यांची जी जहाजे घेतली आहेत तत्संबंधीची आपणाला मिळालेली बातमी मला मिळालेल्या बातमीशी जुळती आहे. ही जहाजे म्हणजे लूट नाही. त्यांच्यावर असलेला माल तो ज्यांचा असेल त्यांना परत केला पाहिजे व नौकाही त्यांच्या मालकांना परत केल्या पाहिजेत.

मराठ्यांच्या बाबतीत आपण जे तटस्थतेचे धोरण स्वीकारले आहे ते मुख्यत्त्वे मुंबई बेटाच्या अस्तित्वाच्या व त्याच्या रक्षणासाठी. परंतु मला असे कळले आहे की, मराठ्यांचा व आपला व्यापार अविरत सुरू असून आपणाकडून त्यांना दारूगोळा आणि इतर आवश्यक तो माल मिळत आहे. आणि त्याच्या बदली त्यांच्याकडून आपण साष्टी बेटात पिकणारे भात घेत आहात. असे जर असेल तर मग आपणाला माझा सवाल आहे की, आपण मराठ्यांशी जो व्यापारी संबंध ठेवला आहे त्यामुळे साष्टी बेट घेण्याच्या आमच्या मार्गात अडथळा येत आहे हे आपणाला दिसत नाही का ?

आपण युरोपच्या ज्या बातम्या पाठविल्यात त्याबद्दल मी आपला आभारी आहे.

इंग्लंडच्या महाराणीच्या निधनाबद्दल आपणाला जे दु:ख झाले आहे, त्या दु:खात मी सहभागी आहे.

देव आपले रक्षण करो".

गोवा, २८ ऑक्टोबर १७३८.

आपला सेवक,
कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्र. १२१, पृ. २४०—२४२

संपादक—
A. B. DE BRAGANSA PEREIRA
(121) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 9, FLS 85

पत्र क्र. १२४

व्हाइसरॉय वसई प्रांताच्या गव्हर्नरला लिहितो की, राज्याच्या उत्पन्नातून युद्धाचा खर्च भागत नसल्याने वसई प्रांतात लढणाऱ्या सैनिकांनी थोडा त्याग केला पाहिजे.

"उत्तरेकडील सेनापती ह्यांस---

आरमार निघून गेल्यावर आलेल्या गलबतावर आपली पत्रे आली. त्यातील एक २८ ऑक्टोबरचे असून दोन २९ ऑक्टोबरची आहेत. त्यांचे उत्तर मी आता देत आहे. आपल्या पत्रात आपण म्हणता की, वसईच्या वखारीतून शिबंद्यांचा जो दरमहा खर्च केला जातो तो पन्नास हजार असुर्प्याहून अधिक आहे. ही रक्कम एवढी मोठी आहे की, ती चालू ठेवण्याची साधने सांप्रत दुष्प्राप्य आहेत. देशाकडील दोन्ही नौकांच्या साभानसुभात्तासाठी दोन लक्ष असुर्प्या खर्च झाल्या. ह्या राज्यातील प्रजेकडून त्यांच्या इच्छेविरुद्ध जो एकदशांश कर वसूल केला जातो तो दीड लक्ष असुर्प्याहून अधिक भरत नाही. महसूल खात्याच्या उत्पन्नातून खर्च भागत नाही. अशा परिस्थितीत जर त्या प्रांतातील लष्करी माणसांची बडदास्त युद्ध सुरू झाल्यापासून चांगली ठेवण्यात येत आहे. तर मग आजच्यासारख्या अडचणीच्या वेळी त्यांनी थोडी गैरसोय पत्करली पाहिजे. त्यांनी ध्यानात ठेवले पाहिजे की, पोर्तुगिजांचे विशेषेकरून हिंदुस्थानातील पोर्तुगिजांचे जीवन फारच त्रासाचे आहे. आणि धकाधकीचे आहे. त्यांनी आपल्या त्यागाने जगाला धडा घालून दिला आहे.

आज इथली परिस्थिती फार खडतर आहे, म्हणून त्या प्रांतातील सैनिकांनी आणि अधिकाऱ्यांनी आपले अन्न वेळेवर मिळते का ते पाहाण्या-पलीकडे अधिक सुखसोयींची अपेक्षा करू नये. आज त्यांना जी रोटी मिळत आहे ती जंगली लोकांशी लढण्यात गुंतलेल्या सैनिकांना मिळणाऱ्या रोटीहून किती तरी पटींनी चांगली आहे. जे ठाणे शत्रूने वेढले आहे तेथे जीवनो-पयोगी वस्तू मुबलक कशा असणार? वसईतील सर्व लोकांचा मुशाहिरा त्यांना वक्तशीर मिळत असून ते फारसा त्रास न होता जीवन जगत आहेत. आणि मला अशी बातमी कळली आहे की, तिकडे खेळही होत आहेत. आम्ही आज गरिबीत जीवन कंठीत असता अशा क्रीडा तेथे चालू असणे ही अयोग्य गोष्ट आहे.

आपण त्या लोकांना परिस्थितीची जाणीव करून दिली पाहिजे. आपण मुंबईच्या गव्हर्नरना लिहिलेले पत्र मी पाहिले. त्यांनी आमच्याशी सहकार्य करण्याचे वेगवेगळ्या कारणांवरून टाळले आहे. आताही त्यांना आणखी कारणे मिळाल्यावाचून राहाणार नाहीत.

डोंगरी येथे एका नवीन झऱ्याचा शोध लागल्याचे वाचून फार आनंद झाला. आपण ज्याअर्थी, म्हणता की, हा झरा अशा एके ठिकाणी आहे की, तेथे शत्रूचा प्रवेश होणे कठीण आहे; त्याअर्थी, ह्या झऱ्याचा शोध लागल्याने त्या ठाण्याचा बचाव निर्धास्त होईल ह्यात शंका नाही. आपल्या इच्छेप्रमाणे

आणि मी आपणाला लिहिल्याप्रमाणे बांदोडा येथील इंग्रजांना आपण निरोप दिलात तर बरे होईल. दोन पठाण सरदारांनी इराण्यांना अटक नदीच्या खिंडीत गाठून त्यांचा पराभव केल्याची जी बातमी आपण मला कळविली आहे ती इकडे प्रसृत झालेली नाही. ही बातमी जर खरी असेल तर ती ताजी असली पाहिजे.

बाजीराव व शाहूराजे ह्या दोघांच्या पक्षांचा उदाजी सावंत ह्यांच्यावरून संघर्ष उडाल्याची जी बातमी आपण पाठविली आहे, ती इकडे पोहोचली नाही, मात्र संभाजीराजे हे सैन्य घेऊन नागोबाच्या मदतीला भोसल्यावर चाल करून येत असल्याची वार्ता इकडे वाडीच्या हद्दीतून आली आहे.

डोंगरीच्या ६० अथवा ७० कोळयांना वसईला हलविण्याच्या ज्या यशस्वी वाटाघाटी आपण होळकरांशी केल्या त्याबद्दल मला फार आनंद झाला. त्याचप्रमाणे डोंगरीच्या तटबंदीचे काम भरपावसामध्ये देखील चालू असलेले ऐकून आनंद झाला. हे काम लवकर संपेल अशी आशा आहे.

आपण जे काम हाती घेतले होते, ते होळकरांच्या आगमनामुळे लांबणीवर पडण्याचे मुख्य कारण म्हणजे संशय आहे. होळकरांना ह्या कामाचा सुगावा न लागल्याने ते लवकर आले असावेत असे वाटते. ह्या कामासंबंधीच्या वाटाघाटी गुप्त न ठेवल्या गेल्याने त्यांचा त्यांना सुगावा लागला असावा असा मला संशय येतो.

दैव करो आणि दीवला मोसांबिकची नौका आल्याची बातमी खरी ठरो. दीवच्या बातम्यांची वाट मी अस्वस्थ मनाने पाहातो. त्याचे ते एक कारण आहे. तिकडून जे शेवटचे पत्र आले ते ५ जुलैचे आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

गोवा, ७ नोव्हेंबर १७३८

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १२४, पृ. २४५—२५२

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(124) BASAIM, No 7, FLS 118V

पत्र क्र. १२६

गोव्यावर मराठ्यांची स्वारी होणार असल्याची बातमी व्हाइसरॉयला कळताच त्याने साष्टी प्रांताच्या गव्हर्नरला पुढील सूचना केल्या.

"साष्टी प्रांताचे गव्हर्नर दों लुईज कायतान द आल्मैद ह्यांस—

आपले गेल्या महिन्याच्या २६ तारखेचे पत्र मिळाले. मजकूर समजला. मला रसाईच्या ठाण्याच्या रक्षणाची फार काळजी वाटत आहे. महसूल खात्याच्या प्रमुखाने त्याची प्रत्यक्ष पहाणी करावी अशी माझी इच्छा असल्याने मला वाटते की, तै आज रात्रौ तिकडे निघतील व उद्या सकाळी तिकडे पोहोचतील. बेटासमोरील तटबंदीचे काम अहोरात्र सुरू असले पाहिजे. त्याशिवाय ते पूर्ण होणार नाही. ह्या कामाला जो खर्च येणार आहे, त्यातील सहाशे असुर्प्या आपण त्या प्रांताच्या खजीनदाराला माझ्या वतीने खर्च करावयास सांगावे व बाकीचा खर्च प्रजेकडून वसूल करावा. कारण हे काम त्यांच्याच रक्षणाचे आहे.

मडगांवच्या किल्ल्यातील तळ्याच्यासंबंधी मला काही सांगायचे नाही. महसूल खात्याच्या प्रमुखाने मला तत्संबंधी लिहिले आहे. त्यांनी पाईप टाकले आहेत, असे मला कळविले आहे. ते बस आहेत की नाही, की, आणखी पाहिजेत ते आपण मला कळवावे.

कोल्हापूरच्या सैन्याच्या हालचाली सुरू झाल्या आहेत अशी बातमी इकडे आली आहे. आणि ज्या अर्थी, आम्ही काळजी घेतली पाहिजे, त्याअर्थी, खऱ्या बातम्या काढण्यासाठी आपण आपले गुप्तहेर तिकडे रवाना करावेत.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, ४ डिसेंबर १७३८.

कौंट द सांदोमिल

A. P. O, TOMO I, VOL III, PART V

पत्र क्र. १२६, पृ. २५३—२५४

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(126) LIVRO DAS CARTAS E ORDENS PORTARIAS, No 24. FLS 11

पत्र क्र. १२९

दमणचा गव्हर्नर व्हाइसरॉयला दमणमधील घडामोडींचा अहवाल खालील पत्रात सादर करतो—

" महाराज—

चालू माहीच्या ८ तारखेपर्यंत ह्या प्रदेशात घडलेल्या शत्रूच्या हालचालीचा वृत्तांत मी आपणाला सादर केला होता. ह्या पत्रातून तदनंतरचा अहवाल सादर करीत आहे. शत्रूची दुसरी छावणी अद्याप सरोडी येथेच आहे. आतापर्यंत शत्रूचे जवळ जवळ पासष्ट घोडे कामास आले आहेत. त्या मुलुखातील खेडी जाळण्यापलीकडे शत्रूने विशेष प्रगती केलेली नाही. शत्रूसैनिकांनी खेड्यातील घरे जाळण्यापूर्वी घरांचे लाकूड काढून आपल्या छावणीत नेले व नंतर घरांना आग लावून दिली. त्या लाकडाचा उपयोग ते आपल्या छावणीत नवीन घरें बांधण्यासाठी करणार आहेत.

शत्रूला घोडदळाची आणि पायदळाची थोडी कुमक आली आहे. आमच्या डोबलांपासून त्यांना रात्रीच्या वेळी उपद्रव होण्याचा जरी संभव नसला, तरी ते मोठ्या खबरदारीने वागत आहेत.

अशी बातमी आहे की, नाशिक जिल्ह्यात शत्रूचे पाच ते सहा हजार घोडदळ असून हे सैन्य इकडे ह्या ठाण्यावर हल्ला करण्यासाठी येत आहे. ह्या बातमीवर माझा विश्वास बसत नाही. परंतु तिच्याकडे मी दुर्लक्षही करु शकत नाही. आणि म्हणून मी आपणाला इकडील परिस्थितीचा समग्र अहवाल सादर करीत आहे. इकडे जे सैन्य आहे ते अवघे एक कंपनीचे आहे. ह्या सैन्याचा एक तृतियांश भाग मी विभागून वेगवेगळ्या ठिकाणी ठेवला आहे. कारण त्या ठिकाणी ह्या ख्रिश्चन सैनिकांची फार मोठी आवश्यकता आहे.

मोझेस तोबिअस ह्यांचे मार्फत वखारीतून साठ बंदुका खरेदी करण्यात आल्या. इकडे दारूगोळा फारच कमी आहे. आणि हातबॉंब्स्चे तर नाव नाही. थोडक्यात सांगायचे म्हणजे माणसे, पैसा आणि दारूगोळा ह्यांचे अभावी ह्या ठाण्याला धोका निर्माण झाला आहे. जे थोडे फार शिपाई आणि सैनिक ह्या प्रदेशाचे रक्षण करीत आहेत, त्यांचा पगार घालायला सांप्रत माझ्याकडे पैसा नाही. ह्या प्रदेशात शत्रू ठाण मांडून बसला असल्याने इकडून फारच थोडे भात नेता येईल. व ते सबंद प्रांताला पुरेल की काय याची शंका आहे. जर आमच्या शेजारच्या मराठ्यांनी आम्हाला कबूल केलेले भात विकले नाही, तर आपणाला दक्षिणेकडून अथवा गोव्याहून तांदूळ पुरवावा लागेल. मी उत्तरेकडील प्रांताच्या गव्हर्नरना पत्र लिहून ह्या अडचणीची

कल्पना करून दिली आहे. तूर्त वसई, कोळम, असरी व माहीम सुड ठाण्यांना ७३० मुड्या भात पाठविण्यात येत आहे. प्रस्तुत ठाण्यांची गरज ह्या मदतीने भागेल अशी आशा आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

दमण, २२ डिसेंबर १७३८.

फिलीप द व्हालादारिज सोतु मायॉर

A. P. O., TOMO I. VOL III, PART V
पत्र क्र. १२९, पृ. २६०—२६२
संपादक :—
A B DE BRAGANSA PEREIRA
(129) LIVRO DAS MONSOES, No 108, FLS 84V

पत्र क्र. १३०

ठाणे येथील रेईश मागुश ह्या नावाच्या, मराठ्यांच्या हातात असलेल्या, किल्ल्यावर जातीने हल्ला करावयास गेलेला वसईचा गव्हर्नर पेद्रु द मेलु हा त्या किल्ल्यावरील एका तोफेचा गोळा लागून ठार झाल्याने, गोव्याच्या व्हाइसरॉयने एक खास हुकूम काढून मार्तिन्यु द सिल्व्हैरा द मिनेझिस् ह्यांची वसई प्रांताचे गव्हर्नर म्हणून नेमणूक केली.

हा हुकूम गोव्याच्या गव्हर्नरने दि. २३ डिसेंबर १७३८ रोजी काढला.

A P O, TOMO I, VOL III, PART V
पत्र क्र. १३०, पृ. २६२—२६३
संपादक :—
A B DE BRAGANSA PEREIRA
(130) LIVRO DAS MONSOES. No 108, FLS 84V

पत्र क्र. १३१

व्हाइसरॉयने वसई प्रांताच्या गव्हर्नरपदी नवीन मनुष्याची नेमणूक केल्यावर त्याला पुढील पत्र लिहिले :—

" उत्तरेकडील सेनापती मार्तिन्यु द सिल्व्हैरा द मिनेझिश ह्यांस—

जनरल पेद्रु द मेलु ह्यांचा शोचनीय अंत झाल्याचे पत्र वसईच्या कॅप्टनकडून येताच मी पुष्कळ विचार करून नवीन गव्हर्नरची नेमणूक ताबडतोब

करण्याचे ठरविले. आणि ज्याअर्थी, आपण अनुभवी आणि पराक्रमी असून त्या प्रांताचा आपणाला बारीक परिचय आहे, त्याअर्थी, त्या प्रांताचा गव्हर्नर होण्यास मला आपणाहून अधिक लायक व्यक्ती न भेटल्याने मी आपलीच नेमणूक करण्याचा निर्णय घेतला. मला आशा आहे की, देशाची व स्वामीची सेवा करण्यास समायिक हितसंबंधाने बद्धपरिकर होऊन आपण हा अधिकार स्वीकारल्यावाचून राहाणार नाही. प्रस्तुत पत्रासोबत मी आपल्या नेमणुकीचा हुकूम आपणाकडे पाठवित आहे. त्या प्रांताच्या रक्षणाची मला आज घोर चिंता लागून राहिली आहे. त्याचे रक्षण जमिनीवरील आणि सागरावरील सामर्थ्यावर अवलंबून आहे. मी ही कामगिरी आज आपणाकडे सुपूर्त करीत आहे.

उत्तरेकडील प्रांताच्या रक्षणाच्या काळजीप्रमाणेच मला इथल्या प्रजेच्या पोषणाची आणि गोवा बेटे व त्याचे दोन प्रांत ह्यांच्या रक्षणाचीही काळजी घ्यावी लागत आहे. ह्या राज्यातील प्रजेला जे धान्य लागते, ते कर्नाटकातून आयात केले जाते, हे आपणाला माहीत असेलच. दरवर्षी आमचे आरमार दक्षिणेकडे तांदूळ आणण्यासाठी जात असते. यंदा संभाजी आंग्रे हा आपल्या बंदरातील आठ पाली व सतरा गलबते घेऊन दक्षिणेकडे निघाला असल्याची बातमी कळल्याने मी फार चिंतेत पडलो आहे. गेल्या वर्षीही तो असाच तिकडे गेला होता. त्याने आमच्या दक्षिणेकडील आरमारावर तोफा डागल्या व काही डच नौकांची लुटालूट केली. यंदाही तो मागच्या वर्षाप्रमाणे चांचेगिरी करतो की काय अशी मला भीती वाटू लागली आहे. व म्हणून मी दक्षिणेकडील आरमार बळकट करीत आहे. हेतु हा की, त्या चांच्याच्या कोणत्याही हल्ल्याला ह्या आरमाराने परिणामकारकपणे तोंड द्यावे. म्हणून मी आपणाला सूचना करीत आहे की, रोझरियु हे फ्रिगेट इकडे तावडतोब पाठवून द्यावे. आणि त्याच्याबरोबर दोन पाली आणि दोन गालीही इकडे आली पाहिजेत. इथल्या समुद्र किनाऱ्याला आणि नद्यांना शत्रूच्या हल्ल्याचा धोका असल्याने प्रस्तुत युद्धनौकांची इकडे फार आवश्यकता आहे.

जर सां पेद्रु द आल्कांतारा हे फ्रिगेट त्या समुद्र किनाऱ्यावर असले तर हे पत्र पोहोचताक्षणी सदरहू युद्धनौका इकडे तावडतोब तिच्याबरोबर असलेल्या इतर युद्धनौकांसह पाठवून द्यावी. हे पत्र पोहोचल्यावर पेद्रु द मेलु ह्यांच्या मोहिमेचा अहवाल इकडे पाठवून द्यावा. कारण, त्यांच्या मृत्युच्या बातमीशिवाय

त्यांच्या मोहिमेचा समग्र वृत्तांत आम्हाला कळलेला नाही. ही मोहीम पुढे का चालू झाली नाही ते मला जाणून घ्यायचे आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे ".

गोवा, २० डिसेंबर १७३८.

कौंट द सांदोमिल

A P O, TOMO I, VOL III, PART V
पत्र क्र. १३१, पृ. २६३--२६४
संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA
(131) BASAIM, No 7, FLS 124

पत्र क्र. १३३

वसईचा गव्हर्नर मराठ्यांच्या एका तोफेचा गोळा लागून ठार झाल्यावर वसईच्या ठाण्याच्या कॅप्टनने व्हाइसरॉयला पुढील पत्र घातले.

वसईच्या ठाण्याचे कॅप्टन ज्युआंव शाव्हिएर पेरैरा पिंतु ह्यांचे गोव्याच्या गव्हर्नरला पत्र--

" महाराज--

ह्या प्रांताचे गव्हर्नर मृत्युमुखी पडल्यावर मी ही शोचनीय वार्ता आपणाला त्वरित कळविण्याची व्यवस्था केली. मी यत्किंचितही वेळ न गमावता तिकडे गलबत पाठवून दिले.

उत्तरेकडील प्रांताच्या सेनापतीच्या मृत्युनंतर आंतोनियु कुन्य द सा ह्यांनी आरमाराचे अधिपत्य स्वीकारले. थोडच्या दंगलीस त्यांना तोंड द्यावे लागले. त्यांनी नंतर अधिकाऱ्यांची बैठक बोलवून आरमार मागे घ्यावे की न घ्यावे याचा विचार विनिमय केला. शेवटी आरमाराधिपतीनी आरमार मागे घेण्याचा निर्णय घेतला. हा निर्णय का घेतला गेला याची कारणे आपणाला कारंजाहून चौलच्या गलबतावर पत्र पाठवून कळविण्यात येणार आहेत. म्हणून त्याची ह्या पत्रात द्विरूक्ति करीत नाही.

उत्तरेकडील सेनापतीच्या मृत्युनंतर ज्याअर्थी, माझ्या अधिकाराच्या कक्षेत मी त्यांची जागा घेतली आहे, त्याअर्थी, त्या अयशस्वी मोहिमेचा अहवाल मी आपणाला सादर केला पाहिजे असे मला वाटते.

त्या मोहिमेत उत्तरेकडील सेनापतीच्या मृत्युशिवाय एक ग्रेनेडियर सैनिक कॅ. मानुएल पेरैरा पिंतु ह्यांच्या पालावरील एक गोलंदाज की, ज्या पालावर

ऊत्तरेकडील सेनापती होते, आणि एक लष्करी शिपाई अशी माणसे कामास आली. हे सर्वजण तोफांच्या गोळ्यांनी ठार झाले.

आज शाररूअ ह्या बंदरास लागले. त्याच्यावर एक लक्ष एक हजार चारशे ऐंशी असुर्प्या, आणि अकरा पै आणि सहा असुर्प्या आणि अकरा पै एवढी रक्कम आहे. आमच्या युद्ध नौकेच्या तावडीत सापडलेल्या दोन्ही नौकांवर तेवढीच काय ती रक्कम होती. त्यातील तीस हजार असर्प्यांची मागणी त्या किल्ल्याच्या किल्लेदाराने किल्ल्याच्या डागडुजीसाठी केली आहे. आपणाला हे प्रस्तुत पत्रासोबत जात असलेल्या दाखल्यावरून कळून येईलच. ह्याच पत्रासमवेत आपण दिवंगत सेनापतीला लिहिलेली पत्रे आपणाकडे परत पाठविण्यात येत आहेत.

दिवंगत सेनापतीनी आपणाला जो अहवाल सादर केला आहे, त्यावरून आपणाला कळून येईलच की, ते नेहमी पैशांच्या अडचणीत असत. सैन्याचा पगार घालताना दर महिन्याला त्यांच्या अगदी नाकी नऊ येत. ते शिपायांना तीन महिन्याचा पगार देणे आहेत. आणि गोऱ्या सैनिकांची आणि अधिकाऱ्यांची बाकी चाळीस हजार असुर्प्यापर्यंत आहे.

पुरवठ्याविषयी बोलायचे झाल्यास माझ्यापाशी असलेली बेगमी एक महिना पुरू शकेल. सेनापतींनी हा हिशोब केल्यावर खजिन्यातील पैशातून सहा हजार असुर्प्या कारंजाला आणि सहा हजार दमणला पाठवून दिल्या.

शत्रूला घाटावरून कुमक आली आहे. आणि असे सांगतात की, चिमणाजी अप्पा हे इकडे येणार आहेत. आणि अशी अफवा उठविण्यात आली आहे की, ते सगळीकडे चढाई करणार आहेत. प्रभुकृपेने त्यांच्या संभाव्य हल्ल्यांचा आमच्या तटबंद्यांवर कोणताच परिणाम होणार नाही, अशी मी आशा बाळगतो. माझ्या अधिकारातील ठाण्याविषयी बोलायचे झाल्यास मी त्यांच्या बाबतीत निश्चित आहे. मी त्याच्या रक्षणाची चांगली तयारी केली आहे. दिवंगत सेनापतींनी आपणाला असेरीविषयीचा जो अहवाल सादर केला होता त्या अहवालाशिवाय मी आपणाला तिकडील आणखी बातम्या तूर्त सादर करू शकत नाही.

ह्या शहरातील रुग्णालयाचे डॉक्टर—मोर आंतोनियु द कुन्य ह्यांनी मला जो अर्ज केला आहे त्यात म्हटले आहे की, प्रस्तुत रुग्णालयातील सत्तेचाळीस रोग्यांना औषधाचे अभावी उपचार करणे अशक्य झाले आहे. ह्या रुग्णाइताना मी फ्रिगेटवर तिकडे पाठवून देत आहे. कारण, इकडे त्यांच्यावर इलाज होणे कठीण असल्याने तिकडे तरी ते बरे होऊ शकतील असे मला

वाटते. ह्या आजारी सैनिकांच्या बदली मी कॅ. ब्रितु फ्रैर ह्यांच्याकडे चाळीस सनिकांची मागणी करीत आहे. पण ते मला हे सैनिक देतील की काय ते मी सांगू शकत नाही.

काही दिवसांमागे बांदोडाहून एक डच आणि एक जर्मन (हांबुर्गर) असे दोघे युरोपियन इकडे पळून आले. त्यांनी त्या बेटावर (मुंबईला) परत जाण्यास नकार दिला. त्यांनी मला असे सांगितले की, त्यांना जर इकडे नोकरी मिळाली नाही तर ते मराठ्यांकडे जातील. मला असे वाटते की, त्या दोघांना शिपायांच्या कंपनीत दरमहा आठ रुपयांच्या मुशाहिऱ्यावर घ्यावे.

परवा मुंबईहून इकडे आणखी एक युरोपियन भाडोत्री सैनिक पळून आला. हा इसम इंग्लंडहून मुंबईला नोकरीसाठी आला होता. मी त्याला कंपनीचे इंजिनियर दों. आंतोनियु द ग्राव्हिला ह्यांच्याबरोबर तटाकडे नेले, व त्याच्या नेमबाजीची चांचणी घेतली. त्याची नेमबाजी अचूक असलेली पाहून दों. आंतोनियु द ग्राव्हिला हे मला म्हणाले की, त्या भाडोत्री सैनिकाला आपण नोकरीला ठेवून घेऊया. मी ही मागणी मान्य केली. ह्या युरोपियन सैनि-काला इंग्रजांकडे दरमहा पंचवीस रुपये पगार होता. मी त्याला म्हटले की, आम्ही सांप्रत पैशांच्या अडचणीत असल्याने आम्हाला दरमहा पंचवीस रुपये पगार देणे परवडणार नाही. आम्ही दरमहा सतरा रुपये पगार देऊ. त्याला तो कबूल झाला.

ह्या भाडोत्री सैनिकाला जर आम्ही ठेवून घेतले नसते, तर तो मरा-ठ्यांकडे गेला असता व मग त्याच्याकडून आमची फार हानी झाली असती. तरी ह्या तिन्ही सैनिकांची नेमणूक पक्की करायची की काय यासंबंधीचा निर्णय आपण द्यावा. ह्या सैनिकांना नोकरीस ठेवून घेतल्याबद्दल इंग्रजांना आमच्या-कडे काही तक्रार करता येणार नाही. कारण, आमच्याकडील बरेच सैनिक त्यांच्याकडे पळून गेले असून त्यांना त्यांनी आपल्याकडे नोकरी दिली आहे.

दमणचे कॅप्टन फिलीप द व्हाला दारिज ह्यांनी शारूअवर जे पत्र पाठविले त्याची नक्कल मी आपणाकडे पाठवीत आहे. त्या पत्रावरून आपणाला कळून यईल की, शत्रू त्या ठाण्यातही आक्रमण करण्याचा प्रयत्न करीत आहे. असे जर झाले तर ते ठाणे आम्हाला अन्नधान्य पाठवू शकणार नाही. बलसार येथील मराठ्यांनी आम्हाला आमच्या ठाण्यांना आवश्यक असेल ती अन्नाची बेगमी पुरविण्याचे कबूल केले आहे. परंतु हे लोक स्वभावाने दगलबाज असल्याने त्यांच्यावर विश्वास ठेवणे धोक्याचे आहे. म्हणून माझी आपणाला सूचना आहे की, दक्षिणेकडील तांदूळ सुरक्षित आहे.

फिलीप द व्हालादारिज ह्यांनी माझ्याकडे पैसा आणि दारूगोळा ह्या दोन्हीचीही मागणी केली आहे. परंतु माझ्यापाशी त्यांना द्यायला ह्या दोन्ही-पैकी एकही गोष्ट नाही. कारण, मला इकडील ठाण्यांना ह्या गोष्टी पुर-वायच्या आहेत. ह्या पत्राबरोबर मी आपणाकडे माझ्या हाताशी असलेल्या सैनिकांचा तक्ता पाठवित आहे. ह्यात डोंगरीच्या शिबंदीचाही अंतर्भाव होतो. येथे ६० ग्रेनेडियर्स आहेत. शिवाय बाहेर ह्या प्रांताची दोन पालीं व गोव्याची तीन गाली आहेत.

देव आपुले पष्कळ वर्षे रक्षण करो ".

वसई, २६ डिसेंबर १७३८.

ज्युआंव शाव्हिएर पेरैरा पिंतु

A. P. O., TOMOI, VOL III, PART V.
पत्र क्रमांक १३३, पृ. २६६-२७१

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(133) LIVRO DAS MONSOES, No. 108, FLS 90

पत्र क्रमांक १३४

वसईचा किल्लेदार व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, इंग्रज हे दगलबाज आहेत. ते मराठ्यांना सैनिक आणि दारूगोळाही पुरवितात.

" महाराज—

काल शाररूअवर मी आपणाला एक पत्र पाठविले आणि आता ह्या गलबतावर दुसरे पाठवीत आहे. हे पत्र घेऊन जाणारे कॅ. मानोल रोले हे प्रथम चौलला व तिथून गोव्याला जाणार आहेत. त्यांना फ्रिगेटवर जागा न मिळाल्याने गलबतावर जावे लागत आहे.

दमणचे कॅप्टन फिलीप द व्हालादारिज ह्यांनी पाठविलेले भाताचे साडेसहाशे मुडे ह्या बंदराला लागले आहेत. हे भात व्यापाऱ्यांचे असल्याने ते त्यांनी मला विकावे म्हणून मला सक्तीने परवानगी द्यावी लागत आहे.

इंग्रजांची दगलबाजी मला आपल्या निदर्शनास आणल्याशिवाय राहावत नाही. इंग्रजांकडील सैनिक मराठ्यांकडे लढत आहेत, हे तर झालेच, परंतु इंग्रज मराठ्यांना दारूगोळा आणि इतर युद्धोपयोगी सामानही पुरवीत आहेत. परवा त्यांनी गार्यीच्या बेटाकडे दारूगोळा आणि इतर युद्धोपयोगी सामानाने

भरलेल्या तीन अथवा चार होड्या पाठविल्या. मराठ्यांच्या तोफा पूर्वी वसईवर जे गोळे टाकीत असत, ते वसईच्या कसब्यातील घरांचे जे लोखंड त्यांनी काढून नेले होते त्या लोखंडापासून बनविलेले असत. हल्ली जे गोळे इकडे पडत आहेत ते ओतीव असून त्यावर इंग्रजी खुणा आहेत.

शारूअवर मी आपणाला शत्रूसंबंधीच्या बातम्या पाठविल्या. त्या-शिवाय माझ्यापाशी आता आणखी बातम्या नाहीत.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

वसई, २७ डिसेंबर १७३८.

A. P. O., TOMO I, VOL III, PART V

पत्र क्रमांक १३४, पृ. २७१-२७३

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(134) LIVRO DAS MONSOES, No. 108, FLS 69

पत्र क्रमांक १३५

दमणचा गव्हर्नर व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की मराठ्यांना कुमक आली असून त्यांचे दोन हजार सैन्य दमणच्या हद्दीत शिरले आहे.

दमणचे गव्हर्नर कॅ. फिलीप द व्हालादारिज सोतु मायॉर ह्यांच्या पत्राची नक्कल.

" महाराज—

चालू महिन्याच्या २० तारखेपर्यंत इकडे ज्या घाडामोडी झाल्या त्याचा वृत्तांत मी शारूअवर पाठविलेल्या पत्रात आपणाला सादर केला आहे. शत्रू कुमकेची वाट पाहात होता. त्याप्रमाणे त्याला घोडदळाची आणि पाय-दळाची थोडी कुमक आली. आतापर्यंत ह्या जिल्ह्याच्या हद्दीत शत्रूचे जवळ जवळ दोन हजार सैन्य घुसले आहे. ह्या सैन्याचा तळ सोरोडी ह्या नावाच्या खेड्यात पडला असून पारडीवर हल्ला करण्याचा त्यांचा विचार आहे. दिनांक २५ ला त्यांनी नायेर आणि संगिन्स (?) ह्या दोन्ही परगाण्यांवर हल्ला चढविला. त्यांचे दुसरे एक मोठे सैन्य दमणच्या बुरुजाजवळ दृष्टोत्पतीस आले. असे सांगतात की हे सैन्य राणोजी शिंदे ह्यांचे असून त्यात पाच हजार घोडेस्वार आहेत. तोफांचे काही बार काढल्यावर हे सैन्य निघून गेले. पण त्याचवेळी शंभर घोडेस्वारांची एक तुकडी कात्रावाडा ह्या नावाच्या खेड्यावर चाल करून गेली. हे खेडे तटबंदीचे आहे. तिथल्या शिबंदीच्या कॅप्टनने मला ही बातमी कळविली.

शत्रूने दोन परगाणे जिंकले असल्याने आणि त्याच्या दोन छावण्या आमच्या हद्दीत असल्याने दाजावाडा ······ नारगोळ आणि उंबरगाव ही गटबंदीची खेडी सुरक्षित राहाणे अशक्य होते, म्हणून मी माझ्या रेजिमेंटच्या अधिकाऱ्यांची बैठक बोलविली. ह्या बैठकीला इथे असलेले उत्तरेकडील आरमाराचे दर्यासारंग कॅ. आंतोनियु ब्रिनु द सिल्व्हा ह्यांनाही पाचारण करण्यात आले. अधिकाऱ्यांनी असा दृष्टिकोन व्यक्त केला की, शत्रूसैन्य आमच्या सैन्याच्या मानाने फारच मोठे असल्याने, कोणतेही ठाणे लढविणे कठीण आहे. फक्त कात्रावाडा हे ठाणे तेवढे लढवावे व बाकीच्या तटबंदीच्या खेड्यांतून तोफा आणि दारूगोळा मागे घ्यावा अस ठरले.

कात्रावाडा हे ठाणे नदी किनाऱ्यावर असल्याने त्याला नदीतून कुमक पोहोचविणे शक्य होते. पण येथे देखील कनिष्ठ दर्जाचा तोफखाना ठेवावा असे ठरले. मी लगेच तो निर्णय अंमलात आणण्याचा हुकूम केला व एक युद्धनौका उंबरगाव नदीतून कात्रावाडाकडे रवाना केली. ती तिकडे दिनांक २७ ला जाऊन पोहोचली. पण तत्पूर्वीच कात्रावाडा पडले होते. तिला ही बातमी तिकडे पोहोचल्यावर कळली. मला ही वार्ता त्याच दिवशी सकाळी कळाली. हे ठाणे दिनांक २६ ला दुपारी शत्रूने घेतले. ह्या ठिकाणी जी लढाई झाली तीत उभयपक्षांची बरीच प्राणहानी झाली. आठ तोफा आणि काही माणसे शत्रूच्या हातास लागली. हे ठाणे पडण्यापूर्वी तेथील कामेली ह्या नावाच्या हत्यारी लोकांनी माघार घेतली होती. त्याचप्रमाणे इतर तीन तटबंद्यांतील चोवीस तोफा शत्रूच्या हाती न पडण्याची दक्षता घेण्यात आली. कात्रावाडाच्या पराभवामुळे ह्या हद्दीतील डोवला आणि शार लोकांमध्ये भयंकर घबराट माजली आहे. कारण, त्यांना कळले आहे, की, आमच्या लोकांनी शत्रूचा जीवावर उदार होऊन प्रतिकार केला असता शत्रूने हा प्रतिकार मोडून काढून ते ठाणे काबीज केले आहे. त्यामुळे शत्रू आमच्याहून पराक्रमी आहे अशी त्यांची समजूत झाली आहे. त्या घबराटीमुळे प्रस्तुत लोकांना चार ठाणी लढविण्यास प्रवृत्त करणे फार कठीण होऊन बसले आहे. शत्रूच्या ज्या नवीन सैन्याचा मी आता उल्लेख केला आहे, ते सैन्य नासिक नदीच्या शेजारी होते. कुणी असे सांगतात की, हे सैन्य तारापोरवर हल्ला करण्यासाठी आले असून ह्या सैन्याहून मोठे असे आणखी एक सैन्य इकडे निघाले असल्याची बातमी आहे.

मी आपणाला इथल्या परिस्थितीची कल्पना दिलीच आहे. इकडे माणसे, दारूगोळा, शस्त्रे, ग्रेनेडस् आणि शेवटीं ह्या प्रदेशाच्या रक्षणासाठी

आवश्यक असलेल्या सर्व वस्तूंची टंचाई आहे. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आपण शक्य तितक्या लवकर मदत पाठवून द्यावी. रुग्णालयाच्या पाद्री संचालकाला महसूलखात्याच्या प्रमुखाने औषधे पाठविण्याचे कबूल केले होते. पण ही औषधे आली नाहीत. त्यांची इथे फार आवश्यकता आहे.

देव आपले रक्षण करो".

दमण, २९ डिसेंबर १७३८.

फिलीप द व्हालादारिज सोतु मायॉर

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्रमांक १३५, पृ. २७३-२७६

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.
(135) LIVRO DAS MONSOES, No. 108, FLS 104

पत्र क्रमांक १३७

तारापोरला पोर्तुगिजांच्या ताब्यात असलेल्या ठाण्याचा कॅप्टन व्हाइसरॉयला आपल्या ठाण्याची परिस्थिती पुढील पत्रात सादर करतो ;

तारापोरच्या ठाण्याचे कॅप्टन लुईस व्हेलोझुभाशादु ह्याची पत्राची नक्कल.
" महाराज—

चालू माहीच्या पहिल्या तारखेस ह्या बंदरानजीक आंग्र्याची एकोणीस गलबते पकडण्यात आली. ह्या ठाण्याची परिस्थिती पुढीलप्रमाणे आहे.

ठाण्याच्या आजूबाजूचा प्रदेश जवळ जवळ ओस पडला आहे, दोन महिने झाले, शत्रूच्या घोडदळाची रोज टेहेळणी चालू आहे. काव्हळ (?) नावाच्या खेड्यात शत्रूने आपली छावणी ठोकली आहे. असे सांगतात की, त्या छावणीत तीनशे घोडेस्वार आणि शंभर पायदळाचे सैनिक असून ढोंगाजीपंत ह्या नावाचा सरदार ह्या सैन्याचे नेतृत्व करीत आहे. हा सरदार शंकरजीपंत ह्याचा बंधु असल्याची बातमी आहे. शंकरजी वसईच्या कसब्यात ठाण मांडून राहिले आहेत. शत्रूचे आणखी दोनशे सैनिक शिरगावच्या टेकडीवर येऊन राहिले आहेत. ह्या ठाण्यांचे आणि असेरीचे दळणवळण तोडण्यासाठी म्हणूनच हे सैन्य तिकडे आले आहे.

आपले दिनांक २९ ऑक्टोबरचे पत्र मिळाले, व बातम्या समजल्या. ह्या बातम्या शार मार्गांनीही कळल्या होत्या. त्यांच्या लायकीप्रमाणे देव त्यांचा

पाहुणचार करील व त्यांच्या बेमुर्वतखोर हेतूप्रमाणे त्यांना चांगली शिक्षा होईल अशी आशा बाळगतो.

इकडे सप्टेंबरपासून असलेल्या दो मिगेल द मिनेझिश् ह्यांच्या कंपनीला आणि ......... अद्याप पगार मिळालेला नाही. ह्या कंपनीतील लोकांनी फरारी होऊ नये म्हणून मला फार काळजी घ्यावी लागत आहे. चोहोबाजूंनी संकटे डोकावत असता ह्या सैनिकांचा पगार लांबणीवर टाकणे इष्ट नाही, असे मला वाटते. तरी आपण ह्यावर तोडगा सूचवावा. त्याचप्रमाणे थोडे हातबाँम्बजही इकडे पाठवून द्यावे. इकडे एकही ग्रेनेड नाही.

आंग्रे व गायीच्या बेटावरील मराठे ह्यांची ह्या किनाऱ्यावर नेहमी टेहेळणी असल्याने आणि जमिनीच्या बाजूने सुयारीज (?) असल्याने निरोप पाठविणे पुष्कळदा कठीण जाते. म्हणून आपल्या पहिल्या पत्राचे उत्तर मी करू शकलो नाही.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

तारापोर, २ जानेवारी १७३९. लुईज व्हेलोझु माशादु.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V

पत्र क्र. १३७, पृ. क्र. २७८—२७९

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

पत्र क्र. १३९

बसईचा कॅप्टन मुंबईच्या गव्हर्नरच्या पत्राला उत्तर करताना तक्रार करतो की, तो पोर्तुगिजांच्या हितसंबंधाच्या रक्षणाचे बाबतीत लक्ष देत नाही.

मुंबईच्या गव्हर्नरच्या पत्राला वसईच्या कॅप्टनने पाठविलेले पत्र.

आपले पत्र मिळाले. मला आलेले हे आपले दुसरे पत्र आहे. पहिले पत्र आपण माझे सेनापती पेद्रु द मेलु ह्यांच्या मृत्यूची बातमी देऊन पाठविले होते. आपल्या दोन्ही पत्रांवरुन माझा असा ग्रह झाला आहे की, आपण माझ्याशी उत्कटतेने वागत नाही की, जी उत्कटता युरोपातील राष्ट्रां-राष्ट्रांच्या सरकारांमध्ये आढळते. आपणाला माहीत आहेच की, माझ्या सेनापतीच्या गैरहजेरीत मी इकडील ठाण्यांचा व सैन्याचा कारभार पाहात आहे. त्यामुळे माझा दर्जा व माझ्या राष्ट्राचा अधिकार कमी होऊ नये म्हणून मला आपणास समान पातळीवर वागविणे भाग पडत आहे.

आपण आपल्या पत्रात आमच्याकडे पळून आलेल्या पाच इंग्रजांची मागणी केली आहे. वास्तविक हे इंग्रज पाच नसून तीन आहेत व एकजण फ्रेंच आहे. हे इसम गुन्हेगार नसल्या कारणे त्यांना परत करण्यास काही हरकत नाही. पण आपणही ह्याच न्यायाने वागले पाहिजे. आपणाकडे आमचे जवळ जवळ शंभर पोर्तुगीज आणि आमच्या राज्यातून पळून गेलेले पुष्कळ कृष्णवर्णी गुलाम आहेत. त्याशिवाय राजांच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी गेलेल्या आरमारावरील दोन पोर्तुगीज सैनिकही आपणाकडे पळून गेले आहेत. हे सर्व लोक कंपनीच्या सैन्यात पगारी सैनिक म्हणून नोकरी करीत आहेत. पण आपण त्यांना आम्हास परत करण्यास तयार नाही. अशा परिस्थितीत आम्हीच आपल्या माणसांना तेवढ कसे परत करायचे? युरोपात आमच्या दोन्ही राष्ट्रांचा एकोपा असता व त्या दोघांची दोस्ती असता इकडेच आपण आमच्याशी विषमतेने वागावे ही खेदाची गोष्ट आहे. तथापि, असे जरी असले, तरी आपली मागणी मी कौंट व्हाइसरॉय ह्यांना कळविली असून ह्या बाबतीत मी त्यांच्या हुकुमाची वाट पाहात आहे. आपल्या पत्रात आपण म्हणता की, आमच्यामध्ये मतैक्य असले पाहिजे. मी आपल्या म्हणण्याशी सहमत आहे. इतकेच नव्हे तर युरोपात आमच्या दोन्ही राष्ट्रांमध्ये घनिष्ट दोस्ती चालू आहे. ही दोन्ही राष्ट्रे एकमेकांच्या हितसंबंधाचे अगदी डोळ्यात तेल घालून रक्षण करीत आहेत. त्याचा प्रत्यय म्हणजे स्पेनने आमच्या देशाशी युद्ध सुरू करण्याची हालचाल करताच इंग्लंडच्या महाराणींना ही बातमी कळल्याबरोबर पोर्तुगालकडे एक मोठे आरमार पाठवून दिले. हे आरमार लिस्बनला आमचे व स्पेनचे मतभेद नाहीसे होईपर्यंत राहिले होते. त्या आरमाराच्या लिस्बन बंदरातील वास्तव्याबद्दल स्पेनच्या इंग्लंडमधील वकिलाने महाराणीकडे तक्रारदेखील केली होती. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही की, आशियामध्ये आमचा हा एकोपा दिसून येत नाही. मूर्तीपूजक मराठा हा आमच्या सर्व युरोपियन राष्ट्रांचा समायिक शत्रू आहे. पण ह्या शत्रूला मुंबई बेटातून दारूगोळ्याचा पुरवठा सातत्याने होत आहे. पावसाळ्यात मराठ्यांच्या तोफांना, जे गोळे, त्या, शहरावर टाकीत होत्या, ते इंग्रज बनावटीचे होते. ज्यावेळी ह्या, प्रांताचे दिवंगत सेनापती ठाणा येथे रेइशच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठी गेले, तेव्हा मुंबईहून ठाण्याला इंग्रज सैनिक गेल्याचे मला कळाले. कदाचित तिकडे आम्हाला जे अपयश आले ते त्यांच्यामुळेच असण्याची शक्यता आहे. नंतर ते सैनिक ठाण्याला पळून गेले होते, असे सांगून त्यांना मुंबईस परत पाठविण्यात आले.

गायीच्या बेटांना मुंबईहून वारंवार पुरवठा होत आहे. मुंबईच्या नौका तिकडे ये-जा करीत असलेल्या दिसतात. ठाण्यालाही मुंबईहून पुरवठा होत आहे. तिथला दारूगोळा आणि शार सामान युरोपियन बनावटीचे आहे.

आपणाला मला इशारा द्यावयाचा आहे की, मुंबई बेटावर मराठ्यांचा डोळा आहे. हे मी आपणाला समायिक हितसंबंधाच्या दृष्टीने सांगत आहे. आमच्या साष्टी बेटावरही त्यांचा असाच डोळा होता व हे बेट त्यांनी आमच्याशी तह असताना आक्रमण करून घेतले. आपला आणि त्यांचा आज जसा सलोखा आहे, तसाच सलोखा त्यावेळी त्यांचा आमच्याशीही होता. आणि माझी खात्री आहे की, एके दिवशी ते अचानकपणे आपल्या बेटावरही हल्ला केल्यावाचून राहाणार नाहीत. त्यांना तिकडे चांगली लूट मिळेल, ह्यात शंका नाही. आणि आज जरी मराठे युद्धात गुंतले असले, तरी ते कंपनीची पुष्कळ नुकसानी करीत आहेत. कारण, नद्यांचे आणि किनाऱ्यांचे रक्षण करण्यासाठी कंपनीला टेहेळणीच्या नौका ठेवण्यासाठी पुष्कळ खर्च करावा लागत आहे. आणि त्यात पुन्हा युद्धाची भीती आहेच. मराठ्यांशी व्यापार करून अर्थात काही जणांचा फायदा होत आहे ह्यात शंका नाही. परंतु हा फायदा आणि बेटाच्या रक्षणासाठी कंपनीला करावा लागत असलेला खर्च ह्यांचा एकमेळ बसत नाही. म्हणून माझे असे मत आहे की, वैयक्तिक हितसंबंधापेक्षा समायिक हितसंबंधाकडे पहिल्या प्रथम लक्ष दिले पाहिजे. आणि माझी खात्री आहे की, मुंबई बेटातील सर्व राज्यकर्त्यांना कळून चुकले आहे की, मराठे साष्टी बेटात ठाण मांडून बसल्यामुळे आमच्याबरोबर त्यांचीही नुकसानी होत आहे. आज मराठे आपल्या सोयीसाठी आपणाशी मैत्रीने वागत आहेत. त्यांना दोन आघाड्यांवर युद्ध करणे परवडण्यासारखे नाही म्हणून त्यांनी आपली कुरापत काढलेली नाही. पण एकट्याला खलास केल्यावर ते दुसऱ्याचा समाचार घेतल्याशिवाय राहाणार नाहीत हे आपणाला कसे कळत नाही, याचेच मला आश्चर्य वाटते. आपले हे धोरण मुंबई बेटाला हानिकारक आहे, ही माझी ठाम समजूत आहे.

मला बातमी कळली आहे की, मराठे गायीच्या बेटावर काही पाले बांधित असून त्यांनी मुंबईहून सुतार आणि करवतकार मागविले आहेत. ह्या कारागिरांना त्यांच्या कामाबद्दल आगाऊ मुशाहिराही देण्यात आल्याचे कळते. तसेच ह्या कामासाठी लागणारे लोखंड विकत घेण्यासाठी त्यांनी पैसे पाठविले असून हे सर्व सामान मुंबईहून गंडवी बालकर (?) कडे जाण्याच्या मिषाने गायीच्या बेटाकडे जाणार आहे. आपण ह्या विरुद्ध इलाज करावा म्हणून मी ही गोष्ट आपल्या निदर्शनास आणीत आहे. त्या सर्व गोष्टींशी आपल्या महाराणीचे आणि माझ्या स्वामीचे हितसंबंध निगडित आहेत म्हणून मी आपणाला ह्या गोष्टीची जाणीव करून देत आहे.

दैव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

—ज्युआंव शाव्हिएर पेदैरा पिंतु

A. P. O., TOMO I, VOL III, PART V

पत्र क्र. १३८, पृ. २७९—२८३

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA

(138) LIVRO DAS MONSOES No. 108, FLS 100

पत्र क्र. १३९

वसईचा किल्लेदार खालील पत्रात व्हाइसरॉयला वसई प्रांतातील युद्धाच्या घडामोडीचा अहवाल सादर करतो.

वसईचे कॅप्टन ज्युआंव शाव्हिएर पेदैरा पिंतु ह्यांचे पत्र.

"महाराज,

शार रूअवर पाठविलेल्या पत्रात मी आपणाला इथल्या घडामोडीचा सविस्तर वृत्तांत सादर केला आहे. ह्या अहवालाबरोबर मी दीवचा किल्लेदार, दमणचा गव्हर्नर आणि कारंजा बेटाचा कॅप्टन ह्यांची पत्रे आणि पत्रांच्या नकला पाठविल्या आहेत. त्याचप्रमाणे समुद्रावरील कॅप्टन मान्युएल शेले ह्यांच्यामार्फत उपरिनिर्दिष्ट नौका इथून गेल्यावर इकडे घडलेल्या घटना मी आपणाला कळविल्या आहेत.

रेइश किल्ल्यावर हल्ला झाला, तेव्हा शत्रूने आजूबाजूच्या लष्करी ठाण्यातन बरेच सैन्य ठाण्याला गोळा केले होते. त्याला वरून मग कुमक आली. एकूण बारा हजार पायदळ आणि दोन हजार घोडदळ घेऊन शत्रू शहराच्या कसब्यात शिरला. येथे त्याने त्या सैन्याची विभागणी केली. पैकी एक मोठा भाग त्याने ह्या ठाण्यासमोर ठेवला व दुसऱ्या लहान भागासह तो तारापोर, माहीम व दमण ह्या ठाण्यांकडे निघाला. मला ह्या हालचालींची व तारापोर व माहीम ह्या ठाण्यांवर हल्ला होणार असल्याची बातमी अगोदर लागली असल्याने मी ह्या दोन्ही ठाण्यांना जागरूक राहाण्याचा इशारा दिला होता. नंतर मला शत्रू दमणकडेही असल्याची बातमी कळली.

आज सकाळी दहा वाजता दमणच्या कॅप्टनची पत्रे घेऊन तारापोरचे गलबत इकडे येऊन दाखल झाले. त्याने दोन पत्रे आणली असून त्यातील एक

आपणाला व दुसरे मला आहे. मला पाठविलेल्या पत्राची नक्कल मी आपणाकडे पाठवीत आहे. तारापोरच्या कॅप्टननेही मला एक पत्र पाठविले होते. प्रस्तुत पत्रासमवेत त्याही पत्राची नक्कल आपणाकडे जात आहे. ह्या पत्रावरून आपणाला कळून येईलच की, शत्रूने दमणच्या हद्दीत आक्रमण केले आहे. त्या आक्रमक सैन्याचे नेतृत्व कसब्याहून तिकडे निघालेल्या सरदाराकडे आहे. ह्या ठाण्यांना मदत करण्याची इच्छा असून देखील मला ती करता येत नाही. कारण, तिकडे कुमक पाठवायची झाल्यास ती ह्या ठाण्यांतील सैन्यातून पाठविली पाहिजे. आणि तसे जर झाले तर ह्या ठाण्याचे संरक्षण कमकुवत होईल. दुसरी गोष्ट अशी की, शत्रू ज्यावेळी डोंगरीवर हल्ला करणार आहे, आणि तो हल्ला केल्याशिवाय राहाणार नाही ह्याची मला खात्री आहे, तेव्हा मला तिकडे कुमक पाठवावी लागणार आहे. हे ठाणे जवळ असल्या कारणे तिकडे सकाळी जर कुमक पाठविली तर ती रात्री इकडे परतू शकेल. मला दिवसा इकडे सैन्याची फारशी आवश्यकता नाही. माझ्यापाशी असलेल्या युद्धनौकांपैकी तीन बाहेर आहेत, दोन कारंजाला पुरवठा घेऊन गेल्या आहेत, त्या अद्याप परतलेल्या नाहीत. आणि एक वर्सोवाला गेली आहे. त्या पालांसह माहीम आणि तारापोर ह्या दोन्ही ठाण्यांना मदत पाठविता येत नाही. कारण त्या बंदरात पाली प्रवेश करू शकत नाहीत. त्या नौका जर बंदरा बाहेर राहिल्या तर त्यांच्यावर हल्ला होण्याची भीती आहे. म्हणून मी त्या तिकडे पाठवू शकत नाही. माझ्या ठाण्यातील शिबंदीत दोनशे चाळीस गोरे, वरे आणि वाईट सैनिक, दोनशे पंचेचाळीस देशी शिपाई—बहुसंख्य निरुपयोगी आहेत. शत्रूकडून ह्या ठाण्यावर हल्ला होण्याचा संभव आहे. परंतु माहीम हे ठाणे कमकुवत असल्याने आणि तेथे रहिवाशीही विशेष नसल्याने त्या ठाण्याच्या मदतीला मी पन्नास माणसे पाठविण्याचे ठरविले आहे. ह्या युद्धनौकांवरील शिबंदी आणि दमणच्या ठाण्यामागील सैन्य मिळून दमणचा गव्हर्नर शत्रूला चांगलेच तोंड देऊ शकेल, आणि जर फारच जरूरी भासली तर मी मुंबईहून रोझरिन्यु हे फ्रिगेट दमणला पाठविन. ह्या नौकेवरील शिबंदीचा एक भाग दमणच्या मदतीला जाऊ शकेल. इकडे माझ्यापाशी आंतोनिय द कुन्य हे पाले व दोन गाली तेवढी आहेत. ती दुसरीकडे पाठविता येत नाहीत, कारण त्या बंदराच्या व ठाण्याकडे जाणाऱ्या नदीच्या तोंडाच्या रक्षणासाठी त्यांची आवश्यकता आहे. कारण ह्या किनाऱ्यावर आंग्र्यांचे आरमार संचार करीत आहे.

दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांच्या पहिल्या पत्रात लहान गोळे पाठविण्याबद्दल कळविण्यात आले होते. पण लहान गोळे म्हणजे कोणत्या प्रकारचे ते नीट न कळल्याने मी त्यांना खुलासा मागून पत्र लिहिले. कारण

मी जे गोळे त्यांना पाठविणार होतो, त्यांचा त्यांना कदाचित उपयोग न होण्याची शक्यता होती.

मुंबईच्या गव्हर्नरांसंबंधीही मला आपणाला लिहायचे आहे, ते मराठ्यांना सतत दारूगोळा आणि इतर युद्धसामग्री पुरवून आमची फार हानी करीत आहेत. ही सामग्री गायीच्या बेटावर आणि ठाण्याला दोन्ही ठिकाणी जात आहे. गेल्या पावसाळयात मराठ्यांपाशी तोफांचे गोळे नव्हते. त्यांच्या तोफा जे गोळे टाकीत होत्या ते घाईघाईने बनविण्यात आलेले होते. आता मराठे जे गोळे टाकीत आहेत ते इंग्रज बनावटीचे आहेत. इंग्रजांकडून मराठ्यांना मदत येत आहे, हे मुंबई बेटातील आमच्या संघाच्या पाद्र्यांना आणि तिथल्या लोकांना देखील माहीत आहे. आणि आमचे आरमार रेइश बेटावर हल्ला करण्यासाठी गेले, तेव्हा इंग्रजांनी मराठ्यांकडे तीन गोलंदाज पाठविले हे मला मुंबईहून आणि साष्टी बेटातील काही लोकांकडून कळले आहे. त्या तीन गोलंदाजापैकी दोघांनी आमच्या आरमारावर जे गोळे टाकले त्यातला एक गोळा लागून जनरल पेद्रु मेलु हे ठार झाले.

मला मुंबईहून एका व्यक्तीने अशी विश्वसनीय बातमी पाठविली आहे की, मराठे गायीच्या बेटांवर पांच किंवा सहा पाली बांधीत असून ह्या नौकांना लागणारे सामान आणि कारागीर मराठ्यांना. मुंबईचे इंग्रज पुरविणार आहेत सामान नावामध्ये भरून तिकडे पाठविण्यात येणार आहे. पण लोकांना ह्या गोष्टीचा सुगावा लागू नये म्हणून ह्या नौका गंडवी आणि बलसाडला जाणार असल्याची हूल उठविण्यात येत आहे. मराठ्यांनी ह्या नौका बांधण्यासाठी जे कारागीर ठरविले आहेत त्यांना त्यांनी आगाऊ मुशाहिरा दिला आहे व लोखंडाचीही खरेदी मुंबई बेटात केली असल्याची बातमी मला कळली आहे. थोडक्यात सांगायचे म्हणजे इंग्रज हा मराठ्यांप्रमाणे छुपा शत्रू आहे. तो आमच्या मैत्रीच्या आवरणाखाली मराठ्यांशी व्यापार करीत आहे व त्यांना दारूगोळा आणि इतर युद्धसामग्री पुरवीत आहे. ही गोष्ट एवढी जगजाहीर आहे की, ती माहीत नाही असा एकही नागरिक मुंबई बेटात आढळणार नाही.

कायतानु द सौझ पेरैरा ह्यांचे मला २८ डिसेंबरला एक पत्र आले आहे. त्या पत्रात त्यांनी असेरीच्या रक्षणकर्त्यांचा सहा महिन्याचा आगाऊ पगार मागितला आहे. मदहूं कॅप्टनचे पत्र मी प्रस्तुत पत्रासोबत आपणाकडे पाठवीत आहे. ह्या पत्रात त्यांनी आणखी ज्या काही गोष्टी लिहील्या आहेत त्या आपणाला कळून चुकतीलच. ज्याअर्थी, सरकारी खजिन्यातून मला ही रक्कम काढण्याचे अधिकार नाहीत त्याअर्थी, त्या प्रश्नाबाबत सल्लागार

मंडळाने आपला निर्णय पसार केल्याशिवाय वखारदार ही मागणी लक्षात घेण्यास तयार नाही. तरी ह्या प्रकरणी आपण लक्ष घालावे अशी विनंती आहे. त्याशिवाय असेरी निर्धोक राहाणार नाही. आज कायतानु द सौझ परैरा ह्यांचे मला आणखी एक पत्र आले. ह्या पत्रात त्यांनी कळविले आहे की, गेल्या दोन महिन्यापासून ते आजारी असून बिछान्यावर पडून आहेत. त्यांच्यावर अद्याप औषधोपचार झालेला नाही, कारण तारापोर येथे वैद्य नाही म्हणून त्यांनी आपणाला ह्या शहरी आणविण्याची तिकडे एक युद्धनौका ठेवून व्यवस्था करावी अशी मागणी केली आहे.

कॅ. मोर आंतोनियु ब्रितु ह्यांनी दमणहून लिहिले आहे की, त्या जिल्ह्याच्या हद्दीतील चार तटबंद्यांपैकी शत्रूने एक घेतली व बाकीच्या तीन खाली करण्यात आल्या. त्या ठाण्यात जवळजवळ तीन हजार मुडे भात गोळा करण्यात आले होते. दमणच्या सांप्रतच्या परिस्थितीवरून मला भीती वाटते की, ह्या ठाण्याला धान्याची जी आवश्यकता आहे ती त्याला पुरी करता येणार नाही. ते ह्या ठाण्याला जवळजवळ चार हजार मुडे भाग पुरवीत असे. मी आपणाला २७ डिसेंबरला जे पत्र लिहिले त्यात ह्या गोष्टीचे विवेचन केलेच आहे. त्या पत्राची एक नक्कल मी आपणाला प्रस्तुत पत्रासमवेत पाठवीत आहे तरी माझी आपणाला विनंती आहे की, आपण आम्हाला ताबडतोब दक्षिणेकडील तांदूळ पुरवावा. न झाल्यास ह्या ठाण्यातील परिस्थिती फार बिकट होईल. दमणचे गव्हर्नर फिलीप द व्हालादारिज ह्यांनी मला त्यांचे पत्र आपणाकडे ताबडतोब रवाना करण्याची व त्या राजधानीत असलेली त्यांची दोन्ही गलबते पाठवून देण्याची विनंती केल्याने मी ही पत्रे चौलला पाठवीत आहे, व तिथून ती त्या राजधानीकडे रवाना करण्याची त्यांना विनंती करीत आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

वसई, ६ जानेवारी १७३९.

ज्युआंव शाव्हिएर परैरा पिंतु.

A. P. O., TOMO I, VOL III, PART V
पत्र क्र. १३९, पृ. २८३—२८७
संपादक :—
A B DE BRAGANCA PEREIRA .

(131) LIVRO DOS REIS VIZINHOS, No. 108, FLS 96

माहीमच्या कॅप्टनचे वसईचे किल्लेदार ज्युआंव शाव्हिएर परैरा पिंतु ह्यांस पत्र—



व्ही ५५५८–३७

मी आपणाला चालू माहीच्या २ तारखेस जे पत्र लिहिले, त्यात मी आपणाला कळविले होते की, ह्या ठाण्यावर आणि कोळमच्या तटबंदीवर हल्ला करण्यासाठी शत्रू मोठे सैन्य आणि पुष्कळ युद्ध सामग्री घेऊन आगशी मार्गे दंतोडाला रवाना झाला आहे. ह्याच पत्रात मी आपणाला विनंती केली होती की, ह्या ठाण्यांची कमकुवत तटबंदी आणि थोडी शिबंदी लक्षात घेऊन शत्रूच्या हल्ल्यांना परिणामकारक तोंड देण्यासाठी त्यांना माणसे आणि दारू-गोळा पुरविण्याची व्यवस्था करावी. आज ९ तारीख आहे, पण आपण मी मागितलेली मदतही पाठविली नाही आणि माझ्या पत्राचे उत्तरही केले नाही. आता मी आपणाला ह्या पत्राचेद्वारा कळवित आहे की, शत्रूचे सैन्य ह्या ठाण्याच्या कसब्यात शिरले असून त्याने तेथे आपली छावणी ठोकली आहे. मला अशी विश्वसनीय बातमी कळली आहे की, शत्रू सैन्यात पाच हजार पायदळ आणि आठशे घोडदळ आहे. ह्या सैन्याचे अधिपत्य, सरदार शंकरजी पंत ह्यांच्याकडे असून, गेल्या वर्षी ह्या ठाण्यावरील हल्ल्यात ठार झालेले सरदार महादजी पंत ह्यांचे ते बंधु आहेत. आपल्या भावाच्या मृत्यूचा सूड उगविण्यासाठी म्हणून ते आले आहेत. म्हणून माझी आपणाला विनंती आहे की, आम्हाला ताबडतोब माणसे, दारूगोळा, अन्नाची बेगमी, दगड, दारू बॉंब्स् वगैरे युद्धसामग्री पाठवून द्यावी. ह्या सर्व वस्तूंची इकडे टंचाई आहे. विशेष करून भाताची कमतरता तर मोठीच आहे. इकडे युद्धनौकाही हव्या आहेत. कारण शत्रूने इकडील सर्व ठाण्यांची आपल्या गलबतांनी नाके-बंदी केली आहे. इकडून एकही गलबत निरोप घेऊन तिकडे जाऊ शकत नाही. हे गलबत केवळ देवावर हवाला टाकून जात आहे. मी आपणाला इशारा देत आहे की, मी आपणाकडे ज्या युद्ध सामग्रीची आणि अन्न सामग्रीची मागणी केली आहे, तिच्या अभावी जर ह्या ठाण्याची काही हानी झाली तर त्याचा जाब आपणाला द्यावा लागेल. कोळंब आणि शिरगाव ह्या ठाण्यात देखील युद्धसामग्रीची आणि सामग्रीची फार मोठी कमतरता आहे ह्याची जाणीव आपणाला माझ्या मागच्या पत्रातून दिलीच आहे.

आज मी शत्रूच्या घोडदळाची आमच्या तोफांनी थोडी हानी केली. आता शत्रू ह्या जागा शिडया लावून घेणार आहे की, वेढा घालून घेणार आहे याची मी वाट पाहात आहे.

दमणमध्ये शत्रूचे जे सैन्य आहे त्याला आठ हजार घोडेस्वारांची कुमक आली आहे, असे मला कळले असून हे सैन्य ह्या बाजूने आपला मोहरा वळविणार असल्याचाही अंदाज ह्या पत्रात व्यक्त करण्यात आला आहे. आपणाला तूर्त जे काय सांगायचे आहे ते एवढेच आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो ".

माहीम, ९ जानेवारी १७३९.

आपला नम्र आणि आज्ञाधारक सेवक,

आंतोनियु द मेलू परेरा इ सौझ.

A P O, TOMO I, VOL III, PART V
पत्र क्र. १४०, पृ. . २८७—२८८

संपादक :—
A B DE BRAGANSA PEREIRA
(14) LIVRO DAS MONSOE, No 108, FLS 127.

पत्र क्रमांक १४१

चौलचा गव्हर्नर खालील पत्रात दमणमधील परिस्थितीचे वर्णन करतो.

चौलचे कमांडर दों. फ्रान्सिस्क, बॅरन द गार्लेन फिएस ह्यांचे पत्र,—

वसईच्या कॅप्टनने माझ्याकडे हे पत्र ह्या मार्गे पाठविले असून ते आपणाला शक्य तितक्या लवकर पोहोचते करण्याची ताकीद दिली आहे. आणि त्यांनी मला जे पत्र लिहिले आहे त्यात म्हटले आहे की, शत्रूने दमणच्या हद्दीत आक्रमण करून कात्रावाड्यावर हल्ला केला व आठ तोफा काबीज केल्या. दमणच्या कॅप्टनला जेव्हा ही वार्ता कळली तेव्हा, त्याने सोळसुंबा, नारगोळ आणि उंबरगाव येथील ठाण्यातील तोफा शत्रूच्या हाती पडू नयेत म्हणून तिथल्या शिबंद्यांना दमणच्या ठाण्यापर्यंत माघार घेण्याचा हुकम केला. परंतु हे ठाणेदेखील सुरक्षित नाही, शत्रूपासून त्यालाही धोका निर्माण झाला आहे. ह्या सर्व घडामोडीमध्ये एक गोष्ट मन फार अस्वस्थ करणारी घडली ती ही म्हणजे आम्ही जी ठाणी सोडली, त्यातील तीन हजारांपेक्षा अधिक मुडे भात शत्रूच्या हातात पडले. सांप्रतच्या स्थितीत ही हानी फारच मोठी आणि सोचनीय आहे. मला तर भीती वाटू लागली आहे की, दमणची तर अशी अवस्था असेल तर तिथून आम्हाला धान्याची मदत मिळणे फार कठीण आहे. तीच गोष्ट पैशांचीही आहे. भाडोत्री पायदळाला आणि मदतीच्या कंपन्यांना तेवीस हजार दोनशे असुर्प्या घालायच्या आहेत. भात आणि तांदूळ तर हातचा गेलाच आहे. ह्या ठाण्याची स्थिती सांप्रत अशी आहे. उंदेरीच्या कॅप्टनने तर मला असे कळविले आहे की, ह्या ठाण्यावरही शत्रूचा हल्ला होण्याचा धोका आहे. ह्या हल्ल्यास तोंड देण्यासाठी जागरूक राहाण्याचा त्याने इशारा दिला आहे. मानाजी आंग्रे हा आमचा सर्वात मोठा शत्रू आहे.



व्ही ५५५८–३७अ

सांप्रतच्या स्थितीत त्याची आम्हाला कुरापत काढता येत नाही, हे जरी खरे असले, तरी तो मराठ्यांना आमच्या अडचणी कळविल्याशिवाय राहाणार नाही. आपल्याही अडचणींची मला कल्पना आहे. आपणाला ह्या सर्व ठाण्यांना मदत पाठवायची असते हे तर झालेच परंतु गोव्यातही पैशाची आणि शार सामग्रीची टंचाई आहे. तथापि ज्याअर्थी, सर्वात मोठ्या रोगावर सर्वात मोठ्या जालीम उपचाराची आवश्यकता असते. त्याअर्थी, माझी आपणाला सूचना आहे की, आपण ह्या ठाण्यातील खजिन्यातील सर्व पैसा काढण्याचा एक हुकूम काढावा. ह्या खजिन्यात प्रिमाजच्या अथवा त्याचा नसल्यास धर्मसमीक्षा मंडळाच्या खजिन्याचाही अंतर्भाव व्हावा. ही निवड आपण आपल्या इच्छेप्रमाणे करावी. दुसरा इलाज नाही म्हणूनच मी आपणाला हा इलाज सूचवीत आहे. ह्या ठाण्यातील कोठारात जी अन्नाची बेगमी आहे ती फेब्रुवारीपर्यंत पुरणार नाही. म्हणून माझी आपणाला विनंति आहे की, ह्या ठाण्याला तांदूळ पाठविण्याची पहिली संधी आपण साधावी. दमणहून ह्या ठाण्याला धान्याची मदत होणार आहे की नाही हे कळेपर्यंत ही तरतूद करणे अत्यंत अगत्याचे आहे. ह्या राज्याच्या अस्तित्वासाठी व माझ्या धिरासाठी देवाने आपणाला आपल्या पवित्र रक्षणाच्या छत्राखाली धरावे अशी माझी त्याच्यापाशी प्रार्थना आहे ".

चौल, १० जानेवारी १७३९.

दो फ्रान्सिश्कु बारांव द गालेन्फिल्स

A P. O, TOMC I, VOL. III, PART V

पत्र क्र. १४१, पृ. क्र. २८८—२९०

संपादक :—

A B DE BRAGANSA PEREIRA

(141) LIVRO DAS MONSOES, No 108, FLS 110

पत्र क्रमाँक १४२

चौंलचा किल्लेदार व्हाइसरॉयला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, मानाजी आंग्रे हे बाजीरावाच्या आज्ञेवरून मोठा तोफखाना घेऊन सहा हजार सैन्यासह चौलवर हल्ला करण्यासाठी येत आहेत, अशी आपणाला बातमी मिळाली आहे.

चौलचे कॅप्टन ज्युआंव द फ्रिकाश् सामत ह्यांचे पत्र.

" महाराज—

उंदेरीच्या जलदुर्गाच्या किल्लेदाराने मला पत्र घालून कळविले आहे की, मानाजी आंग्रे ह्यांनी कुलाब्याच्या जलदुर्गातून पाच भारी तोफा बाहेर काढल्या

असून त्या तोफांना घोडेही जुंपण्यात आले आहेत. बाजीरावाच्या आज्ञेवरून मानाजी आंग्रे हे सहा हजार सैन्यासह पालीच्या पायथ्याशी ठाण देऊन राहिले आहेत. ह्या ठाण्यावर हल्ला करणे हे त्यांचे मुख्य उद्दीष्ट आहे. ह्या पत्रा-समवेत उंदेरीच्या किल्लेदाराच्या पत्राची नक्कल मी आपणाकडे पाठवीत आहे. ती नजरेखालून घातल्यावर आपणाला सर्व काही कळून चुकेल. मी ह्या बातमीचा खरेखोटेपणा बघण्यासाठी पालीकडे माणसे पाठविली असता त्यांनी त्या गडावर माणसे गोळा झाली असल्याची बातमी आणली. ह्याच माणसांनी आणखी एक बातमी आणली की, इथून एक दिवसाच्या अंतरावर तळेगोंकडे (?) ह्या नावाचा किल्ला असून तेथे तीन हजार माणसे आहेत. असे सांगतात की, ह्या माणसांबरोबर आणखीही माणसे इकडे येणार आहेत.

मी आणि दों. फ्रान्सिश्कु ह्यांनी सिनेटला तिजोरीतून पैसे काढण्याचा सल्ला दिला कारण दमणच्या वखारदाराने इथल्या वखारीला जे सत्तेचाळीस हजार असुर्प्याचे देणे होते ते, ते त्याला फेडता आले नाही. आणि आम्हाला तर इथल्या सैन्यासाठी भात खरेदी करण्यासाठी पैसे हवे होते. सिनेटने आमचा ठराव संमत करून तिजोरीतून पैसे काढण्यास परवानगी दिली. ह्या ठरावाची एक प्रत प्रस्तुत पत्रासमवेत आपणाकडे पाठवीत आहे, परंतु ह्या ठरावाची अमलबजावणी धर्मगुरू व खजिन्यांचे खजिनदार ह्यांनी केली नाही. त्यांनी सिनेटच्या ठरावाप्रमाणे आपल्या तिजोऱ्या खुल्या करण्याचे आश्वासन दिले होते. फक्त शहराच्या खजिन्याने तेवढ्या हजार असुर्प्या दिल्या त्याशिवाय आणखी कुणी आपल्या तिजोऱ्या खुल्या करीत नाहीत. हे जेव्हा मी आणि दों. फ्रान्सिश्कु ह्यांनी पाहिले तेव्हा आम्ही दोघांनी महाराजांच्या खजिन्यातून पाद्री ॲडमिनिस्ट्रेटर ह्यांना तीन हजार असुर्प्या देण्याचे ठरविले. कारण, त्यांना पूर्वी ज्या दहा हजार असुर्प्या मिळाल्या होत्या त्या भात खरेदी करण्यास पुरत नव्हत्या. आता सरकारी खजिन्यात तिनशे असुर्प्याहून अधिक रक्कम नाही. त्या रकमेच्यावर जी रक्कम होती ती दमणला पाठविण्यात आलेल्या कोळ्यांवर आणि माशुआंवर खर्च झाली.

माझी आपणाला विनंती आहे की, धर्मगुरूंनी व खजिनदारांनी भात खरेदी करण्यासाठी व सैन्याचा पगार घालण्यासाठी पैसा आणि चांदी द्यावी म्हणून आपण मला आज्ञा द्यावी. कारण त्यांनी वचनभंग केला आहे. कारण, मला निश्चितपणे असे वाटते की, धर्मगुरूंच्या सभेमध्ये उपरिनिर्दिष्ट खर्चासाठी काहीच द्यायचे नाही असा निर्णय घेण्यात आला असावा. म्हणून आपण मोठ्या धर्मगुरुंना आज्ञा करावी की, त्यांच्या अनुयायांनी धर्ममंदिरांतील चांदी व तिजोरीतील पैसा कोणतीही बळजबरी होण्यापूर्वी द्यावा.

गेल्या मोसमात इकडे जो तांदूळ इथल्या सैनिकांसाठी म्हणून आला. त्याचा दर मणाला दोन असुर्प्या आणि एक आणा असा पडला. तरी यापुढे

तांदळाच्या किंमतीत विशेष बदल होऊ नये म्हणून आपण योग्य ती उपाययोजना करावी.

धर्मसमीक्षा मंडळाचे (इंक्विझिशन) कमिशन फादर आलेशांद्र ह्यांनी माझ्याशी गैरवर्तन केले ह्याबद्दल आपणाकडे मला तक्रार करावयाची आहे. त्यांनी माझ्या इच्छेविरुद्ध आपणाकडे वसईचे सेनापती ठार झाल्याची बातमी घेऊन गेलेल्या गलबताच्या मुकादमास बंदिस्त करण्याचा हुकूम केला. ह्या मुकादमाचा गुन्हा एवढाच की, धर्मसमीक्षा मंडळाची पत्रे त्याने आपणाबरोबर नेली नाहीत. उत्तरेकडील सेनापतीच्या मृत्यूची बातमी आपणाला तातडीने कळवायची असल्याने गलबताचा मुकादम घाईत होता. त्यामुळे त्याला धर्मसमीक्षा मंडळाच्या कचेरीत जाण्यास सवड झाली नाही. मी धर्मसमीक्षा मंडळाच्या कमिशनरशी ह्या प्रश्नासंबंधी बोललो असता तो मला म्हणाला की, त्याच्यापाशी कैद करण्याचे आज्ञापत्रक होते व म्हणून त्याने तसे केले. पण ह्यावर माझा असा खुलासा आहे की, गलबताच्या मुकादमाच्या हातून चूक झाली नाही. धर्मसमीक्षा मंडळाच्या कमिशनरने गलबत सुटतेवेळी बंदरात हजर असायला हवे होते. कारण, गलबत तिकडे गेले ते सरकारी कामासाठी, व त्याला विलंब होणे उपयोगाचे नव्हते. आता माझ्याच अधिकारांच्या टापूत सदर्हू कमिशनरने गलबताच्या मुकादमाला कैद केल्याने प्रजेसमोर माझी स्थिती फारच शोचनीय झाली आहे. तरी माझी आपणाला विनंती आहे की, आपण सदर्हू कमिशनरला अशी दंडेली न करण्याचा हुकूम करावा. मला बातमी कळली आहे की, मानाजी आंग्रे ह्यांनी तीस गलबते तयार केली आहेत व त्यांनी आपल्या सरदारांना देण्यासाठी सोन्याचांदीची अनेक कडी घडविण्याचा हुकूम केला आहे

कारंजावर हल्ला करण्याचा त्याचा बेत आहे. हा किल्ला घेण्याचे त्याने बाजीरावाला वचन दिले आहे, असेही कळते. बाजीराव खुद्द ह्या ठाण्याला आणि किल्ल्याला वेढा देण्यासाठी येणार असल्याचीही बातमी आहे. मी आपणाला ह्या ज्या बातम्या सादर करीत आहे, त्या माझ्या गुप्त हेरांनी आणलेल्या आहेत. कारंजाच्या किल्लेदारालाही मी त्याच्यावर होणाऱ्या संभाव्य हल्ल्याची पूर्वसूचना दिली आहे. ह्या राज्याच्या विस्तारासाठी देव आपणाला पुष्कळ वर्षांचे आयुष्य देवो".

चौलचा किल्ला, १० जानेवारी १७३९.

ज्युआंव द फ्रिअश् सार्मेंतु

A. P. O, TOMO I, VOL. III, PART V.
पत्र क्रमांक १४२, पृ. २९०–२९३

संपादक :—
A. B. DE BRAGANSA PEREIRA.

पत्र क्रमांक १४३

माहीमचा किल्लेदार वसईच्या किल्लेदारास कळवितो की, माहीम येथें चिमणाजी अप्पा, पिलाजी जाधव आणि शंकरजीपंत ह्या तीन मराठे सरदारांचे आगमन झालें असून माहीमला त्यांनी वेढा घातला आहे.

माहीमच्या कॅप्टनचें पत्र

" सिंज्योर ज्युआंव शाव्हिएर पेरैरा पिंतु ह्यांस—

काल मी शिरगांवहून पाठविलेल्या एका छोटया गलबतावर कळविलें की, शत्रूनें ह्या बंदराची नाकेबंदी करण्यासाठीं आपली गलबतें इकडे आणली आहेत. तें छोटें गलबत शत्रूच्या तावडींत सांपडण्याचा धोका असल्यानें हें गलबत आज नदींतून दुसऱ्या मार्गानें पाठवीत आहे. हेतु हा कीं, ह्या दोन्ही गलबतांपैकीं एक तरी आपणाकडे पोहोचावे. आज सकाळी मला खात्री लायक बातमी कळली कीं, चिमणाजी अप्पा, पिलाजी जाधव आणि शंकरजीपंत हे तिघे मराठे सरदार ह्या ठाण्याच्या कसब्यांमध्यें येऊन दाखल झाले आहेत. त्यांनी आठ हजार घोडदळ आणलें असून शिवाय दमण येथें असलेलें सैन्य आहे तें वेगळेंच. एकूण जवळजवळ चौदा हजार सैन्य ह्या हल्ल्यांत भाग घेणार आहे. त्यांनी ह्या ठाण्याला सर्व बाजूनी वेढा घातला आहे, व कसब्यांतील माड तोडून टाकण्याचें सत्र सुरू केलें आहे.

ह्या शत्रूने आपणाबरोबर चौदा हत्ती, पुष्कळ ऊंट आणि बारा तोफा आणल्या आहेत. ह्या ठाण्याबरोबरच कळंम आणि शिरगांव ह्या दोन्ही ठाण्यांवरही हल्ला करण्याचा त्यांचा बेत आहे. शत्रूचें आरमार समद्रातून संचार करीत आहे तर जमिनीच्या बाजूने त्याने हे ठाणें सर्व बाजूने वेढून तोफा डागण्यास सुरवात केली आहे. शत्रुसैन्य मोठे आहे व त्या प्रमाणांत माझ्यापाशीं दारूगोळा काहीच नाही असे म्हटलें तरी चालेल. सैन्याचीही तीच गत आहे. तरी आपणापाशीं कुमक असल्यास ताबडतोब इकडे रवाना करावी. न झाल्यास ह्या ठाण्याचे काय होईल तें सांगतां येत नाही. अशा परिस्थितींत जर माझें बलिदान झालें तर माझे कर्तव्य मी पार पाडलें असें मी समजेन.

आज सकाळी शत्रूने आपले झेंडे ···················· कोळममध्यें ·········· आणि भंडाऱ्यांनी ························ पाहिल्याचें मी आपल्या सेवेस नेहमी तत्पर आहे.

देव आपलें पुष्कळ वर्षे रक्षण करो, वगैरे".

आपला नम्र सेवक,

आंतोनिक द मेलु पेरैरा इ सौझ

A. P. O., TOMO I, VOL III, PART V.

पत्र क्रमांक १४३, पृ. २९३-२९४

सपादक :—

A B DE BRAGANCA PEREIRA.

(143) LIVRO DAS MONCOCS, No 108, FLS 127.

पत्र क्रमांक १४७

गोव्याचा व्हाइसरॉय पोर्तुगालला राज्य सचिवास कळवितों कीं, सरदार व्यंकटराव घोरपडे हे गोव्यावर चालून येत असल्याची बातमी आपणास कळली आहे.

"राज्य सचिव आंतोनिक गे दिश पेरैरा, ह्यांस,—

मी आपणास कळविल्याप्रमाणें, दों. लुईज द बोतेएफ हे एका इंग्रज नौकेने देशाला रवाना होण्यास सज्ज झाले होते. ती इंग्रज नौका युरोपच्या मार्गावर ह्या बंदरात येऊन दाखल झाली देखील होती. अकस्मात अशी बातमी आली, कीं, मराठ्यांचे सरदार व्यंकटराव घोरपडे हे मोठे सैन्य घेऊन ह्या राज्यावर स्वारी करण्यासाठीं येत आहेत. ही बातमी कळतांच दों. दुईन द बोतेल्यु ह्यांनी त्या नौकेवर जाण्याचा आपला बेत रहीत केला. कारण त्यांना ह्या राज्याच्या रक्षणाचे काम आपल्या वैयक्तिक कामापेक्षां अधिक महत्वाचे वाटलें. तरी माझी इच्छा आहे कीं, त्यांचा गैरहजेरीत न्याय निवाडा त्यांच्या बाजूने व्हावा. ते महाराज आपणास दया दाखवितील अशी आशा बाळगून आहेत. जर मराठ्यांच्या स्वारीचा धोका टळला तर दों लुईज द बोतेल्यू हे तेलिचेरीला रवाना होतील व तिथून देशाला निघतील. कारण ती नौका तिकडे पंधरा दिवस मुक्काम करणार आहे.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो, वगैरे".

गोवा, २२ जानेवारी १७३९.

A. P. O., TOMOI, VOL III, PART V.

पत्र क्रमांक १४७, पृ. २९९

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(147) LIVRO DAS MONCOES, No 108, FLS 130.

पत्र क्रमांक १४८

व्हाइसरॉय आर्च बिशपला लिहितो कीं, मराठे गोव्याच्या हद्दीवर येऊन पोहोचले असल्याची बातमी आपणास कळली आहे. तरी गोव्याच्या रक्षणाच्या कामात भिक्षूंनी भाग घ्यावा अशी इच्छा आपण व्यक्त कराल अशी आशा आहे.

"आर्च बिशप ह्यांस—

मराठे ह्या राज्यावर स्वारी करण्यासाठीं घाट उतरत असल्याची बातमी इकडे काल येऊन पोहोचली आहे. आज पुनः अशी बातमी आली आहे कीं, ते आज रात्री आमच्या हद्दीवर येउन दाखल होतील. अशा परिस्थितीत मला आशा आहे कीं, आपल्या अमलाखालचे भिक्षू ह्या राज्याच्या संरक्षणाच्या कार्यात भाग घेतील. कारण इकडे सैन्य फार थोडें आहे. ही कल्पना आपणाला पसंत आहे कीं नाहीं तें मला आपणाकडून जाणून घ्यायचे आहे. आणि जर पसंत असेल तर आपण त्यांना जय्यत तयार राहण्याची आज्ञा करावी. म्हणजे मला त्यांचा आवश्यक त्या ठिकाणीं उपयोग करणे शक्य होईल.

देव आपले पुष्कळ वर्षे रक्षण करो".

पानेली, २३ जानेवारी १७३९.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्रमांक १४८, पृ. ३००

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(148) CARTAS E ORDENS PORTARIAS, No 24, FLS 37V.

पत्र क्रमांक १४९

व्हाइसरॉय गोव्याच्या संरक्षणासंबंधी सरसेनापतीस पुढील पत्रात काही सूचना करतो.

"सरसेनापती ह्यांस—

आज रात्री एक किंवा दोनच्या सुमारास मराठ्यांच्या सैन्यासंबंधीचे आपले पत्र मिळाले. त्याचक्षणी मान्यएल दुश सांतुश ह्यांना मडगावला पाठविण्याचा व महसूल खात्याच्या प्रमुखाला नद्यांचे रक्षण करण्यासाठी दोन गाली रवाना

करावयास सांगण्याचा हुकूम मी अॅज्युडंट जनरलना केला. महसूल खात्याच्या प्रमुखाने मला आज सकाळी सांगितले की, नौका आपल्या कामगिरीवर जाण्यासाठी तयार आहेत. बलून्स अॅज्युडंट जनरलच्या दिमतीखाली असून ते आपणाकडे ते उद्या पाठवून देतील.

ह्या राज्यातील लोक आपण ज्या ठिकाणी त्यांना जाण्याचा हुकूम करता तिकडे ते जात नाहीत हे पाहून मला फार वाईट वाटते. पण शत्रूच्या भयाने ते आपली वृत्ती सुधारतील अशी मला आशा वाटते.

माझा आपणाला असा सल्ला आहे की, आपल्या हाताखाली जे सैन्य आहे त्या सैन्यासह आपण बचावाचे युद्ध खेळावे. कारण सांप्रतच्या स्थितीत बचावाचे युद्ध खेळणे हाच शहाणपणा आहे असे माझे मत आहे. मी आपणाला पगारी सैनिकांची एक कंपनी पाठविण्याचा प्रयत्न करीत आहे. अर्थात ह्या मार्गात दक्षिणेकडील आरमारासंबंधीच्या काही अडचणी आहेत. पण त्या माफ करण्यासारख्या नाहीत. ह्यांची कारणे आपणाला माहीत आहेतच. त्याच प्रमाणे आपल्या आज्ञेप्रमाणे तीन कॅप्टन लेफ्टनंटस् तिकडे पाठवून देण्याचा मी हुकूम केला आहे. कारण अशा प्रकारचे अधिकारी इकडे पुष्कळ आहेत. आणि शेवटी ह्या प्रकरणी मला जे काय करणे होते ते मी केले आहे. आणि मला आशा आहे की, आपणाला जे काय करणे शक्य आहे ते आपण केल्यावाचून राहाणार नाही. मी गृहीत धरतो की, मुरगावला जी माणसे जायची होती ती आपण तिकडे रवाना केलीच असतील.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, २३ जानेवारी १७३९.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्रमांक १४९, पृ. ३००-३०१.

संपादक :—

A. B. DE BRAGANCA PEREIRA.

(149) CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 4, FLS 38V.

पत्र क्रमांक १५०

"आंतोनियु कार्दिम फ्रॉइश ह्यांस—

चालू परिस्थितीत मुरगाव हे एक महत्त्वाचे ठाणे असून ते आम्ही लढविले पाहिजे ह्याबद्दल आपले दुमत होणार नाही असे मी धरून चालतो.

तरी शत्रूने साष्टी प्रांतात प्रवेश केला असल्याने आपण मुरगावला त्वरीत निघून जाल अशी आशा आहे. आपला अनुभव मोठा असल्याकारणे मुरगावच्या किल्ल्यात आणि त्याचप्रमाणे ह्या बेटात ज्या उणीवा आहेत, त्या आपल्यामुळे भरून निघतील अशी मला आशा वाटते. ह्या कार्यामुळे आपण आमच्या स्वामीची मोठी सेवा करणार आहात हे आपणाला लिहिणे नलगे. आपण साष्टी प्रांताच्या सेनापतीच्या हुकूमावरून तिकडे जात नाही हेहीं आपण लक्षात घ्यावे".

पानेली, २३ जानेवारी १७३९.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V

पत्र क्र. १४९, पृ. ३०१

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(150) CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 24, FLS 39.

पत्र क्र. १५१

साष्टीचे सेनापती दों. लुईश कायतानु द आल्मैद ह्यांस—

आपण काल २३ रोजी रात्री अकरा वाजता लिहिलेली ही कटु बातमी मला त्याचवेळी माझ्या पुतणीच्या आगमनाच्यानंतर कळली. त्या प्रांतात काय चालले आहे ते आम्हाला इकडे काल संध्याकाळपर्यंत काहीं कळले नव्हते. तथापि, शत्रूचा प्रतिकार करणे आमच्या आवाक्याबाहेर असल्याने तो आपल्या इच्छेप्रमाणे त्या प्रांतात केव्हाहीं प्रवेश करू शकेल हे आम्ही जाणून होतो. मुलकी लोकांना इशारा दिला असताहीं त्यांनी आपला जीव आणि चीजवस्तू सांभाळण्याकरता जी धावपळ केली, ती योग्य नाही. तथापि, ही चूक आता सुधारणे शक्य नाहीं. परंतु शत्रूने त्या ठाण्यावर हल्ला केला नसल्यास मुलकी लोकांना पुन: तिकडे जाता येईल.

मी आपणाला पायदळाच्या एका कंपनीची व दोन गालिबांची कुमक पाठविण्याचा हुकूम केला आहे. ह्या युद्धनौका तिकडे आज पोहोचण्याकरता शिडे सोडणार आहेत. आणि मला माहीत आहे कीं, काहीं खासगी स्वयंसेवक आणि अधिकारी तिकडे जाण्याकरता आज रात्रीं निघणार आहेत. आणि जर सर्वजण तिकडे गेले आणि मुलकी माणसे त्या ठाण्यात प्रवेश करण्याच्या मन:स्थितीत असली, तर देव आम्हाला आमच्या संरक्षणाच्या कामी

मदत केल्यावाचून राहाणार नाहीं, अशी मला आशा आहे. आणि कुकळ्ळीच्या कॅप्टनने आपणाला जे पत्र लिहिले आहे की, जे आपण माझ्याकडे आपल्या पत्रासमवेत पाठविले आहे, त्या पत्रातील निर्धारावरून कुकळ्ळीलाही शत्रूचा चांगलाच प्रतिकार होईल अशी मला आशा वाटते. मडगावविषयी मला हा आत्मविश्वास वाटत नाहीं. पण मी आपण पाठव म्हणून सांगितलेला अधिकारी तिकडे पाठवीत आहे. मुरगावच्या ठाण्याचे कॅप्टन ज्युआंव वापीसा हे म्हातारे आणि पायाने अधु असल्याकारणे आणि ते ठाणे मोक्याचे आहे, म्हणून मी तिकडे आंतोनिक कार्दिम फ्रॉइश ह्यांची रवानगी केली आहे, आणि ज्याअर्थी, आपणाला त्या ठाण्यास आज्ञा करता येणार नाही, आणि केल्या तर ते त्यांची अंमलबजावणी करणार नाहीत, त्याअर्थी आपण त्या ठाण्यापासून अलिप्त रहावे. केवळ सर्वांच्या कल्याणासाठी आपण तेवढ्यापुरती आपल्या अधिकाराला मुरड घालावी.

पाद्री दुरूर्ची हे तिकडे पोहोचले आहेत की काय ते आपण मला कळवावे. कारण ते तिकडे गेले नसल्यास मला झुजेलोपिश् ह्यांना तिकडे पाठवायचे आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, २४ जानेवारी १७३९.

कौंट द सांदोमिल

पत्र क्र. १५१, पृ. ३०२—३०३

A. P. O., TOMO I, VOL III, PART V

संपादक :

A B DE BRAGANSA PEREIRA

(151) LIVRO DE CARTAS E ORDENS PORTARIAS, No 24, FLS 38

पत्र क्र. १५२

व्हाइसरॉय आरमाराच्या दर्यासारंगाला गोवा बेटात मराठ्यांनी प्रवेश करू नये म्हणून काळजी घेण्याचा इशारा देतो.

"आरमाराचे सेनापती अंतोनियु द फिगेरेदु इ उत्र ह्यांस—

मराठ्यांनी साष्टी प्रांतात प्रवेश केला असून ह्या बेटातही प्रवेश करण्याचा त्यांचा बेत आहे ह्याची आपणाला कल्पना नसावी असे मला

वाट नाही. म्हणून रात्रीच्या वेळी नद्यामध्ये कुंभारजूवे बेटापासून सांथिआतपर्यंत टेहे णी आणि गस्त सुरू झाली पाहिजे अशी माझी आपणाला सूचना आहे. तरी महाराजांच्या सेवेसाठी आपण बलून्सच्या तुकड्यांसह आळीपाळीने टेहेळणीचे आणि गस्तीचे काम करावे. बून्सची यादी मी आपणाकडे पाठवीत असून त्यांचे प्रमुख म्हणून आपली नेमणूक करीत आहे. सायंकाळी सहा वाजता दावजीच्या (?) धक्यावर सर्व बलून्स गोळा करण्यात यावे. आज रात्री पहाऱ्यावर मोठा भर देणे सोयीचे आहे. ह्याच कामासाठी मी आपल्या दिमतीला दुसरी तुकडीही देत आहे. दुसऱ्या यादीवरून आपणाला त्याची कल्पना होईलच. टेहेळणीचे आणि पहाऱ्याचे काम ह्या दोन्ही तुकड्यांनी रात्रीच्यावेळी आळीपाळीने करावे. एकेरात्री आपल्या तुकडीने आणि दुसऱ्या रा अॅड्मिरलच्या तुकडीने.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

पानेली, २४ जानेवारी १७३९

कोंट द सांदोमिल

पत्र क्र. १५२, पृ. ३०३.

. P. O., TOMO I, VOL III, PART V

पादक :

A B DE BRAGANSA PEREIRA

(152) CARTAS E ORDENS PORTARIAS, No 24, FLS 40

पत्र क्र. १५२

व्हाइसरॉय आग्वादच्या किल्लेदारास पुढील सूचना देतो.

"आग्वादचे कॅप्टन झुजे फेरेरेरा पेस्ताना ह्यांस--

आग्वादच्या किल्ल्यात ज्या माणसांची नेमणूक करण्यात आली आहे, त्यांना नेण्याकरता त्या किल्ल्याच्या कॅप्टनला पाठविण्यात येत आहे. ह्या माणसांनी त्यांच्या खेड्यात जी बेगमी असेल ती आपणाबरोबर न्यावी. बेगमी बरोबरच त्यांनी आपल्या मौल्यवान वस्तूही न्याव्या. कारण रासई येथे जे काय घडले ते तिकडे घडू नये अशी माझी इच्छा आहे. रासई येथे शत्रूने प्रांतांत प्रवेश केल्यावर लोकांची अन्नधान्य आणि मौल्यवान वस्तू आपणाबरोबर नेण्याची धावपळ सुरू झाली. पण त्यांना ह्या दोन्हींपैकी एकाही गोष्टीचा बचाव करता आला नाही. आग्वादच्या कॅप्टनला माझी सूचना आहे की, जे लोक आपणाबरोबर अन्नधान्य नेणार नाहीत त्यांना त्यांनी किल्ल्यामध्ये

घेऊ नये. मी इकडून जो धान्यपुरवठा आणि शार जीवनोपयोगी वस्तू पाठवित आहे त्या फक्त किल्ल्याचे रक्षण करणारांसाठीच आहेत ".

पानेली, २४ जानेवारी १७३९.

कौंट द सांदोमिल

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १५५, पृ. ३०५--३०६

संपादक :

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(155) CARTAS E ORDENS PORTARIAS

पत्र क्र. १५८

व्हाइसरॉय गोवा बेटांतील प्रजेला उद्देशून खालील जाहीरनामा काढतो.

"मी पेद्रु मास्कारेन्यास कौंट द सांदोमिल, महाराजांच्या सल्लागार मंडळाचा सदस्य आणि व्हाइसरॉय व हिंदुस्थानचा कॅप्टन जनरल, वगैरे.

मला असे कळले आहे की, मराठ्यांनी साष्टी प्रांतावर स्वारी केली आहे. पण त्यामुळे गोवा बेटातील प्रजेने काळजी करण्याचे कारण नाही. आणि जरी त्यांना काळजी वाटत असली, तरी मी त्यांना आज्ञा करीत आहे की, त्यांनी घाबरून न जाता आपल्या घरात रहावे. कारण शत्रूने जर गोवा बेटावर स्वारी करण्याचा प्रयत्न केला, तर राजवाड्यावर आणि गोवा बेटात इतर भागात जे माझ्या हाताखाली सैन्य आहे ते शत्रूचा पराभव केल्यावाचून राहाणार नाही, ह्याची मला खात्री आहे. लोकांनी शांत रहावे म्हणून हे प्रकरण सार्वजनिक ठिकाणी ह्या शहराच्या नेहमीच्या जागी व चोडणे बेटात दौंडी पिटून जाहीर करण्यात येत आहे. आणि जे अधिकारी ही दौंडी पिटतील ते त्याचा पुरावा ह्या राज्याच्या सचिवालयात सादर करतील ".

पानेली, २६ जानेवारी १७३९.

नामदार व्हाइसरॉय ह्यांची सही.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १५८, पृ. ३०७--३०८

संपादक :—

A. B. DE BRAGANSA PEREIRA.

(158) CARTAS E ORDENS PORTARIAS, No 24, FLS 49

पत्र क्र. १५९

व्हाइसरॉय बार्देशच्या सेनापतीला लिहिलेल्या पत्रात म्हणतो की, मराठ्यांचे गोव्यावर चाल करून आलेले सैन्य सहा हजारांहून अधिक नाही असे आपणाला कळले आहे.

"बार्देशचे सेनापती फ्रान्सिश्कु द मेलु ह्यांस—

आपल्या २५ तारखेच्या पत्राचे हे उत्तर आहे. मला मिळालेल्या बातम्यांवरून भोसले फोंडेचा किल्ला मराठ्यांच्या हवाली करण्यापलीकडे त्यांच्याशी आमच्याविरुद्ध सहकार्य करणार नाहीत असे मला वाटते. त्याच-प्रमाणे एका हिंदूकडून मला अशी विश्वसनीय बातमी कळली आहे की, साष्टी प्रांतात शिरलेल्या सैन्याशिवाय मराठ्यांचे आणखी सैन्य घाटाखाली नाही. आणि साष्टी प्रांतात शिरलेले सैन्य देखील दोन हजार घोडदळ आणि चार हजार पायदळ इतकेच आहे. आणि पायदळापैकीही दोन हजार खेडे आणि दोन हजार मुलकी आहे. जर शत्रुसैन्याची ही संख्या खरी असेल, तर त्याला बार्देश आणि गोवा बेटात हल्ला करता येईल असे मला वाटत नाही. आपण तटबंदीवर आणि खिंडीवर जे सैन्य ठेवले आहे, त्यावर आपण समाधान मानले असल्याचे पाहून मला आनंद झाला. सगळ्यांनी स्वखुषीने मदत केली पाहिजे. कारण आपल्या भूमीचे व घरांचे रक्षण करण्याचा हा एकमेव मार्ग आहे. गोऱ्या सैनिकांविषयी आपण जे लिहिता त्याबद्दल मला आश्चर्य वाटते. माझ्यापाशीच जर इकडे गोरे सैनिक नाहीत तर मग मी ते आपणाला कुठून पाठविणार? अशा परिस्थितीत आपल्या हाताखाली जी माणसे आहेत त्यांच्यावरच आपण संरक्षणाचा भर टाकला पाहिजे. माझ्यापाशी आपणाला कुमक पाठवायला माणसे नाहीत हे आपण लक्षात घ्यावे. माणसांप्रमाणेच किनाऱ्यावर गस्त घालण्यासाठीही तिकडे पाठविण्यास माझ्यापाशी गाली नाहीत. किनाऱ्याचे रक्षणही आपल्यापाशी जी साधने आहेत त्यांच्या बळावर आपण केले पाहिजे. शत्रूचे आगमन झाल्यावर साष्टी प्रांतातील मुलकी लोकांची पळापळ सुरू झाली, व अधिकाऱ्यांचे हुकूम धाब्यावर बसवून त्यांनी दंगल माजविली. त्यांच्या सेनापतीने त्यांना वारंवार हुकूम करून देखील त्यांनी धान्य आणि मौल्यवान वस्तू घेऊन रासईचा आश्रय घेतला नाही. त्याची परिणती ह्या वस्तू गमावण्यात झाली हे लिहिण्याची जरूरी नाही. साष्टीतील गोंधळाची पुनरुक्ति इकडे होऊ नये म्हणून मी आग्वादच्या कॅप्टनला लोकांना त्यांच्या किल्ल्याच्या आश्रयास त्यांच्या मौल्यवान वस्तू आणि धान्य घेऊन बोलविण्याचा हुकूम केला. जे लोक ह्या वस्तू आपल्याबरोबर घेऊन येणार

नाहीत त्यांना किल्ल्यांत प्रवेश द्यायचा नाही अशीही ताकीद मी त्यांना दिली आहे. कारण हे लोक चकमकीच्या वेळी ठाण्याचा आश्रय घेण्याऐवजी घरातून पळ काढतात. असे मुरगाव येथे घडले आहे.

खोरजुवे येथे मी दारू पाठवीत आहे.

देव आपले रक्षण करो, वगैरे".

कौंट द सांदोमिल

पानेली, २६ जानेवारी १७३९.

A. P. O., TOMO I, VOL. III, PART V.

पत्र क्र. १५०, पृ. ३०८—३०९

संपादक :

A. B. DE BRAGAN A PEREIRA.

(159) CARTAS E ORDENS PORTARIAS, No. 24, FLS 47.



शासकिय मध्यवर्ती मुद्रणालय मुंबई

# सूचि





व्ही ५५५८--३८

आ (चालू)

## आ (चालू)



## इ



## ऊ



## ए



## औ

औ (चालू)



क

## क (चालू)

## ग (चालू)



## घ



## च

## झ (चालू)



## ट



## ठ



## ड



## त

ड (चालू)



थ



द

व्ही ५५५८—४०

## म—(चालू)



## य



## र

स—(चालू)

स—(चालू)



ह





